॥ श्रीशंकर ॥

संतकवि श्रीदासगणूमहाराज : समग्र वाङ्मय

## खंड आठवा

# श्रीमदाद्य शंकराचार्य चरित्र
# व
# श्रीज्ञानेश्वर चरित्र

( महाकाव्य )



संपादक

अ. दा. आठवले





रामनवमी, शके १८८९

।। श्रीशंकर ।।

संतकवि श्रीदासगणूमहाराज : समग्र वाङ्मय

## खंड आठवा

# श्रीमदाद्य शंकराचार्य चरित्र
व
# श्रीज्ञानेश्वर चरित्र

(महाकाव्य )



मपादक

अ. दा. आठवले



रामनवमी, शके १८८९

प्रकाशक :
छ. मा. बारटक्के,
'श्रीगणुदासाश्रम,' गोरटा
उमरीमार्गे,
जिल्हा – नांदेड (मराठवाडा)

卐 卐



卐 卐

मूल्य रु. १०·००

卐 卐

मुद्रक :
श्री. मा. ह. पटवर्धन,
संगम प्रेस प्रा. लि.,
३८३ नारायण पेठ,
पुणे २.

॥ श्रीशंकर ॥

## संतकवि श्रीदासगणूविरचित

# श्रीमदाद्यशंकराचार्यचरितामृत

## अध्याय पहिला

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॐजयजयाजी सर्वाद्या । जयजयाजी अभेद्या । जयजयाजी सर्ववंद्या । स्वसंवेद्या पूर्णब्रह्मा ॥ १ ॥ तूं सच्चिदानंद आनंदघन । तूं अवघ्यांचें आद्य कारण । एकहि वस्तु नसे भिन्न । तुझ्यापून जगत्मया ॥ २ ॥ तुझी जी का आद्य शक्ति । जिला म्हणती प्रकृति । जिचें महत्त्व वाखाणिती । सांख्य आपुल्या ग्रंथांमध्यें ॥ ३ ॥ त्या कर्तृत्ववती प्रकृतीनें । [illegible] नटणें विश्वपणें । येतें झालें आविर्भावा ॥ [illegible] अथवा निर्गुण । तूंच असपी परिपूर्ण । येथें संशय घेणें नको ॥ ५ ॥ निर्गुण हें मूळ जरी । तें सगुणाविण न कळे परी । प्राण शिरतां शरीरीं । महत्त्व येतें तयाला ॥ ६ ॥ ऐसा जो तूं अचिंत्य । तो तूंच उमानाथ । पंढरीपति रुक्मिणीकांत । तूंच विधाता विरं[illegible] ७ ॥ सगुण साक्षात्काराविना । ब्रह्म प्रत्यया येईना । देहावांचून [illegible] बळ आत्मराजाचें ॥ ८ ॥ त्या तुझ्या प्राप्तीकारण । मी तुशीं मानितों सगुण । कैलासपति उमारमण । भाललोचन गंगाधर ॥ ९ ॥ तूंच देवा वैष्णवांसाठीं । प्रगटलास अक्षयवटीं । मूर्ति चतुर्भुज गोमटी । श्यामसुंदर मनोहर ॥ १० ॥ अग्निहोत्र्याकारण । तूंच अग्निनारायण । गाणपत्यांचा गजानन । सौरांकारणें सूर्य तूं ॥ ११ ॥ कोणतीहि उपासना । तुझ्यावांचून घडेना । हे नीलकंठा ! मदनदहना ! । पाहि मां दीनबधो ! ॥ १२ ॥ मी अजाण पापमति । तुज ठाउका पशुपति । जे का खरे थोर असती । ते न अव्हेरिती हीनांतें ॥ १३ ॥ चिखल अवघ्यांनीं तुडविला ।

तो गजराजें मस्तकीं धरिला । तैसें आपण विभूतीला । हीन असून स्वीकारिलें ॥ १४ ॥ त्याच न्यायें मजप्रति । हे भगवान दक्षिणामूर्ति । पदरीं घ्यावें शीघ्रगति । पापतापा निवारून ॥ १५ ॥ तुम्हीं केल्या अव्हेर । कोणापुढें पसरूं पदर । तूं करुणेचा सागर । मम दोषां पाहूं नको ॥ १६ ॥ जैसे सरितेसी सांठवण । नाहीं सागरावांचून । तैसे पातक्यालागून । चरणयुगुल देवा तुझे ॥ १७ ॥ तूंच केदार विश्वेश्वर । तूंच सोमनाथ ओंकार । महांकाल त्र्यंबकेश्वर । भीमाशंकर तूंच पैं ॥ १८ ॥ तूं औंढ्या-मराठारीं । नागनाथ त्रिपुरारि । वैजनाथ परळीपुरी । घृष्णेश्वर तूंच वेरुळांत ॥ १९ ॥ तूं मल्लिकार्जुन पार्वतीवर । तूं सेतुबंध रामेश्वर । पश्चिम समुद्र तीरावर । श्रीगोकर्ण तूंच कीं ॥ २० ॥ तूं शंभु महादेव शिंगणापुरीं । तूं कोटेश्वर कृष्णातीरीं । गोदाप्रवरासंगमावरी । सिद्धेश्वर तूंच कीं ॥ २१ ॥ तो तूंच देवा पंढरपुरीं । उभा सतत विटेवरी । कटीं कर तो अत्यादरीं । ठेवूनिया पांडुरंगा ! ॥ २२ ॥ दशअवतारधरिता । तूंच कीं रे अनंता ! । संतप्रिया पंढरिनाथा ! । माझी उपेक्षा करूं नको ॥ २३ ॥ विघ्ने करण्या निवारण । तूंच झालास गजानन । सिंदुरासुरा मर्दून । भक्त सुखी केले तुवां ॥ २४ ॥ कार्यारंभ कोणताहि । तुझ्या अभावीं होत नाहीं । हे महापुत्रा ! म. [illegible] वरद कर ॥ २५ ॥ तुझा लाभतां वरद कर । संक. [illegible] शवटीं साचार । कार्य माझें जाईल ॥ २६ ॥ मी अनन्य भावें तुजप्रति । शरण आहें गणपति । हृदयीं माझ्या करून वसती । वदवी आचार्यचरितामृता ॥ २७ ॥ देवा ! तुझ्या कृपेंकरून । झालें संत-चरित्रांचें लेखन । आतां करितों अवगाहन । आचार्य-चरित्र-गंगेंत या ॥ २८ ॥ श्रीमद [illegible] थोर विभूति । जे संतसम्राट निश्चितीं । जे ज्ञानांबरीचे गभस्ति । उदे[illegible] [illegible]-खंडांत ॥ २९ ॥ त्या आचार्यचरितामृता । साह्य करावें गणनाथा ! । सर्व दिशांनीं समर्था ! । हीच तुझी याचना ॥ ३० ॥ दासगणू ही लेखणी । करीं आपुल्या धरोनी । लिहवावी प्रसादवाणी । संतमहंतां पटेलशी ॥ ३१ ॥ हे श्रीसरस्वती शारदे ! । हे कविवरांचे आराध्ये ! । तुझा अभयपाणि असूं दे । दासगणूच्या मस्तकीं ॥ ३२ ॥ तूं शब्दसृष्टीच्या ईश्वरी । अवघें चातुर्य तुझ्या करीं । ती तूं बसून जिव्हाग्रीं । माझ्या, चरित्र वदवी हें ॥ ३३ ॥ मोठमोठ्या कवींनीं । तुजला अंबे ! जोडिले पाणि ।

तेव्हांच त्यांची प्रसादवाणी । विबुधमान्य झाली असे ॥ ३४ ॥ जगीं जेवढें चतुरपण । तेवढें तुझी मूर्ति जाण । वाग् विलासाकारण । तुझ्यावांचून स्थान नसे ॥ ३५ ॥ व्यास वाल्मीकिप्रभृति । यांनीं स्तविलें तुजप्रति । तीच वहिवाट निश्चितीं । ठेविली गीर्वाण कवींनीं ॥ ३६ ॥ त्याच न्यायें तुझें भलें । मींहि स्तवन मांडिलें । आतां कृपाळू हो माउले ! । दासगणूला विसरूं नको ॥ ३७ ॥ मी तुझें अजाण पोर । परी जगतीं होईन थोर । छाया कृपेची असल्यावर । तुझी मजवरी जगदंबे ! ॥ ३८ ॥ जे जे जगीं थोर असती । ते ते कदा न परतविती । निज दारींच्या याचकाप्रति । हें ध्यानांत असूं दे ॥ ३९ ॥ मी दारींचा याचक । मला न लावी विन्मुख । सत्कृपेची घाल भीक । अंबे ! दासगणूला ॥ ४० ॥ आतां कुलाची कुलस्वामिनी । कमला कोल्हापुरनिवासिनी । अत्यादरें जोडून पाणि । वंदितों प्रसाद मिळावया ॥४१॥ तव कृपेचा वरद कर । ठेवी मम शिरावर । हीच आहे पसरून पदर । तुज जगदंबे ! याचना ॥ ४२ ॥ हे तुळजे अपर्णे भवानी । शिवप्रिये जगज्जननी । या आचार्यचरित्रालागूनि । साह्य आपुलें असावें ॥ ४३ ॥ आतां वंदन दत्तात्रेया । कृष्णातटनिवासिया । [illegible] जेजुरीच्या मालुराया । हे भैरवा पावा [illegible] कृपेंकरून । आचार्यचरित्राचें लेखन । मी [illegible] माझ्या असावें ॥ ४५ ॥ आतां वंदूं संतमहंत । रामदासस्वामी समर्थ । ज्ञानेश, निवृत्ति, एकनाथ । श्रीतुकाराममहाराज ॥ ४६ ॥ आधुनिक संतचूडामणि । श्रीसांईबाबा ज्ञानखनि । श्रीवा[illegible]शास्त्री यांचे चरणीं । असो माझा नमस्कार ॥ ४७ ॥ तुम्हां अव[illegible] कृपेची । याचना मीं केली साची । पुरवा आस मनींची । लि[illegible] आचार्यचरितातें ॥ ४८ ॥ जे श्रीशंकराचार्य जगद्गुरु । पदनतांचे कल्पतरु । अध्यात्म विद्येचे मेरु । वेदरहस्यप्रतिपादिते ॥४९॥ ज्यांनीं चार्वाकमतखंडन । परमचातुर्येंकरून । प्रस्थानत्रयींचें महत्त्व पूर्ण । निवेदिलें जगताला ॥ ५० ॥ जो भगवान् शंकराचा । अवतार होय प्रत्यक्ष साचा । त्या ज्ञाननभींच्या दिनकराचा । प्रभाव वानूं कोठवर ॥ ५१ ॥ मागें महिपति नामें कविवर । ताहाराबादेंत झाला थोर । ज्यानें संतचरित्रात्मक साचार । प्रसादिक ग्रंथ लिहिले ॥ ५२ ॥ त्या महिपति नामें कविवरा ! । तूं भेटलासजगदुद्धारा । हा इतिहास

साजिरा । माझ्यासमोर ठेविला मीं ॥ ५३ ॥ आणि महिपतीनंतर । जे जे झाले साधुवर । त्यांच्या चरित्रांचा विस्तार । तीन ग्रंथांत केला मी ॥ ५४ ॥ भक्तलीलामृत अर्वाचीन । द्वितीय संतकथामृत जाण । पांडुरंगा ! तृतीय स्थान । श्रीभक्तिसारामृतातें ॥ ५५ ॥ या तिन्ही ग्रंथांमाझारीं । वर्णिले मीं साक्षात्कारी । दांभिकाला ठेविलें दुरी । विटाळ त्यांचा न होऊं दिला ॥ ५६ ॥ परि न तुझी भेट झाली । चित्ता तळमळ लागली । कीर्तनोपयोगी रचिलीं । नाना संतचरित्रें ॥ ५७ ॥ श्रीअध्यात्माचे ग्रंथ । पासष्टी अनुभवामृत । तिसरें तें शांडिल्यसूत्र । तेविं भक्तिसूत्रें नारदाचीं ॥ ५८ ॥ गुरुचरित्रसारामृत । तेवीं ब्रह्मपुराणांतर्गत । जे देवा ! गौतमीमाहात्म्य । तेंहि रचिलें सिंहस्थीं ॥५९॥ स्तोत्रें नाना देवतांचीं । रचिलीं अन्य अन्य प्रकारचीं । धरून आस प्राप्तीची । तुझ्या कीं हे जगत्पाला ॥६०॥ चरित्र गजानन साधूचें । तैसें श्रीमध्वाचार्यांचें । आणि माहात्म्य शनीचें । तुकतेंच देवा गाइलें मीं ॥ ६१ ॥ चौसष्टांचें उद्धवागमन । श्लोकबद्ध लिहिलें जाण । भाष्यावरी व्याख्यान । केलें गायत्रीमंत्राच्या ॥ ६२ ॥ वि[illegible]सहस्रनामबोधिनी ग्रंथ । जो मीं लिहिला प्राकृतांत । तुझ्या प्राप्तीप्रीत्यर्थ । [illegible] व्यर्थ झाला कीं ॥ ६३ ॥ प्रसंगानुरूप स्फुट कविता । बहुत लिहि[illegible]प्ति अनंता । कां न तुझी झाली मज ? ॥ ६४ ॥ [illegible]दर्कास । काव्येच तूं भेटलास । ऐकून अष्टपदीस । जयदेवासी उद्धरिलें ॥ ६५ ॥ जगन्नाथ पंडिताचा । उद्धार काशींत झाला साचा । ग्रंथ बिल्व मंगलाचा । राधाराम आवडला तुज ॥ ६६ ॥ तुलसीकृत रामायणा । पाहून [illegible] आनंद मना । झाला कीं रे मनमोहना ! । ऐसा काव्यप्रेमी तूं [illegible] ॥ नामा, मुकुंद, ज्ञानेश्वर । जनी, गोरा, चोखा महार । ज्यानें [illegible]वलें गोदातीर । तो एकनाथ पांडुरंगा ॥ ६८ ॥ मुक्तेश्वर, महिपति, श्रीधर । तैसा सरस्वतिगंगाधर । ऐसे नाना कविवर । काव्येच पावले त्वत्पदा ॥ ६९ ॥ म्हणून मीं ही परिपाठी । तीच धरिली शेवटीं । तुझ्या प्राप्तीस्तव जगजेठी । त्या ऐकून इतिहासा ॥ ७० ॥ आतां त्यांच्या काव्यापरी । काव्य माझें न श्रीहरि । याची पूर्ण अंतरीं । आहे माझ्या जाणीव ॥ ७१ ॥ शंकरांनीं नृत्य केलें । तें भूतांनीं पाहिलें । आणि आपणहि नाचूं लागले । तैसी गति झाली मम ॥ ७२ ॥

ते सर्व प्रासादिक कविवर। साक्षात् भगवान् शंकर। मज भूतासी न येणार। त्यांची सरी केव्हांहि ॥ ७३ ॥ परि मम वाणीचा उपयोग भला। तुझ्यास्तव असें झाला। नाहीं शास्त्रविषय प्रतिपादिला। वाणी हीन म्हणून ॥ ७४ ॥ जे जे भाविक श्रीमंत। देवा तुझे झाले भक्त। त्यांनीं त्यांनीं तुजप्रत। नैवेद्य पक्वान्नें अर्पिलीं ॥ ७५ ॥ म्हणून कां गरिबांनीं। पक्वान्न अशक्य म्हणोनि। द्यावें सांग सोडूनि। नैवेद्य तुजला दावणें ? ॥ ७६ ॥ जी असेल भाजीभाकर। तीच देवा जोडून कर। नैवेद्य दावणें साचार। आहे सर्वस्वीं भाग पाहा ॥ ७७ ॥ त्या भाजीभाकरीपरी। ग्राम्य वाणी माझी खरी। ती तूं देवा सेविल्यावरी। आनंद होईल मनातें ॥ ७८ ॥ शिवाय तुजला विशेषण। आहे दीनानाथ म्हणून। त्याची असूं दे आठवण। या दीन दासास्तव ॥ ७९ ॥ नाले ओढे क्षुद्र सरिता। गोदेलागीं मिळूं जातां। काय गंगा पंढरिनाथा। तयालागीं अव्हेरितें ? ॥ ८० ॥ या ओढ्या-नाल्यांपरी। मी असें गा दानवारि ! । काव्य माझें त्यांतील वारि। नाना दोषांनीं व्याप्त असे ॥ ८१ ॥ ऐसें जरी अशुद्ध वारि। तरी तव स्तव गोदावरी। तिसीं जाऊन मिळाल्या हरि। सेव्य [illegible] भाविकां ॥ ८२ ॥ म्हणून माझी उपे[illegible]। आपुला मोठेपणा राखा। मशी आश्रय [illegible] ॥ ८[illegible] ॥ ये ग्रंथीच्या वर्ण्यविषया। नमन माझें तुला सदया। तुला सर्वांगें नटवावया। मी खचित समर्थ नसें ॥ ८४ ॥ मी नाहीं विद्वान। नाहीं मशीं भाषाज्ञान। यावनी शब्द मधुनमधून। येती [illegible] कीं बहुसाल ॥ ८५ ॥ यांत माझा दोष नाहीं। तो संगतीचा गुण [illegible]। स्वभाषेचा मलाहि। आहे अभिमान हें खरें ॥ ८६ ॥ शब्द शोधण्या जरी जावें। तरी सहजतेला मुकावें। डोकें खाजवीत बसावें। लागेल मशीं दयाळा ! ॥ ८७ ॥ म्हणून मी त्या फंदांत। पडायासी न इच्छीत। सावधगिरी थोडी बहुत। ठेवीन यावनी शब्दांविषयीं ॥ ८८ ॥ आतां म्हणशील जगद्गुरूंचें। चरित्र श्रेष्ठ संन्याशाचें। तेथें यावनी शब्दांचें। मिश्रण नाहीं उपयोगी ॥ ८९ ॥ परि हें म्हणणें इतर ठायीं। उचित ऐसें होईल पाही। जगद्गुरूच्या चरित्राठायीं। याचें महत्त्व कांहीं नसे ॥ ९० ॥ कां कीं जगद्गुरूंचा। अद्वैत सिद्धांत साचा। प्रकार अजादुजाचा। द्वैतामाजीं मोडेल ॥ ९१ ॥ तूं सर्वांग-

सुंदर। त्या तुझ्या देहावर। मम वाणीचे अलंकार। घालितों तें मान्य करी ॥ ९२ ॥ कां कीं भूपतीचिया भाळां। जरी चिखलाचा लाविला टिळा। तरी कस्तुरी तियेला। जगतीं लोक लेखतील कीं ॥ ९३ ॥ गंगेस मिळतां ओहळ। तीर्थरूप होतो सकळ। कांचनाचा जातो मळ। संबंध झाल्या अग्नीचा ॥ ९४ ॥ तेवीं तव ठायींची पवित्रता। तीच अग्नि सर्वथा। मम वाणीचा तत्त्वता। दोष तो जाय सकळ ॥ ९५ ॥ आद्य जगद्गुरूंचें। म्हणजे श्रीशंकराचार्य स्वामींचें। मोठमोठ्या कवींनीं साचे। चरित्र गायन केलें कीं ॥ ९६ ॥ विद्यारण्य, आनंदगिरी। चिद्विलास, सदानंद त्याचपरी। यांनीं गीर्वाणाभीतरीं। श्रीचीं चरित्रें गायिलीं ॥ ९७ ॥ चित्सुखाचार्य, गोविंदनाथ। राजचूडामणि दीक्षित। वल्लिसहाय पंडित। तेवीं अनंतानंदगिरी ॥ ९८ ॥ ऐशा थोर थोर विद्वानांनीं। वाङ्मयाच्या सहाय्यांनीं। चरित्रें ठेविलीं लिहूनि। श्रीमत् आचार्यस्वामींचीं ॥ ९९ ॥ आठल्ये, बोडस, क्षीरसागर। यांनीं श्रींचे गद्यमंदिर। प्राकृतामाजीं साचार। बांधूनिया ठेविलें कीं ॥ १०० ॥ ज्ञानेश्वरादि संतांनीं। गौरवीलें आचार्यालागूनि। आपुल्या मधुर वाणीनीं। तें येथें सांगू किती! ॥ १०१ ॥ पूर्वकीच्या राजांनीं। स्मारकें ठेविलीं बांधूनि। आचार्यांच्या नांवानीं। पुढं [illegible] २ ॥ अलीकडच्या भूपा भलें। धर्माचें वावडें [illegible] वलिं। कांहीं उदार सावकार ॥ १०३ ॥ नुकतेच खानदेशांत। अमळनेर नामें ग्रामांत। आचार्यांचें मंदिर सत्य। बांधण्यासी आरंभ झाला ॥ १०४ ॥ तो अमळनेरचा सावकार। 'प्रतापशेठ' नामें थोर। कर्णापरी उदार। याच्या औदार्या जोड नसे ॥ १०५ ॥ ही त्या प्रतापशेठाची श्रींचे मंदिर बांधण्याची। गोष्ट मीं ऐकिली साची। लोणावळ्यास त्यांच्या मुखीं ॥ १०६ ॥ त्या प्रतापशेठापरी। श्रींचें मंदिर भूमीवरी। बांधण्याची शक्ति खरी। नाहीं माझ्या अंगांत ॥ १०७ ॥ म्हणून हें मी 'शब्दमंदिर'। श्रींचे बांधितों साचार। विश्वासून तुझ्यावर। हे पार्वतीपरमेश्वरा! ॥ १०८ ॥ तें आपण शेवटा न्यावें। साह्य माझें करावें। आचार्यचरित्र वदवावें। माझ्या मुखें मराठींत ॥ १०९ ॥ हेंच आहे मागणें। तें या दासगणूस देणें। लेंकराचा अभिमान धरणें। दोष माझा पाहूं नका ॥ ११० ॥ इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत।

होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १११ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय दुसरा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय पूर्णब्रह्मा सनातना । अज अजित नारायणा । ओंकाररूपा आनंदघना । सर्वसाक्षी विश्वपते ! ॥ १ ॥ तुझें सहाय्य असल्यावरी । काय एक न होय हरि । शिला तरल्या सागरीं । वानरांच्या हस्तांनीं ॥ २ ॥ मी सर्वतोंपरी हीन दीन । आचार्यचरित ज का गहन । त्याचें कराया लेखन । इच्छा चित्तीं उदेली ॥ ३ ॥ ती अवघी पूर्ण व्हाया । तुझी कृपा पाहिजे सदया । हे भक्तवत्सला ! पंढरीराया । चरित्र-लेखना साह्य करी ॥ ४ ॥ आतां श्रोते सावधान । कथा ही ऐका पुरातन । अभक्त झाले अवतीर्ण । वेद खोटा ठरवाया ॥ ५ ॥ जे वेद परमेश्वराचे । श्वासापासून झाले साचे । ऋग्यजुसाम नांवांचे । सनातन धर्मा मूळ जे ॥ ६ ॥ कर्म, उपासना [illegible] ज्ञान । हीं वेदांनींच केलीं कथन । जगाचें [illegible] शंका नसे ॥ ७ ॥ त्या सर्ववंद्य वेदांवरी [illegible] ाली स्वारी । शब्दछलाचे घेऊन करीं । शस्त्र आपुल्या विबुध हो ॥ ८ ॥ हें ऐसें व्हाया भलें । कारण तें एक झालें । ऐहिक सुखा हपापले । लोक सारे जगतीतला ॥ ९ ॥ म्हणून कर्ममार्गाची । प्रवृत्ति झाली जोरांत साची । महती यज्ञयागांची । सहज वाढूं लाग[illegible] कीं ॥ १० ॥ ज्ञान आणि उपासना । यांस आला उणेपणा । शिंदी ताडी पटल्या मना । महती पयाची कोण मानी ? ॥ ११ ॥ कावळ्यांचे सभेसी । कोण विचारी कोकिलेसी ? । संबंध येतां माकडासी । रत्न हीन ठरतसे ॥ १२ ॥ तैसें तेधवां झालें । कर्मकांडा महत्त्व आलें । परि कर्म न होई सांग भलें । म्हणून फळ येईना ॥ १३ ॥ श्रोते कर्मकांडांत । राहिली पाहिजे कडक शिस्त । ती बिघडवितां यत्किंचित । परिणाम भलता होतसे ॥ १४ ॥ जनमनाच्या कामना । पुरवावयाप्रति जाणा । कर्मकांडाच्या शोधना । विद्वान् करूं लागले ॥ १५ ॥ माजले यज्ञावडंबर । तत्त्व पळालें बहु दूर । समाज झाला बेजार । त्या शुष्क

इष्टीनें ॥१६॥ कृतात्रेताद्वापारीं । लोक होते सदाचारी । ते एकेक पायरी । कर्मभक्तीची चढत होते ॥ १७ ॥ कलियुगाच्या आरंभाला । या क्रमाचा लोप झाला । नुकताच होता लागला । शक युधिष्ठिर राजाचा ॥ १८ ॥ रहस्याविण कवाईत । कर्मी राहिली जागृत । रस कां हो होईल प्राप्त । फळापून गोकाकच्या ? ॥ १९ ॥ पात्र नदीचें पाण्याविण । अथवा वृक्ष पर्णांवांचून । किंवा इंदुअभावीं गगन । मान्यता न पावे कदा ॥ २० । कोणत्याहि गोष्टीचा । अतिरेक तो झाल्या साचा । त्याचा आहेच व्हाव याचा । बोजवारा तो केव्हांहि ॥ २१ ॥ असो या न्यायें कर्माप्रत ओहोटी लागली समाजांत । कर्मकांडीं यत्किंचित । श्रद्धा न बसे कवणाचे ॥ २२ ॥ ही श्रद्धा न बसण्यास । अभक्त कारण झाले खास । तशा विद्वत्तेनें त्यास । थोडाबहुत हात दिला ॥ २३ ॥ या नास्तिकांचा शिरो मणि । जन्म घेवोनि आला अवनीं । अवंति देशामाजी जाणी । शंखोद्धा क्षेत्रामध्यें ॥ २४ ॥ इंदुकांत-सृग्विणींपासून । चार्वाकाचे झालें जनन सातव्या शतकामाजी जाण । सम्राट युधिष्ठिराच्या ॥ २५ ॥ तैल बु चावार्काची । श्रोते अत्यंत होती साची । भाषाशैली जयाची । होती अ पम मनोरम ॥ २६ ॥ चारु म्ह..ने सुंदर । वाणी ज्याची असे फार ऐसा जो असे नर । चारुवाक् म्हणतां ... हें चार्वाक नां त्याचे । द्योतक त्याच्या विद्वत्तेचें । अथव. ... ले । ये ॥ २८ ॥ हें कांहीं न सांगवत । मात्र तो होता प्रख्यात । चार्वाक ना जगतांत । येविषयीं शंका नसे ॥ २९ ॥ या चर्वाकामागून । तैसेच झा सहा जण । वेदद्वेष्टे परिपूर्ण । वेदविद्या विध्वंसिते ॥ ३० ॥ वैशाख शु पौर्णिमेला । चार्वाक हा जन्मा आला । वेद खोटा ठरविण्याला ... कं त्याने बांधिली ॥ ३१ ॥ त्या चार्वाकाचे जें का मत । तें थोडक्य सांगतों येथ । तुम्ही ऐकावें सावचित्त । तो निरीश्वरवादी असे ॥३२॥ ईश हा मुळींच नाहीं । परलोक हा पदार्थ कांहीं । अंशहि खरा नाहीं नरकयातना भ्रामक ॥ ३३ ॥ एकमेकांत पंचभूतें । मिळतां जग प्रत्य येतें । गुलाबी रंग धारण करितें । हळद चुना मिसळल्यावरी ॥३ त्या हळदचुन्यांच्या रंगापरी । देहाची स्थिति आहे खरी । चैतन्य जे अंतरीं । तें मद्याच्या कैफासम ॥ ३५ ॥ पापपुण्यांची कल्पना । मुळ आहे खोटी जाणा । या लोकींच्या यातना । बागुलबुवा निःसंशय ॥३

धर्म धर्म ज्याला म्हणती । तें थोतांड निश्चितीं । या भटांनीं आपुली महती । वाढवावया निर्मिलें तें ॥३७॥ भोग्य आहे स्त्रीजात । भोक्तेपण पुरुषाप्रत । म्हणून अमकी अमक्याची म्हणण्यांत । अर्थ काय सांगा हो ? ॥ ३८ ॥ भोग्य वस्तु भोगण्या देखा । अधिकार सर्वांस सारखा । वेदांवर ठेवूं नका । विश्वास तो थोडाहि ॥ ३९ ॥ मृतालागीं पिंडदान । श्राद्ध केल्या पोचतें जाण । हें केवढें मूर्खपण । याचा विचार कांहीं करा ॥ ४० ॥ घृत ओदन अग्नीमाजी । जाळतां देव राहती राजी । ही केवळ बुवाबाजी । अर्थ यांत कांहीं नसे ॥ ४१ ॥ हें चार्वाकाचें मत । होऊं लागलें पसंत । तुटपुंज्या विद्वानांप्रत । श्रोते त्या पूर्वकाळीं ॥४२॥ येतां मास फाल्गुन । मुदित मनापासून । होती स्वैराचारी जन । हें ध्यानांत असूं द्या ॥ ४३ ॥ तैसेंच तेधवां झालें । चार्वाक मत बळावलें । पुसतां न सांगतां आलें । यज्ञरहस्य याज्ञिकां ॥ ४४ ॥ त्यांना पाठ कवाईत । अर्थ-दृष्टि न यत्किंचित । कर्याविषयीं मनांत । श्रद्धा मुळींच नव्हती ॥ ४५ ॥ या यज्ञांचे प्रकार । सांगावें तरी कोठवर ? । अश्वमेध भराभर । राजे करूं लागले ॥ ४६ ॥ वैभ[illegible] आपुलें वाढवावें । अवघ्या लोकांस जिंकावें । दास करून [illegible] । यासाठीं करणे तो ॥ ४७ ॥ जैसें सांप्रत [illegible]त । आधिभौतिक शोध बहुत । प्राणांताचे [illegible] ॥ ४८ [illegible] अश्वमेधाची । तऱ्हा तेधवा होती साची । शकलें आर्यावर्ताचीं । आधींच पडलीं होतीं कीं ॥ ४९ ॥ आंध्र, केरल, कोसल । मगध, वंग, नि मैथिल । महाराष्ट्र, कर्नाटक, सिंहल । गुर्जर, कांबोज इत्यादि ॥ ५० ॥ ऐशा भूपांलागी भले । अश्वमेधाचें वेड लागलें । तेणें सह[illegible] फावलें । उपाध्याय वर्गाचें ॥ ५१ ॥ कांहीं क्रूर देवता जाण । ध्याया प्रसन्न करून । त्यांच्या नांवांनीं तें यजन । सबलि होऊं लागलें ॥ ५२ ॥ मजल या काम्य यज्ञांची । नरमेधापर्यंत साची । येऊन ठेपली समाजाची । घडी झाली विस्कळित ॥ ५३ ॥ त्यायोगें ऐसें झालें । सात्त्विक देव मागें पडले । उपनिषद्-रहस्य मावळलें । सुळसुळाट कर्मकांडाचा ॥ ५४ ॥ त्या जगन्मान्य वेदाचें । कर्म हे पाय साचे । उपासनाकांड तयाचें । उदर म्हणणें भाग कीं ॥ ५५ ॥ उपनिषद् हृदय शिर । ऐसा सर्वांगसुंदर । वेद जो का पुरुष थोर । पक्षाघात त्यासी झाला ॥५६॥ उपासना तत्त्वज्ञान । निर्जीव बैसले होऊन । सुदृढ जरी होते चरण । तरी

ते झाले निरुपयोगी ।। ५७ ।। अवयव ते शरीराचे । निकोप असल्यावरी साचे । उत्तम आहे व्हावयाचें । कार्य जें का करणें त्या ।। ५८ ।। पक्षाघात झालेलें । शरीर निकामी सहज भलें । तयापरी तेधवां झालें । या वेदांचें विबुध हो ।। ५९ ।। कांहीं भाग वेदाचा । सम्मत आहे जया साचा । ऐसा पंथ सांख्यांचा । निर्माण केला कपिलांनीं ।। ६० ।। चोवीस तत्त्वांपासून । जग झालें निर्माण । तेवीस तत्त्वांचें जनन । झालें प्रकृतीपासूनी ।। ६१ ।। संबंध या जगताचा । ब्रह्मासी न कांहीं साचा । कां कीं बोध ब्रह्माचा । शब्दांनींच होतसे ।। ६२ ।। जेवीं सशाच्या शिंगाचे । खांब वाचारंभण साचे । ते न दाविता यावयाचे । यत्न कितीहि केला जरी ।। ६३ ।। तैशीच ब्रह्माची स्थिति । तंतोतंत निश्चितीं । जगा कारण प्रकृति । ब्रह्म म्हणणें थोतांड ।। ६४ ।। पुढें याच प्रकृतीला । सगुण वेष चढविला । आणि मानिलें तियेला । एक देवता शाक्तांनीं ।। ६५ ।। या शाक्त उपासनेंत । मांस मद्याचें स्तोम बहुत । माजतें झालें जगतांत । लोक नादीं लागले ।। ६६ ।। या शाक्तपंथेंकरून । अनाचार वाढला जाण । त्याचें करतां वर्णन । घाण मात्र सुटेल कीं ।। ६७ ।। जेवीं झांकण गटाराचें । कोण उघडण्या जाई साचें । निवासस्थानें [illegible]ाचें । कोण सांगा वाखाणी ? ।। ६८ ।। गाणपत्य पंथांत । सहा भेद [illegible]प्रत । महत्त्व विशेष या पंथीं ।। ६९ ।। हरिद्रा [illegible] नव[illegible] गणपति । तिसरा उच्छिष्ट गणपति । ऐसे भेद तेथे असती । परी ते अवघे भ्रामक ।। ७० ।। भुताखेतांच्या कल्पना । सुरू झाल्या असती जाणा । कांहीं ठिकाणीं भैरवांना । महत्त्व येतें जाहलें ।। ७१ ।। आतां कांहीं सात्त्विक । निघाल्या उपासना देख । ज्या पंथीं द्वैत झांक । उमटली होती चहूंकडे ।। ७२ ।। त्याचा कश्यप उत्पादिता । सदाचारी भाविक होता । त्यानें पोषक आपुल्या मतां । ऐसा ग्रंथ रचिला कीं ।। ७३ ।। तो भक्तिसूत्रें म्हणून । प्रख्यातीस पावला जाण । त्याचा वाहिला अभिमान । कांहीं पाहा विद्वानांनीं ।। ७४ ।। या अवघ्या सात्त्विक मतांप्रत । वेद होते सम्मत । पुढें झालें विपरीत । तें आतां अवधारा ।। ७५ ।। कांहीं अंशीं चार्वाकाला । सम्मत ऐसा निघाला । पंथ बुध हो जगतीतला । बौद्ध नांव जयाचें ।। ७६ ।। कोसल देशाभीतरीं । कपिलवस्तु नामें नगरी । तेथें मायादेवीचे उदरीं । शुद्धोदनापासून ।। ७७ ।। युधिष्ठिर शकाच्या

अमलांत। शके तेराशें बारांत। बुद्धदेव जन्माप्रत। आला लुंबिनी राईमध्यें ॥ ७८ ॥ हा श्रीविष्णूचा। अवतार होता साचा। त्यानें वेदबाह्य धर्माचा। पुरस्कार केला असे ॥ ७९ ॥ ऐसें कोणी म्हणतात। परि हें सर्वांशीं नसे सत्य। बुद्धानें थोतांड मत। जाणून बुजून प्रतिपादिलें ॥ ८० ॥ कां कीं मतामतांचा गलबला। होता चहूंकडे माजला। तोच बुद्धानें कळसाला। नेला असे मुद्दाम ॥ ८१ ॥ विरुद्ध एकाहून दुसरें। जेव्हां निर्माण होतें खरें। तेव्हांच मंथन साजिरें। करितां येतें विद्वानांना ॥ ८२ ॥ पाहा घुसळण्याच्या रवीप्रति। दांते विरुद्धाविरुद्ध असती। म्हणून नवनीताची प्राप्ति। होते घुसळण केल्यावरी ॥ ८३ ॥ तैसाच हाहि प्रकार। वाटे झाला साचार। बुद्धदेवाचा अवतार। निरर्थक झाला नसे ॥ ८४ ॥ वैदिक संस्कृति दूध भली। ती चार्वाकमतें दधि झाली। म्हणून पाहा पाळी आली। करण्या घुसळण तियेचें ॥ ८५ ॥ असो या बुद्धाचें। नांव सिद्धार्थ होतें साचें। तो निरीक्षण नगराचें। करण्या गेला एकदां ॥ ८६ ॥ तया-लागीं मार्गांत। एक भेटला जराग्रस्त। तैसेंच एक प्रेत। त्यानें पाहिलें निज डोळां ॥ ८७ ॥ या गोष्टींच्या विचारांत। गढून गेला सिद्धार्थ। त्यानें निजसारथी छंदाप्रत। कारणें [illegible]ां विचारिलीं ॥ ८८ ॥ छंद म्हणे राजपुत्रा !। [illegible] [illegible]स्था। भोगणें आहे तत्त्वता। प्रत्येक जी[illegible]स [illegible]ाचा विचार करितां। बाणली अंगीं विर-क्तता। राज्यवैभव, पुत्र, कांता। सिद्धार्थानें त्यागिलीं ॥ ९० ॥ अवसर पाहून एके दिवशीं। दोन प्रहर रात्रीशीं। कपिलवस्तु नगरीशीं। वंदन केलें अखेरचें ॥ ९१ ॥ जरा, जन्म आणि मरण। यांचें कारण शोधल्या-विण। मी न येईन परतून। या नगरीकारणें ॥ ९२ ॥ ऐसा विचार अंतरीं केला। घोड्यावरी स्वार झाला। सूं सूं करीत निघाला। वारु झंझावातापरी ॥ ९३ ॥ उलटून गेले दोन प्रहर। तमानें आक्रमिलें अंबर। वन्य पशूंच्या भयंकर। होऊं लागल्या गर्जना ॥ ९४ ॥ परि श्रोते सिद्धार्थ। मानसीं होता भयरहित। प्राची होतां आरक्त। आला भार्गवाश्रमातें ॥ ९५ ॥ एका व्याधाकारणें। आपुलीं राजभूषणें। देवोनिया सिद्धार्थानें। वस्त्र काषाय घेतलें कीं ॥ ९६ ॥ आराड-उद्रकांच्या जवळ। गौतम राहिला कांहीं काळ। परी मनाची तळमळ। गौतमाच्या निवेना ॥ ९७ ॥ हे आराड नि उद्रक। सांख्य मताचे होते देख। त्यांचीं मतें एकूण एक।

नाहीं पटलीं गौतमा ॥ ९८ ॥ पुढें निरंजना सरितातीरीं । गौतम आला सत्वरीं । तेथें बैसले होते कांतारीं । पांच भिक्षू तपाला ॥ ९९ ॥ त्यांच्या-परी देहदंडन । गौतमें पाहिलें करून । सहा वर्षें तेथें राहून । परि न निर्वाण कळलें तया ॥ १०० ॥ मग त्यानें केला सिद्धांत । देहदंडन आहे व्यर्थ । वेदें पाडिलें भ्रमांत । या तापसा निःसंशय ॥ १०१ ॥ यांच्या नादीं लागल्यानें । कार्य माझें नाहीं होणें । आतां आपणची आपुल्या मनें । तत्त्वशोध करावा ॥ १०२ ॥ ऐसें बोलून निघाला । उरुवेलासन्निध आला । तत्त्व विचार करण्याला । बैसूनिया कांतारीं ॥ १०३ ॥ श्रोते हें कानन । परम होतें शोभायमान । वृक्षासी वृक्ष लागले सघन । वाटे भेदिती नभातें ॥ १०४ ॥ वेली त्या नाना जाती । निज पतीस आलिं-गिती । वृक्ष हेच त्यांचे पति । ऐशी विविध दांपत्यें ॥ १०५ ॥ निज-पतीच्या आलिंगनें । हर्ष झाला त्यांकारणें । हें सुवासिक पुष्परूपानें । दृष्टि पडूं लागला ॥ १०६ ॥ वाटे महीचा उपकार । फेडावयासी साचार । मोठमोठे तरुवर । वर्षाव करिती सुमनांचा ॥ १०७ ॥ तीं पडतां दूर्वांकुरीं । वाटती बुट्टे जरतारी । काढिले काय शालूवरी । हरित वर्ण पृथ्वीच्या ॥ १०८ ॥ कळप [illegible] हरणांचे । बागडती सर्वत्र साचे । पाहून जाळें व्याधाचें । कित्येक घेती मा [illegible] रमणीय वनीं । बुद्ध बैसला येऊनि । अश्वत्थाच्या त[illegible]नया ॥ ११० ॥ नासाग्र दृष्टि मुद्रा शांत । अंगावरी वस्त्र पीत । अहोरात्र चित्तांत । विचार चालला तत्त्वाचा ॥ १११ ॥ येथेंचि त्याचें पुरें झालें । तप तें अवघें श्रोते भले । सिद्धान्त त्यानें कायम केले । आपुलिया मताचे ॥ ११२ ॥ या अश्वत्थ वृक्षाकारण । बौद्ध पंथीं नामाभिधान । आहे बोधिद्रुम म्हणून । विशेष मानिती पवित्र या ॥ ११३ ॥ आपुल्या मताचा प्रसार । करावया भूमीवर । बुद्ध निघाला सत्वर । उरुवेल तें सोडूनिया ॥ ११४ ॥ प्रथम शिष्य बुद्धाचा । कौंडिन्य नामे झाला साचा । पुत्र एक ब्राह्मणाचा । काशीक्षेत्रामाझारीं ॥ ११५ ॥ यालाच अज्ञात कौंडिन्य । म्हणूं लागले पुढती जन । मृगदाव वनाकारण । बुद्ध येता जाहला ॥ ११६ ॥ या मृगदाव वनीं । पांच शिष्य झाले जाणी । यश नांवाचा वैश्य वाणी । धनाढ्य शिष्य जाहला ॥ ११७ ॥ निरंजना तटीं जाण । शिष्य झाले बहुत जण । त्यांत काश्यप कुलोत्पन्न । ब्रह्मबीज तिघे होते ॥ ११८ ॥

उरुविला, नादी आणि गया। येथें बुद्ध आला जावोनिया। बहुत जनांसी करूनिया। अनुयायी निज पंथाचे ॥११९॥ राजगृहींचा बिंबिसार। नामें होता महीधर। त्यानें बुद्धचरणीं ठेवूनि शिर। बुद्धदीक्षा घेतली ॥१२०॥ बिंबिसाराच्या राज्यांत। बुद्ध वेणुवनांत। असतां शिष्य झाले बहुत। ते किती सांगावे ! ॥ १२१ ॥ शालिपुत्रा मौद्गल्यायन। ऐसे प्रमुख दोघे-जण। गौतमाचा ऐकून। बोध, शिष्य जाहले ॥ १२२ ॥ नांव घेण्या-सारिखा आणिक। गौतमाचा शिष्य देख। झाला अनाथ पिंडिक। त्या गौतम बोधामृतें ॥ १२३ ॥ गौतमबुद्धाचे सिद्धांत। केले आहेत अवघे ग्रथित। अश्वघोषानें लिहून ग्रंथ। बुद्धचरित नांवाचा ॥ १२४ ॥ बुद्ध-धर्माचीं थोडक्यांत। मतें मी सांगतों येथ। विचारें पाहतां त्यांप्रत। वेदोच्छिष्ट असतीं तीं ॥ १२५ ॥ मनुष्यप्राण्याच्या ठायीं। पंच स्कंद असती पाही। ज्यांवांचूनी अस्तित्व नाहीं। मनुष्यदेहाकारणें ॥ १२६ ॥ जडत्व संज्ञा वेदना। चौथा संस्कार जाणा। स्थान पांचवें विज्ञाना। क्रमानुरोधें प्राप्त होतें ॥ १२७ ॥ अठ्ठावीस भेद जडत्वांत। हें गौतमाचें आहे मत। संज्ञा आणि वेदनेप्रत। सहा सहा भेद असती ॥ १२८ ॥ संस्कारी बावन्न। एकूणनव्वद विज्ञानालागून। ऐसें [illegible] सांगून। गौतम आपुल्या वाणीनें ॥ १२९ [illegible] ी। दुःख होतें अहर्निशीं। तें येणेंकरून निश्चयेंस [illegible] ॥ १३० ॥ जन्म पंचस्कंद तैसी जरा। मृत्यु आणि रोगपसारा। इष्ट गोष्टींचा विरह खरा। होऊन प्राप्ति अनिष्टाची ॥ १३१ ॥ अतृप्ति वासनेची। ही दुःखामुळें साची। आहेत लागलीं काय-मचीं। मागें प्रत्येक जिवाच्या ॥ १३२ ॥ वेदनेच्या योगेंकरून। लालसेचें होय जनन। लालसा करी उत्पन्न। व्यामोहास चित्ताठायीं ॥ १३३ ॥ पासोनिया व्यामोहाचें। जनन अहंभावाचें। अहंभावापुढील साचें। स्थान जीवित प्रीतीला ॥ १३४ ॥ एवंच कोणतीहि वासना। मानवासी नाचवी जाणा। तिचा क्षय केल्याविना। शांति प्राप्त होणें नसे ॥ १३५ ॥ शांति व्हावया प्राप्त। विवेक पाहिजे जागृत। तैसें सन्नीतिप्रत। स्थान पाहिजे चित्तामध्यें ॥ १३६ ॥ सन्नीति म्हणजे सन्मर्ग। याचीं आठ अंगें असतीं चांग। तीं आतां अलग अलग। सांगतों मी ध्यानीं धरा ॥ १३७ ॥ संकल्प समजूनि भाषणयोग। वर्तन चरितार्थ उद्योग। मननशीलता पाहिजे योग्य। तैसा बुध हो सावधपणा ॥ १३८ ॥ आतां सन्मार्गाचें अवलंबन।

होतें येणेंकरून। धर्म बौद्धाचें केल्या श्रवण। समागम साधुसंतांचा ॥१३९॥ सत्यज्ञानाच्या बळावरी। जो विवेक उपजे अंतरीं। तो जागृत सर्वतोपरी। यत्नें पाहिजे ठेविला ॥ १४० ॥ तैसें धर्मसम्मत नित्याचरण। ठेविल्या दुःखाचें निरसन। होवोनिया पावे जाण। प्राणी प्रथम पदाला ॥ १४१ ॥ संशय, द्वेष, अहंकार। हे झाले पाहिजेत ठार। निष्ठा कर्मकांडावर। बसतां कामा नये ॥ १४२ ॥ विषयलालसा भ्रामक समजुती। या नष्ट झाल्यावरी। द्वितीय पदाची ती प्राप्ति। होत जीवाकारणें ॥ १४३ ॥ शेष राहिलेल्या वासना। तृतीय पदीं निमती जाणा। पुनर्जन्माची कल्पना। बीजासह नष्ट होई ॥ १४४ ॥ पुढे चौथ्या पदांत। पद जें का अर्हत्। तें होतें सहज प्राप्त। ऐसा सिद्धांत बुद्धांचा ॥१४५॥ अर्हत्पदानंतरी। अखेरची पायरी। ती यत्नें आल्या करीं। निर्वाणप्राप्ति होतसे ॥१४६॥ असो सामान्य नीतिकारण। बौद्धधर्मी प्राधान्य। मानिलें असती पवित्र दिन। अष्टमी, अमा, पौर्णिमा ॥१४७॥ वैदिक धर्मान्तर्गत। मुंडण्याची पद्धत। तीच बुद्धानें सेविली सत्य। मुंडण अवश्य भिक्षूला ॥ १४८ ॥ उपासतापास कांहीं नाहीं। बौद्ध पंथाचिये ठायीं। प्रत्यवाय मुळींच नाहीं [illegible] अन्न उदक सेवावया ॥ १४९ ॥ ऐसा आहे म्हणून। स्वैर होते जे का [illegible] ग्रहण। अनुयायी होऊनि बुद्धाचा ॥ १५० ॥ चा[illegible]। समाज जेव्हां कंटाळला। तेव्हांच त्यांनीं काढिला। शाक्तपंथ विबुध हो ॥ १५१ ॥ शाक्त दीक्षा घेऊन। यथेच्छ करावें मद्यपान। लोकां सांगावें भूषण। आम्ही शाक्त म्हणोनि ॥ १५२ ॥ तैसेंच बौद्ध धर्मी झाले। या मतास बळी पडले। मोठमोठाले राजे भले। बिंबिसारासमान ॥ १५३ ॥ राजसत्तेच्या जोरावर। धर्माचा झाला प्रसार। तत्त्व असोनि असार। हें ध्यानांत असूं द्या ॥ १५४ ॥ राजसत्तेचिया पुढती। इतर सत्ता मुळीं न टिकती। मालकाची नष्ट होतां मालकी। चोर शिरती घरीं ॥ १५५ ॥ तैसें तेधवां झालें। बहुतेक राजे बुद्ध बनले। वैदिक पळूं लागले। सोडूनिया बुद्ध देशा ॥ १५६ ॥ मगध, कोमल आणि काशी। अयोध्या, बहार, नेपाळासी। तिबेट, जावा, ब्रह्मदेशीं। पसरला होता बौद्ध धर्म ॥ १५७ ॥ सयाम, सिंहलद्वीपांत। चीन, जपान, प्रांतांत। राहिलासे जागृत। हा धर्म गौतमाचा ॥ १५८ ॥

बुद्धधर्माचे पुरस्कर्ते। असंख्य राजे जरी होते। तरी त्यांतल्या त्यांत महत्त्व तें । अशोक-कनिष्कांना ॥ १५९ ॥ सभा बुद्ध धर्माच्या । या दोघांनीं भरविल्या साच्या । कांहीं सामाजिक गोष्टींच्या । यांनींच केल्या सुधारणा ॥१६० ॥ भिक्षूंसाठीं विहार । स्थापन केले भूमीवर । छाया तरु पंथावर । लावून, बांधिल्या धर्मशाळा ॥ १६१ ॥ रुग्णालयें गरिबां-साठीं । विद्यादानाची हांव मोठी । ती पुरविली ज्ञानजेठी । नेमून या शाळांवर ॥ १६२ ॥ अमेरिका खंडीं भले । बुद्ध भिक्षू गेले होते । कॉञ्जल-कोटला वळविते झाले । पशुहत्या बंद करण्यास ॥ १६३ ॥ एवंच वैदिक संस्कृति । ज्या ज्या ठिकाणीं जागृत होती । त्या त्या ठिकाणीं निश्चितीं । बुद्ध भिक्षू जाते झाले ॥ १६४ ॥ पर्यटनाचा हाच हेत । तुडवोनिया वैदिक मत । बुद्धवचनें लोकांप्रत । सांगून देण्या बुद्ध दीक्षा ॥ १६५ ॥ असो बुद्धधर्माची । निपज वाढ कथिली साची । पुढील अध्यायीं जैनाची । आहे ती अवधारा ॥ १६६ ॥ इति श्रीदासगणुविरचित ॥ श्रीशंकरा-चार्यचरितामृत । होवो सोपान भाविकाप्रत । केवलपेठेस जावया ॥ १६७ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय तिसरा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जय जय पार्वतीपरमेश्वरा। जयजयाजी जगदुद्धारा। वेद प्रतिपाद्या सर्वेश्वरा। ओंकाररूपा नमो तुसी ॥ १ ॥ आपण देवा माझ्या चित्तीं। वास करोनी पशुपति। या आचार्य चरिताप्रति। सुबोध सरसे वदवावें ॥ २ ॥ म्हणजे अवघे होईल बरें। आणि जगालाहि कळेल खरें। कां कीं शब्दसृष्टीचे वारे। अफाट सुटले भूमंडळीं ॥ ३ ॥ या शब्दसृष्टीची स्थिति रंगासमान साची। तेथे कुशलता चितान्याची। ये कळूनि जगातें ॥ ४ ॥ नाना मतें, नाना पंथ। निर्माण झाले तशांत। म्हणून अडचण पडली खचित। खरें खोटें निवडावया ॥ ५ ॥ प्रत्येक मतवाद्या-प्रत। वाटूं लागलें सांप्रत। जुन्यांत जुना अत्यंत। पंथ आमुचा असे कीं ॥ ६ ॥ त्या मतवादी जनांनीं। शास्त्रे ठेविलीं लिहोनि। शब्दसृष्टीच्या सहाय्यांनीं। आतां काय करावें ॥ ७ ॥ खरें खोटें अवघें तुला। कळतें

कीं हे जगत्पाला । म्हणून प्रार्थना आपणांला । आहे माझी दीनबंधो ! ॥ ८ ॥ जैशी जैशी प्रेरणा । तूं करशील माझ्या मना । तैसें तैसें दयाघना । चरित्रलेखन करीन मी ॥ ९ ॥ प्रसार बौद्धमताचा । गताध्यायीं कथिला साचा । आतां येथें जैनाचा । देतों इतिहास संक्षेपें ॥ १० ॥ गौतमबुद्धाच्या कालांत । उदया आलें जैनमत । याहि पंथाला संमत । वेद चारी नव्हते कीं ॥ ११ ॥ जैन लोकांनीं आपुला । धर्म पुरातन ठरविला । ऋग्वेदाकडे बोटाला । दावूनिया विबुध हो ! ॥ १२ ॥ ते म्हणती ऋग्वेदांत । वृषभ तीर्थंकराप्रत । ॐ पवित्रं नग्न या ऋचेंत । बहु आदरें वर्णिलेसें ॥ १३ ॥

पवित्रं नग्नमुपविप्रसामहे येषां नग्नाजातिर्येषां वीराः

ती ही ऋचा ऐशापरी । दाखल केली आहे वरी । तिचा अर्थ तो अंतरीं । तुम्हीच आपुल्या करावा ॥ १४ ॥ ऋग्वेदाच्या प्रथमाध्यायीं । सोळाव्या ऋचेठायीं । आलें असे नांव पाहीं । नेमिनाथ तीर्थंकराचें ॥ १५ ॥

स्वस्तिन इंद्रो वृद्धश्रवाःस्वस्तिनः पूषा विश्ववेदाः ।
स्वतिनस्तार्क्ष्योऽरिष्टनेमिः स्वस्तिनो बृहस्पतिर्दधातु ॥

ऋग्वेदाच्या द्वितीयाध्यायीं । सत्राव्य ऋचेठायीं । आलें असे नांव पाही । अर्हत तीर्थंकराचें ॥ १६ ॥

अर्हत बिभर्षि सायकानि धन्वार्हंभिष्कं यजनं विश्वरूपम् ।
अर्हन्निदं दयसे विश्वमभ्वं नवा ओ जीओ रुद्रत्व हस्ति ॥

तेवीं यजुर्वेदांत । एकूणिसाव्या अध्यायांत । चौदाव्या मंत्रांत । वर्णन महावीर स्वामीचें ॥ १७ ॥

आतिथ्यरूपमासर ,महावीरस्थ नग्नहुः ।
रूपमुपसदाम हे ताजिस्रो रात्रिः सुरासुजा ॥

ऐशा रीतीं आपुला । धर्म अनादि ठरविण्याला । आहे बालिश प्रयत्न केला । त्या जैन पंडितांनीं ॥ १८ ॥ श्रोते ऐसें संशोधन । कोणी करूं गेल्या जाण । प्रत्येक पंथा मिळेल स्थान । वेदामध्यें कोठेंतरी ॥ १९ ॥ इमंमे हा शब्द पाहावा । आणि सिद्धांत ऐसा ठोकावा । मे महिन्याच्या घेतलें नांवा । या अनादि वेदानें ॥ २० ॥ मे जून ऐशीं । नांवें भगवत्-गीतेशीं । येती म्हणून तियेसी । अनादि तुम्ही मानूं नका ॥ २१ ॥ याच परीचें तेंहि आहे । त्यांत कांहीं महत्त्व नोहे । अशातें न स्थापित बरवें ।

होय अनादित्व जैनाचें ॥२२॥ बौद्ध आणि जैन । पंथ बहुतेक समान । अंतर आहे थोडकें जाण । त्या दोहोंमाझारीं ॥ २३ ॥ अहिंसातत्त्व दोघांचेंहि । त्यांत मुळींच फरक नाहीं । श्रोते सामान्य नीति तीहि । आहे दोघांची समान ॥ २४ ॥ कोणत्याहि धर्मातें । सामान्य नीति सारखी असते । हिरवें तांबडें कधीं न पडतें । ऊन सूर्याचें विबुध हो ! ॥ २५ ॥ वा अवयव धर्मांत । फरक ना पडे यत्किंचित । तोच आहे सिद्धांत । या सामान्य नीतीचा ॥ २६ ॥ उपास आणि देहदंडन । तेंवि श्रोते नग्नपण । या तिहीं गोष्टींचें मोठेपण । गौरविलें जैनांनीं ॥ २७ ॥ कोष्टक काल गणण्याचें । आहे विचित्र जैनांचें । नांव ऐका तयाचें । कोडाकोडी सागरोपम ॥ २८ ॥ एवं च कालगणना ही । कोणाचीहि शुद्ध नाहीं । जो तो आपुल्या मतें पाही । प्रमाण कालाचें ठरवीतसे ॥ २९ ॥ त्याचा नको विचार येथ । हें काल गणण्याचें नाहीं शास्त्र । झालें कैसें विपरीत । हल्ले वैदिक धर्मावरी ॥ ३० ॥ एवढ्याच गोष्टीचा । विचार आहे करणें साचा । बाकीच्या भाकड कथांचा । ऊहापोह येथे नको ॥ ३१ ॥ जैनपंथीं साचार । मानिती चोवीस तीर्थंकर । चोविसावा जो महावीर । तो बौद्धकालीं झाला असे ॥ ३२ ॥ विदेह देशामाझारीं । वैशाली नामें एक नगरी । ज्या पुरीच्या शेजारीं । गांव कुंडग्राम नांवाचें ॥ ३३ ॥ तया कुंडग्रामांत । चैत्र शुद्ध पक्षांत । महावीर आला जन्माप्रत । सोमवारीं त्रयोदशीला ॥ ३४ ॥ सिद्धार्थाचे पासून । त्रिशलादेवीचे उदरीं जाण । महावीर पावला जनन । श्रोते या भारतवर्षी ॥ ३५ ॥ महावीराचें नामाभिधान । पहिलें होतें वर्धमान । पुढें महावीर हें टोपण । नांव त्यासी मिळालें ॥ ३६ ॥ तीस वर्षेपर्यंत । महावीर राहिला प्रपंचांत । कोणी म्हणती अविवाहित । मूळपासून होता हा ॥ ३७ ॥ कोणी म्हणती लग्नातें । महावीरानें केलें होतें । एक कन्या तयातें । झाली होती विबुध हो ! ॥ ३८ ॥ जैन श्वेतांबर ग्रंथांत । ऐशापरी लिहिलें सत्य । दिगंबरानें अविवाहित । ठरविलें महावीराला ॥ ३९ ॥ असो तीस वर्षांनंतर । हे स्वामी महावीर । झाले होते बहुत आतुर । जैन दीक्षा घ्यावया ॥ ४० ॥ कुंडग्रामा सोडून । जे का नाग खंडावन । त्या काननालागून । मार्गशीर्षमासीं आले ॥ ४१ ॥ वद्य दशमी तिथीला । दीक्षाविधि त्यांचा झाला । उपटिलें श्रींच्या

केसांना । पांच मुठी तयानें ॥ ४२ ॥ खूळ हें नग्नपणाचें । अवघ्या धर्मांत आहे साचें । वृषभदेव भागवतीचें । महाज्ञानी शुकाचार्य ॥ ४३ ॥ त्यांच्या नग्नपणाची । नक्कलहि केली साची । जैन तीर्थंकराची । मूर्ति ती नग्न पाहा ॥ ४४ ॥ श्रोते हें नग्नपण । वैराग्याचें न विशेष लक्षण । पक्षुपक्ष्यांकारण । कुठें त वस्त्रें नेसावया ॥ ४५ ॥ ते अवघे नग्न फिरती । म्हणून का श्रोते तयाप्रति । कोणी श्रेष्ठ मानिती । याचा विचार तुम्हीच करा ॥ ४६ ॥ वैराग्याचें लक्षण । जैनांनीं ठरविलें नग्नपण । म्हणून तेंच विशेष चिह्न । ठरविलें तीर्थकराचें ॥ ४७ ॥ जैनांचा सिद्धांत । सांगतों मी थोडक्यांत । अवधान द्यावें तयाप्रत । अहो श्रोते तुम्ही आतां ॥ ४८ ॥ विश्व हें अनाद्यनंत । स्वयंभू आहे साक्षात । तें आविर्भावाप्रत । आलें सहा द्रव्यांनीं ॥ ४९ ॥ जीव अजीव हे दोन । धर्म अधर्म हे दोन । अकाल काल हे दोन । सहा ऐसे मिळोनिया ॥ ५० ॥ जीव भिन्न भिन्न असती । ते कदा ना एक होती । एक जे कां मानिती । तेच भ्रमिष्ट म्हणावे ॥ ५१ ॥ तीं सहा द्रव्यें जरी नित्य । तरी पर्यायां-तरानें होतात । तींच बुध हो ! अनित्य । ऐसा सिद्धांत जैनांचा ॥५२॥ हे संसारी जीव जाण । अनादि कालापासून । जड आणि अशुद्ध पूर्ण । आहेत कीं विबुध हो ! ॥ ५३ ॥ हा जो लाधतो अशुद्धपणा । या संसारी जीवास जाणा । त्याच्या शोधितां कारणा । कर्मपुद्गल हेंच कळे ॥ ५४ ॥ कृतकर्माचा फलदाता । ईश्वर नोहे सर्वथा । ती आहे निसर्ग-सत्ता । फल कर्माचे कर्म देई ॥ ५५ ॥ मुक्त जीवहि अनंत । आहेत ते न पावतात । कधींहि जन्ममृत्यूप्रत । हा सिद्धांत जैनांचा ॥ ५६ ॥ क्रोध, लोभ, मान आणि माया । चार कषाय म्हणतात या । होतो याजपासूनिया । कर्मबंध तो उत्पन्न ॥ ५७ ॥ ऐशी ही कषाय वृत्ति । सोडून वीतरागमय आत्म्याप्रति । जेव्हां समाधीच्या ठायीं करिती । स्थित कर्ते पुरुष पाहा ॥ ५८ ॥ तेव्हांच कर्मबंधाचा । नाश आहे व्हावयाचा । एवंच प्रकार मुक्तीचा । जिवाच्याच स्वाधीन असे ॥ ५९ ॥ अहिंसा, अस्तेय आणि सत्य । ब्रह्मचर्य अपरिग्रहाप्रत । परमधर्म मानितात । या जैन पंथामध्यें ॥ ६० ॥ षट्कर्मे जैनांचीं । आहेत येणें प्रकारचीं । वंदनस्तुति मुक्तात्म्याची । प्रतिक्रम, प्रताख्यान, सामयिक ॥ ६१ ॥ मांसाशन वा मदिरापान । यांचें न करणें सेवन । पंचाणुव्रतांचें पालन । केलें पाहिजे गृहस्थें

॥ ६२ ॥ ईश्वराची व्याख्या । जैन शास्त्रीं ऐसी देखा । स्वयंभू आणि अकलंक जो कां । उपाधिरहित वीतरागी ॥ ६३ ॥ शुद्धात्मा चैतन्यमय । ऐसा जो तो ईश्वर होय । ऐसे ईश्वर पाही अनंत । जैनशास्त्रीं मानिती ॥ ६४ ॥ जड आणि आत्मतत्त्व जैन । मानिताती भिन्नभिन्न । त्यांचा संयोग होतो म्हणून । तत्त्वें न एक होतीं कदा ॥ ६५ ॥ सम्यक्चरित्र सम्यक्ज्ञान । तृतीय तें सम्यक्दर्शन । या रत्नत्रयीच्या योगेंकरून । संसारी जीव मुक्त होई ॥ ६६ ॥ अपुरें असल्या ज्ञान । तें होय घातक पूर्ण । तेंवि परावलंबीपण । नाहीं मुळींच उपयोगी ॥ ६७ ॥ तें विपरीत परिणाम करितें । मानवा भ्रमीं पाडितें । ऐशीं आहेत जैन मतें । तीं कांहीं थोडीं सांगितलीं ॥ ६८ ॥ हे अवघे सिद्धांत । वैदिक धर्मीं आहेत । कांहीं कांहीं तत्त्वांप्रत । नांवें दिलीं निराळीं ॥ ६९ ॥ तो केवळ नवीनपणा । शास्त्राचा दाखवावया जाणा । याविण दुसरा ना । हेतु येथें संभवतो ॥ ७० ॥ हा महावीर समाधिस्थ । झाला पावापुरींत । कार्तिक वद्य पक्षांत । चतुर्दशीस होतां निशा ॥ ७१ ॥ या जैन शास्त्रकाराची । तऱ्हा एके प्रकारची । आहे चमत्कारिक साची । ती थोडी सांगतों ॥ ७२ ॥ अनादि ठरविण्या जैन पंथ । वृषभ महावीर नेमिनाथ । यांचीं नांवें वेदांत । आहेत ऐसें प्रतिपादिलें ॥ ७३ ॥ कां कीं वेदापेक्षां अनादित्व । येत नाहीं कोणाप्रत । हें आणून ध्यानांत । वेदप्रामाण्य दाविलें ॥ ७४ ॥ वेदाचें प्रमाण देऊन । अनादि ठरविण्या पंथ जैन । पुढें त्याच वेदाकारण । हीन त्यांनीं ठरविलें ॥ ७५ ॥ तैसेंच गौतमबुद्धाला । अहिंसेपुरता मान दिला । तोच सामान्य ठरविला । या जैन पंडितांनीं ॥ ७६ ॥ इतिहासाची तीच तऱ्हा । या जैनांची ध्यानीं धरा । अशोक नामें नृपवरा । मूळचा जैन ठरविलें ॥७७॥ परि तो होतां बौद्ध । हें सर्वत्र आहे प्रसिद्ध । जैन मूळचा म्हणतां बाध । येतो त्यांच्याच पक्षाला ॥ ७८ ॥ सोडून जैन पंथाला । अशोक राजा बौद्ध झाला । म्हणजे अर्थात् त्यासी नावडला । जैन पंथ विबुध हो ! ॥ ७९ ॥ एवंच अशोकाचें मोठेपण । पाहून त्या ठरविलें जैन । आपुल्या पंथाचें महत्त्वपूर्ण । जगालागीं दावावया ॥ ८० ॥ श्रोते या जैनांत । निघते झाले दोन पंथ । त्यांचीं नांवें देतों येथ । दिगंबरी श्वेतांबरी ॥८१॥ या दोन्ही पक्षांतील लोक । परस्परांशीं भांडती देख । या दोघांचा विचार एक । नाहीं नाहीं कोठेंहि ॥ ८२ ॥ फैलाव जैन पंथाचा । वैश्यांमाजीं

विशेष साचा। दुबळेपणा अहिंसेचा। त्रिवर्गास पटला नसे ॥ ८३ ॥ कुंद कुंदाचार्यें भला। दिगंबर पंथ फैलाविला। श्वेतांबराच्या वांटघाला। स्थूल भद्र त्याचपरी ॥ ८४ ॥ श्रोते या दोन्ही पंथांत। धरसोड होती अत्यंत। वा बौद्ध असल्या नृपनाथ। मुलगा जैन होतसे ॥ ८५ ॥ तेंवि मुलगा जैनाचा। होतसे बौद्ध साचा। म्हणून स्थिरपणा कायमचा। आला या न दोघांतें ॥ ८६ ॥ खंडन बौद्ध मताचें। करण्या ग्रंथ रचिले साचे। आणि आपुल्या पक्षाचें। मंडन तेंवि करावया ॥ ८७ ॥ या गोष्टीनें दोघांत भली। अतिशय चुरस वाढली। जैनांची कत्तल केली। एका बौद्ध राजानें ॥ ८८ ॥ विचारानें पाहूं जातां। श्रोते या दोन्ही पंथां। खरोखर येईल म्हणतां। द्वेष्टे वैदिक धर्माचे ॥ ८९ ॥ वैदिक धर्म कोणाचाहि। द्वेष्टा आजपर्यंत झाला नाहीं। आणि पुढें ही न पाळी येई। त्याला द्वेष्टा होण्याची ॥ ९० ॥ कां कीं धर्म वैदिकांचा। आहे सूर्यापरी साचा। यच्चयावत् पंथाचा। तो मुळींच जनक असे ॥ ९१ ॥ त्याला द्वेष करण्या पाही। जागा कोठेंच उरली नाहीं। जननी कदा न विष देई। निजोदरींच्या बालका ॥ ९२ ॥ कोणतेंहि घ्या हो मत। तें आहेच वेदांत। आणि वेदांहूनि अनादित्व। येत नाहीं कोणाला ॥ ९३ ॥ चैत्य मोठमोठाले। जैनांनीं बांधून ठेविले। हें साच आहे केलें। अनुकरण वैदिकांचें ॥ ९४ ॥ या दोन्ही पंथें भल्या। सुखसोयी विशेष केल्या। कांहीं फाजील वाढविल्या। चाली नावीन्य दावण्यास ॥ ९५ ॥ पाणी प्यावें गाळून। न करावें दंतधावन। तैसेंच स्नानावांचून। कित्येक दिवस राहावें कीं ॥ ९६ ॥ उपास सहासहा महिने। मोक्षार्थ करावा जीवानें। कृतकर्मांचा क्षय होणें। नाहीं तयावांचूनी ॥ ९७ ॥ सफल कर्म पूर्वार्जित। पाळोनियां खडतर व्रत। जेव्हां करावें भस्मीभूत। तेव्हांच जावें मोक्षाला ॥ ९८ ॥ पुनर्जन्म पापपुण्य। जैनांप्रति आहे मान्य। बौद्धाइतकें स्वैरपण। या धर्मानें केलें नसे ॥ ९९ ॥ वैदिक धर्मामाजी भले। आधींच होते भेद पडले। त्यांत हे दोन आले। पाहुणे तेथें मुक्कामा ॥ १०० ॥ एवंच सर्वत्र अनवस्था। पसरूं लागली हां हां म्हणतां। तेणें कवणाच्याहि चित्ता। स्थैर्य न उरलें येतुलेंहि ॥ १०१ ॥ खरें खोटें कांहीं न कळे। अभक्तीचीं माजलीं खुळें। स्वैर वृत्तीचिया बळें। समाज दुबळा जाहला ॥ १०२ ॥ पुण्यार्जित जें जें होई। तें तें अवघें दांभिक

पाही । केल्यानें कथिल कल्हई । पितळ, चांदी होणें नसे ॥ १०३ ॥ अनाचार बळावला । अनीतीनें घातली माळा । अवघ्या समाजाच्या गळां । बेबंदशाही माजली ॥ १०४ ॥ निर्व्यसनी निस्पृह स्पष्टवक्ता । सदाचारसंपन्न तत्त्ववेत्ता । निरिच्छ भाविक सद्गुणी नेता । कोणी न उरला समाजासी ॥ १०५ ॥ दुनिया होतां अनाचारी । रोग बळावती भारी । पडूं लागली वरच्यावरी । अवर्षणें तीं देशांत ॥ १०६ ॥ पंथ बळावण्या कोणताहि । ब्राह्मणावांचून गति नाहीं । याहि जैन धर्माठायीं । सामील झाले द्विज बहु ॥ १०७ ॥ हल्लीं भरतखंडांत । जीं जीं कोरीव लेणीं आहेत । तीं जैनबुद्धांच्या काळांत । निर्माण होतीं जाहलीं ॥ १०८ ॥ श्रोते या लेण्यांप्रत । कोणी बुद्धाचीं म्हणतात । जैन आपुल्या ग्रंथांत । आमचीं म्हणून सांगती ॥ १०९ ॥ लेणीं बौद्धजैनांचीं । जरी म्हणावीं साचीं । तरी त्यांतहि वैदिकांचीं । चिह्नें सांपडतीं बहुसाल ॥ ११० ॥ पाहा वेरुळच्या लेण्यांत । एक लेणें आहे ख्यात । ज्या लेण्याप्रत । लोक कैलास बोलती ॥१११॥ कांहीं कांहीं लेण्यांप्रत । पांडव लेणीं म्हणतात । म्हणून न सांगतां येत । हीं अमक्यांचींच म्हणून ॥ ११२ ॥ असो अनाचार्येकरून । संत साधू सज्जन । गेले असती घाबरून । पापभारें महीच्या ॥ ११३ ॥ आतां यापुढील अवघें वृत्त । चतुर्थाध्यायीं होईल विदित । अवघें देऊन चित्त । श्रवण करा भाविक हो ! ॥ ११४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरित । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ११५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय चौथा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे नानावेषधारका । हे जगत्रयसंरक्षका । हे दुःख कलिमलविध्वंसका ! । दीनबंधो जगत्पते ! ॥ १ ॥ देवा तुझ्या कर्तव्याचा । कोणा न लागे पार साचा । तो वर्णितां होईल वाचा । कुंठित ब्रह्मदेवाची ॥ २ ॥ सरस्वती टेकील हात । तुझें वर्णन करण्याप्रत । सहस्त्र मुखांचा शेष कुंठित । होईल कीं पुरुषोत्तमा ! ॥ ३ ॥ तेथें माझा पाड किती । मी खंडीमाजी एक रति । टिटवी कां अपांपति । शोषण्यासी

समर्थ असे ? ॥ ४ ॥ देवा ! तुझें वर्णन । कोणत्या प्रकारें करूं जाण । कां कीं वाणीलागून । तूं न विषय सर्वथा ॥ ५ ॥ नुसता शब्दोच्चारहि । तुझ्या ठायीं टिकणें नाहीं । पाहूं जातां शब्द तोहि । तुझ्याविण न निराळा ॥ ६ ॥ रेघरूपी जनार्दन । तूं सर्व ठायीं सारखा जाण । परी अक्षराचें भिन्नपण । कायम तेथेंच राहतें ॥ ७ ॥ तेंवि तव स्वरूपाचा । प्रकार तो आहे साचा । तुझ्याविण न व्हावयाचा । कवणाचाही आरंभ ॥ ८ ॥ अवघ्या वस्तूंचें तूंच मूळ । तुझा विलास जग हें सकळ । जी कां होते खळबळ । ती तुझ्याच इच्छेनें ॥ ९ ॥ ऐसा तूं अद्वितीय अचिंत्य । पुरविण्या भक्ताचें मनोरथ । सगुण होऊन होशी स्थित । उपासकासी भेट द्याया ॥ १० ॥ उपासक, उपास्य, उपासना । तूंच कीं रे दयाघना ! । कोणतीहि कल्पना । जाई न कदा तुझ्यापुढें ॥ ११ ॥ ऐसें आहे म्हणोन । नानापंथ निर्माण । तुझ्याच लीलेंकरून । होते झाले जगतीतला ॥ १२ ॥ पंथ मूळा न पाहती । दिसतें त्याचा विचार करिती । परस्परांचे वैरी बनती । पाहूं न देती मूळ कोणा ॥ १३ ॥ मूळ वेदा-वांचून । कोणा ना आलें कळून । वाहिला मनीं अभिमान । वृथाच मताभिमान्यांनीं ॥ १४ ॥ तो मतामतांचा गलबला । समूळ नेण्या रसातळा । तूंच समर्थ जगत्पाला ! । तेथें न गति इतरांची ॥ १५ ॥ असो मागिलाध्यायांत । तुम्हीं ऐकिलें जैन मत । यादवी भरतखंडांत । मतामतांची माजली ॥ १६ ॥ खरें मूळ जो वेद त्याला । कोणी न पाही जगतीतला । कोणी मानिती बौद्धाला । कोणी स्तविती जैनातें ॥ १७ ॥ कोणी यज्ञमार्गी रत । कोणी बैसोन कंदरींत । हठयोगाची आचरितात । कर्मे नाना प्रकारचीं ॥ १८ ॥ भाषाकोविद विद्वान् । तर्कास देवोन प्राधान्य । करिती सृष्टीचें संशोधन । घुसळत रित्या डेऱ्यापरि ॥ १९ ॥ गुलहौशी चैनी जन । चार्वाकाचें मानिती वचन । वेदोपनिषदां निंदोन । ब्रह्मकुलांत जन्मूनियां ॥ २० ॥ कोणी सांख्य कोणी शाक्त । कोणी कापालिक गाणपात्य । कोणी स्थापुनिया द्वैत । अद्वैताला निंदिती ॥ २१ ॥ कोणी अद्वैत मानिती । स्वैराचार यथेच्छ करिती । निरीश्वरवादी म्हणविती । कोणी कोणी आपणांतें ॥ २२ ॥ एवंच खरें लोपलें । तर्कट मात्र माजलें । खरे भाविक घाबरले । पळूं लागले दशदिशां ॥ २३ ॥ हें ऐसें होण्याला । कारण तूंच असशी भला । जाग आपुल्या ब्रीदाला ।

त्याचें दैन्य करूं नको ॥ २४ ॥ कृत त्रेता द्वापार सरले। भयंकर कलियुग लागलें। भरतखंडामाजीं भलें। युधिष्ठिराच्या शतकांत ॥२५॥ आतां म्हणशील ऐसें जरी। जें जें होतें भूमीवरी। ती ती माझीच इच्छा खरी। मग निवारावें कोणीं कोणा ॥ २६ ॥ हें जरी आहे सत्य। तरी दशावतार तुजप्रत। कां घ्यावे लागले खचित। याचा विचार कांहीं करा ॥ २७ ॥ द्वारपाल तुझ्या दारींचे। झाले असती राक्षस साचे। कौतुक खऱ्या-खोटयांचें। दावावया साच कीं ॥ २८ ॥ हिरण्याक्ष होऊन। वेद नेले चोरून। तेच वराह होऊन। आणिले तूं पुनरपि ॥ २९ ॥ ऐसे भाविक म्हणती। ईश्वरासी बाहती। कोणी याच्याच करिती। मनसोक्त टवाळ्या ॥ ३० ॥ ऐसें होतां भारतांत। आला ब्रह्मदेवाचा सुत। नारद वीणा वाजवीत। तेथिचें निरीक्षण। करावया ॥३१॥ आसेतुहिमालया। नारद आला पाहूनिया। आणि गेला ही खबर द्याया। ब्रह्मलोकीं विधात्यासी ॥ ३२ ॥ निजपित्याचें वंदन। प्रथमतः नारदें करून। करिता झाला मधुर भाषण। विनयातें न सोडितां ॥३३॥ हे ब्रह्मदेवा चतुरानना ! । भारताची झाली दैना। तिन्ही वेदांस कमीपणा। आला मृत्युलोकांत ॥ ३४ ॥ चार्वाक म्हणे थोतांड। हें वेदत्रयाचें बंड। भटांनीं माजविलें उदंड। केवळ स्वार्थ बुद्धीनें ॥ ३५ ॥ सविधि कर्माचरण। गेलें आहे मावळून। वाढला पोकळ अभिमान। शास्त्रीपंडितवैदिकां ॥ ३६ ॥ वाढतां तो अभिमान। सवेंच होतसे पतन। याच न्यायेंकरून। हीन दशा त्या पातली ॥ ३७ ॥ एवंच कर्मकांडाची। कहाणी झाली असे साची। आवड यज्ञयागांची। राहिली नसे कवणातें ॥ ३८ ॥ चार्वाकानें आपुला। हल्ला जोरांत चढविला। नीतीचा तो अभेद्य किल्ला। जमीनदोस्त केला असे ॥ ३९ ॥ अनीति हीच झाली सती। असतीच झाल्या सती। वात्रट तेच वाचस्पति। धुरीण होऊन बैसले ॥ ४० ॥ या चार्वाकमताला। थोडाबहुत घातला आळा। गौतम बुद्धानें तो भला। नीतिपाठ देवोनिया ॥ ४१ ॥ त्यायोगें सदाचारी। थोडे लोक झाले जरी। तरी वेदांविषयीं अंतरीं। तिटकाराच राहिला ॥ ४२ ॥ पाणी पडल्या वळवाचें। उपयोगी न पिकाचे। साम्राज्य मात्र चिखलाचें। होईल तेणें भूमीवर ॥ ४३ ॥ बुद्ध सिद्धांतांची स्थिति। झाली तैशीच निश्चितीं। एवंच मृत्युलोकावरती। खरा धर्म न राहिला ॥ ४४ ॥ बुद्धापरी महा-

वीर। एक पुरुष झाला चतुर। तो जैनांचा तीर्थंकर। म्हणून आहे ख्यात जगीं ॥ ४५ ॥ या महावीरें आपुला। पंथ अनादि ठरविला। वेद म्हणे मागून झाला। आमुच्या मतानंतर ॥ ४६ ॥ भारताचा धर्म जैन। आहे फार पुरातन। आले उत्तरेकडून। हे आर्य वैदिकधर्मी ॥ ४७ ॥ उत्तर ध्रुवापाशीं होती। या आर्यांची मूळ वसती। अहिंसा कशास म्हणती। हें न ठाउके आर्यांना ॥ ४८ ॥ ते आर्य लोक फिरत फिरत। आले भरत-खंडांत। पाहून अमुचा जैन पंथ। उपनिषदें त्यांनीं रचियेलीं ॥ ४९ ॥ सबलि हिंसा क्रूर देवता। या वेदासी मान्य तत्त्वता। मद्य, मांस यथेच्छ पिता। होता आर्य समाज ॥ ५० ॥ त्यांनीं वेदसंहितेसी। कांहीं तीर्थं-करांसी। मान दिला आदरेंसी। वर्णन त्यांचें करूनिया ॥ ५१ ॥ उच्च तत्त्वें जैनांचीं। वैदिकांनीं घेतलीं साचीं। स्थापना आपुल्या मताची। धूर्ततेनें केली असे ॥ ५२ ॥ या मतासी पोषक। ऐसा इतिहास रचिला देख। भाषेमाजी करून फरक। थोडाथोडा जैनांनीं ॥ ५३ ॥ जैन धर्मांचे तीर्थंकर। निजमताचा प्रसार। करावयासी भूमीवर। संचार करूं लागले ॥ ५४ ॥ वैराग्याचें दावण्या चिह्न। नागवे फिरूं लागले जैन। सज्जन त्यांसी पाहून। माना खालीं घालती ॥५५॥ करावें देहदंडन। पूर्व दोष करण्या दहन। पडूनिया प्रेतासमान। उपास ते करावे ॥ ५६ ॥ दृष्टीं पडतां अघटित। सहज लोक जमती तेथ। गारुड्याचा बाजा[illegible]। ढोल वाजतां लोक येती ॥ ५७ ॥ महावीराचे अनुयायी। कित्येक ब्राह्मण झाले पाही। निजधर्माचा उरला नाहीं। अभिमान त्या यत्किंचित ॥ ५८ ॥ उलट तेंच लोकांतें। ऐसें झालें सांगते। वेदामाजीं थोतांड मतें। आहेत अवघीं सांगितलीं ॥ ५९ ॥ म्हणून वैदिक धर्माला। आम्हीं समूळ फांटा दिला। आणि हा जैनपंथ स्वीकारिला। मोक्षाचिया इच्छेनें ॥६०॥ मत जैन धन्य धन्य। पाहिलें आम्हीं शोधून। येणेंच जैन-मार्गें निर्वाण। प्राप्त होईल जीवातें ॥ ६१ ॥ शाक्त मतें करून। मोठमोठे विद्वान्। करूं लागले मद्यपान। उघड उघड बाजारीं ॥ ६२ ॥ एवंच देवा जगतीतला। खरा धर्म नाहीं उरला। आली वेळ रसातळा। ही दुनिया जावयाची ॥६३॥ कोणी कोणास मानीना। जो तो आपणां म्हणवी शहाणा। वेड्यावांकुड्या कल्पना। निघती न भूतो न भविष्यति ॥ ६४ ॥ ॥ ऐशा भीषण काळीं रक्षण। कोण वेदांचें करी जाण। तुम्ही

बोटें घालून । कानांत ऐसें बसूं नका ।। ६५ ।। अजून वैवस्वत मनूचें । मन्वंतर न संपलें साचें । तोंच कां या महीचें । वाटोळें सांग होणार ? ।। ६६ ।। ही जी हकीकत निवेदिली । ती प्रत्यक्ष पाहून कथन केली । कल्पनेनें न रंगविली । हे विधात्या यत्किंचित ।। ६७ ।। वैदिक धर्म सनातन । तोच गेल्या मावळून । तुझें देवा ! मोठेंपण । नाहीं राहणार कोठेंहि ।। ६८ ।। ऐकून ही नारदोक्ति । ब्रह्मदेव आपुल्या चित्तीं । गेला खिन्न होऊन अति । अंगीं रोमांच थरारले ।। ६९ ।। विधात्यानें पाचारण । धाडिलें देवांलागून । असाल तैसें निघून । यावें लिहिलें ब्रह्म-लोका ।। ७० ।। उषा, इंद्र आणि वरुण । बृहस्पति, सविता, रोहिणीरमण। आले अवघे मिळून । ब्रह्मलोकाकारणें ।।७१।। इंद्र म्हणे चतुरानना ! । कां आम्हांस पाचारणा । अति त्वरेनें दयाघना ! । केलें तेवढें सांगणें ।।७२।। ब्रह्म म्हणे पुरंदरा ! । अनन्वित कर्में व्यापिली धरा। वेदमार्गाची परंपरा । बुडूं पाहते भूमीवरी ।।७३।। लोक जे कां स्वैराचारी । तेच मातले भूमीवरी । खऱ्याखोटयांचा कोणी न करी । विचार तो यत्किंचित ।।७४।। तुम्हां यज्ञयागाविना । हविर्भाग तो मिळेना। आणि तुमचें अस्तित्व असल्याविना । सृष्टि न चाले तिळभर ।। ७५ ।। जग चालावें सुरळीत । ऐसा धरूनिया हेत । कथिलें ज्या नियमाप्रत । त्या नियमाचें नांव वेद ।।७६।। जग हें कशापून झालें । त्याला कोणीं निर्मिलें । हें सर्व कांहीं कथन केलें । आहे ज्या वेदांत ।।७७।। तो वेद राजरस्ता । सांप्रत झाला नावडता । थोतांड मतें हां हां म्हणतां । चहूंकडे पसरलीं ।।७८।। रोग झाल्या शरीरीं । त्याची उपेक्षा नाहीं बरी । नेलें पाहिजे वैद्या घरीं । त्याची वाट लावावया ।।७९।। एकदां रोग बळावल्यास । अवघ्यांचाच होईल नाश । या जाणून सिद्धांतास । सावध झालें पाहिजे ।।८०।। ब्रह्म्याचें भाषण ऐकिलें । मग देव बोलले । थोडेंबहुत ऐकिलें । आहे आम्हीं याच रीतीं ।।८१।। वेदांच्या संरक्षणा । करायासी चतुरानना ! । तुम्ही ज्या ज्या कराल आज्ञा । त्या त्या पाळूं सर्व आम्ही ।।८२।। मग ब्रह्मदेव देवांसहित । बैसूनिया विमानांत । आला कैलास लोकाप्रत । श्रीभगवान शिवाकडे ।।८३।। आधींच तो कैलासगिरि । श्रेष्ठ देव लोकां-माझारीं । जेथें भगवान् मन्मथारि । सहपरिवारें राहिला ।।८४।। शिव-सभा शोभायमान । सिंहासनीं पंचवदन । नीलकंठ नागभूषण ! । मृडानी-

पति परमात्मा ॥ ८५ ॥ प्रभूचे ते दिव्य चरण । मृदु कमलपत्राहून । भक्तिमधु परिपूर्ण । भरला ज्या चरणद्वयां ॥८६॥ तो भक्तिमधु लुटण्या भले । संत भ्रमर होऊनि आले । आनंदें करूं लागले । भजन हाच गुंजारव ॥८७॥ तो भ्रमर षट्पदांचा । तेवींच हाहि साचा । विशेष धर्मयत्पदांचा । ते न होती दृग्गोचर ॥ ८८ ॥ नीति, दया, क्षमा, शांति । समाधान आणि उपरति । हे सहा पाय निश्चितीं । संतरूपी भ्रमराचे ॥ ८९ ॥ कटीं शोभे सोनसळा । कंठामाजीं रुद्राक्षमाळा । भस्म विराजे भव्य भाला । अर्धचंद्र मस्तकीं ॥ ९० ॥ सव्यांकीं पार्वती । जी अभेद्य शक्ति । ज्या शक्तीला प्रकृति । ज्ञाते नांव देतात ॥ ९१ ॥ जटामुकुटीं मंदाकिनी । बिंबाधरी सुहास्यवदनी । महापातक संहारिणी । भागीरथी प्रतापतुंगा ॥ ९२ ॥ नाना पुष्पांचे ते हार । दंडीं, मनगटीं, कर्णांवर । निळा वर्ण खुले फार । विषामुळें कंठाचा ॥ ९३ ॥ दशभुज पंचवदन । कांति सहस्र सूर्यासमान । तृतीयनेत्रीं त्रिचरण । राहिला ज्या हराच्या ॥ ९४ ॥ नारदतुंबरू गान करिती । प्रभूचें ते यश गाती । पंचमस्वरें अप्सरा गाती । कुबेर उभा सेवेला ॥ ९५ ॥ भुतें नाचतीं सभोंवार । शंख-शिंगांचे मधुर स्वर । काढूं लागले वरचेवर । गण भगवान हराचे ॥ ९६ ॥ डमरू बाजे डिमडिमा । भक्तगणाचा न वर्णवे प्रेमा । रुद्र सूक्तें स्तविती भीमा । यक्ष मुनि किन्नर ॥ ९७ ॥ ऐशा त्या सभेंत । ब्रह्मा पातला देवांसहित । साष्टांग करोनि प्रणिपात । शिवास बोलला येणेंरीतीं ॥ ९८ ॥ जयजयाजी दक्षिणामूर्ति ! । सच्चिदानंदा जगत्पति ! । हे अज अजिता विश्वमूर्ति ! । देवाधिदेवा ! आद्यपीठा ॥ ९९ ॥ हे भुवनत्रयपालका ! । दुरितकलिमलविध्वसंका । संतसज्जनसंरक्षका । मृडानीपते शंकरा ! ॥ १०० ॥ भाललोचना भूवरती । अनाचार माजला अति । दुष्ट दुर्जन दुर्मति । चढले असती वैभवा ॥ १०१ ॥ सर्वमान्य अशा वेदाला । कोणी न विचारी जगतीतला । उलट लागलें तुडवायाला । या वेदास पायातळीं ॥ १०२ ॥ वेदरहस्य विद्वानांनीं । म्हणजे शब्दपंडितांनीं । टाकिला आहे नासुनी । सहाय्यानें त्या व्याकरणाच्या ॥ १०३ ॥ व्याकरणरूपी कातर भली । या वेदपटास लाविली । फाडाफाड बहुत केली । चिंध्या केल्या तत्त्वाच्या ॥ १०४ ॥ त्यायोगें हृद्गत । वेदाचें न कळे सत्य । चिंध्यांचिया स्वरूपाप्रत । वेदकापड आल्यानें

॥ १०५ ॥ ऊब यावी कोठून । शीताचें न होई निरसन । कापडाचें कापड-
पण । त्या चिंध्यांनीं नाशिलें ॥ १०६ ॥ कर्ममार्गाचा नायनाट । चार्वा-
कानें केला स्पष्ट । फैलावूनी भरमसाट । मतें आपुलीं कांहींतरी ॥१०७॥
विरुद्धाविरुद्ध मतमांडणी । केली या विद्वानांनीं । त्या मतामतांच्या
गलबल्यांनीं । दुनिया झाली हैराण ॥१०८॥ मतप्राबल्य माजलें । व्याख्या-
त्यांना महत्त्व आलें । भावभक्तीचें वाटोळें । झालें सहज त्यायोगें ॥१०९॥
कांहीं भरमसाट मताला । राजाश्रय मिळता झाला । त्यांनीं मताचा फैलाव
केला । राजसत्तेच्या जोरावर ॥ ११० ॥ राजसत्तेच्या समोर । कोणाचा
न चाले जोर । जें जें बोलेल नृपवर । तें तें लोक मानिती खरें ॥ १११ ॥
सृष्टी चालण्या सुरळीत । जिंकण्या शत्रुपक्षाप्रत । शस्त्र, अस्त्र आणि
मंत्र । ऐसें निर्मिले वेदानें ॥ ११२ ॥ शक्ति असल्या अंगांत । शस्त्राचा
उपयोग होत । आधिभौतिकांचें समस्त । ज्ञान पाहिजे अस्त्राला ॥ ११३ ॥
सशास्त्र सदाचाराविना । मंत्रविद्या फळेना । या तिन्ही गोष्टींस उणे-
पणा । हल्लीं आला पृथ्वीवरी ॥ ११४ ॥ स्वैरतेनें वाढली चैन । चैनी-
मुळें शक्ति क्षीण । बसली आहे होऊन । विषयवासना वाढली ॥११५॥
अद्वेष्टी उपासना । कोठेंच दृष्टीं पडेना । या हल्लींच्या विद्वानां । अहं-
कारें पछाडिलें ॥ ११६ ॥ धेनूंचे होती संहार । मद्यमांसांची आवड
फार । धर्मद्वेष्टे पापी नर । संपन्न होऊन बसले ॥ ११७ ॥ हल्लींपरी
हा क्रम चालतां । दुनिया संपेल जगन्नाथा ! । हीच वर्दी देण्याकरितां ।
आम्ही आलों येथवर ॥ ११८ ॥ तुजविण या संकटासी । कोणी न वारिता
निश्चयेंसी । मुंग्यांच्यांनीं होय कैसी । शिकार सिंहाची उमाधवा
॥ ११९ ॥ महीवरचा धुरळा । अवघा शमविण्या जगत्पाळा ! । पाहि-
जेचि पर्जन्य झाला । तें न साधे सड्यानें ॥ १२० ॥ रात्रीचा तो अंधार ।
दिव्यानें न होई दूर । तेथें पाहिजे दिनकर । उदय पावला प्राचीसी
॥ १२१ ॥ ऐशी ऐकून देववाणि । बोलता झाला शूलपाणि । म्हणे देव
हो ! भ्यावें मनीं । तुमचा आशय मीं जाणितला ॥ १२२ ॥ यावत्चंद्र
दिवाकर । वेद ऐसेंच राहतील स्थिर । कां कीं अक्षय अभंग निर्विकार ।
वेद आहेत माझ्यापरी ॥ १२३ ॥ चार्वाक मतें झंझावात । जरी जोरा-
वला अत्यंत । परि त्याचा न होई आघात । केव्हांहि त्या पर्वता
॥ १२४ ॥ मृत्तिकेचें ढेकूळ । काय सागरा ढवळवील । सोन्याप्रति न खाई

मळ। तें मातींत पडलें जरी ॥ १२५ ॥ तैशी वैदिक धर्माची आहे स्थिति। तो न बुडे कल्पांतीं। वरचेवर जे आघात होती। त्यावर हाच मोठेपणा ॥ १२६ ॥ ताव सोन्यास वरच्यावरी। जखमा शूराच्या शरीरीं। चढे हिराच ऐरणीवरी। तो न योग कांचेला ॥ १२७ ॥ मागें ममाज्ञेंकरून। विष्णु झाला संकर्षण। मध्यम कांडाचें उद्धरण। करावया भूमीवरी ॥ १२८ ॥ शेष पतंजलि झाला। शोधून योगयोगांगाला। तो मार्ग सोपान केला। जाया मोक्षा साधकातें ॥ १२९ ॥ तैसेंच होईल आतां। वेदोद्धार करण्याकरितां। मी माझ्या धाडीन सुता। या कार्तिकेयाकारणें ॥ १३० ॥ तो कुमारिल भट्ट होऊन। भूतळीं होईल अवतीर्ण। ब्राह्मणाच्या वंशीं जाण। रक्षिण्या कर्मपरंपरा ॥ १३१ ॥ ऐसें देवांस सांगितलें। आणि कुमाराकडे पाहिलें। तेणें चित्त मुदित झालें। सुब्रह्मण्यस्वामींचें ॥ १३२ ॥ शिव म्हणे हे षडानना। पार्वतीच्या हृदयरत्ना। माझी आहे तुला आज्ञा। भूतळीं जन्म घेण्याची ॥ १३३ ॥ करणें वेदांचें रक्षण। हेंच आहे महापुण्य। लाभ अलौकिक याहून। नाहीं कोणाचाच सुजाणा ॥ १३४ ॥ तो लाभ तुवां घ्यावा। धर्मोद्धार करावा। अभक्तांचा घ्यावा। पूर्णपणें समाचार ॥ १३५ ॥ मागे शंखासुरानीं। वेद नेले चोरूनि। ते वराह होऊन माधवानीं। परत आणिले सुजाणा ॥ १३६ ॥ त्या गोष्टी नंतर। प्रसंग हाच वेदावर। आला आहे दुर्धर। चार्वाकांच्या सुळसुळाटें ॥ १३७ ॥ त्या चार्वाकांचें निर्दाळण। करतां झाला नारायण। वेश बुद्धाचा घेऊन। कपिलवस्तु नगरीमध्यें ॥ १३८ ॥ त्यानें चार्वाकांच्या स्वैराचारा। आळा थोडा घातिला खरा। परि फैलाविला पसारा। वैदिक मताविरुद्ध ॥ १३९ ॥ मूळ वैदिक धर्माचें। जें कां कर्मकांड साचें। त्याला, सोडीव दांभिकांचे। हातून, तूं कार्तिकेया! ॥ १४० ॥ त्या कर्मकांडगंगेंत। घाण झाली अतोनात। ती तूं जाऊन काढ त्वरित। कल्याणास्तव जगाच्या ॥ १४१ ॥ त्या कर्मगंगेचें वारि। निर्मालिया घाण सारी। पुष्टिदायक भूमीवरी। होऊन, प्रत्यय येईल ॥ १४२ ॥ तेंच करायाकारणें। मृत्युलोकीं तुला जाणें। आहे मदीय आज्ञेनें। वेळ आणीबाणीची ॥ १४३ ॥ ऐसें ऐकतां पितृवचन। स्वामी कार्तिका चढलें स्फुरण। आकाशींचें सजलघन। जेवीं मोरा नाचवितें ॥ १४४ ॥ स्वामी वदती जोडून कर। आपुली आज्ञा झाल्यावर।

कर्म-कांडाचा जयजयकार । होईल वाटे निःसंशय ।। १४५ ।। जैमिनीय न्यायमालेप्रत । ती आणून अमलांत । चुका यज्ञकृत्यांत । कोठें होती दावीन त्या ।। १४६ ।। कर्ममार्ग गंगाजल । सकामत्व हें शेवाळ । काढीन मी तत्काळ । सोज्ज्वळ त्यातें करावया ।। १४७ ।। शेवाळ तें काढल्या खरी । झुडपें लागतीं कांटेरी । त्याविण न होय वारि । शुद्ध तें देवा ! कदा ।। १४८ ।। हें शेवाळ काढण्याकरितां । झुडूप कांटेरी राजसत्ता । ती एखादी देई हातां । म्हणजे सोपें जाईल ।। १४९ ।। मत प्रस्थापित करण्याकरितां । साह्य लागतें राजसत्ता । लांब वाहत जाण्याकरितां । जेवीं उतार लागतो ।। १५० ।। ऐसें गुहाचें भाषण । ऐकून बोले पंच-वदन । इंद्राकडे पाहून । तें आतां अवधारा ।। १५१ ।। हे इंद्रा, परीस वैखरी । तूं या कार्तिक स्वामीपरी । जाऊनिया भूमीवरी । धर्मोद्धार करावा ।। १५२ ।। तूं सुधन्वा नामें नृप व्हावें । साह्य गुहाचें करावें । हें विधात्या ! तूंहि यावें । शिष्य होऊन गुहाचा ।। १५३ ।। नाम घेई मंडण-मिश्र । आचरणें कर्ममार्गास । बरोबर ने सरस्वतीस । आपुली पत्नी करावया ।। १५४ ।। तूर्त तुम्हीं पुढें जावें । मीं सांगितलें तें करावें । परावरी न विसंबावें । आपुलें कार्य आपण करा ।। १५५ ।। मीहि येतों मागून । मानवी अवतार घेऊन । माना हें प्रमाण वचन । जा आतां स्वस्थाना ।। १५६ ।। ऐसें भगवान् बोलतां । आनंद झाला समस्तां । करूनि शिवास दंडवता । देव निघून गेले कीं ।। १५७ ।। इति श्रीदास-गणुविरचित । श्रीशंकराचार्य चरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ।। १५८ ।। हरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

## अध्याय पांचवा

।। श्रीगणेशाय नमः ।। हे पंचतुंडा उमापति । हृदयीं माझ्या करून वस्ती । वदवी आचार्यचरिताप्रति । जेणें धन्य होईन मी ।। १ ।। जे जगद्-गुरूचें चरित । श्रेष्ठ आहे अत्यंत । जयाचिया पुढें पडत । फिकें अमृत स्वर्गीचें ।। २ ।। तें अमृत अमर करी । कैवल्य ना देई परी । हें प्राशितां श्रवणद्वारीं । मोक्ष मिळे रोकडा ।। ३ ।। त्या श्रेष्ठतर अमृतासी । द्यावया

हे व्योमकेशी । योग्य पात्र मजपाशीं । नाहीं हें कळतें मला ।। ४ ।। माझी वाणी अति हीन । परी योग्य पात्र ना म्हणून । नको कचरूं देऊं मन । चरितामृत वाढावया ।। ५ ।। पात्र त्या धारण करितें । परी चवी ना बदलवीतें । काय साखर मडक्यातें । ठेवितां ती लागे कडू ।। ६ ।। याचा विचार करावा । याचक ना परत लावावा । घडोव आचार्यांची सेवा । देवा माझ्या करांनीं ।। ७ ।। देवा रामकृपेनीं । सेतु बांधिला वानरांनीं । हें ध्यानांत धरोनि । साह्य मशीं देवा ! करा ।। ८ ।। माझी वाणी लोह खास । जगद्गुरूचें चरित परीस । तिचा संबंध झालियास । हेमपणास पावेल ती ।। ९ ।। म्हणून हे जगदुद्धारा । तुझ्यापुढें पसरतों पदरां । वरद-कर मस्तकीं धरा । आणि वदवा चरितातें ।।१०।। ओढा गंगेकडे आला । आणि गंगा न घेई उदरीं त्याला । तरी हा दोष गंगेला । आहे मुळीं न ओढ्यातें ।। ११ ।। त्या न्यायें तुझे चरण । धरिले अनन्य होऊन । आतां हे पार्वतीरमण ! माझी उपेक्षा करूं नको ।। १२ ।। सम्राटाचा आश्रित गण । मागूं लागल्या कोरान्न । त्या गणाचें हीनपण । जाचक होईल सम्राटा ।। १३ ।। मी विश्वासलों तुजवरी । आतां कृपा सत्वर करी । माझ्या दोषास मन्मथारि । ये वेळीं पाहूं नको ।।१४।। असो श्रोते चतुर्थाध्यायीं । देव आपापल्या ठायीं । जाते झाले लवलाही । शंकरासी वंदूनिया ।।१५।। इकडे मृत्युलोकांत । वैदिकांचा छळ बहुत । होऊं लागला त्यांप्रत । जोड कोठें न राहिली ।। १६ ।। शके सतराशे बासष्टासी । युधिष्ठिर शकाच्या परियेसीं । घालून दगडी घाण्यासी । ब्राह्मण मारिले अशोकानें ।। १७ ।। जैनबौद्धांचा पुरस्कर्ता । हा अशोक राजा साच होता । याचीहि क्रूरता । पुढें न कायम राहिली ।। १८ ।। जे जैन गाळून पाणी । पिती तेच मानवी प्राणी । वधावया न भीती मनीं । दया दाविती शब्दांत ।। १९ ।। बौद्ध जैन माजले । वैदिक पळों लागले । यज्ञसाहित्य घेऊन भले । पर्वताच्या गुहांतून ।। २० ।। पुढें युधिष्ठिर शके एकविसांत । श्रोते बंगाल प्रांतांत । मेदिनीपुर ग्रामांत । सुधन्वा जन्मला इंद्रांशें ।। २१ ।। ज्या शहरा मिदनापुर । सांप्रत म्हणती भूमीवर । तेथेंच धरिला अवतार । इंद्रानें भूप सुधन्व्याचा ।।२२।। हा सुधन्वा नामें भूप पाही । होता जैन मतानुयायी । परी न्यायबुद्धि याचे ठायीं । होती परम जागृत ।। २३ ।। पंडित जैन-बौद्धांचे । याच्या आश्रया होते साचे । बहुतेक मेदिनीपुराचे । लोक बौद्ध

जैन होते ।। २४ ।। क्वचित शहरीं कोठेंकोठें । वैदिकधर्मी ब्राह्मण भेटे । रस्तोरस्तीं पसरतां कांटे । गाढवेंच फिरती निर्भय ।। २५ ।। ऐशा त्या समयाला । श्रोते तैलंगण देशाला । जयमंगल ग्रामाला । गोदावरीच्या आसमंतभागीं ।। २६ ।। शके एकविसशें आणि दहा । युधिष्ठिर शकाच्या बुध हो ! पाहा । जन्मता झाला पुरुष महा । वेदोद्धार करण्यास ।।२७।। असो त्या जयमंगल नगरीं । यज्ञेश्वर भट सदाचारी । चंद्रगुणा पवित्र नारी । सहधर्मिणी जयाची ।। २८ ।। हें जोडपें अत्यंत । पवित्र आणि परम शांत । वैदिकमार्गी सदा रत । सदन अवघ्या सद्‌गुणांचें ।। २९ ।। या चंद्रगुणाचिये उदरीं । जन्मास आला तारकारि । वैशाखमासामाझारीं । रविवारीं पौर्णिमेला ।। ३० ।। वेळा होती अभिजित । उच्च स्थानीं ग्रह समस्त । रवि आला आकाशांत । माध्यान्हींहि विबुध हो ! ।। ३१ ।। ऐशी मंगल वेळा भली । चंद्रगुणा प्रसूत झाली । दैदीप्यमान प्रसवली । पुत्ररत्न श्रोते हो ।। ३२ ।। हाच कुमारिल भट्ट । वेदामाजीं अति श्रेष्ठ । यानें मिळविलें अचाट । यश जिंकून जैनांना ।।३३।। याच कुमारिल भट्टा-प्रति । ज्ञाते भट्टपाद ऐसें म्हणती । वेदोनारायणाची मूर्ति । प्रत्यक्ष हाच भूमीवर ।।३४।। ही वेळा अभिजित । श्रेष्ठ आहे अवघ्यांत । याच वेळीं जानकीनाथ । रघुकुलासी जन्मला ।। ३५ ।। कश्यपात्मज वामनाला । याच वेळीं जन्म झाला । भाद्रपद शुद्ध द्वादशीला । हें विदित आहे सर्वांसी ।। ३६ ।। त्याच अभिजित वेळेस । कुमारिल भट्ट जन्मास । आला तैलंगण देशास । जयमंगल गांवामधे ।। ३७ ।। जन्मोत्सव श्रोते याचा । कोठेंहि न झाला साचा । गरिबाच्या संततीचा । उत्सव सांगा कोण करी ? ।। ३८ ।। त्यांतून वैदिकाच्या पंथा । पडतां काळ लागला होता । नव्हती करीं राजसत्ता । वैदिकाच्या ये्तुलीहि ।। ३९ ।। जेवीं यादवाच्या कुळीं । मथुरेंत जन्मला वनमाळी । तैसाच हा जयमंगली । ज्ञानसूर्य उदेला ।। ४० ।। वेद-वेदांगें ब्राह्मण । शिक्षा निरुक्त व्याकरण । काव्य, तर्क, पुराण । हीं अवगत झालीं भट्टपादा ।। ४१ ।। झाला विद्यापारंगत । श्रोते ऐन तारुण्यांत । तैलबुद्धि अत्यंत । होती भट्टपादांची ।। ४२ ।। पुढें जैन मताचें । रहस्य तें शिकण्या साचें । कुमारिल भट्टाचें । चित्त आतुर झालें कीं ।। ४३ ।। श्रीनिकेतन नांवाचा । एक पंडित जैनाचा । होता अति उत्तम साचा । त्यांच्या जैन पंथामधें ।। ४४ ।। त्या श्रीनिकेतनापाशीं । जैन शास्त्र शिक-

ण्यासी । कुमारिल आला अति हर्षीं । ज्ञानजिज्ञासा बलवत्तर ॥ ४५ ॥ एके दिवशीं निकेतना । कुमार करी भाषणा । म्हणे जैन पंथाच्या कल्पना । अज्ञानमूलक दिसती कीं ॥ ४६ ॥ यथातथ्य ईश्वराचें । ज्ञान जैनां न झालें साचें । म्हणून ग्रहण करण्याचें । नाहीं तया कारण ॥ ४७ ॥ माझें आयुष्य गेलें व्यर्थ । शिकण्या हें थोतांड मत । तुम्हीहि व्हा सावध त्वरित । अहो निकेतन गुरुजी ॥ ४८ ॥ ऐसें ऐकतां भाषण । कोपले गुरुजी निकेतन । तुझें कपट मजलागून । कुमारा आजीं समजलें ॥ ४९ ॥ द्विजरूपी पल्वलाचा । तूं किडा आहेस साचा । सरोवरासम जैनाचा । पंथ तुला न पटेल कीं ॥ ५० ॥ तुम्ही अवघे ब्राह्मण । धूर्त कावेबाज पूर्ण । आम्ही भोळे भाविक जैन । तुझ्या कपटा न ओळखिलें ॥ ५१ ॥ हें पूर्वीच कळतें जरी । तुला न शिकवितों विद्या तरी । उलटलास माझ्यावरी । विद्या शिकून मजजवळ ॥ ५२ ॥ हें कां सुज्ञाचें लक्षण । तूं गुरुद्रोही कृतघ्न । दावूं नकोस मजला वदन । काळें करी येथूनिया ॥५३॥ मग कुमार करी भाषणा । अहो गुरुजी निकेतना । पूर्णपणें आणा मना । सिद्धान्त जैन शास्त्राचे ॥ ५४ ॥ म्हणजे तुमचें तुम्हांसी कळेल । खरें खोटें जें कां सकळ । पंथाभिमान केवळ । खऱ्या ज्ञात्यांनीं वाहूं नये ॥ ५५ ॥ तरीच होय तो ज्ञाता । ना तरी अवघें वृथा । तुम्हीच सोडून जैनपंथा । चला माझ्याबरोबर ॥ ५६ ॥ गुरूचा द्रोह करण्यास । मी न आलों जन्मास । खरें जे का असे त्यास । धुंडावया जन्मलों मी ॥ ५७ ॥ ऐसें बोलून निघाला । कुमार निजगृहीं आला । कांहीं दिवस राहिला । विश्रांति ती घेण्यास ॥ ५८ ॥ स्फोट जैन मताचा । करण्या कुमार निघाला साचा । श्रेष्ठ स्वानुभवी ज्याची वाचा । ऐसा व्याख्यानसिंह तो ॥ ५९ ॥ गांवोगांव फिरूनि । बौद्ध जैनां जिंतिलें त्यांनीं । भरसभेंत खंडोनि । टाकिलें त्यांचें थोतांडमत ॥ ६० ॥ ऐशीं जयपत्रें घेत घेत । आले मेदिनिपुरांत । जेथें सुधन्वा नामे नृपनाथ । राज्य करीत होता कीं ॥ ६१ ॥ श्रोते हें मेदिनीपुर । होतें अति सुंदर । वाटे दुजी भूमीवर । अमरावतीच इंद्राची ॥ ६२ ॥ बागबगीचे सभोंवार । शहराच्या त्या मनोहर । साधिले चौक साचार । ठिकठिकाणीं शहरामधें ॥ ६३ ॥ गर्दी चैत्य विहारांची । मेदिनी पुरामाजीं साची । श्रमणक जैन जातीची । मानमान्यता विशेष ॥ ६४ ॥ रुग्णालयें गरिबांसाठीं । बांधलीं होतीं

मोठमोठीं । सरिता सरोवरांकांठीं । घाट तसे विशाल ॥ ६५ ॥ पाठ-शाळा शिल्पशाळा । पांथिकांसाठीं धर्मशाळा । पुरीच्या मध्यभागाला । हर्म्य नृपाचा सुंदर ॥ ६६ ॥ ऐशा त्या अनुपम शहरीं । कुमारिल आले सत्वरीं । कांहीं शिष्यांस बरोबरी । घेऊनिया विबुध हो ॥ ६७ ॥ कुमार-भट्टातें पाहून । हांसूं लागले पौर जन । म्हणती हें कोठून । सोंग आलें वैदिकाचें ॥ ६८ ॥ कुमारिल भट्टानें । कळविलें राजाकारणें । माझी एक मानणें । विनंती तूं नृपाळा ॥ ६९ ॥ तूं भूप या पुरीचा । पोशिंदा अवघ्या मतांचा । प्रकार अजादुजाचा । तुजजवळ नसावा कीं ॥ ७० ॥ अवघ्या वृक्षलतांतें । एक जमीन धारण करिते । ती न कोणाची पाहते । जातपात गुणधर्म ॥ ७१ ॥ त्या मेदिनीसमान । तुझा नृपाळा धर्म जाण । अभिमानातें टाकून । खरें तेंच शोधित राहा ॥ ७२ ॥ माजलीं बौद्ध जैनमतें । तीं मी आलों खंडण्यातें । धाड पाचारण तयांतें । एक सभा भरवून ॥ ७३ ॥ एकमेकांचे सिद्धान्त । मांडणें भूपा ! सभेंत । करून वादविवादाप्रत । सत्य काय तें ठरवावें ॥ ७४ ॥ तें मानिलें सुधन्व्यासी । धाडिले बौद्धजैनांसी । निमंत्रण येण्या सभेसी । कुमारासवें वादावया ॥ ७५ ॥ सुधन्वा जैन मताचा । जरी राजा होता साचा । तरी तो विद्वानांचा । आदर करी कोणत्याहि ॥ ७६ ॥ भट्ट-पादाची प्रार्थना । सुधन्व्यानें आणिली मना । आणि धाडिलें पाचारणा । बौद्धजैनांकारणें ॥ ७७ ॥ सभा धर्मवादाची । राजवाड्यांत ठरली साची । बौद्धजैन पंडितांची । गर्दी उडाली विशेष ॥ ७८ ॥ कुमारिल भट्टाप्रति । सामोरा आला भूपति । आदर करून आपुल्या हातीं । पवित्रासनीं बैस-विलें त्या ॥ ७९ ॥ पौरजनांची गर्दी झाली । धर्मसभा पाहण्या भली । मुंगीलाहि न राहिली । रीघ तेथें जावया ॥ ८० ॥ दरकदार, सिलेदार । मानकरी आणि जहागिरदार । वीरासनें घालून थोर । बसले सभेंत राजाच्या ॥ ८१ ॥ बौद्धजैनांसमोरी । कुमारिल बसले आसनावरी । सभेचिया मध्यंतरीं । सिंहासनीं सुधन्वा ॥ ८२ ॥ ग्रहनक्षत्रें पंडित । लोक अवांतर चांदण्या सत्य । सभाकाशीं निशानाथ । सुधन्वा तो सिंहासनीं ॥ ८३ ॥ टेकड्यापर्वतांमाजी मेरु । वा वृक्षांत कल्पतरु । किंवा तो विनताकुमरु । खगीं शोभे तैसा नृप ॥८४॥ श्रोते वक्ते आसनीं बसले । कुशल प्रश्न प्रथम झाले । तो एक कारण उदेलें । अनायासें वादास ॥८५॥

राजद्वारासमोरी । एका सघन वृक्षावरी । कोकिल तो गायन करी । आपुल्या मधुर रवानें ॥ ८६ ॥ तें कोकिलांचें गायन । जमेस आपुल्या धरून । भट्टपाद तो गर्जून । सभेत ऐसें बोलला ॥ ८७ ॥

मलिनैश्चेन्न संगस्ते नीचैः काककुलैः पिक
श्रुतिदूषक निर्‍ह्रादैः श्लाघनीयस्तदा भवेः ॥ १ ॥

हे कोकिला ! ऐक भाषण । अवघ्या पक्ष्यांत जे का हीन । कावळे पापी पक्षी मलिन । त्याची संगति आहे तुला ॥ ८८ ॥ शब्द ज्या कावळ्यांचा । श्रुतीस नाहीं मान्य साचा । त्याच्या अवास्तव बडबडीचा । ज्ञाते न करिती विचार ॥ ८९ ॥ त्या दुष्ट कावळ्यांची । संगत तुला आहे साची । म्हणून तुझी न व्हावयाची । कोठेंहि ती प्रशंसा ॥ ९० ॥ हीन पापी संगत तुला । जरी ही नसती कोकिळा । तै तुझें करण्याला । वर्णन कोण समर्थ ? ॥ ९१ ॥ एक्या संगतीकरून । तूं उत्तमोत्तम असून । अवघ्यांमाजी ठरलास हीन । हें दुर्दैव बापा ! तुझें ॥ ९२ ॥ वर्णाचें तें काळेपण । गुणांवरून ठरे हीन । भगवान जो गोपालकृष्ण । निंद्य न कोणीं मानिला ॥ ९३ ॥ कां कीं शब्द कृष्णाचा । श्रुतिसंमत आहे साचा । म्हणून गौरव तयाचा । झाला जगतीं चोंहीकडे ॥ ९४ ॥ श्रुतिबाह्य जें भाषण । ते कावळ्याचे शब्द जाण । त्यांच्यामाजी बसून । तूं हें गान करूं नको ॥ ९५ ॥ कां कीं कावळे कदाचित । टोचे मारतील तुजप्रत । तुझा हा श्रुतिसंमत । आवाज तो ऐकूनिया ॥ ९६ ॥ हल्लीं या काश्यपेशीं । श्रुतिसंमत नाहीं ऐशीं । मतें निघालीं बहुवशीं । किलकिलाटासम कावळ्याच्या ॥ ९७ ॥ श्रुतिसंमत ज्ञान साचें । आहे एक वैदिकांचें । तत्त्वज्ञान इतरांचें । कावळ्यांचे शब्दापरीं ॥ ९८ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । बौद्धजैन कोपले । हमरीतुमरीवरी आले । कांपूं लागले थरथरां ॥ ९९ ॥ हे वैदिक पशो ऐक ऐक । आम्हांपुढें न लावी नाक । अन्योक्तीनें आम्हांस देख । तूं कावळे ठरवूं नको ॥ १०० ॥ श्लोकार्थ आम्हां समजला । तूं काक ठरविलें आम्हांला । आणि आमच्यांतिल मुधन्व्याला । तूं कोकिळ ठरविलेंस ॥ १०१ ॥ हें तुझें शब्दपांडित्य । दावी न आम्हां यत्किंचित । आमुचे खोडी सिद्धान्त । सशास्त्र तूं ये ठायीं ॥ १०२ ॥ भट्टपादें तें ऐकिलें । आणि विनयानें भाषण केलें । नका करूं हो आपुलें । चित्त तें क्रोधवश ॥ १०३ ॥ जो श्रुतीला असे मान्य । तोच खरा सिद्धान्त

जाण। उगीच गाढवाचें गान। कोण जाई ऐकावया ? ॥ १०४ ॥ ज्या वेदांकारण। श्रुति हें आहे अभिधान। त्या श्रुतीला सोडून। जे ते अपसिद्धान्त हो ॥१०५॥ अपसिद्धान्त काढूं नका। घात जगाचा करूं नका। शब्दजाळाची टाकूं नका। धूळ डोळ्यांत कोणाच्याहि ॥१०६॥ तुमच्या शून्य वादाप्रत। शेंडा बुडूख नाहीं सत्य। अवघें तुमचें थोतांड मत। त्याची प्रतिष्ठा सांगूं नका ॥१०७॥ कांहीं असल्यावांचून। उत्पत्ति ती कशाची न। उगीच किडयाचें जनन। पाहून सिद्धांत ठोकूं नका ॥१०८॥ बौद्ध जनांनीं आपुले। सभेंत सिद्धांत मांडिले। ते यच्चयावत् खोडिले। कुमारिलभट्टांनीं ॥ १०९ ॥ आधिक्य जैनबौद्धांचें। सभेठायीं होतें साचें। वनामाजीं बाभळीचे। छायातरु दहापांच ॥११०॥ म्हणून छायातरूंची। योग्यता न ये बाभळीस साची। त्याची आहे व्हावयाची। सरपणाठायीं योजना ॥ १११ ॥ ते जैनबौद्धांचे सिद्धान्त। मुळापासून खोडिले सत्य। तर्क-व्याकरणांचें हातांत। शस्त्र तें घेऊनिया ॥ ११२ ॥ जो वादाटवीचा प्रत्यक्ष हरि। ब्रह्मज्ञानाचा अचलगिरि। तत्त्व ज्याचें सूर्यापरि। अवघ्यां प्रकाशित करीत असे ॥ ११३ ॥ सिद्धान्त भट्टपादाचे। जैना न आले खोडितां साचे। तेज वैश्वानराचें। झांकण्या कोण समर्थ ? ॥ ११४ ॥ बौद्धजैन पंडितांविण। भट्टपादांचें तत्त्वज्ञान। सर्वांप्रति झाले मान्य। एकाच त्या व्याख्यानानें ॥ ११५ ॥ या अपमानें राग आला। जैनबौद्ध पंडितांना। लाली लाल असे झाला। चेहरा त्यांचा विबुध हो ॥११६॥ वाटे जैनबौद्धांचें जें मत। भट्टपादें खोडिलें सत्य। तोच तरु साक्षात। उन्मळून पडला भूमीवरी ॥ ११७ ॥ ओलावा गेला मावळून। वृक्ष झाला सरपण। फांद्या झाल्या इंधन। त्यांच्यीं पेटवण्या कोपाग्नि ॥११८॥ तेणें जैनबौद्धांचा। कोपानल भडकला साचा। तो अंतरीं पेटल्याचें। मुखें सांगूं लागलीं ॥ ११९ ॥ त्या सभारूप सरोवरीं। जैनबौद्धांचीं मुखें सारीं। बुध हीं रक्तकमलापरी। दिसूं लागलीं अवघ्यांना ॥ १२० ॥ बोलण्याची न छाती उरली। क्रोधें तप्त तनू झाली। कराकरां ती दंतावली। चावण्या केला आरंभ ॥ १२१ ॥ भिंतीचिया चित्रापरी। स्तब्ध सभा झाली खरी। भट्टपादांच्या समोरी। कोणी न धजे बोलावाय ॥ १२२ ॥ सुधन्वा तो होता जैन। स्वपक्षाचा अपमान। झालेला न ालज्ञा सहन। हा असे न्यायची ॥ १२३ ॥ तो बोलला विनयेंकरून।

भट्टपादांकारण । अनुपम आहां आपण । विद्वान् यांत शंका नसे ॥१२४॥ शब्दसाहित्याच्या राशि । असंख्य आहेत आपणांपाशीं । तुम्ही जैन-बौद्धांसी । जिंकिलें त्याच्या जोरावर ॥ १२५ ॥ तुम्ही परम विद्वान् । आहां हें केलें मान्य । तेवढ्यापुरतें लिहून । जयपत्र आम्ही देतों तुम्हां ॥ १२६ ॥ ही सभा न साहित्याची । आहे धर्मतत्त्वाची । नाहीं होणें तयाची । परीक्षा शब्दजलानें ॥ १२७ ॥ जरी तुमचा वेद सत्य । असेल मान्य ईश्वराप्रत । तरी कृत्य कांहीं अघटित । करून येथें दाखवा ॥१२८॥ ज्या कांहीं अघटित घटना । होताती या जगीं जाणा । त्या न होती ईश्वराविना । ऐसें सांगे पुराण तुमचें ॥१२९॥ तुम्हीं शब्दांनीं जिंकिलें । या जैन बौद्धांकारणें भले । आतां अघटित राहिलें । तें कांहीं दावा करून ॥ १३० ॥ तें झाल्यावांचून । आम्ही न मानूं प्रमाण । तुमच्या वेदा-लागून । शब्दच्छल आतां पुरे ॥ १३१ ॥ ऐसें ऐकतां भूपवचन । भट्टपाद तोषले जाण । वाहवा राजा ! मोठेपण । येणेंच तुझें कळलें मला ॥१३२॥ अघटित साक्षात्काराविना । ईशतत्त्व ना पटे कोणा । ती तुझ्या पटविण्या मना । करूं मी तें काय सांग ॥ १३३ ॥ तें ऐकून नृपवर । बोलता झाला जोडूनि कर । अति उंच या डोंगरावर । आपण चढावें प्रथमतः ॥१३४॥ आणि जाऊन शिखरावरी । तेथून उडी घ्यावी खरी । भट्टपादा भूमीवरी । या सर्वांदेखत ॥ १३५ ॥ त्यांत तुमचें रक्षण । झाल्या मानूं प्रमाण । तुमच्या वेदांलागून । सत्य सत्य त्रिवाचा ॥ १३६ ॥ हें भाषण ऐकतां क्षणीं । भट्टपाद उठले तेथूनि । पर्वतशिखरास जाऊनि । करिते झाले प्रतिज्ञा ॥१३७॥ हे सच्चिदानंद आनंदघना ! हे निर्विकल्पा निरंजना ! । हे अजअजिता परिपूर्णा ! । सर्वव्यापका सर्वेशा ! ॥ १३८ ॥ वेदत्रयी असेल मान्य । जरी देवा तुजकारण । तरीच माझें रक्षण । होईल उडी घेतल्याहि ॥१३९॥ तुझ्या श्वासापासून भले । जरी वेद असती निघाले । तरी माझें रक्षण वहिलें । होईल उडी टाकितां ही ॥ १४० ॥ वेदांवांचून जें कां इतर । मत तें थोतांड साचार । तें खरें असल्या न होणार । घात उडी टाकितांहि ॥ १४१ ॥ या वैदिक धर्मावरी । श्रद्धा माझी असल्या खरी । रक्षण माझें सर्वतोपरी । होईल उडी टाकितांहि ॥ १४२ ॥ मागें तुम्ही अनंता । रक्षिलें आहे प्रल्हादभक्ता । पहाडावरून लोटितां । त्याचें बाळ प्रत्यंतर ॥ १४३ ॥ भियाळाचे चिलियाला । पुनरपि उठविलें

जगत्पाळा ! । या गोष्टी नीळकंठा ! । विसरूं नका ये काळीं ॥ १४४ ॥ देवा ! हें अगोचरपण । मी न करितों होऊन । पर्वतावरून पडतां प्राण । जातील हें मी जाणतों ॥ १४५ ॥ परी या बौद्धजैन पंडितांनीं । राजाची करून विनवणी । हें साहस मजलागूनि । करावया लाविलें ॥ १४६ ॥ या कृत्यासी इनकार । जरी मी करितों साचार । तरी येईल वेदावर । आरोप थोतांडपणाचा ॥१४७॥ पंचप्राणांपेक्षांहि । वेद मला प्रिय पाही । त्याची 'ठचा ठचा' जगाठायीं । न व्हावी हें इच्छितों मी ॥ १४८ ॥ म्हणून वेदांची सत्यता । दावण्यासी भगवंता । मी उडी टाकितों आतां । या पर्वताच्या कड्यावरून ॥ १४९ ॥ भट्टपाद स्वशिष्यांना । सांगे हरिः ॐ ऐसें म्हणा । मी उडी टाकितांना । उच्च रवातें काढून ॥ १५० ॥ ऐसें शिष्यांसी सांगून । हरिःॐ ऐसें म्हणून । उडी घेतली कड्यावरून । डोंगराच्या भट्टपादें ॥ १५१ ॥ ही मौज पाहण्याला । होता समुदाय बहुत जमला । सुधन्वाहि तेथें आला । जैनबौद्धांसी घेऊन ॥ १५२ ॥ उडी टाकून खालतीं । आले भट्टपाद सन्मति । वैदिक आरोळ्या मारिती । जयशब्दें वरच्यावर ॥ १५३ ॥ कापसाच्या बोळ्यापरी । भट्टपाद उतरले भूमीवरी । तें पाहून अंतरीं । सुधन्वा झाला लज्जित ॥ १५४ ॥ जैन-बौद्धांनीं आपुल्या माना । खालीं घातल्या असती जाणा । तो तेजःपुंज पाहवेना । पुरुष त्यांना भट्टपाद ॥ १५५ ॥ प्रेक्षकांनीं अत्यादरीं । तुळशी-फुलें घेऊन करीं । उधळिलीं भट्टपादांवरी । जयघोष तो करूनिया ॥१५६॥ भगवंतानें निर्मित । आहे एक वैदिक पंथ । इतर धर्म थोतांड साक्षात । ये विषयीं शंका नसे ॥ १५७ ॥ श्रोते तेथेंच कित्येकांनीं । दिली पार फेकूनि । जैनबौद्धांचीं चिन्हें जाणी । उपदेशें भट्टपादांच्या ॥ १५८ ॥ खरा अधिकारी भेटल्याविना । संशय तो जाईना । बौद्धजैनांचिया मना । जबर धक्का बसला हा ॥ १५९ ॥ पंडित ते बौद्ध जैन । होते झाले तेज-हीन । अरुणोदयीं कोठून । तेज राहावें चंद्रम्याला ? ॥ १६० ॥ सुधन्वा राजा शरणागत । आला असे जोडून हात । म्हणे स्वामी मजप्रत । अप-राधाची क्षमा करा ॥१६१॥ वैदिक पंथ धन्य धन्य । तैसेंच ते वेद तीन । इतर धर्म यावरून । ओवाळून टाकावे ॥ १६२ ॥ इकडे जैनबौद्धें खल-बत केलें । सुधन्व्यासी म्हणूं लागले । तुला हें जें वाटलें । या उडीचें कौतुक ॥ १६३ ॥ यांत न विशेष कांहीं । ते योगाभ्यासें साध्य होई ।

वा मंत्रतंत्रें करतां येई । हे सुधन्वा ! ऐसें कृत्य ॥१६४॥ जारण मारण उच्चाटण । ह्या ज्या विद्या असती हीन । त्या वेदानेंच केल्या कथन । जग नादीं लावावया ॥ १६५ ॥ मांत्रिक मंत्रसामर्थ्यें । अघटित ऐशीं करतो कृत्यें । काढी हजारों पदार्थांतें । नुसत्या बगलेमधूनि ॥ १६६ ॥ जपून नरसिंह मंत्रातें । चित्ररेखेनें प्रद्युम्नातें । एक्या रात्रींत उचलून नेलें । उषेस्तव बाणसदनीं ॥ १६७ ॥ ऐशा हीन गोष्टीचा । तूं न करी गौरव साचा । यायोगें धर्माचा । मोठेपणा ठरत नसे ॥ १६८ ॥ योगाभ्यासें करितां येतें । ऐशा प्रकारचें कौतुक तें । कोण्याहि मनुष्य जीवांतें । त्यांत न विशेष कांहीं ॥ १६९ ॥ कोल्हाटीण निज खेळांतून । ऐशा उड्या घेती जाण । त्यांत ना भूषण । तो एक अभ्यास असे ॥ १७० ॥ उडी टाकून नाहीं मेला । म्हणून वैदिक मताला । देऊं नकोस प्राधान्याला । यांत कांहीं अघटित नसे ॥ १७१ ॥ कड्यावरून ऐशा रीतीं । वानरें उड्या मारिती । म्हणून कां त्यांचें करिती । कोणी सुधन्वा ! कौतुक ? ॥ १७२ ॥ भट्टपादे आणखी याहून । कांहीं दावावें करून । तरीच आम्ही प्रमाण । मानूं यांच्या वेदाला ॥ १७३ ॥ पौर म्हणती राजासी । नको आतां छळूं यांसी । भगवान् भट्टपादांसी । हा महापुरुष असे ॥ १७४ ॥ जैन मताचें खंडन केलें । वेदप्रामाण्य दाविलें । उडी मारून कौतुक केलें । जे इतरां न साधे कधीं ॥ १७५ ॥ सुधन्वा म्हणे हे मान्य मशीं । परी या जैनबौद्धांसी । तें न पटे मानसीं । याला मी काय करूं ? ॥ १७६ ॥ ते म्हणती हें अभ्यासानें । साधे मानवांकारणें । कांहीं अंशीं यांचें म्हणणें । योग्य आहे तें तुम्हीच पाहा ॥ १७७ ॥ आतां तुम्ही अवघ्यांनीं । यावें उद्यां सभास्थानीं । आपापले घेऊनि । अनुयायी बरोबर ॥ १७८ ॥ निकाल या गोष्टीचा । मी आतां लावीन साचा । बौद्धजैनवैदिकांचा । तंटा जेणें मिटेल ॥ १७९ ॥ ते सर्वांनीं मानिलें । आपापल्या सदनां गेले । राजाचें मात्र घोटाळलें । मन युक्ति योजण्यासी ॥ १८० ॥ यापुढील श्रोते वृत्त । पुढील अध्यायीं होईल विदित । श्रीभट्टपादांसहित । नृप गेला मेदिनीपुरा ॥१८१॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरित । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १८२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सहावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय भुवनत्रयसुंदरा । ॐ काररूपा उदारा । मी याचक तुझिया द्वारां । कृपाभिक्षा घाली मज ॥ १ ॥ देवा तुझें मोठें-पण । गात आले साधुजन । श्रुतींनींहि वर्णन । केलें आहे साच तुझें ॥ २ ॥ इतिहासाचे दाखले । पाहतां ते खरे ठरले । तुझियाविण ना खचित उरलें । स्थान आश्रय मागण्या ॥ ३ ॥ आश्रय देवा तोच देतो । कीं जो स्वतः समृद्ध असतो । तुटका कोठून घालितो । अन्नछत्र तें गरिबां-स्तव ॥ ४ ॥ एवंच सर्व बाजूंनीं । तूं समर्थ पिनाकपाणि । दासगंणू जोडून पाणि । शरण आला तुज देवा ॥५॥ मूल मातेच्या कडेस असतां । तें न भी कीं कृतान्ता । माय थोडी दूर जातां । तेंच भितें मांजरासी ! ॥ ६ ॥ तूंच माझी जननी-जनिता । तूंच सद्‌गुरु ज्ञानदाता । दासगणूच्या धरून हातां । चरित्रलेखन करावें ॥ ७ ॥ राजा सुधन्वा महाचतुर । त्यानें तो करून विचार । एक युक्ति अखेर । बिनतोड ऐशी काढिली ॥ ८ ॥ श्रोते एका घागरींत । सर्प घातिला असे पीत । लांब जो का पांच हात । भव्य फणी जयाची ॥ ९ ॥ ती सर्पाची घागर भली । सभेंत आणून ठेविली । जी आधींच होती केली । सीलबंद श्रोते हो ॥ १० ॥ सभा ठरल्याप्रमाणें । चिक्कार भरली श्रोत्यांनीं । पट्टण अवघें पडलें सुनें । गर्दी राजवाड्यांत ॥ ११ ॥ तथागत आणि सौगत । द्वय पंथांचे पंडित । जैनांसी करून संगनमत । आले भट्टपादा जिंकावया ॥ १२ ॥ भट्टपादाच्या बाजूला । वैदिक वर्ग येऊन बसला । भूप सुधन्वा तोहि झाला । विराजमान सिंहासनीं ॥१३॥ राजाज्ञेनें सचिव उठला । सभेप्रति सांगता झाला । सभ्य हो ! आतां माझिया बोला । अवधान द्यावें आपुलें ॥१४॥ पंधरा दिवसपर्यंत । वाद जो चालला येथ । श्रेष्ठ ईश्वर सम्मत । पंथ आहे कोणाचा ? ॥ १५ ॥ तो वाद अखेरीं । मिटला नाहीं आजवरी । ज्यांनें त्यानें आपुल्या परी । मंडण केलें शब्दबळें ॥ १६ ॥ शब्दसाहित्यें जैनमत । भट्टपादें खोडिलें सत्य । तें न मानितां सौगत । करूं लागलें पांडित्य वृथा ॥ १७ ॥ शब्द वाद अभिमान्यांचा । कदा न शेवटीं जावयाचा । त्यांची होते बंद वाचा । कांहीं अद्‌भुत देखिलियास ॥१८॥ तेंहि कृत्य काल झालें । उडी टाकून खालीं आले । श्रीभट्टपाद

हें पाहिलें। अवघ्या जैन पंडितांनीं ॥ १९ ॥ या कृत्या म्हणाले जैन। त्यांत ना कांहीं मोठेपण। हें मांत्रिकालागून। सहज करतां येतसे ॥ २० ॥ म्हणून आज युक्ति दुसरी। पाहा राजानें योजिली खरी। ही जी दिसते घागरी। तुम्हांसमोर अवघ्यांच्या ॥ २१ ॥ काय ठेविलें आहे तींत। हें जो का सांगेल सत्य। त्याचाच ईश्वरसम्मत। पंथ ऐसें मानूं आम्ही ॥ २२ ॥ काल आज्ञा मानण्याची। पाळी झाली वैदिकांची। आज आहे सौगतांची। ती भाग त्यांना मानणें ॥ २३ ॥ बोला हो ! जैनपंडित। काय आहे घागरींत। येथें नाहीं यत्किंचित। काम शब्दवादाचें ॥ २४ ॥ ऐसें सौगत सांगून भला। सचिव तो खालीं बसला। तें ऐकून घोटाळला। समूह जैन-पंडितांचा ॥ २५ ॥ तथागत आणि सौगत। ऐसे दोन्ही पंथांचे पंडित। काय असावें घागरींत। हें शोधूं लागले ॥ २६ ॥ कांहींच तर्क चालेना। निश्चय कांहींच करवेना। आणि सांगितल्याविण सुटेना। मागचा तो ससेमिरा ॥ २७ ॥ पुढें मग त्या पंडितांनीं। आदरेंसी जोडून पाणि। केली असे विनवणी। त्या सुधन्वा राजास ॥ २८ ॥ एक दिवसाची द्यावी मुदत। राजा आम्हां अवघ्यांप्रत। सांगूं उद्यां घागरींत। काय वस्तु आहे ती ॥ २९ ॥ त्यांची विनंती मानिली। नृपें सभा बरखास्त केली। चिंतातुर अवघी झाली। मंडळी बौद्धजैनांची ॥ ३० ॥ कोणी ज्योतिषा-कडे गेले। कोणीं आपणचि मांडिलें। गणित, कोणीं जाऊन आणिलें। भाकिताचें रमलशास्त्र ॥ ३१ ॥ लग्नकुंडल्या पाटीवरी। कोणीं मांडिल्या रात्रभरी। कोणी फासे घेऊन करीं। टाकिले रमलशास्त्रापुढें ॥ ३२ ॥ अखेर केला सिद्धान्त। सर्प आहे घागरींत। ज्योतिष रमल सांगूं शकत। पुढचें आणि मागचें ॥ ३३ ॥ पुन्हां सभा भरतांक्षणीं। अवघे जमले सभास्थानीं। जैन बौद्ध आपुल्या आसनीं। विराजमान जाहले ॥ ३४ ॥ भट्टपाद त्यांचे समोरी। सशिष्य बसले आसनावरी। तटस्थ झाली सभा सारी। काय होतें तें पाहावया ॥ ३५ ॥ जैन पंडित उभे राहिले। सभेत गर्जून बोलले। या घागरींत आहे ठेविले। एक्या विषारी सर्पाला ॥ ३६ ॥ त्याविण ना कांहीं दुसरें। सोडून घागर पाहा त्वरें। आम्ही बोलूं सत्यचि खरें। खोटें वांटयास वैदिकांच्या ॥३७॥ मग सचिव पुसे वैदिकांसीं। हें मान्य असे कां तुम्हांसी। तें नसल्या घागरीसी। कोणती वस्तु तें सांगा ॥ ३८ ॥ भट्टपाद बोले त्यावरी।

ही जैनांची सत्य न वैखरी । आहे त्या घटाभीतरी । मूर्ति शेषशायीची ॥३९॥ ती मूर्ति परम सुंदर । जैन म्हणती विखार । पाहा त्याचें प्रत्यंतर । आतांच घागर सोडूनिया ॥ ४० ॥ ऐसें भट्टपाद बोलला । तेणें राजा हताश झाला । अधोवदन बैसला । कांहीं न सुचे तयासी ॥ ४१ ॥ सुधन्वा बोले स्वगत । आज हें झालें अनुचित । या कुमारिलभट्टाप्रत । जिंकिलें या जैनांनीं ॥ ४२ ॥ नुसता सर्प आहे म्हणते । तरी न त्यां अपेश येतें । काय करावी युक्ति यातें । वैदिक खरें ठरावया ॥ ४३ ॥ तों झाली आकाशवाणि । भूपा ! मुळीं न भ्यावें मनीं । होणार नाहीं कदा वाणि । वैदिकांची असत्य ॥ ४४ ॥ जे सदाचारी ब्राह्मण । ते श्रेष्ठ देवाहून । त्यांच्या मुखींचें तें वचन । असत्य होणें नाहीं कदा ॥ ४५ ॥ जैन म्हणती सचिवासी । जपून सोडा घागरीसी । आंत असलेल्या सर्पासी । सावधपणें सांभाळा ॥ ४६ ॥ नाग पिवळा सणसणीत । ज्यानें नुकतीच टाकिली कात । आहे चपल अत्यंत । म्हणून राहा सावध बहु ॥ ४७ ॥ भट्टपाद म्हणे ऐकावें । तुम्ही माझें वचन बरवें । पूजा-साहित्य घेऊन यावें । शेषशायीस पूजावया ॥ ४८ ॥ आंत मुळींच सर्प नाहीं । तो भगवान् शेषशायी । श्रुतिसत्यत्व दावण्या पाही । आहे बसला घागरीमध्यें ॥४९॥ असो पाहत असतां जन सकळ । घागरीचें तोडिलें सील । घागरींत पाहतां घननीळ । मूर्तिरूपें दिसला कीं ॥ ५० ॥ सर्पाचें तें नांव नाहीं । घागरीमध्यें अंशेंहि । पाहतां चित्ताठायीं । सुधन्वा अति संतोषला ॥५१॥ प्रेक्षक अवघे चकित झाले । जैन अधोवदन बैसले । बौद्ध पंडितां नाहीं उरलें । अवसान तें कशाचेंहि ॥ ५२ ॥ राजासहित पौरवासी । वानिती भट्टपादांसी । पूजिलें परमादरेंसीं । शेषशायीस निघालेल्या ॥ ५३ ॥ मग राजा म्हणे सैनिकांस । जा या जैनबुद्धांस । तुम्ही घेऊन वधायास । घालून दगडी घाण्यामध्यें ॥ ५४ ॥ वा हातीं घेऊन तलवार । या अधमांस करा ठार । ठेवूं नका भूमीवर । बीज या वेदद्वेष्टयांचें ॥ ५५ ॥ या अधमांनीं थोतांड मत । पसरविलें समाजांत । ज्यामुळें झाला घात । अवघ्या हिंदी राष्ट्राचा ॥ ५६ ॥ पूर्ण विचारी वैदिक धर्म । तो न सांगे भलतें कर्म । अवघ्यांचें तें आहे वर्म । ठाउके एक्या देवाला ॥ ५७ ॥ म्हणून या भ्रामक पंथा । मूठमाती देण्याकरितां । तुम्ही व्हावें तयार आतां । उपेक्षा ती नाहीं बरी ॥ ५८ ॥ तुळशीमाजी भांगोरा । ठेविल्या

होईल घात खरा । सांथीचा तो पसारा । थांबविलाच पाहिजे ।। ५९ ।। हे बौद्ध आणि जैन । पूर्ण अनुतापें करून । करीत असल्या दीक्षाग्रहण । या वैदिक धर्माची ।। ६० ।। तत्काळ त्या सोडावें । भाविकांना न तुडवावें । द्वेष्टे निवडून काढावे । आणि चोपावे यथास्थित ।। ६१ ।। जैन बौद्धांचें तें मत । आहे एकांगी खचित । सर्व बाजूंचा तयांत । नाहीं नाहीं विचार केला ।। ६२ ।। यांचीं मतें बळावल्यासी । या आपुल्या भारतदेशीं । मुकावें लागेल अवघ्यांसी । अविनाशपदा जावया ।। ६३ ।। बौद्ध सिद्धान्तें वाढेल चैन । चैनीसाठीं विपुल धन । मिळवतां ये यत्नेंकरून । परि ना कळे खरें तत्त्व ।। ६४ ।। उपकारबुद्धि वाढेल । परि ती अस्थानीं होईल । दुष्ट दुर्जनां फावेल । स्वार्थ आपुला साधावया ।। ६५ ।। तेवीं वाढल्या जैनमत । नेभळा समाज होईल सत्य । फाजिल दयेला तो ऊत । येऊन फावेल दुष्टांतें ।। ६६ ।। स्वच्छतेला मिळेल फांटा । अभिमान तो वाढेल खोटा । मानवी कर्तव्याला बट्टा । सहज लागेल त्यांयोगें ।। ६७ ।। महिना महिना उपास करणें । नंगे धूत गांवांत फिरणें । हींच साधूचीं लक्षणें । लोक मानूं लागतील ।। ६८ ।। ऐसें भूपवचन ऐकिलें । जैन बौद्ध घाबरले । वाट हुडकूं लागले । सभेंतून पळावया ।। ६९ ।। बाघाची गर्जना जेवीं । कोल्हे लांडगे उदा पळवी । भूपतीचें भाषण तेवीं । झाले बौद्ध जैनांत ।। ७० ।। भट्टपाद म्हणे भूपासी । या बौद्ध आणि जैनांसी । ठार मारून टाकण्यासी । सेवकांशीं सांगूं नको ।। ७१ ।। कां कीं जीवात्मा अवघ्यांचा । एकचि आहे साचा । तेथें जैन बौद्ध वैदिकांचा । भेद नाहीं अणुमात्र ।। ७२ ।। दुष्टाचें दुष्टपर्ण । ज्ञात्यानें करावें हनन । परि त्यांचा रक्षणें प्राण । ही नीति वैदिकांची ।। ७३ ।। जैन-बौद्धांच्या चिन्हांस । मात्र करावें नामशेष । हेंच आहे मरण खास । त्या कीं जैनबौद्धांना ।। ७४ ।। तैसें तुम्ही करावें । सुजन सत्पथा लावावे । वेदद्वेष्टे न राहूं द्यावे । मुळींच या भूमंडळीं ।। ७५ ।। मागें कनिष्क-अशोकांनीं । वैदिक टाकिले मारूनि । त्याचें तें उसनें म्हणोनि । तूं ऐसें घेऊं नको ।। ७६ ।। तें न जरी मारिते वैदिक । तरी त्यांचा प्रसार देख । झाला नसता निःशंक । इतक्या मोठ्या प्रमाणीं ।। ७७ ।। मारिले वैदिक हे पाहतां । भीति पडली समस्तां । प्राण भयानें हां हां म्हणतां । अनेक लोक बौद्ध झाले ।। ७८ ।। भीड वशिला लांचलुचपत । धाक दपटशा

यत्किंचित । करावा न लागे सत्याप्रत । त्याची जरुरी खोटचाला ।।७९।। शुद्ध सोंवळा अत्यंत । अवघ्या तत्त्वांनीं परिप्लुत । हाच एक वैदिक पंथ । आहे राजा ! भूमीवरी ।। ८० ।। कोणी कोणी म्हणतात । जैन बौद्ध मारण्यांत । भट्टपादाचा होता हात । नव्हता म्हणणें हें न खरें ।। ८१ ।। त्यानें सुधन्व्याकडून । मारविले बौद्ध जैन । कोणी म्हणती सुज्ञ जन । चिन्हें तेवढीं ठार केलीं ।। ८२ ।। चिन्हें ठार करण्याची । अज्ञा असेल भट्टपादाची । तेधवां झाली साची । कां कीं परम ज्ञाता तो ।। ८३ ।। शहाण्याचा अपमान । हेंच आहे त्यासी मरण । तें मरणाहून शतगुण.। दुःखद होतें तयातें ।। ८४ ।। मागें अश्वत्थाम्यातें । मणि काढून सोडून दिलें । साक्षात् नाहीं मारिलें । अश्वत्थाम्या विबुध हो ।। ८५ ।। असो अनंतांचीं अनंत मतें । त्याचें व्याख्यान नको येथें । जैन बौद्ध समाजातें । अप्रिय झाले तेधवां ।। ८६ ।। ते अप्रिय होण्यालागून । भट्टपाद झाले कारण । सुधन्व्याच्या मनांतून । जैन बौद्ध उतरले ।।८७।। स्वतः सुधन्वा भूपति । आपल्या परिवारासह निश्चितीं । शरण भट्टपादांप्रति । येता झाला विबुध हो ।। ८८ ।। आणि केली याचना । हे स्वामी ! दयाघना । कृपा करावी या दीना । घ्यावें वैदिक मार्गांत ।।८९।। तें भट्टपादें ऐकिलें । तत्काळ प्रायश्चित्त दिलें । पंचगव्यासी प्राशविलें । काया पवित्र करावया ।। ९० ।। पौरवासी अवघे लोक । वैदिकपंथी झाले देख । थोडेबहुत जैन लोक । पळाले ग्राम सोडोनिया ।। ९१ ।। या झालेल्या जयाचें । कौतुक देवांनीं केलें साचें । धन्यवाद वदले वाचें । यक्ष, गंधर्व, किन्नर ।। ९२ ।। इंद्र, वायु आणि वरुण । यांनीं तुकविली मान । भट्टपादातें पाहून । अतिशय आदरानें ।। ९३ ।। नाचूं लागल्या अप्सरा । देव वर्षती सुमनभारा । किन्नरांनीं नगारा । वाजविण्या आरंभ केला कीं ।। ९४ ।। इंद्रानें दिलें वरदान । भट्टपादांलागून । जो कोणी करील स्मरण । या तव उज्ज्वल चरिताचें ।। ९५ ।। तो विजयी होईल वादांत । ज्या ज्या कामना मनांत । धरील त्या त्या पुरतील सत्य । ईश्वराच्या कृपेनें ।। ९६ ।। हा विजयरूपी पर्जन्य । चहूंकडे पडला म्हणून । एक आलें घडून । कौतुक तें ऐका आतां ।। ९७ ।। वैदिक मताचे तरु भले । जे जैनबुद्धांनीं खच्ची केलें । तेच पुन्हां जोरांत फुटले । या पर्जन्यें एकसरा ।।९८।। हा विजय भट्टपादांचा । ऋतु वसंत होय साचा । आहेच तो व्हावयाचा । बहुतेकांस सुखदायी

॥ ९९ ॥ सत्कर्मकांडवृक्षा भली । नूतन पालवी फुटूं लागली । सन्नीति या आम्रास आलीं । गोड आणि मोठीं फळें ॥१००॥ वैदिकधर्मी ब्राह्मण । हेच कोकिल सुजाण । करूं लागले गायन । वेदत्रयाच्या संहितांचें ॥१०१॥ जैनांचा मोड झाला । लागली त्या उतरती कळा । जेवीं सूर्योदयाला । घुबडे-पिंगळे लपताती ॥ १०२ ॥ सोडून मेदिनीपुरासी । भट्टपाद निघाले अतिहर्षी । हिंडून देशीं विदेशीं । सौगतातें जिंकावया ॥ १०३ ॥ जगन्नाथ, रामेश्वर । मदुरा, मीनाक्षी, चिदंबर । गोकर्ण, गिरि, पंढरपुर । त्र्यंबकेश्वर, गोदातीर ॥ १०४ ॥ द्वारका, गोकुळ, वृंदावन । सोमनाथ, प्रभासपट्टण । काशी, प्रयाग, गया जाण । क्षिप्रातटीं उज्जनी ॥ १०५ ॥ एवंच अवघ्या भारतवर्षी । आले फिरून पुण्यराशि । जे जे भेटले जैन त्यांसी । त्यांना त्यांना जिंकलें ॥ १०६ ॥ नुसतें भट्टपाद आले म्हणतां । डकी भरे जैन पंडितां । जेवीं केसरी वनांत येतां । कळप गजांचा पळतसे ॥ १०७ ॥ असो इकडे नर्मदातीरीं । माहिष्मती नामें नगरी । ज्या शहरास भूमीवरी । हल्लीं महेश्वर म्हणतात ॥ १०८ ॥ येथें होळकर सरकारचा । भव्य घाट नर्मदेस साचा । तेथेंच सति अहल्येचा । अंत झाला असे कीं ॥ १०९ ॥ त्या महेश्वर नगरांत । कान्यकुब्ज जातींत । आला विधाता जन्माप्रत । विश्वरूप नांव घेऊनिया ॥ ११० ॥ यालाच मंडणमिश्र पुढती । नांव मिळालें निश्चितीं । कर्मकांडाची अत्यंत महती । यानेंच गायिली प्रथमतः ॥ १११ ॥ हा कान्यकुब्ज ब्राह्मण । नर्मदातटीं जन्मला जाण । जो प्रत्यक्ष चतुरानन । आला भूवरी जन्मातें ॥ ११२ ॥ त्या शहरीं फिरत फिरत । भट्टपाद आले सत्य । कर्ममार्गाच्या प्रसारार्थ । व्याख्यानें तीं द्यावया ॥ ११३ ॥ अस्तमानीं नर्मदातीरीं । व्याख्यानें होऊं लागलीं खरीं । साक्षात् व्याख्यानकेसरी । दिसूं लागले भट्टपाद ॥ ११४ ॥ त्यांचा उपदेश विश्वरूपाला । अतिशय आवडता झाला । सांगा न पटे कवणाला । मोगऱ्याचा सुवास ? ॥ ११५ ॥ भट्टपादांचें व्याख्यान । मनापासून करी श्रवण । आणि त्याचेंच करी चिंतन । येऊनिया सदनातें ॥ ११६ ॥ कांहीं अडचण पडली जरी । ती ती भट्टपादांस विचारी । भट्टपादहि त्याचें करी । समाधान अत्युत्तम ॥ ११७ ॥ असो. विश्वरूप शिष्य झाला । भट्टपादांचा तेथ भला । या गुरुशिष्यांच्या जोडीला । मोल न उरलें भूमीवरी ॥ ११८ ॥ त्यांच्या उपदेशें सर्वत्र ।

गांवोगांव अग्निहोत्र । सुरूं होऊन झाले छात्र । असंख्य विश्वरूपाचे ॥ ११९ ॥ हा विश्वरूप ब्रह्मचारी । भव्य पिळदार तनु सारी । सांगून येऊं लागल्या पोरी । बहुसाल तयाला ॥ १२० ॥ विश्वरूप म्हणे पित्या-प्रत । विवाह करण्याचें मनांत । सध्यां माझ्या न मुळीं येत । तें कां हें कळेना ॥ १२१ ॥ वरचेवरी पुसतां आपण । लग्नाविषयीं मजलागून । तेणें माझें दुःखित मन । होत आहे तातराया ! ॥१२२॥ विवाहइच्छा ज्या दिवशीं । होईल माझ्या मनासी । सांगेन मी त्याच दिवशीं । ताता! आपणांकारणें ॥१२३॥ काय झालें यानंतर । तें पुढील अध्यायीं सविस्तर.। सांगेन हो अहो चतुर !।. तिकडे अवधान असावें ॥१२४॥ इति श्रीदास-गणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १२५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सातवा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे परब्रह्मा पतितपावना । सर्वसाक्षी दयाघना पाहि मां मदनदहना ! । मशीं आपुलें म्हणावें ॥ १ ॥ आतां श्रोते साव चित्त । तुम्ही व्हावें हो ! समस्त । माहिष्मती नगरींत । ब्रह्मदेव तो जन्मला ॥ २ ॥ हें तुम्हीं गताध्यायीं । ऐकिलें आहे सर्व कांहीं । विश्वरूपा पटली नाहीं । मुलगी आलेल्या मुलींतून ॥ ३ ॥ त्यासी वाटे सुशिक्षित । वधू असावी आपणांप्रत । विद्याहीनाचें जीवित । दगडधोंड्यासम जनीं ॥ ४ ॥ अशिक्षित कन्यका । त्या दगडाधोंड्यापरी देखा । त्यांच्यापासून खऱ्या सुखा । मिळवण्याची आशा नको ॥ ५ ॥ अघटित विधीची योजना । ती एकाएकीं न कळे कोणा । मंडणासाठीं अंगना । आधींच उत्पन्न केली असे ॥ ६ ॥ जी.प्रत्यक्ष सरस्वती । दुर्वासशापें जन्मली होती । शोण नदीच्या कांठावरती । सदनीं विष्णुमित्राच्या ॥ ७ ॥ या शापाचें कारण । सांगतों तें करा श्रवण । विधीपाशीं वेदाध्ययन । दुर्वास तो करीत होता ॥ ८ ॥ करीत असतां वेदाध्ययन । कांहीं पाहा चुकले वर्ण । ते सरस्वती-कारण । सहजासहजीं समजले ॥ ९ ॥ कां कीं जेवढे वर्ण असती । ती सरस्वतीची संतति । लीला मुलांच्या कळून येती । सहज मातेकारणें

॥ १० ॥ दुर्वासमुनि वर्ण चुकतां। सरस्वती हंसली तत्वतां। तेणें दुर्वासाच्या चित्ता। कोप आला भयंकर ॥ ११ ॥ त्यानें सरस्वतीकारण। शाप दिलासे दारुण। मत्ते ! तूं पावशील जनन। द्विजकुलांत मृत्युलोकीं ॥ १२ ॥ मुनि वदतां शापवाणि। गेली शारदा घाबरोनि। जाऊन लोळूं लागली चरणीं। उःशाप तो मागावया ॥ १३ ॥ हे दुर्वासा ! आपण। असूनिया त्रिकालज्ञ। कां हो ! विनाकारण। शाप मशीं दिधला हा ॥ १४ ॥ दुर्वास म्हणे बाई !। रागांत हें बोललों पाही। राग आल्या उरत नाहीं। चित्तीं शांति सद्विचार ॥ १५ ॥ आतां उःशाप देतों तुला। जरी तुझा जन्म झाला। शापें मृत्युलोकाला। तरी न त्याची खंती करी ॥ १६ ॥ हा शाप नव्हे सुसंधि। जी न तुला लाधली कधीं। अवतार मृत्युलोकामधीं। होणार आहे शिवाचा ॥१७॥ त्याचें दर्शन तुला घडतां। शापापासून मुक्तता। होईल तुझी सर्वथा। आणि वाढेल लौकिक ॥ १८ ॥ ती सरस्वती अंबा गोरटी। विष्णुमित्राच्या आली पोटीं। शोण नदीच्या कांठीं। अनुपम लावण्य जियेचें ॥ १९ ॥ रंभा, मेनका, उर्वशी। याहि लाजती पाहून तिसी। तुलना करतां रतीसी। तीहि उणी ठरेल ॥ २० ॥ सरस्वती सर्वांगसुंदर। नाना कलांचें माहेरघर। अमोघ ज्ञानाचें भांडार। चतुरपणाचा सागर ती ॥ २१ ॥ शुक्लपक्षीच्या इंदूसमान। सरस्वती वाढूं लागली जाण। जिचें पाहून अमोघ ज्ञान। ज्ञाते माना डोलविती ॥ २२ ॥ तारुण्यांत आली बाला। तैं हा प्रकार घडला। एके दिनीं मंडणाला। पाहिलें तिनें स्वप्नांत ॥ २३ ॥ मंडणाची तशीच स्थिति। त्याच दिनीं झाली होती। स्वप्नामाजीं सरस्वती। भेटली येऊन तया ॥ २४ ॥ बोलणें स्वप्नीं बहुत झालें। एकमेकांचें बुध हो ! भलें। तें अवघेच मावळलें। समूळ जागे झाल्यावरी ॥ २५ ॥ श्रोते मंडणमिश्राला। ध्यास तिचा लागला। अन्नपाणी न रुचे त्याला। झुरे मनींच्या मनांत ॥ २६ ॥ ऐशी पाहून त्याची स्थिति। आप्त सचिंत झाले चित्तीं। पिता जो का सन्मति। तोहि पुसूं लागला ॥ २७ ॥ हे विश्वरूपा पुत्रराया !। दुर्धर चिंता तुझे ठायां। कशाची लागली सांग सदया !। ऐसें मनीं न झुरणें बरें ॥ २८ ॥ तुला चिंतेचें कारण। येतुलेंहि नसून। सर्वदा तुझें खिन्न मन। कां राहतें अलीकडे ? ॥ २९ ॥ भार अवघ्या प्रपंचाचा। आहे माझ्या शिरीं साचा। शिवाय घोर विद्येचा। लागणें तुला शक्य नाहीं ॥ ३० ॥ तूं सकल विद्या-

पारंगत। वेदवेदांगें अवगत। सन्मानहि तुला मिळत। विद्वानांत चोहीं-कडे ॥ ३१ ॥ शरीरास तुझ्या तारुण्य। मीं आलेलें पाहून। तुझें कराया लग्न। मागेंच पाहत होतों कीं ॥ ३२ ॥ तूंच त्या कृत्याला। केलास कीं रे अडथळा। सांग सांग आतां बाळा !। तुज काळजी कशाची ? ॥ ३३ ॥ गुरु, पिता आणि जननी। चोरून यांच्यापासूनि। कांहींच ठेवूं नये कोणीं। हें तत्त्व तूं जाणतोस ॥ ३४ ॥ विश्वरूप म्हणे ताता !। आपण शिरावरी असतां। मी नाहीं करणार चिंता। मुळींच या प्रपंचाची ॥ ३५ ॥ योग्य वधू मिळाल्यास। वाटतें करावें लग्नास। पितृऋण तें फेडण्यास। त्याविण दुसरी गति नसे ॥ ३६ ॥ ऐसें भाषण ऐकिलें। पित्याचें चित्त आनंदलें। वधू शोधण्या गुंतून गेलें। मन त्याचें विबुध हो ! ॥ ३७ ॥ आतां शोण नदीच्या कांठावर। काय घडलासे प्रकार। तो ऐका सविस्तर। तुम्हांप्रति सांगतों ॥ ३८ ॥ श्रीभट्टपाद एके दिनीं। आले शोणतटालागूनि। आप्त आपुला म्हणोनि। विष्णुमित्राच्या घरां गेले ॥ ३९ ॥ विष्णु-मित्रानें त्याचा भला। आदर-सत्कार बहुत केला। पुढें सहज प्रश्न निघाला। सरस्वतीच्या लग्नाचा ॥ ४० ॥ चिंता कन्येच्या लग्नाची। लागली सांप्रत मज साची। माहिती बहुत ठिकाणची। आहे स्वामी आपणांतें ॥ ४१ ॥ इच्या रूपगुणांशीं शोभेल। ऐसें एखादें सांगा स्थळ। आली आहे योग्य वेळ। आतां इच्या लग्नाची ॥ ४२ ॥ मग भट्टपाद वदले त्यास। करूं नको या चिंतेस। तुझ्यापेक्षां विधात्यास। आहे तिची काळजी ॥ ४३ ॥ सरस्वतीशीं शोभेल ऐसा। वर त्यानें निर्मियेला खासा। आतां न कोठें शोधीत बसा। विष्णुमित्रा, हिला वर ॥ ४४ ॥ नर्मदेच्या दक्षिण तीरावरी। महेश्वर नामें असे नगरी। तेथें मंडणमिश्र सदाचारी। आहे कुमार ब्राह्मणाचा ॥ ४५ ॥ विश्वरूप हें नांव त्याचें। आहे पाहा पूर्वीचें। कुळ संपन्न जयाचें। आहे तया प्रांतांत ॥ ४६ ॥ मुलगा सभाग्य सुंदर। सर्व विद्यांचें आगर। तोच आहे योग्य वर। या तुझ्या कन्येतें ॥ ४७ ॥ ऐसें विष्णुमित्रासी सांगून। भट्टपाद गेले निघून। पुढें काय घडलें वर्तमान। तें आतां अवधारा ॥ ४८ ॥ वधू शोधण्या मंडणपिता। देशीं विदेशीं फिरत होता। तो येतां झाला अवचिता। विष्णुमित्राच्या घराशीं ॥ ४९ ॥

कां कीं सरस्वतीची कीर्ति। त्याच्या आली कानांवरती। म्हणून तो शोधीत तिजप्रति। तया स्थानीं पातलासे ॥ ५० ॥ विष्णुमित्रातें विनवणी। करूं लागला मधुर वचनीं। आलों मागणें घालण्या जाणी। मी तुझ्या सुशील कन्येतें ॥ ५१ ॥ असल्या मुलीचें टिपण। दाखवावें मजकारण। मी माझ्या मुलाचें घेऊन। टिपण आलों आहें कीं ॥ ५२ ॥ लगेच विष्णुमित्रानें। मुलीची पत्रिका आदरानें। दाखविली तयाकारणें। ग्रहमैत्री पाहावया ॥ ५३ ॥ टिपण उभयतांचें पाहिलें। छत्तीस गुण उतरले। कांहीं न कोठें राहिलें। उणे त्या दोन्ही पत्रिकांत ॥ ५४ ॥ पत्रिका पाहून मंडणपिता। विष्णुमित्रासी झाला बोलता। देतोस का आपुली दुहिता। मम मंडणाकारणें ? ॥ ५५ ॥ दोघांचेंहि जमलें घटित। सोडिली नाहीं लौकिकी रीत। मी आलों होऊनि येथ। मागणी ती घालावया ॥ ५६ ॥ विष्णुमित्र म्हणे थांबा जरा। घरांत माझी आहे दारा। तिच्या घेऊन विचारा। काय तें सांगतों इतक्यांत ॥५७॥ विष्णुमित्र म्हणे कांतेसी। आपुल्या सुभगे ! गेहासी। आला कन्येस मागण्यासी। पिता मंडणमिश्राचा ॥ ५८ ॥ याच मुलाची कीर्ति। आपण ऐकिली होती। भट्टपाद जे सन्मति। तयांचिया मुखांतून ॥५९॥ मंडण हें नांव ऐकतां। हर्ष सरस्वतीचित्ता। म्हणे याच नांवाचा तत्त्वतः। पुरुष मीं पाहिला स्वप्नांत ॥ ६० ॥ तोच हा मंडण असेल जरी। धन्य धन्य मी होईन खरी। हे भगवान् त्रिपुरारि ! । तोच कीं हा मंडण असो ॥ ६१ ॥ कांता बोले त्यावर। वर सर्वांगसुंदर। परि येथन बहुत दूर। देश आहे तयाचा ॥ ६२ ॥ एकदां कन्या सासरीं। प्राणनाथा ! गेल्यावरी। तिला पाहा वरच्यावरी। आणवितां न ये भेटावया ॥ ६३ ॥ विष्णुमित्र म्हणे नियेम। येथेंच तूं चुकतेस। लांब जवळ या भेदास। ज्ञाते न मनीं आणती ॥ ६४ ॥ पाहा कोठें द्वारकानगर। आणि कोठें कौडिन्यपुर। ऐशा स्थितींत योजिला वर। कृष्ण परमात्मा रुक्मिणीसी ॥ ६५ ॥ हा मंडण भट्टपादाचा। शिष्य सुभगे ! आहे साचा। म्हणून लांब-जवळ या भेदाचा। स्वीकार तूं करूं नये ॥ ६६ ॥ दुभत्यासाठीं घेण्याप्रत। गाय निघावें बाजारांत। तों अनायासें घरांत। कामधेनु ती यावी जशी ॥ ६७ ॥ तैसा प्रकार आजि झाला। पिता वराचा हुडकीत आला। आपुलिया कीं सदनाला। त्याला

परत लावूं नये ॥ ६८ ॥ पतीदेखत कन्येसी । माय पुसूं लागली ऐशी । आहेस का वरण्यासी । तूं मंडणासी तयार ॥ ६९ ॥ दूर देशीं त्याचें सदन । एवढीच आहे अडचण । बाकी महा गुणवान् । तुझ्यापरीच आहे तो ॥ ७० ॥ नांव ऐकतां मंडण । किंचित् केलें हास्य-वदन । विनयें खालीं घालून मान । मुख प्रफुल्लित झालें तिचें ॥७१॥ ही जी ऐशी झाली स्थिति । तीच कन्येची सम्मति । ज्ञाते पुरुष मानिती । लग्ननिश्चय जाहला ॥ ७२ ॥ सोहळा झाला चार दिवस । विष्णुमित्राच्या सदनास । देणग्या त्या बहुवस । दिधल्या असती जामाता ॥ ७३ ॥ पुढें बोळवण्याच्या दिवशीं । बोध केला कन्येसी । पोटीं धरून तियेसी । तो ऐका विबुध हो ! ॥ ७४ ॥ लग्नवऱ्हाड सिद्ध झालें । परत गांवा जाया भलें । सरस्वतीचे भरून आले । डोळे तै आसवांनीं ॥ ७५ ॥ आतां मी दुराव-णार । या माहेरा साचार । ऐसें म्हणून लाविला पदर । सरस्वतीनें डोळ्यांना ॥ ७६ ॥ माय म्हणे तेधवां बाई ! । हा शोक आतां बरा नाहीं । आनंदानें सासरीं जाई । संसारसुख भोगावया ॥ ७७ ॥ नद्या पर्वतापासून निघती । आणि सागरा जाऊन मिळती । त्या का सांग इच्छिताती । परत पर्वतीं येण्यास ॥ ७८ ॥ तूं परम विद्वान् । तुज हें आहे ज्ञान । देई टाकून हूडपण । जें न सासरीं शोभणारें ॥ ७९ ॥ तूं स्वतः विद्वान् । ठेवी पतीचा सन्मान । तो हिरा त्या कोंदण । होऊनिया राहावें तुवां ॥ ८० ॥ विद्वत्तेला विनयाची । जोड असल्या कायमची । होती त्याच विद्वत्तेची । ख्याति ती चोहींकडे ॥८१॥ सासू, श्वशुर, नणंदा, जावा । यांसी द्वेष नसावा । निज कुलाचा तो वाहावा । मानसीं तीव्र अभिमान ॥ ८२ ॥ तुझा पति पुरुषांप्रत । करील वेदमार्गीं रत । तूंहि करी सुशिक्षित । त्या महिलासमाजाला ॥८३॥ म्हणजे बाई ! अनायासें । राष्ट्रकार्य होईल खासें । आणि हेंच करण्यासाठीं असे । जन्म तुम्हां उभ-यतांचा ॥८४॥ ऐसें म्हणोनी ओटी भरली । सरस्वती वाहनांत बसली । निज पतीच्या सन्निध भली । निज देशास जावया ॥ ८५ ॥ सरस्वतीला घेऊन । महेश्वरीं आला मंडण । कर्मावरी श्रद्धा पूर्ण । होती मंडणमिश्राची ॥ ८६ ॥ पूर्वमीमांसा जैमिनीची । मंडणें अभ्यासिली साची । यायोगें कर्मकांडाची । घडी बसवतां आली तया ॥ ८७ ॥ सशास्त्र जयीं कर्म होतें । तेव्हांच त्याला फळ मिळतें । याचें दाविलें जगातें । प्रत्यंतर

मंडणानें ॥ ८८ ॥ गोळ्यांवांचून तोफा समरीं । धारेवांचून तलवारी । वा पर्णिल्या वांझ नारी । कांहीं उपयोग होणें नसे ॥ ८९ ॥ प्रभातीं सडा-संमार्जन । अग्निहोत्र आणि गोपूजन । घरोघरीं वेदपठण । होऊं लागलें आदरानें ॥ ९० ॥ एवंच कर्मकांडाला । महीतलीं जोर आला । जिकडे तिकडे बोलबाला । झाला मंडणमिश्राचा ॥ ९१ ॥ सरस्वती नि मंडण-मिश्र । हे केवळ लक्ष्मीनारायण । या दांपत्याचे अमोल गुण । गावे तितके होतील थोडे ॥ ९२ ॥ सरस्वतीनें आपुलें । मायबापें ठेवियेलें । सार्थ करून दाखविलें । सरस्वती हें नांव पाहा ॥ ९३ ॥ सरस्वती अत्यंत सदाचारी । होती गहन विचारी । विद्वत्तेची बरोबरी । तिच्या न होय कवणाच्यानें ॥ ९४ ॥ असो श्रोते ! तया काळीं । जी जैनांची मंडळी । वैदिक होऊन बैसली । तें झालें मान्य जगा ॥ ९५ ॥ म्हणजे पंथ मात्र बदलले । परी रक्त होतें तेंच उरलें । म्हणून हें मान्य केलें । पंथांतर विबुधांनीं ॥ ९६ ॥ हें पंथांतर वस्त्रापरी । होतें झालें वरच्यावरी । परी त्याची शरीरीं । बाधा न झाली मुळींच ॥९७॥ वैदिकजैनबौद्धांचें । रक्त एकचि होतें साचें । येथे कुतर्क घ्यावयाचें । नाहीं मुळींच कारण ॥ ९८ ॥ गांवोगांव मंडणाची । स्तुति होऊं लागली साची । भरभराट कर्मकांडाची । झाली बुध हो ! चहूंकडे ॥९९॥ जैनबौद्धांचा नायनाट । जरी होता झाला स्पष्ट । तरी दुसरें अरिष्ट । ओढवतें जाहलें ॥१००॥ वेदांतील उपासना । कोणीचहि मानीना । तसेंचि त्या ब्रह्मज्ञाना । निंदूं लागले उघड उघड ॥ १०१ ॥ कर्मे सांग करावीं । इह परलोकीं फळें घ्यावीं । हीच वासना बरवी । होऊं लागली प्रत्येका ॥ १०२ ॥ कर्म, उपासना, ज्ञान । हें बाल्य, तारुण्य, वृद्धपण । ह्या स्थितीचें समान । आहे याचा विसर पडला ॥ १०३ ॥ ह्या सशास्त्र कर्मकांडें । दाढीमिशांचें ठेंगडें । रांगूं लागलें चोहींकडे । मुळीं न पाहती चालावया ! ॥ १०४ ॥ नुसत्या कर्मोद्धारें पाही । वेदोद्धार होणें नाहीं । आपत्ति न टळे अंशेंहि । कर्मे जन्ममृत्यूंचीं ॥ १०५ ॥ कर्ममार्गीच्या देवता । खऱ्या वाटूं लागल्या चित्ता । मूळ तत्त्वाची अनवस्था । होऊं लागली सहज तेणें ॥ १०६ ॥ शेतीं जोंधळा पेरिला । आणि येऊं न देतां कणीस त्याला । तो पाणी घालून पोशिला । बाटूक करून रक्षिलें ॥ १०७ ॥ पशूलाच पोशी भलें । तें बाटूक रक्षण केलेलें । तसें कर्मकांडाचें झालें । त्या वेळीं जगतीतला

॥ १०८ ॥ जोंधळा जो लाविला । तो बाटूक होण्यासाठीं न भला । आलें पाहिजे कणीस त्याला । ही इच्छा मालकाची ॥ १०९ ॥ नुसतें कणीसहि येऊन । इच्छा न त्याची होय पूर्ण । त्या कणसालागून । दाणे आले पाहिजेत ॥११०॥ तेव्हांच जोंधळा पेरल्याची । सार्थकता झाली साची । नुसत्या बाटूकें तयाची । होणें नाहीं प्रतिष्ठा ॥ १११ ॥ वैदिक पंथ जोंधळा । कर्म हें बाटूक त्याला । उपासनामार्गाला । कणीस म्हणणें असे ॥ ११२ ॥ दाणे हेंच आहे ज्ञान । त्या कणसालागून । ऐसा वेदमार्ग संरक्षण । करणें ज्ञानी पुरुषानें ॥ ११३ ॥ आणि या कृत्याची विस्मृति । जेव्हां पडते जगाप्रति । तेव्हां अवतार धरून येती । धर्मोद्धारा महापुरुष ॥ ११४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥११५॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय आठवा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी पार्वतीवरा !। पिनाकपणि गंगाधरा !। नीलकंठा सर्वेश्वरा !। पूर्णब्रह्मा विश्वपते ! ॥ १ ॥ तूंच विष्णु चतुरानन । तूंच सूर्य गजानन । कोणतेंहि औपासन । तुजविण तें घडत नसे ॥ २ ॥ भक्त भेटे जैसा जैसा । तूंहि वेश धरिशी तैसा । हे अचिंत्या पुराणपुरुषा !। आहे लीला विचित्र तुझी ॥ ३ ॥ आश्रयासाठीं जमीन । तहानेसाठीं जीवन । दृष्टिस येण्या दृष्टिपण । आहे अपेक्षा प्रकाशाची ॥ ४ ॥ तैसें कार्य कोणतेंहि । तुजविण न तडीस जाई । जेथें तुझी कृपा नाहीं । त्याचा बोजवारा तत्काळ ॥ ५ ॥ ऐशा तव कृपेस भगवंता ! । मी न पात्र सर्वथा । हें माझें मला ठाऊक असतां । पुन्हां विश्वास वाटतो ॥ ६ ॥ गोकर्णांत चांडाळणी । तुम्हीं उद्धरिली पिनाकपाणि ! । नुसत्या बिल्वपत्रांनीं । व्याध गेला कैलासा ॥ ७ ॥ नांव तुम्हांकारण । आहे पतितपावन । मग पतिताकारण । तुम्हां न ये उपेक्षिता ॥ ८ ॥ मी पतिताहून पतित जरी । राहिलों उभा तुझ्या द्वारीं । याचा अभिमान मन्मथारि !। कांहीं तरी धरा हो ! ॥ ९ ॥ वैश्वानराच्या समोरी । गंजी

गवताची नुरे खरी । तेवीं जावोत पातकें सारीं । नाम तुझें घेतां हरा ! ॥१०॥ श्रीमत् जगद्गुरूचें । रसाळ चरित्र वदवी वाचें । हेंच दासगणूचें । कोडकौतुक पुरवा हो ! ॥ ११ ॥ पश्चिम समुद्राच्या तीरीं । केरळदेश निर्धारीं । हल्लीं ज्यास व्यवहारीं । मलबार नांव मिळालें ॥ १२ ॥ श्रोते हा मलबार । सुपीक आणि संपन्न फार । एक वगळिल्या काश्मीर । याची सरी न ये कोणा ॥ १३ ॥ सह्याद्रि पूर्व बाजूला । आणि रत्नाकर पश्चिमेला । तेथिच्या सृष्टिसौंदर्याला । कोठवरी वर्णावें ! ॥ १४ ॥ वाटे अवघ्या सुबत्तांनीं । मुक्काम केला त्या ठिकाणीं । पुढे येणार जाणोनि । जगद्गुरु हे तया प्रांता ॥ १५ ॥ वनविहार करण्या भली । वनश्री ती तेथें आली । काननीं विचरूं लागली । आपुल्या साऱ्या वैभवासह ॥१६॥ पादपाच्या नाना जाती । त्याची न ये करितां गणती । जी समजली मजप्रति । त्यांचीं नांवें सांगतों ॥ १७ ॥ अश्वत्थवट, औदुंबर । आम्र, निंब, जंबीर । साग, शिशवी, देवदार । श्वेत, हरित, पीत चाफे ॥१८॥ केळी, चवेळी, नारळी । शिंदी, ताड, पोफळी । करवंदाच्या नाना जाळी । जिकडे तिकडे पसरल्या ॥ १९ ॥ कमरके, चिक्कू, अननस । खिरणी, अंजीर, पपनस । जर्दाळू, अक्रोड, फणस । तैसे मंडप द्राक्षांचे ॥ २० ॥ जाई, जुई, मालती । मोगरा, गुलाब, शेवंती । बकुल, पुन्नाग, गुलबाक्षी । कर्दळी नि पारिजात ॥ २१ ॥ सिंहवाघांच्या गर्जना । ऐकूं येती क्षणक्षणां । तेणें लता भिऊन मनां । वृक्षपतीस आलिंगिती ॥ २२ ॥ मृग, लांडगे, कोल्हे, रोही । काळविटाला पार नाहीं । झुडपांतून ठायीं ठायीं । ससे पळती सुंदर ॥ २३ ॥ खिल्लारें गायीम्हशींचीं । निर्भय चरतीं काननीं साचीं । रगाडी हरळी-कुंदांची । झाली होती महीठायां ॥ २४ ॥ किलकिलाट खगवर्याचे । होती नाना तऱ्हांचे । मैना, राघू, कोकिळांचे । श्रुतिमधुर शब्द होती ॥ २५ ॥ कमलें उदेलीं सरोवरीं । जीं मकरंदानें पूरित सारीं । गुंजारव तयांवरी । भ्रमर करूं लागले ॥ २६ ॥ पिसारा तो उभारून । मोर नाचती प्रेमेंकरून । जे सरस्वतीचें वाहन । तुरा मस्तकीं जयांच्या ॥ २७ ॥ केतकीचीं अपार बनें । त्याच्या मधुर सुवासानें । वेधून डोलती आनदानें । मोठमोठे फणिवर ॥ २८ ॥ ऐशा त्या मलबारीं । पूर्णानदीच्या उत्तर तीरीं । कालडी नामें एक नगरी । जो अग्रहार ब्राह्मणांचा ॥ २९ ॥ या कालडी गांवाचे । ब्राह्मण नंबुद्री

असती साचे । विद्वान् भोळया वृत्तीचे । मूळपासून असती जे ॥ ३० ॥ तेथें भव्य आणि सुंदर । आहे शिवाचें मंदिर । जें बांधिता झाला नृपवर । तया केरळ प्रांतींचा ॥ ३१ ॥ हल्लीं मंदिरें बांधणारे । राजे कोठें न उरले खरे । आहेत खेपा घालणारे । विलायतेच्या निरर्थक ! ॥ ३२ ॥ धर्ममार्गी त्यांचा पैसा । खर्च नाहीं होत सहसा । बोकाळल्याती रेसेसा । म्हणजे शर्यती घोडयांच्या ॥ ३३ ॥ त्यांत पैसा कित्येकांचा । अगणित होतो खर्च साचा । जो एक प्रकारचा । जुगार साक्षात् विबुध हो ! ॥ ३४ ॥ कांहीं विषयंध भूपति । परदेशांत भटकती । स्वदेशाची संगति । क्षणमात्र ती आवडेना ॥ ३५ ॥ कांहीं जातीजातींचे । तंटे लावण्या बघती साचे । खऱ्या राजधर्माचे । नृपवर आतांचे नसती कीं ॥ ३६ ॥ कांहीं धर्मगुरूंचा अपमान । करण्यांत मानिती भूषण । हें का प्रजानुरंजन । विचार करून पाहा तुम्ही ॥ ३७ ॥ हे न राजे रोकडे । अधर्म अनीतीचे भव्य वाडे । स्पष्टवक्त्यासी वांकडे । यांचे सहज मुळापून ॥ ३८ ॥ असो हल्लींच्या राजांपरी । तेव्हां नव्हते भूमीवरी । राजे, ज्यांच्या अंतरीं । दया, धर्म, नीति वसे ॥ ३९ ॥ या कालडी गांवांत । विद्याधिराज पंडित । होता शुचिर्भूत अत्यंत । गृहस्थाश्रमी वर्ततसे ॥ ४० ॥ सुशील त्याची अंगना । सदा झेलीत पतिवचना । आल्या अतिथ्या अन्नदाना । हें जोडपे करीत असे ॥ ४१ ॥ शिवार्चनीं प्रेम भारी । भूतदया ती अंतरीं । शिवगुरु नामें त्याच्या उदरीं । पुत्र एक झाला असे ॥ ४२ ॥ जो परम बुद्धिवान् । बृहस्पतीचे समान । त्याचें मौंजीबंधन । विद्याधिराजें करोनिया ॥ ४३ ॥ धाडिला गुरुगृहासी । वेदविद्या शिकण्यासी । तेवीं अवघ्या शास्त्रांसी । हृद्‌गतासहित जाणावया ॥ ४४ ॥ विद्यागुरूचें प्रेम भारी । जडलें शिवगुरूच्यावरी । तिटकारा तो कोण करी । सांगा मधुर शर्करेचा ॥ ४५ ॥ एवंच गुरुगृहीं राहून । सर्व विद्या शिकला जाण । कशाचेंहि नुरलें न्यून । ठायीं शिवगुरु पंडिताच्या ॥ ४६ ॥ श्रोते ! गुरूचिया घरीं । नेम शिवगुरूचा येणेपरी । होता शीत जलें स्नान करी । प्रत्यहीं उषःकालाला ॥ ४७ ॥ संध्यावंदन अरुणोदयीं । सूर्य उदया येई जयीं । तयीं शिवगुरु अर्घ्य देई । श्रीभास्कराकारणें ॥४८॥ मग घाली नमस्कार । प्रत्यहीं एक हजार । गुरुसेवेसी तत्पर । सदा

हात जोडोनी ॥४९॥ गोदुग्धाचें पान करी । व्रतस्थ राहिला ब्रह्मचारी । वेडेंवांकुडें अंतरीं । विचार त्याच्या न उठती कदा ॥ ५० ॥ नातरी पोरें हल्लींचीं । अवघीं स्वैर वृत्तीचीं । कुटाळी ती शिक्षकाची । करण्या पाहती आवर्जून ॥ ५१ ॥ नटव्यापरी डोईस । भांग काढिती ठेवून केस । धर्म नावडे तयांस । चैनीकडे झुकती सदा ॥ ५२ ॥ बाईल गृहींची देवता । वाटूं लागते त्यांच्या चित्ता । मातापितरांस देती लाथा । प्रत्यक्ष कोठें शब्दांनीं ॥ ५३ ॥ ह्या ऐशा उकिरड्यांत । कोठून शिवगुरु पंडित । धर्मोद्धार करण्याप्रत । जन्मा यावा सांगा तुम्ही ॥ ५४ ॥ असो, विद्या अवघी पूर्ण झाली । मग गुरूंनीं आज्ञा केली । शिवगुरु पंडितालागीं भली । ती आतां अवधारा ॥ ५५ ॥ हे शिष्या ! तूं आतां जावें । जनकजननीला तोषवावें । गृहस्थाश्रमी होऊन राहावें । सदाचारा सांभाळून ॥ ५६ ॥ तें शिवगुरूंनीं ऐकतां । विनयानें जोडून हातां । आणि झाला बोलता । निज गुरूंस येणेंरीतीं ॥ ५७ ॥ आपली आज्ञा मान्य मशीं । परि एक इच्छा मानसीं । उदेली ती पायांपाशीं । वाटे करावी निवेदन ॥ ५८ ॥ मला वाटतें येथेंच राहावें । आपुल्या सेवेंत असावें । गृहस्थाश्रमी न होतां व्हावें । आश्रम घेऊन संन्यासी ॥ ५९ ॥ तेथें तत्त्वाचा विचार । करूनिया निरंतर । आपुल्या आत्म्याचा उद्धार । करून घ्यावा या जन्मीं ॥ ६० ॥ गृहस्थाश्रमी प्रत्येकानें । झालेंच पाहिजे आदरानें । ऐशापरीचीं शास्त्रवचनें । नाहींत कोठें शास्त्रांतून ॥६१॥

" ब्रह्मचर्य समाप्य गृहीभवेद्गृहाद्वनीभूत्वा प्रव्रजेत् ॥ "

संपतां तें विद्यार्जन । वधू पाहून करणें लग्न । गृहस्थाश्रमा आचरून । वानप्रस्थ व्हावें पुढें ॥ ६२ ॥ अशा प्रकारचीं वाक्यें जरी । आहेत शास्त्राभीतरीं । त्याच्याहि उलट दुसरीं । वाक्यें आढळती गुरुराया ! ॥ ६३ ॥

"यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वनाद्वा प्लवा ह्येते हृद्दृढा यज्ञरूपा ।
न कर्मणि न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्वमानशुरिति "

म्हणजे पूर्व सुकृतें मानवास । प्रखर वैराग्य झालियास । ब्रह्मचर्यांतून संन्यास । मोक्षार्थ करितां येतो कीं ॥ ६४ ॥ कां कीं मोक्ष जो का आहे मिळणें । तो केवळ ज्ञानानें । कर्म, धर्म, वा संततीनें । तो न प्राप्त होई कदा ॥६५॥ ऐशीहि एक श्रुति । आहे तिचा स्वीकार चित्तीं । करूनिया

त्वरित गति । घ्यावा मोक्ष साधून ।। ६६ ।। ऐसें शिवगुरूचें भाषण। ऐकतां गांहिवरून । त्याचा विद्यागुरु जाण । म्हणे धन्य धन्य शिष्या ! तुझी ।। ६७ ।। तूं विरक्त संभावित । अवघ्या विद्या पारंगत । तुझें भाषण आहे सत्य । परि जनकजननीचें ऐक जा ।। ६८ ।। तोंच श्रोते ! दुसऱ्या दिवशीं । विद्याधिराज न्यावयासी । आले शिवगुरु पंडितासी । विद्यागुरूच्या सदनाला ।। ६९ ।। वडील येतां देखोन । शिवगुरूनें केलें वंदन । विद्यागुरूंनीं आसन । विद्याधिराजा बसण्या दिलें ।। ७० ।। क्षेम-कुशल प्रश्न झाले । मग येण्याचें 'निवेदिलें । कारण विद्याधिराजें भलें । नम्र मधुर वाणीनें ।। ७१ ।। गुरुदक्षिणा म्हणून । पुढें ठेविलें विपुल धन । शिवगुरूंनीं साष्टांग नमन । केलें आपुल्या गुरूंसी ।। ७२ ।। पितापुत्र आले घरीं । पुनीत पूर्णा सरितातीरीं । प्रवेश केला मंदिरीं । वंदून ग्राम-देवतेला ।। ७३ ।। तै विद्याधिराज-कांता । म्हणजे शिवगुरूची होय माता । ती पाहून आपुल्या पुत्रा । चित्तीं आनंद पावली ।। ७४ ।। सांदीपनीच्या सदनाहून । जेवीं आला गोपालकृष्ण । अवघ्या विद्या शिकून । तै जें झालें देवकीला ।। ७५ ।। तेंच शिवगुरूच्या मातेसी । झालें पाहून पुत्रासी । तिनें आपुल्या अंकासी । शिवगुरूला बैसवीलें ।। ७६ ।। मूल तान्हें अथवा तरुण । हें न मानी मातेचें मन । झाड मोठें अथवा सान । हीं जमिनीला सारखीं ।। ७७ ।। अवघ्राण मस्तक केलें । निज पुत्रास आलिंगिलें । आनंदाश्रु नेत्रीं भले । वाहूं लागले साध्वीच्या ।। ७८ ।। गांवामध्यें कळली मात । शिवगुरूच्या मित्रांप्रत । तेहि आले धांवत । शिवगुरूसी पाहावया ।। ७९ ।। एके दिवशीं विद्वानांस । विद्याधिराजें सदनास । बोलाविलें घ्यावयास । शिवगुरूची परीक्षा ।। ८० ।। सदनीं विद्वान बहुत जमले । कांहीं प्रश्न त्यांनीं केले । ते अवघेच सोडविले । शिवगुरूंनीं क्षणांत ।। ८१ ।। ऐशी पाहून तयारी । विद्वान आनंदले भारी । आसमंत भागीं पसरली खरी । कीर्ति शिवगुरूची ।। ८२ ।। कणाद गौतम सांख्यांचीं । जीं कां षट्दर्शनें साचीं । त्यांत गति शिवगुरूची । अत्युत्तम हें जाणिलें ।। ८३ ।। एवंच जगमान्य विद्वानांनीं । उत्तमशा विशेषणांनीं । गौरविला सभास्थानीं । पुत्र विद्याधिराजाचा ।। ८४ ।। शिवगुरूची कीर्ति भली । हां हां म्हणतां पसरली । म्हणून येऊं लागलीं । नाना स्थळे सांगून ।। ८५ ।। मधु कमलांत येता देखा । धांवून येती मधुमक्षिका । तैशा

विविध कन्यका । सांगून आल्या शिवगुरूसी ॥ ८६ ॥ तया नंबोदरी ब्राह्मणांत । एक होता मेध पंडित । साधारण गृहींचा श्रीमंत । त्यास एक कन्या होती ॥ ८७ ॥ ती त्यानें शिवगुरूसी । अर्पण केली आदरेंसी । जाऊन कालडी ग्रामासी । आग्रहें विद्याधिराजाच्या ॥ ८८ ॥ असो शिवगुरूचें झालें लग्न । वधू मिळाली गुणसंपन्न । ठेवलें जिचें नामाभिधान । अंबिका ऐसें श्रोते हो ! ॥ ८९ ॥ ही शिव आणि अंबिका । दुजी शिवपार्वती देखा । हा जोडा शोभला निका । वसिष्ठअरुंधतींपरी ॥ ९० ॥ प्रेम एकमेकांचें । जडलें एकमेकीं साचें । जेवीं गूळ गोडीचें । नातें जें कां तेंच तेथें ॥ ९१ ॥ प्रपंचभार पुत्रावरी । सोंपवून केली तयारी । विद्याधिराजें आपुली खरी । कैलासलोका जावया ॥ ९२ ॥ विद्याधिराजाचा अंत झाला । तया कालडी ग्रामाला । प्रपंचभार अवघा पडला । शिवगुरूच्या शिरावरी ॥ ९३ ॥ नव्हती कशाची ददात । अग्रहार होता त्याप्रत । हा कालडी गांव सत्य । केवळ राजाकडून हो ! ॥ ९४ ॥ सांपत्तिक स्थिति तयाची । होती समाधानाची । अंबिकाशिवगुरूची । आज्ञा मानिती सारे जन ॥ ९५ ॥ दोघांचा एक विचार । करिती अतिथींचा सत्कार । ओलांडून त्याचे द्वार । एकहि याचक गेला नसे ॥ ९६ ॥ विद्वानांसी संभावना । मिळत होती त्यांच्या सदना । प्रत्यहीं करी अग्न्याधाना । उठून सुप्रभातीं ॥ ९७ ॥ पंचायतनपूजन । आल्या अतिथा अन्नदान । तृतीय प्रहरीं वाची पुराण । सायंसंध्या अस्तमानीं ॥ ९८ ॥ ऐसा त्यानें चालविला नियम । प्रतिदिवशीं उत्तमोत्तम । सन्नीतीचें केवळ धाम । सदन झालें शिवगुरूचें ॥ ९९ ॥ एक त्याच्या प्रपंचांत । उणी गोष्ट होती सत्य । संततीवांचून होतें चित्त । अजुरदें तें उभयतांचें ॥१००॥ एके दिनीं शिवगुरु । म्हणाले हे रंभोरु ! । मी आतां काय करूं । नाहीं संतति आपणांला ॥ १०१ ॥ एक पुत्रावांचून । अशुभ आहे आपुलें सदन । पल्वल जैसें कमलाविण । वा वदन नाकावांचुनी ॥ १०२ ॥ जरी न झाली संतति । हे प्रिये ! आपणांप्रति । तरी पुन्नामक नरकाप्रति । जाणें आहे आपणां ॥ १०३ ॥ निपुत्रिकाचें सदन । अशुभ मानिती ज्ञानी जन । आहे पुत्रावांचून । प्रपंच हा ओखटा ॥ १०४ ॥ नाना व्रतें आपण केलीं । तीं न मुळीं फळा आलीं । धेनु वांझोटी दोहिली । वृथा परिश्रम घेऊनिया ॥ १०५ ॥ ज्यास नाहीं

संतति । त्याच्या पितरां ना मिळे गति । ऐशीं शास्त्रें ओरडती । प्रापंचिकाच्या नांवानें ॥ १०६ ॥ धिक् धिक् आहे आपुलें जिणें । झाड असल्या फळाविणें । तयालागीं सर्पण होणें । क्रमें भाग येतें कीं ॥ १०७ ॥ ये जन्मीं आपुले । हातून पाप नाहीं घडलें । ऐसें असून ठेविलें । प्रभूनें कां निपुत्रिक ? ॥ १०८ ॥ जरी पूर्वजन्मींचा । दोष कांहीं असेल साचा । म्हणून निपुत्रिकपणाचा । डाग लागला आपणांसी ॥१०९॥ परि अग्निहोत्र ज्याच्या घरीं । पूर्वजन्मार्जित पापें सारीं । दग्ध होतीं त्याचीं खरीं । मग कां हा प्रसंग यावा ? ॥ ११० ॥ कांहीं असो प्रिये ! आतां । आपण भजूं उमानाथा । या पुत्रप्राप्तीकरितां । तोच इच्छा पुरवील कीं ॥१११॥ अंबिका म्हणे पतीस । जें आपुल्या विचारास । येईल तें तें करण्यास । मी तयार प्राणनाथा ! ॥ ११२ ॥ तपास बसलीं उभयतां । शिवगुरु नित्यांची कांता । त्रिकाळ पूजिती उमानाथा । मनोभावें करूनिया ॥११३॥ रुद्राभिषेक तीन वेळां । हजार अर्पी बिल्वदळां । शिवगुरु तो त्या नीळकंठा । पदीं अनन्य होऊन ॥ ११४ ॥ सदा धरिलें मौन व्रत । भाषण न करी यत्किंचित । ॐ नमः शिवाय हा मंत्र । चित्तीं जपे सर्वथा ॥११५॥ कांहीं दिवस निराहारी । कांहीं दिवस फळांवरी । कांहीं दिवस नुसतें करी । अशन बिल्वपत्रांचें ॥ ११६ ॥ ऐशा प्रकारें आचरीत । तप तो वृष क्षेत्रांत । ज्या तपोबलें उमानाथ । स्वप्नीं प्रकटला एके दिनीं ॥११७॥ दशभुज पंचवदन । भाळभागां रोहिणीरमण । अंगीं विभूतीचें भूषण । जटाभार मस्तकीं ॥ ११८ ॥ सव्यांकीं ती पार्वती । वामभागीं गणपति । जटेमधून भागीरथी । झुळझुळ वाहे निर्मळ ॥ ११९ ॥ व्याघ्रचर्म अंगावरी । धरिता झाला मन्मथारि । शंख, शिंगें अतिकुसरी । गण वाजवूं लागले ॥ १२० ॥ स्वप्नीं ऐसा प्रभु दिसला । शिवगुरूसी आनंद झाला । म्हणे देवा ! पुत्र मला । एक तरी दे प्रपंचांत ॥ १२१ ॥ नातरी माझे अधोगति । पितर जातील निश्चितीं । कांहीं न अशक्य तुजप्रति । एक मुलगा देणें पाहा ॥ १२२ ॥ ज्या ज्या गोष्टी होणें नाहीं । त्या त्या तूं केल्यास पाही । ऐशी गाजते जगाठायीं । तुझी कीर्ति सदाशिवा ! ॥ १२३ ॥ हें शिवगुरूचें भाषण । ऐकून बोले पार्वतीरमण । एक मुलगा तुजलागून । देणें कांहींच अशक्य नसे ॥ १२४ ॥ परि एक अडचण आहे त्यांत । ती मी तुला सांगतों येथ । शतायु पाहिजे असल्या सुत । तो

परम मूर्ख निघेल कीं ॥ १२५ ॥ पाहिजे असल्या सद्‌गुणी । तो अल्पायु निघेल जाणी । सांग या दोघांमधुनी । पुत्र कोणता द्यावा तुला ? ॥१२६॥ शिवगुरु म्हणे हे भगवंता ! । वंशवृद्धि करण्याकरितां । ज्याची जगांत मान्यता । होईल ऐसा पुत्र देई ॥ १२७ ॥ ऐसें वचन ऐकिलें । भगवान् तथास्तु बोलले । आणि अंतर्धान पावले । आपल्या परिवारासह ॥१२८॥ हें उषःकालीं पाहिलें । शिवगुरूंनीं भले । तों प्रभातीचे लागले । शीत वायु वाहावया ॥१२९॥ कुक्कुटाचे मधुर स्वर । येऊं लागले कानांवर । ऐशा वेळीं साचार । उठून बैसला शिवगुरु ॥ १३० ॥ सभोंवार जो निरखून पाही । तों शय्येविण कांहीं नाहीं । म्हणे मी पापी मला होई । दर्शन प्रत्यक्ष कोठलें ॥ १३१ ॥ भगवान् माझ्या स्वप्नीं आला । हाच अमोलिक लाभ झाला । दिलें आहे तेजाला । काजव्यापुरतें काजव्याशीं ॥ १३२ ॥ त्याच न्यायें मजप्रत । भेटता झाला पार्वतीकांत । जेवढें सांठवण तेवढें मिळत । पाणी सरितेपासूनि ॥ १३३ ॥ भार्येस आपुल्या पाचारिलें । स्वप्न तिजला कथन केलें । व्रतसांगता करिते झाले । वृष-क्षेत्रीं शिवगुरु ॥ १३४ ॥ पुढें शिवगुरु भार्येसहित । येते झाले काल-डींत । प्रपंच त्यांचा यथास्थित । सदनीं चालूं लागला ॥ १३५ ॥ असो, कांहीं दिवसांनीं । देवी अंबिका गर्भिणी । झाली शिवगुरूच्यापासूनि । गर्भीं शंकर सामावले ॥१३६॥ जों जों गर्भ वाढे उदरीं । तों तों तिच्या तनूवरी । तेज वाढूं लागलें भारी । हळूंहळूं एकेक कला ॥ १३७ ॥ अघ-टित होती डोहळे । काषाय वस्त्र घेई भलें । पूर्ण कावेनें रंगविलेलें । पांघरण्यासी विबुध हो ! ॥ १३८ ॥ तें पाहून शिवगुरु । म्हणती हे रंभोरु ! । तूं नको गे ! स्पर्श करूं । काषायवस्त्राकारणें ॥ १३९ ॥ अंबिका म्हणे हें सत्य । परि येतें माझ्या मनांत । हमेशा याच वस्त्राप्रत । वापरावें प्राणेश्वरा ! ॥ १४० ॥ त्रिकाल स्नानाप्रति जावें । वादविवादा करावें । थोतांड मत निर्दलावें । दावून सत्याचें प्रत्यंतर. ॥ १४१ ॥ सदा राहून शुचिर्भूत । उपनिषदांचें हृद्‌गत । स्थापूनिया अद्वैत मत । प्रकाश करावा खऱ्याचा ॥१४२॥ हे डोहळे पाहतां । आश्चर्य वाटलें पंडिता । ते विचार करिती चित्ता । ऐसे डोहळे कां व्हावे ॥१४३॥ या डोहळ्यांवरून । कोणीतरी पुरुष महान् । येत आहे घेऊन । मानव जन्म भूमीवरी ॥ १४४ ॥ गुप्त वेषें देव येती । त्या गर्भाची करण्या स्तुति । अंबिकेला वंदून जाती ।

प्रत्यहीं ते दिवौकस ॥ १४५ ॥ मुनि म्हणती आपुल्या वाचें । केवढें भाग्य पंडिताचें । साक्षात् भगवान् शंकराचे । हे वडील झाले कीं ॥ १४६ ॥ अगणित जो पुण्य करितो । त्यालाच ऐसा योग येतो । कल्पतरु हा सांपडतो । एखाद्याच भाग्यवंता ॥ १४७ ॥ असो नवमास ते पूर्ण झाले । वरती नऊ दिवस गेले । दहाव्या दिवशीं काय झालें । तें आतां अवधारा ॥ १४८ ॥ असो वैशाख मासांत । तिथि पंचमी धादांत । रविवारीं द्वितीय प्रहरांत । मिथुनलग्नीं विबुध हो ! ॥ १४९ ॥ आर्द्रा नक्षत्रावरी । प्रसूत झाली अंबिका नारी । कालडी ग्रामीं पूर्णातीरीं । केरल देशाकारणें ॥ १५० ॥ पुत्र झाला देदीप्यमान । जो साक्षात् मदनदहन । भूवरी झाला अवतीर्ण । अद्वैत सिद्धान्त स्थापावया ॥ १५१ ॥ उच्च रवी मेषेचा । दशमामाजीं मंगळ साचा । भाग्य भुवनीं कुंभेचा । असता झाला बृहस्पति ॥ १५२ ॥ तनुस्थानीं साचार । मिथुनेचा रोहिणीवर । जाया स्थानीं शनैश्चर । विराजमान धनेचा ॥ १५३ ॥ षष्ठ आणि द्वादशस्थानीं । केतु राहु बसले जाणी । बुध शुक्र सन्निधानीं । होते मुळींच रवीच्या ॥ १५४ ॥ तीन हजार अठ्ठावन्न । गेलीं कलीचीं निघून । संवत्सराचें अभिधान । ईश्वर ऐसें होतें कीं ॥ १५५ ॥ तया सालीं शिवगुरूला । हा असामान्य पुत्र झाला । वेदोद्धार करण्याला । खंडण्या थोतांड मताचें ॥ १५६ ॥ वर्णन त्या वेळाचें । काय करूं मी या वाचें । जिकडे तिकडे कोकिळेचें । गायन सुरू काननीं ॥ १५७ ॥ वसंत ऋतूचा समय खरो । उपवनीं फुलला मोगरा । मलयमारुतासम वारा । शीत वाहूं लागला हो ! ॥ १५८ ॥ अग्निहोत्र्यांचे अग्नि । प्रकट झाले कुंडांतुनी । धेनु अवघ्या पान्हावुनि । पाजूं लागल्या वत्सांना ॥ १५९ ॥ पुत्र झाला हें ऐकतां । शिवगुरूचे आनंद चित्ता । लगेच गेले स्नानाकरितां । त्या पूर्णा नामे गंगेवरी ॥ १६० ॥ केलें पुत्राचें जातकर्म । पंडितांनीं उत्तमोत्तम । भूमि, धेनु, हेम । दिधलें श्रेष्ठ वैदिकांना ॥ १६१ ॥ अन्न गोरगरिबांसी । दिलें शिवगुरूनें अति हर्षी । बुध हो ! सूतिकागृहासी । प्रकाश पडला बालकाचा ॥ १६२ ॥ व्यासचित्त आनंदलें । गंधर्व गाऊं लागले । देव विमानीं बैसून आले । पुष्पवर्षाव करावया ॥ १६३ ॥ फक्त सती पार्वती । बालका पाहाया आली नव्हती । कां कीं नव्हता तिच्या चित्तीं । आनंद तो येतुलाहि ॥ १६४ ॥ ती म्हणे

मनांत । विष्णु आपुल्या पत्नीसहित । येता झाला जन्माप्रत । रामकृष्ण अवतारीं ॥ १६५ ॥ देव हा मन्मथारि । होता झाला मल्लारि । तेव्हां मात्र बरोबरी । मज म्हाळसा करून नेलें ॥ १६६ ॥ हा अवतार संन्याशाचा । यांनीं मुद्दाम धरिला साचा । अति अल्प मुदतीचा । मज खिजवायाकारणें ॥ १६७ ॥ कां कीं सारिपाट खेळतांना । मी यांच्या साऱ्या भूषणां । केलें होतें साच हरणा । त्याचा राग होता मनीं ॥ १६८ ॥ तो राग शंकरांनीं । हा संन्यास अवतार घेऊनि । प्रकट केला त्रिभुवनीं । असो मर्जी तयांची ॥ १६९ ॥ मी न त्याचें पाहणार । मुख कदाहि भूमीवर । हे संन्यासी जोंवर । होऊन फिरती भूप्रदेशीं ॥ १७० ॥ म्हणून पार्वती नाहीं आली । अवघी देवमंडळी मिळाली । कालडींत गर्जना केली । "हर हर महादेव" ऐशी हो ! ॥ १७१ ॥ मुलाचें जातक वर्तविलें । प्रसिद्ध ज्योतिषांकडून भलें । ज्यायोगें कळतें झालें । पुढचें भाकित शिवगुरूला ॥ १७२ ॥ रास नांव गजानन । ठेविलें व्यवहारीं शंकर जाण । बाळंत-विडे घेऊन । आल्या सुवासिनी पौरांच्या ॥ १७३ ॥ नामकरण विधि झाला । कालडी गांव आनंदला । येथून आचार्य म्हणणें त्याला । भाग आहे आपणांसी ॥ १७४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १७५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय नववा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी मंगलधामा ! । संतसज्जनविरामा ! । जयजयाजी पुरुषोत्तमा ! । जयजयाजी विश्वपते ! ॥ १ ॥ देवा ! तुझ्या अघटित । ज्या कांहीं लीला सत्य । तेंच हें अवघे जगत् । अन्य कांहीं असेना ॥ २ ॥ जैशी कां ती राजसत्ता । विभागली जाते सर्वथा । तेव्हांच येते पात्रता । तिला नियमन करण्याची ॥ ३ ॥ नियम्य आणि नियमन । करणारा तूं होऊन । जगीं आपला आपण । अवघा ईश नटलासे ॥ ४ ॥ याची फोड रामायण । पाहतां, येते कळून । चिदंश तो रावण । चिदंश तो राम असे ॥ ५ ॥ राम जरी पतितपावन । तरी वर्णण्याचा पहिला

मान । देणें वाल्मिकालागून । भाग पडलें रावणाला ॥ ६ ॥ त्या रावण-कुंभकर्णांपरी । या आचार्य चरिताभीतरीं । जैन-बुद्धांचीं वर्णनें खरीं । द्यावीं लागलीं प्रथमतः ॥ ७ ॥ असो कालडीग्रामांत । शिवगुरूच्या सदनांत । अधिकाधिक आनंद सत्य । होऊं लागला प्रतिदिनीं ॥ ८ ॥ आचार्य रांगूं लागले । सवेंच उंब्रे ओलांडिले । उभे राहूं लागले । क्वचित् धरून भिंतीला ॥ ९ ॥ आचार्यांची बालमूर्ति । देदीप्यमान सुंदर अति । जेवीं शोभतो प्रभातीं । उदयाचलीं सूर्य तो ॥ १० ॥ आचार्यांच्या देहावरती । शिवचिन्हें अवघींच होतीं । तृतीय नेत्राची खूण ती । दिसूं लागली भ्रुकुटीमध्यें ॥ ११ ॥ पहिल्या वर्षी भले । आचार्य बोलूं लागले । तेणें चोज वाटलें । विशेष मातापितरांना ॥ १२ ॥ काव्य, कोश, व्याकरण । तिसऱ्याच वर्षी शिकले पूर्ण । आचार्यबुद्धि असामान्य । तिचें वर्णन कोण करी ! ॥ १३ ॥ चूडाकर्म अवघें झालें । म्हणजे जावळ राखिलें । अध्ययन सुरूं केलें । पुढें वेदसंहितेचें ॥ १४ ॥ आचार्य ज्या ज्या गुरूपाशीं । जाऊं लागले अध्ययनासी । त्या त्या गुरूच्या मानसीं । उपजूं लागली परम चिंता ॥ १५ ॥ जे जे आचार्यां शिकवावें । तें एक्याच संथेत पाठ व्हावें । पुढचें पुसतां लाजावें । गुरूनेंच मानसीं ॥ १६ ॥ गुरु म्हणती आचार्यांसी । तूं आमुचाहि गुरु शोभसी । तुला पाठ द्यावयासी । नाहीं ताकद आम्हांमध्यें ॥ १७ ॥ प्रवीणता तर्कशास्त्रांत । मिळविली अल्पवयांत । दुजा कणाद मूर्तिमंत । आला वाटे पुनरपि ॥ १८ ॥ अल्पवयांत त्यांच्यापुढें । कोणतेंहि मत बापुडें । मुळींच टिकेना रोकडें । तें सप्रमाण खंडित होई ॥ १९ ॥ अवघे गांवींचे विद्वान् । आचार्यांसी पाहून । आनंदानें तुकविती मान । वादविवादा पाहतां ॥ २० ॥ आणि शिवगुरूला सांगती । बाप्पा ! तुझ्या पुत्रापुढती । फिक्का पडेल बृहस्पति । सत्य सत्य त्रिवाचा ॥ २१ ॥ ते पुत्राचे ऐकतां गुण । शिवगुरूचें तोषे मन । जेवीं चकोरालागून । चंद्रकिरणें चंद्राचीं ॥ २२ ॥ असो. वर्ष चौथें आचार्यांसी । लागतां गोष्ट घडली ऐशी । पिता झाला स्वर्गवासी । शिवगुरु हें नांव ज्याचें ॥ २३ ॥ नाना इच्छा मानव करी । आपुलिया चित्तांतरीं । शिवगुरूला हौस भारी । होती मुलाच्या मुंजीची ॥ २४ ॥ परि न ती पूर्ण झाली । मुंज तशीच राहिली । अंबिका परम चिंतावली । कां कीं आचार्य लहान ॥ २५ ॥ जगरहाटी मनीं आणिली । आणि

शिवगुरूची क्रिया केली। ज्ञाता तो न जाणे मुळीं। जन्म आणि मरणाला ॥ २६ ॥ मुळीं न सुटावा व्यवहार। दृष्टि याच मुद्यावर। आचार्यांनीं साचार। ठेवून अवघीं कृत्यें केलीं ॥ २७ ॥ देवी अंबिका महाधूर्त। शुचि आणि प्रज्ञावंत। तिनें आपुल्या पुत्राप्रत। नाना शिक्षक ठेविले ॥ २८॥ सोयरींधायरीं जमविलीं। आचार्यांची मुंज केली। बोहोल्यावरी भासती झाली। आचार्यमूर्ति वामनासम ॥२९॥ वर्ष पांचवें वयास। लागलें होतें आचार्यांस। धाडिले गुरुगृहास। दशग्रंथ पढावया ॥ ३० ॥ निघंट, छंद, ज्योतिष। तैसेंच चारी वेदांस। अभ्यासिले गृहास। राहून घरीं गुरूच्या ॥३१॥ एक वर्षांत दशग्रंथी। आचार्य झाले सन्मति। ही त्यांची विमल कीर्ति। पसरती झाली चोहींकडे ॥ ३२ ॥ सुवासिक द्रव्य कस्तुरी। झांकून राहील कोठवरी। त्याचा सुवास त्यालाच करी। स्पष्ट साऱ्या जगांत ॥ ३३ ॥ विद्यागुरु आचार्यांचे। वदले त्या आपुल्या वाचें। शंकरा ! आतां आमुचें। सत्त्व वृथा घेऊं नको ॥ ३४ ॥ तूं विद्यानभींचा वासरमणि। राहिलास कीं रे ! होऊनि। तुझ्या प्रकाशापुढें जाणी। विद्या माझी काडवात ॥ ३५ ॥ तूंच आजपासून। ही शाळा चालीव जाण। मी बसून पाहीन। कौतुक तुझें शंकरा ! ॥ ३६ ॥ निःसंशय तूं मनुज नससी। कोणीतरी देव अससी। त्या तुझें ज्ञान आम्हांसी। होणे मुळीं अशक्य ॥ ३७ ॥ मग त्या दिवसापासून। पाठ मुलांलागून। आचार्य देऊं लागले पूर्ण। अति सोप्या भाषेनें ॥ ३८ ॥ ती आचार्यपाठपद्धति। पाहण्या विद्वान् जमा होती। सारख्या माना तुकविती। आचार्यांच्या पद्धतीला ॥ ३९ ॥ श्रीआचार्य एके दिनीं। आपुले सौंगडी घेऊनि। एक्या दरिद्री द्विजसदनीं। येते झाले भिक्षेला ॥ ४० ॥ तयीं द्विज तो घरीं नव्हता। ॐ भवति आचार्य वदतां। त्या दरिद्री द्विजाची कांता। हात लावी दैवास ॥ ४१ ॥ हे द्विजकुमार भास्करापरी। भिक्षेस आले माझ्या घरीं। घरांत ज्वारी-बाजरी। कांहीं नसे काय करूं ? ॥ ४२ ॥ दुरून नमस्कार केला। बाई म्हणाली आचार्यांना। आपणां निरर्थक त्रास झाला। यावयाचा माझ्या घरीं ॥ ४३ ॥ आम्ही दरिद्री कफल्लक। तुम्हां घालावया भीक। सदनीं नसे कांहीं एक। आज आम्हीच उपाशी ॥ ४४ ॥ तुम्ही आज येण्याला। आणि मम घरीं कांहीं नसण्याला। एकचि समय येता झाला। हें दुर्दैव आमचें !

॥ ४५ ॥ प्रापंचिकाचें सदन। अशुभ द्रव्य-अन्नांविण। अथवा फुलांवांचून। पुष्पवाटिका गुरुराया ! ॥ ४६ ॥ परि दारींचा याचक। लावूं नये विन्मुख। ऐसें शास्त्र वैदिक। कंठरवें सांगतसे ॥ ४७ ॥ मग त्या अवज्ञा शास्त्राची। मी तरी करूं कैची ?। ही घ्या एक आंवळ्याची। भिक्षा तुम्हां घालित्ये ॥ ४८ ॥ येणेंच असा हो संतुष्ट। तुम्ही ब्रह्मचारी अवघे श्रेष्ठ। घरें-दारें सोडून कष्ट। विद्येसाठीं घेतां तुम्ही ॥ ४९ ॥ ऐसें वदून आंवळा दिला। बाईनें नमस्कार केला। श्रीशंकराचार्यचरणांना। भाव चित्तीं ठेवूनिया ॥ ५० ॥ आंवळ्याची भिक्षा स्वीकारिली। द्रवली आचार्य-माउली। त्रिकालज्ञें जाणिली। दरिद्रावस्था तियेची ॥ ५१ ॥ आणि केली प्रार्थना। इंदिरा जी कमलनयना। आरंभिलें तिच्या स्तवना। श्लोक नूतन रचूनिया ॥ ५२ ॥ तूं इंदिरा लोकमाता। जगत्रयाची तुला चिंता। मग कां गे ! ठेविलें या वृथा। केरल देशांत दरिद्री ॥ ५३ ॥ शक्तिवांचून जीवित। जैसें ओखटें जगतांत। तैशी न कळा प्रपंचांत। तुझ्यावांचून हे लक्ष्मी ! ॥ ५४ ॥ आचार्यस्तव ऐकूनि। प्रकट झाली नारायणी। कुरळकेशा हास्यवदनी। चारुगात्री कमलनयना ॥ ५५ ॥ लक्ष्मी होतां अवतीर्ण। अवघ्यांनीं केलें वंदन। आचार्य मधुर भाषण। करिते झाले तियेसी ॥ ५६ ॥ अंबे ! थोडीबहुत तरी। या दरिद्री द्विजावरी। आपुली गे ! कृपा करी। त्यांचा प्रपंच सुधारण्या ॥ ५७ ॥ मग क्षीरोदतनया बोलली। मला समर्था ! अडचण पडली। आपुली आज्ञा ऐकण्या भली। ती आतां सांगतें ॥ ५८ ॥ यानें पूर्वजन्मांत। कांहीं न दिलें कोणाप्रत। पेरल्याविण शेतांत। पीक यावें कोठूनी ? ॥ ५९ ॥ पूर्वजन्मीं हा ब्राह्मण। असतां झाला कृपण। यानें पाहा एकहि कण। नाहीं घातला मुंगीसहि ॥ ६० ॥ उष्टच्या हातानें कावळा। यानें न कधीं मारिला। नुसतें आल्या अतिथाला। जल तेंहि न पाजिलें ॥ ६१ ॥ कैसा असे परोपकार। हें न जाणिले तिळभर। पूर्वजन्मीं साचार। मग काय करूं ? सांगा बरें ॥ ६२ ॥ आचार्य वदती त्यावरी। तुझी सत्य आहे वैखरी। परी ज्याच्या लागले घरीं। तुझे चरण जगदंबे ! ॥ ६३ ॥ तो किती जरी दोषी असला। तरी पाहिजे शुद्ध झाला। गंगौघ जेथे धांविन्नला। तेथें धुराळा कोठून ? ॥ ६४ ॥ सूर्यानें का अंधारासी। भ्यावें सांग

मानसीं । तें कांहीं असो आज यांसी । संपन्न तुवां करावें ॥ ६५ ॥ शिवाय द्विजभार्येनें आंवळा । मशीं आहे दान केला । म्हणून यांच्या सदनाला । भरीव सुवर्णफलांनीं ॥ ६६ ॥ ऐसी आज्ञा होतां क्षणीं । संतोषली नारायणी । जी सहधर्मचारिणी । महाविष्णूची विबुध हो ! ॥ ६७ ॥ तिनें कृपाकटाक्षेंकरून । त्या द्विजाचें अवघें सदन । गच्च टाकिलें भरून । सुवर्णाच्या आंवळ्यांनीं ॥ ६८ ॥ लक्ष्मी ती जातां जातां । ऐसें बोलली तत्त्वतां । जो ही कोणी गाईल कथा । तो होईल धनवान् ॥ ६९ ॥ आणि आचार्यासी वंदून । लक्ष्मी पावली अंतर्धान । हें अघटित आलें घडून । सर्व लोकांदेखतां ॥ ७० ॥ आतां म्हणतील अभक्त । लक्ष्मी ज्याच्या अंकित । त्यानें भिक्षा मागत । कां हो ! गांवांत फिरावें ? ॥ ७१ ॥ कामधेनु असून घरीं । तो मागतो माधुकरी । हें सांगा कधींतरी । खरें वाटेल कां कवणासी ? ॥ ७२ ॥ करीं असून अमृत । मृत्यु पावला पर्यंत । ऐसें सांगतां ही मात । कोणास कां वाटे खरी ? ॥७३॥ हें वरदृष्टीनें पाहतां । खरें वाटेल सर्वथा । परि खोल जाऊन विचार करतां । भ्रम सारा निवेल कीं ॥ ७४ ॥ आचार्य सहाध्यायांसहित । फडके घेऊन हातांत । जाऊन द्विजसदनाप्रत । मागत होते माधुकरी ॥७५॥ ती इतक्याचसाठीं जाण । करीत असतां विद्यार्जन । शुद्ध अन्नाचें भक्षण । झालें पाहिजे म्हणूनिया ॥ ७६ ॥ शुद्ध अन्नाचें भक्षण । केल्या सुसंस्कृत होतें मन । जैसें सागराचें जीवन । मेघीं जातां गोड होतें ॥ ७७ ॥ पाहा भगवान् मन्मथारि । कुबेर ज्याची सेवा करी । तो नरकपाल घेऊन करीं । भिक्षाच पाहा मागतसे ॥ ७८ ॥ दत्त अत्रीचे नंदन । तेहि करिती भिक्षाटन । कां कीं भिक्षेचें शुद्ध अन्न । ऐसें शास्त्र सांगतसे ॥ ७९ ॥ सांदीपनीचे असतां घरीं । भिक्षाच मागे श्रीहरि । धनुर्विद्या शिकतां खरी । भिक्षा मागितली रामचंद्रें ॥ ८० ॥ याच न्यायें आचार्य तेहि । भिक्षा मागत होते पाहीं । ब्रह्मचारी आश्रमाठायीं । महत्त्व विशेष भिक्षेचें ॥ ८१ ॥ असो, सदन त्या बाईचें । सुवर्ण आंवळ्यांनीं भरतां साचें । पाहावया लोक गांवींचे । असंख्य धावून आले कीं ॥ ८२ ॥ त्या बाईचा पति आला । हें ऐकून निजघराला । उभयतांनीं धरणीं केला । आचार्याच्या प्रणिपात ॥ ८३ ॥ आपुल्या कृपेनें आम्हांला । संपत्तीचा लाभ झाला । मजसारिख्या सुदाम्याला । कृष्ण तुम्ही भेटलांत ॥ ८४ ।

पाहून हा चमत्कार। लोक आश्चर्य करिती फार। न ब्रह्मचारी हा ईश्वर। हाच अवतरला भूमंडळीं ॥ ८५ ॥ त्या दिवसापासून। ग्रामवासी अवघे जन। भजनीं लागले परिपूर्ण। श्रीमत् शंकराचार्यांच्या ॥ ८६। भिक्षा घेऊन सर्वत्रांनीं। आले गुरुगृहास परतोनि। तीं विद्यागुरुच्या घातली कानीं। ही घडलेली गोष्ट पाहा ॥ ८७ ॥ तें ऐकतां गुरु धाले॥ आणि लोकांप्रति बोलले। याचें प्रत्यंतर मला आलें। आहे मागे कितीक वेळां ॥ ८८ ॥ आपुल्या गांवींचें महापुण्य। म्हणून याचे लागले चरण। यासी कराया विद्यादान। समर्थ कोणी न भूमंडळीं ॥८९॥ हा गुरुंचाहि आहे गुरु। कामधेनु वा कल्पतरु। अवघ्या विद्यांचा सागरु। मूर्तिमंत हा शंकर ॥ ९० ॥ अवघी विद्या झाली पूर्ण। गुरुस दक्षिणा देऊन। आचार्य आले परतून। स्वगृहाकारणें ॥ ९१ ॥ कालडी गांव आनंदला। आचार्यांसी पाहून भला। पारावार नाहीं उरला। मातेच्या आनंदातें ॥९२॥ असो, एके दिवशीं म्हातारी। स्नानास गेली दोन प्रहरीं। त्या पूर्णा नदीच्या वरी। नित्यनियमाप्रमाणें ॥ ९३ ॥ तो उन्हाळा विशेष। लागला होता वैशाखमास। ऊन सूर्याचें सोसण्यास। जन असमर्थ झाले कीं ॥९४॥ पांखरें न फिरती गगनोदरीं। तापून गेली भूमि सारी। तप्त झालें अवघें वारी। त्या पूर्णा नदीचें ॥ ९५ ॥ अनवाणी पंथाप्रति। चालतां पाय पोळती। चटचटां चटके बसती। ऐसा प्रखर उन्हाळा ॥ ९६ ॥ माता करूनिया स्नान। येत असतां परतून। मधेच भोंड येऊन। पंथामाजीं पडली कीं ॥ ९७ ॥ ते गांवींचे लोक मिळाले। तिला सदनीं आणून ठेविलें। हें आचार्यांसी श्रुत झालें। पंथींचें तें वर्तमान ॥ ९८ ॥ आचार्य आले घरांत। पाहिली माता दुःखित। आरंभिलें त्यांनीं त्वरित। शीतोपचार मातेला ॥ ९९ ॥ पंखा घेऊनिया करीं। वारा घालते निजकरीं। शीतोदक मुखाभीतरीं। घालूं लागले वरचेवर ॥ १०० ॥ वाळा, कापूर, चंदन। यांचे करून मिश्रण। त्याचें केलें अनुलेपन। जननीच्या भालभागा ॥ १०१ ॥ थोडा वेळ गेल्यावरी। सावध झाली म्हातारी। तों उसें आपुलें अंगावरी। पुत्राच्या हें पाहिलें ॥ १०२ ॥ तेणें बहुत आनंद झाला। माय वदे आचार्याला। आज आली होती वेळा। परी न आला काळ तो ॥ १०३ ॥ काळ वेळ एक्याठायीं। होईल तेव्हांच मृत्यु येई पृथक् पृथक् आल्या देई। त्रास मानवशरीरा ॥ १०४ ॥ उन्हाळ्याचे

असती दिन । वयास माझ्या म्हातारपण । पूर्णा नदीचें तें स्नान । आजन्म घडावें ही आशा ॥ १०५ ॥ आपुल्या सदनापासूनिया । नदं लांब पुत्र-राया ! । म्हणून स्नान साधावया । ऐसें करावें वाटतें ॥ १०६ ॥ उन्हाळा आहे जोंवरी । राहूं आपण तोंवरी । खोपट बांधून तिच्या तीरीं । म्हणजे माध्यान्ह-स्नान साधेल ॥ १०७ ॥ आचार्य म्हणती त्यावरी । तुला नाहीं जरुरी खरी । जाऊन राहण्या तिच्या तीरीं । कां तें आतां सांगतों ॥ १०८ ॥ वृद्धापकालें जर्जर । तुझी तनु झाली फार । मीच आपुल्या पाठीवर । त्रिकाल माते ! घेऊनिया ॥ १०९ ॥ तुला नेईन स्नानासी । त्या पुनीत पूर्णा सरितेसी । घडूं दे ही अमोलशी । मजलागी मातृसेवा ॥ ११० ॥ कां कीं मातृसेवेहून । दुसरें मोठें नाहीं पुण्य । तें घडूं दे मजलागून । हीच तुला विनंती ॥ १११ ॥ ऐकून ऐशा भाषणाला । ऊर जननीचा भरून आला । आनंदाश्रू डोळ्यांना । वाहूं लागले एकसरां ॥ ११२ ॥ आणि केलें भाषण । पुत्रा ! तूं आहेस लहान । मींच तुझें पालन । केलें पाहिजे स्थितींत या ॥ ११३ ॥ माझें काय व्हावयाचें । राहिलें आहे आतां साचें । मज पाठीवर घ्यावयाचें । मनांतहि न आणी तूं ॥११४॥ पंखाखालच्या पिलास । काय कोंबडी देते त्रास । वानरी आपुल्या बालकास । मारितां उड्या न विसंबे ॥ ११५ ॥ हें आचार्यांनीं ऐकिलें । मौन धरून बैसले । मातेच्या सेवेंत राहिले । रात्र होईपर्यंत ॥ ११६ ॥ पुढे रात्र झाली दोन प्रहर । तमाचें राज्य झालें थोर । उगवला नव्हता रोहिणीवर । चमकूं लागल्या चांदण्या ॥ ११७ ॥ वाघुळे, पिंगळे, दिवाभीत । फिरूं लागले आकाशांत । 'टी, टी' असा ध्वनि होत । सरितातटीं टिटव्यांचा ॥ ११८ ॥ पूर्णा तीर अवघें शांत । ऐशा समयीं आले तेथ । श्रीजगद्गुरु साक्षात् । जो अवतार हराचा ॥ ११९ ॥ हस्तपाद प्रक्षाळिले । सरितातटीं बैसले । पद्मासन घातिलें । आचार्यांनीं तेधवां ॥ १२० ॥ आणि गंगेप्रति जोडिले कर । स्तव मांडिला अपार । जननी ! तूं आहेस दूर । मम सदनापासूनिया ॥ १२१ ॥ म्हणून माझ्या मातेस । रोज यावया स्नानास । तुझ्या तीरीं होतो त्रास । तो तूं वाटतें चुकवावा ॥ १२२ ॥ तूं आधींच आहेस पूर्णा । पुरविसी भक्तांच्या मनकामना । विफल माझी प्रार्थना । होऊं न द्यावी ये कालीं ॥ १२३ ॥ मागे सगरपुत्रांसाठीं भगीरथ । गेला हिमालयांत ।

गंगा आणावया सत्य । हें आहे ठावे तुला ॥ १२४ ॥ त्या भगीरथा-परी । मी आलों तुझ्या तीरीं । तुला न्यावया निर्धारीं । मदीय सदना-पर्यंत ॥ १२५ ॥ भगीरथाचें अंतर फार । माझें नाहीं तितकें दूर । अवघें एक मैलावर । येणें आहे गंगे ! तुला ॥१२६॥ त्रिकाल तुझ्या स्नानाचा । नेम माझ्या जननीचा । आहे तो पुरीव साचा । माझी प्रार्थना ऐकून ॥ १२७ ॥ गंगा, यमुना, गोदावरी । नर्मदा, कृष्णा, कावेरी । ह्या अवघ्यांपेक्षां तुलाच खरी । माझी जननी मानीतसे ॥१२८॥ आतां वृद्धाप-कालीं तिला । तुझ्या तीरास येण्याला । अवसान नुरलें देहाला । म्हणून तूंच चलावें ॥ १२९ ॥ ऐशी प्रार्थना ऐकिली । पूर्णा तेथें प्रकटली । चंद्र नसून फांकली । प्रभा बुध हो ! चोहींकडे ॥१३०॥ रूप पूर्णा सरितेचें । कितीतरी वानूं वाचें । मुख पाहतां तियेचें । धाबे जाय दणाणून ॥१३१॥ गौर वर्ण गोमटी । चतुर्भुज सिंहकटी । मगराच्या बैसून पाठीं । पूर्णा आली जलावर ॥ १३२ ॥ पूर्णेप्रति पाहतां । आचार्य करिती दंडवता । तों पूर्णेनें त्यांच्या हातां । धरून ऐसें बोलली ॥ १३३ ॥ तुम्ही न करावा नमस्कार । तुम्ही साक्षात् शंकर । तुम्हांमुळेंच माझें तीर । पवित्र होणार आहे कीं ॥१३४॥ तुम्हांमुळे कालडी । तीर्थ होऊन बसली गाढी । नाहीं किंमत बापुडी । सप्तपुऱ्यांची इच्यापुढें ॥१३५॥ मला नका जोडूं हात । मी तयार येण्याप्रत । आतांच घरापर्यंत । तुमच्या आहें आचार्या ! ॥ १३६ ॥ मीं कोठवरी यावें । हें तुम्हींच ठरवावें । आपण पुढें चालावें । तुमच्या मागून येतें मी ॥ १३७ ॥ आचार्यें तें ऐकिलें । उठून चालूं लागले । मागोमाग त्यांच्या केलें । प्रयाण, पूर्णा सरितेनें ॥ १३८ ॥ लागतां घराचें तें द्वार । आचार्य वदले होऊन स्थिर । यावत् चंद्रदिवाकर । येथून वाहावें पूर्णे ! तुवां ॥ १३९ ॥ मग काय विचारतां । तैसेंच झालें तत्त्वतां । आली श्रीशंकराचार्याकरितां । पूर्णा सन्निध घराच्या ॥ १४० ॥ प्रभातकालीं उठून । पौर जों करिती अवलोकन । तों चालला गांवाजव-ळून । प्रवाह पूर्णा नदीचा ॥ १४१ ॥ आचार्य म्हणाले जननीस । तुला स्नान घालण्यास । आणिलें आहे पूर्णेस । घरासन्निध आपुल्या ॥ १४२ ॥ घरासन्निध अलेली । पूर्णा जननीनें पाहिली । आणि आचार्यास बोलली । येणें रीतीं तें ऐका ॥ १४३ ॥ शंकरा ! तूं माझ्या उदरीं । आला आहेस कोणीतरी । देव महान् अधिकारी । तें आज कळलें मला ॥ १४४ ॥ तूंच

माझा भगीरथ । गंगा आणूनिया येथे । पुरविलास माझा हेत । साच कीं हे राजसा ! ॥ १४५ ॥ एका रात्रींत पूर्णा फिरली । प्रवाहगति बदलली । ह्या गोष्टीची पुकार झाली । आसमंत भागीं कालडीच्या ॥ १४६ ॥ तो पाहण्या प्रकार । धांवू लागले नारीनर । कोणी बसून वाहनावर । कोणी तसेच पायांनीं ॥ १४७ ॥ जलांत स्नान करोनि । ओटया भरती सुवासिनी । तैसेंच ब्राह्मणांलागूनि । वायनें देऊं लागल्या ॥ १४८ ॥ कालडी गांव आनंदला । हा चमत्कार पाहून भला । अवघ्यांनीं सिद्धान्त केला । ऐशा रीतीं तेधवां ॥ १४९ ॥ हा शिवगुरूचा सुत । देव आहे साक्षात् । आपण झालों अवघे पुनीत । याचिया कीं दर्शनानें ॥ १५० ॥ कालडी झालें महाक्षेत्र । अवघ्या क्षेत्रांहून पवित्र । पुष्पासंगें जैसें सूत्र । मोल पावे जगामधें ॥ १५१ ॥ त्यापरीच या गांवाची । स्थिति झाली असे साची । जन्मभूमि आचार्यांची । हा मान मिळाला जिला ॥ १५२ ॥ मातेनें करितां स्नान । प्रत्यक्ष पूर्णेचें दर्शन । झालें असे तिजलागून । पुण्यवान् केवढी ही ! ॥ १५३ ॥ इति श्रीदासगणु-विरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्य-पेठेस जावया ॥ १५४ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय दहावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी विश्वपते ! । जयजयाजी विमल-कीर्ते ! । केल्या तुला वंदनाते । अवघे दोष भस्म होती ॥ १ ॥ ऐसें ज्ञाते आजवर । सांगत आले साचार । त्याचेंच येवो प्रत्यंतर । देवा ! दासगणूला ॥ २ ॥ कितीहि मलिन असला जरी । देह परि त्याला करी । निर्मल कीं सरितावारि । याचा अनुभव सर्वांना ॥ ३ ॥ तुझ्या नामगंगेत । विमल भक्तिजलांत । न्हाऊन आल्यावरी नुरत । लेश कस-ल्याहि पातकाचा ॥ ४ ॥ मला एकचि माहीत । तुझ्या धरावे चरणांप्रत । तृषित गेल्या गंगेप्रत । तो न विन्मुख येई कदा ॥ ५ ॥ अवघा भार तुजवरी । मीं घातिला मन्मथारि ! । योग्य वाटेल तेंच करी । इच्छे-नुरूप आपुल्या ॥ ६ ॥ माझें अशुभ होतां कांहीं । त्याचा दोष तुला

पाही। हे नीलकंठा ! माझे आई ! । याचा विचार पूर्ण करा ॥ ७ ॥ असो आचार्याची विमल कीर्ति। केरलदेशीं पसरली होती। लांबून लांबून लोक येती। चरणदर्शन घ्यावया ॥ ८ ॥ पुण्यसरितेंत करितां स्नान। होतें पातकांचें निरसन। तेंच होतें, दर्शन। झाल्या आचार्य-चरणांचें ॥ ९ ॥ म्हणजे पुण्यसरितेहूनि। आचार्यांचे चरण दोन्ही। श्रेष्ठ शतपटींनीं। आहेत कीं निःसंशय ! ॥ १० ॥ त्या चरणद्वयाचा कोमलपणा। कमळासहि लाजवी जाणा। नवनीताचा मऊपणा। फिक्का पडेल त्यापुढे ॥ ११ ॥ नखाग्राची आरक्त कांति। वाटती दुजी रत्न-ज्योति। केळी गर्भासम शोभती। पोटऱ्या आचार्य माउलीच्या ॥ १२ ॥ गजशुंडेसमान। दोन्ही मांड्या शोभायमान। प्रत्यक्ष क्षमा दयेचें सांठवण। पोट शंकराचार्यांचें ॥ १३ ॥ तुंदिल गजापरी छाती। भव्य शोभायमान अति। मान सुंदर शंखाकृति। आजानु बाहू आचार्यांचे ॥ १४ ॥ निष्क-लंक चंद्रासम। मुखकमल उत्तमोत्तम। लक्ष्मीचें निवासधाम। सरो-वरीचें कमल जे ॥ १५ ॥ त्या कमलापरी नयन। तनूचा अवघा गौर वर्ण। पंक्ति हिऱ्याच्या वाटती पूर्ण । दंत आचार्यमुखींचे ॥ १६ ॥ वाणी शुद्ध आणि अति मधुर। जेविं रायपुरी साखर। ऐसा सर्वांग-सुंदर। पुतळा तोच एक भूमीवरी ॥ १७ ॥ त्रिपथगामिनी जैशी गंगा। त्रिपुंड्र तेंवि भालभागा। येतुलीहि नव्हती बघा। जागा कुरूपतेस ते ठायां ॥ १८ ॥ कोणी भाविक दर्शना येती। कोणी शास्त्रार्थ विचारिती। कोणी मांडून पाहती। शंका आपुल्या श्रींच्यापुढे ॥ १९ ॥ समाधान अवघ्यांचें। आचार्य करिती आपुल्या वाचें। जेवीं मेघ स्वातीचे। चातकाला तोषविती ॥ २० ॥ ऐशी कीर्ति दूरवर। गेली नृपाच्या कानांवर। नृप जो कां राजशेखर। तया केरल प्रांतीचा ॥ २१ ॥ त्या राजशेखरालागूनी। उत्कट इच्छा उपजली मनीं। आचार्यांच्या पवित्र चरणीं। मस्तक आपुलें नमवावें ॥ २२ ॥ त्यानें आपुल्या प्रधानास। धाडिलें कालडीग्रामास। आणावयासी आचार्यास। लवाजमा तो देऊ-निया ॥ २३ ॥ पालखी, उंट, घोडे, हत्ती। दासदासी सेवेप्रति। स्वार शिपाई संगतीं। ढालाईत, भालाईत ॥ २४ ॥ बहुमोल धाडिला अहेर। धोतर, शाल, पीतांबर। सुवर्णाच्या एक हजार। मोहरा दक्षिणा ठेवावया ॥ २५ ॥ वैभवासह कालडीसी। आला प्रधान वेगेंसीं। गेला आचार्य-

दर्शनासी । सामग्री सारी घेऊन ॥ २६ ॥ प्रधानानें आचार्यांना । साष्टांग प्रणिपात केला । आणि भूपाचा तो ठेविला । पुढें दिलेला अहेर ॥ २७ ॥ विनति करी जोडून कर । याचा व्हावा स्वीकार । आणि यावें एकवार । श्रींनीं राजधानीला ॥ २८ ॥ आचार्या ! आपणां बसण्यासी । आणलें आहे पालखीसी । चला बसून तियेसी । दर्शन द्याया भूपातें ॥ २९ ॥ आचार्य म्हणती प्रधानास । याचें न कारण आम्हांस । आम्हां तापसी जनांस । नाहीं पालखी उपयोगी ॥ ३० ॥ पालखी, घोडे, दासदासी । योग्य आहेत भूपासी । आम्हां ब्रह्मचाऱ्यासी । त्याचा न कांहीं उपयोग ॥ ३१ ॥ भिक्षेवरी उदर भरतें । पूर्णा पाजी पयातें । सत्शास्त्रानें शांति टिकते । वाटे न हांव कशाची ॥ ३२ ॥ राजाकडे येऊन । काय मागणें मजलागून । माझ्या चित्तीं समाधान । शास्त्राभ्यासें भरलें असे ॥ ३३ ॥ म्हणून माझें ऐकावें । यासह तुम्हीं परत जावें । कांहीं न येथें ठेवावें । आशीर्वाद सांगा राजासी ॥ ३४ ॥ प्रधानाचा निरुपाय झाला । तो राजधानीस परत गेला । घेऊन साऱ्या लवाजम्याला । आचार्यांच्या आज्ञेनें ॥ ३५ ॥ सांगता झाला प्रधान । चंद्रशेखरालागून । कालडीचें वर्तमान । अवघें घडून आलेलें ॥ ३६ ॥ राजा ! येथें यावयासी । आचार्य न इच्छिती मानसीं । त्यांनीं अहेर दक्षिणेसी । तूं दिलेल्या परत केलें ॥ ३७ ॥ आनंदानें त्यांनीं । आशीर्वाद दिला तुजलागूनि । त्यांच्या सम विरक्त कोणी । मीं न पुरुष पाहिला ॥ ३८ ॥ साक्षात् तो भूवरती । उदेली ज्ञानगभस्ति । वेद-वेदांगें पुढें असती । हात जोडून तयांच्या ॥ ३९ ॥ बसावयासी मृगाजिन । भालीं भस्माचें लेपन । नुसत्या कृपाकटाक्षेंकरून । त्रिताप जगाचे वारिती ॥ ४० ॥ हें ऐकतां मनांत । राजा तोषला अत्यंत । म्हणे खरे जे कां विरक्त । त्यांना पर्वा आमुची नसे ॥ ४१ ॥ प्रथमतः मीच चुकलों । त्यांना बोलावणें धाडिता झालों । नृपमदानें भुलून गेलों । धुंदींत मी ते वेळां ॥ ४२ ॥ नदीनें कां समुद्राला । बाहावें आपणां भेटण्याला ? । तैसाच हा प्रकार झाला । थोर योग्यता आचार्यांची ॥ ४३ ॥ मीच माझ्या वैभवासहित । जातों त्यांना भेटण्याप्रत । जेणें वैभव कृतार्थ । अनायासें होईल मम ॥ ४४ ॥ ऐसा विचार मनीं केला । राजशेखर निघाला । चतुरंगसेनेसहित भला । आचार्यांच्या दर्शनासी

॥ ४५ ॥ सांडण्या, उंट, हत्ती, घोडे । उल्हाट यंत्राचे ते गाडे । अघाडीला बडे बडे । चालूं लागले सैन्याच्या ॥ ४६ ॥ राष्ट्रनिशाणाबरोबर । धांवूं लागले घोडेस्वार । करींच्या तलवारी अपार । तळपूं लागल्या विजांपरी ॥ ४७ ॥ नगारे ते घोड्यावरती । मोठमोठ्या नौबती । उंटावरी बांधल्या असती । ध्वनि ज्यांचा गंभीर ॥ ४८ ॥ पायदळ शिपाई मागें पुढें । दिवाण, मानकरी बडे बडे । एकाचिया एकापुढें । बसले निजहत्तींवरी ॥ ४९ ॥ सैन्याचिया मध्यंतरीं । एका श्वेत हत्तीवरी । बांधली होती अंबारी । राजशेखरा बसावया ॥ ५० ॥ त्या हत्तीच्या पाठीवरी । झूल· रेशमी जरतारी । वरती आच्छादिली अंबारी । रेशमाच्या काढणीनें ॥५१॥ रत्नें जडलीं थोरथोर । त्या अंबारीसी साचार । आंत बैसला राजशेखर । राजा केरल देशींचा ॥ ५२ ॥ ऐशा वैभवासहित । राजा आला कालडींत । घालता झाला दंडवत । श्रीशंकराचार्यातें ॥ ५३ ॥ राजा विनयानें बोलला । मी आहें शिष्य आपुला । म्हणून आलों करायाला । सशास्त्र पूजन आपुलें ॥ ५४ ॥ कां कीं आम्हां क्षत्रियातें । गुरु, ब्राह्मण, ब्रह्मवेत्ते । त्यांच्या दिव्य चरणांतें । वंदणें हा धर्म आमुचा ॥ ५५ ॥ कां कीं ब्राह्मणांवांचूनि । गुरुपदा न योग्य कोणी । परी तो सर्व बाजूंनीं । योग्य असला·पाहिजे ॥ ५६ ॥ ब्राह्मण कुळीं जन्मून । जो न करी वेदाध्ययन । मदिरामांसांचें सेवन । केल्या, नोहे ब्राह्मण तो ॥५७॥ असत्य सर्वदा ज्याची वाणी । त्या ब्राह्मण म्हणूं नये कोणीं । प्रेम पर-स्त्रीच्या ठिकाणीं । धरी तो न ब्राह्मण ॥ ५८ ॥ व्यापार व्याजबट्ट्याचा । करी तो न ब्राह्मण साचा । रस, कातडे विकण्याचा । धंदा करी तो न द्विज ॥ ५९ ॥ यांतील दोष एकहि । अहो आचार्या ! आपुल्या ठायीं । कधींच मिळावयाचा नाहीं । तुम्हीच गुरु जगाचे ॥ ६० ॥ आपण गुरुपदास गेलां । म्हणून शिष्य पूजेस आला । यथासांग पूजा मला । करूं द्या आतां आपुली ॥ ६१ ॥ ऐसें विनये बोलून । करिता झाला पूजन । ठेविल्या दक्षिणेकारण । दहा हजार मोहरा त्या ॥ ६२ ॥ अवघ्या कालडीलागून । राजानें दिलें भोजन । चहूं वर्णांकारण । करून पंचपक्वान्नें ॥ ६३ ॥ वैदिक अग्निहोत्र्यासी । दक्षिणा दिली बहुवसी । एवंच अवघ्या विद्वानांसी । गौरविलें राजानें ॥ ६४ ॥ तीन दिवसपर्यंत । ऐसा थाट चालला तेथ । अनाथ पंगु दुबळ्यांप्रत । वस्त्राभरणें दीधलीं

॥ ६५ ॥ तो राजा राजशेखर । म्हणे आचार्यां जोडून कर । मी शृंगारशास्त्रावर । कांहीं रचना केली असे ॥ ६६ ॥ तीं माझीं नाटकें तीन । आपण करावीं अवलोकन । कां कीं आपण सर्वज्ञ । सर्व कांहीं आपणां कळे ॥ ६७ ॥ ज्ञात्यावांचून दुरुस्ती । न होय कीं कल्पान्तीं । गुरूच शिष्या दाखविती । चुका त्यांच्या झालेल्या ॥ ६८ ॥ ऐसें म्हणून तिन्ही ग्रंथ । आचार्यांपुढें ठेविले सत्य । आचार्यांनीं तयांप्रत । सांगोपांग पाहिलें ॥ ६९ ॥ नाटकांविषयीं आपुलें । समाधान त्यांनीं व्यक्त केलें । प्रेमें वरती विचारिलें । आणखी काय इच्छिसी तूं ॥ ७० ॥ चंद्रशेखर म्हणे गुरुराया ! । पुढें गादी चालवावया । पुत्र सद्‌गुणी द्यावा सदया । या दासाकारणें ॥ ७१ ॥ आचार्य म्हणती नृपासी । तूं जरी आमुचें ऐकसी । कांहीं एक विरोध त्यासी । न करतां येधवां ॥ ७२ ॥ तरी सद्‌गुणी पुत्र शतायुषी । होईल तुजला निश्चयेंसी । नाहीं धनाचें आम्हांसी । मुळींच राजा ! कारण ॥ ७३ ॥ या मोहरा दहा हजार । परत न्याव्या साचार । वा एखादें शिवमंदिर । याच्या खर्चानें बांध नृपा ! ॥ ७४ ॥ विरक्त ब्रह्मचारी संन्यासी । अयोग्य द्रव्य भिक्षेसी । ते गृहस्थाश्रमी वैदिकांसी । योग्य आहे नृपाळा । ! ॥ ७५ ॥ सर्वेषाम अन्नदान । द्रव्य पात्र पाहून । दांभिक दुर्जनालागून । द्रव्यदान करूं नये ॥ ७६ ॥ आश्रय पंगुअनाथांसी । कधीं न द्यावा तस्करासी । सर्प-पाळणें घरासी । नाहीं मुळीं निर्भय ॥ ७७ ॥ विद्यादान रयतेस करावें । त्यास शहाणें करावें । नीतिपाठ शिकवावें । अवघ्या कुलीन स्त्रियांना ॥ ७८ ॥ सर्व ठेवून ध्यानांत । तैसेंच जावें वागत । तरीच तुला होईल सुत । जा काळजी करूं नको ॥ ७९ ॥ राजानें तें ऐकिलें । आचार्यांसी वंदन केलें । त्याच मोहरांनीं बांधिलें । पुढें एक शिवमंदिर ॥ ८० ॥ राजा स्वनगराप्रति गेला । वंदित श्रीआचार्यांना । अचंबा बहुत वाटला । त्यांच्या विरक्ततेचा तया ॥ ८१ ॥ विरक्तता सांगतां येते । परी तैसी न कृति करवते । विचार करून पाहा श्रोते ! । या हल्लींच्या काळांत ॥ ८२ ॥ सोंगें विरक्ततेचीं । हल्लीं चोहींकडे साचीं । इच्छा अंतरीं वैभवाची । आणि बळेंच म्हणावें 'नको ! नको !' ॥ ८३ ॥ नाहीं वैराग्य, नाहीं ज्ञान । हरिठायीं न जडलें मन । विषयभोगाची असे पूर्ण । चित्ताठायीं वासना ॥ ८४ ॥ इतके दुर्गुण

संग्रहासी । असूनिया आपणांपाशीं । सांगत फिरती जगासी । आम्ही साधू म्हणून ॥ ८५ ॥ ज्ञानेश्वरीच्या बळावर । इस्टेट करावी अपार । गरम दूध वरच्यावर । घ्यावें केशर घालूनिया ॥ ८६ ॥ आध्यात्माच्या काढण्या शाळा । वर्गण्या कराव्या कीं गोळा । विनाकारण द्वेषाला । ऊत आणावा चोहींकडे ॥ ८७ ॥ कोणी राहूनिया नग्न । व्हावें वैभवसंपन्न । हें का वैराग्याचें लक्षण । विचार करून पाहा तुम्ही ॥ ८८ ॥ ऐशीं सोंगें जोंवरी । नाहींशीं न झालीं खरीं । खरें सुख तोंवरीं । तुम्हांपासून दूर असे ॥ ८९ ॥ सार्वजनिक हित साधण्याचें । जें कां असेल कार्य साचें । आहे तया वर्गणीचें । प्रयोजन तें निःसंशय ॥ ९० ॥ पारमार्थिक कामांत । द्रव्य नको यत्किंचित् । तें दिल्या होतो घात । उलट पाहा कृत्याचा ॥ ९१ ॥ म्हणून पूर्वीच्या संतांचीं । चरित्रे आणा ध्यानांत साचीं । या अलीकडील दांभिकांची । उगीच प्रशंसा करूं नका ॥ ९२ ॥ आध्यात्मशाळा काढून । प्राप्त न झालें कोणा ज्ञान । त्याची वेगळीच आहे खूण । ती कळणार आहे सद्‌भक्तां ॥ ९३ ॥ असो राजशेखराशी । पुत्र झाला पुढच्या वर्षी । बाध आचार्यवाणीसी । कल्पांतींहि येणें नव्हे ॥ ९४ ॥ धन्य भाग्य त्या कालडीचें । पद लागलें आचार्याचें । महत्त्व तेथील भूमीचें । येणार नाहीं कवणास ॥ ९५ ॥ कां कीं आचार्य-चरणांचे रजःकण । तेथें आहेत अजून । म्हणून मुमुक्षूंनीं लोळण । जाऊन घ्यावी तया क्षेत्रा ॥ ९६ ॥ मथुरा, गोकुळ, वृंदावन । जेथें हरीचें बाळपण । गेलें आहे म्हणून । महत्त्व आलें तया स्थाना ॥ ९७ ॥ त्यापरीच कालडीची । स्थिति तंतोतंत साची । बालमूर्ति आचार्यांची । फिरली येथेंच चोहींकडे ॥ ९८ ॥ यात्रा रोज नवी नवी । आचार्य-चरणांसाठीं यावी । ती कोठवरी सांगावी ? । या वाणीनें तुम्हांस ॥ ९९ ॥ एकदां महान् महान् ऋषि । येते झाले कालडीसी । ही कथा आदरेसी । पुढील अध्यायीं श्रवण करा ॥ १०० ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १०१ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय अकरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ नमो नमो मंगलधामा ! । नमो नमो राघवा रामा ! । नमो नमो पुरुषोत्तमा ! । पंढरीशा रमापते ! ॥ १ ॥ देवा ! तुम्हीच शंकर । विधाता तूंच साचार । कां कीं हें चराचर । अवघेंच आहे रूप तुझें ॥२॥ जें जें देवा म्हणावें कांहीं । तें तें तूंच विठाबाई ! । तुझ्याठायीं भेद नाहीं । त्या तुला नमन असो ॥ ३ ॥ तुझ्या कंठींचा कोहिनूर । जो का देवा ज्ञानेश्वर । भूषविलें गोदातीर । आपेगांवीं जन्मूनिया ॥ ४ ॥ त्या ज्ञानसूर्य ज्ञानेश्वरांनीं । आदरें करून विनवणी । जया वाट पुसली जाणी । मोक्षपेठेस जावया ॥५॥ जे वाटाडे पदनता । झाले असती पंढरिनाथा ! । त्या जगद्गुरूच्या चरिता । वदवी मम मुखानें ॥ ६ ॥ असो आचार्यांच्या वयाप्रत । वर्षे लोटूनि गेली सात । तों काय घडला वृत्तान्त । तो आतां अवधारा ॥ ७ ॥ प्रहर रात्रींच्या सुमारासी । आले भेटण्या अवघे ऋषी । श्रीमत् शंकराचार्यांसी । त्या कालडी ग्रामाकारणें ॥ ८ ॥ भृगु, वामदेव, अंगिरा । ज्यानें निजकुळीं वैश्वानरा । जन्म दिधला असे खरा । तो शांडिल्य महाऋषी ॥ ९ ॥ अत्रि, जमदग्नि, पाराशर । कपि, वत्स, अरुंधतीवर । गार्ग्य, मांडव्य, थोरथोर । विश्वामित्र, देवल ॥ १० ॥ याज्ञवल्क्य, वैशंपायन । महातापसी कौंडिन्य । यास्क, पिंगल, बादरायण । विष्णुवर्धन, इत्यादि ॥ ११ ॥ अवघ्या ऋषींनीं पाहून । उभे राहिले आपण । दिलें बसाया आसन । आदरानें प्रत्येका ॥ १२ ॥ मग वैशंपायन बोलले । अवघ्या ऋषींच्या तर्फे भलें । तें पाहिजे ऐकिलें । तुम्ही श्रोते ! येधवां ॥१३॥ अहो आचार्य ! आपण । मूळचे आहांत पुरुष कोण । कशासाठीं घेऊन । जन्मा आलांत भूमंडळीं ॥१४॥ जग चालण्या सुरळीत । जो निर्मिला वैदिक पंथ । त्याची दुर्दशा सांप्रत । काय झाली तिकडे पाहा ! ॥ १५ ॥

छन्दः पादौ तु वेदस्य, हस्तौ कल्पोऽथ पठ्यते ।
ज्योतिषामयनं नेत्रंनिरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥
शिक्षा घ्राणं तु वेदस्य, मुखं व्याकरणं स्मृतम् ।
तस्मात्साङ्गमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥

ज्या विबुधमान्य वेदाचे । छंद हेचि पाय साचे । कल्पसूत्र कर त्याचे ।

ज्योतिषशास्त्र नेत्र दोन्ही ॥ १६ ॥ निरुक्त हे ज्याचे कान। मुख वेदाचें व्याकरण। शिक्षाशास्त्र हेंचि घ्राण। आहे आपण जाणतां ॥१७॥ एकवीस शाखा ऋग्वेदासी। सोळा शुक्ल यजूसी। तैशा आहेत पंचाऐंशी। शाखा कृष्ण यजूला ॥ १८ ॥ एक हजार सामासी। शाखा होत्या परियेसी। चौथ्या अथर्ववेदासी। नऊ शाखाच केवळ ॥ १९ ॥ स्तोत्रें देवदेवतांचीं। तेंवि रचना ब्रह्मांडाची। कैशी झाली असे साची। हें ऋग्वेदें कथन केलें ॥ २० ॥ यज्ञकर्म इत्थंभूत। कथिलीं यजुर्वेदांत। तें कसें करावें यासहित। त्याचा हल्लीं लोप झाला ॥ २१ ॥ मंत्र तंत्र जादूटोणा। हें सांग कथिलें आथर्वणा। कसें करावें अनुष्ठाना। तें कौशिक सूत्रीं कथियेलें ॥ २२ ॥ कृत, त्रेता, द्वापारीं। वेदविद्या भूमीवरी। जागृत देवा ! होती खरी। कलींत झाला लोप तिचा ॥ २३ ॥ वेदसामर्थ्याच्या पुढें। प्रकाश कोणाचा न पडे। गरुडापरी कोठून उडे। चिमणी ती गगनोदरीं ॥ २४ ॥ हा दुर्धर लागतां कलि। सदाचारता मावळली। जिकडे तिकडे पर्वणी आली। अनाचार दुफळीला ॥ २५ ॥ सर्व कर्तृत्व परमात्म्याचें। शब्दें हरण केलें साचें। नाचवून घोडें प्रकृतीचें। कपिल आणि सांख्यानें ॥ २६ ॥ आतां कपिल महामुनि। जो देवहूतीलागूनि। गेला तत्त्वज्ञान सांगोनि। तो नाहीं सांख्यकर्ता ॥ २७ ॥ परि झालें अघटित। सांख्यमत व्हाया सम्मत। घेते झाले आहेत धूर्त। नांव त्या कपिल मुनींचें ॥ २८ ॥ ते सांख्यकर्त्याची परंपरा। लाविती ऐशी ध्यानीं धरा। कपिल, असुरी, पंचशिख खरा। ईश्वर कृष्ण त्यानंतरीं ॥ २९ ॥ सत्य हुडकितां यावें तें। म्हणून वादविवादापुरतें। जे शब्दसाहित्य निर्मिलें होतें। तेंच शास्त्र बनविलें ॥ ३० ॥ सांख्य पुरुष मानिती। त्यासी आधार प्रकृति। तेंहि आपुलें आहे म्हणती। शास्त्र वेद प्रमाण ॥ ३१ ॥ आपुल्या पक्षाचें मंडण। करण्या देती उदाहरण। म्हणती शास्त्र आमुचें पुरातन। वेदकालापासून असे ॥ ३२ ॥ मैत्रायणीय, श्वेताश्वतर। या दोन उपनिषदीं आधार। सांख्यशास्त्रा साचार। आहे पाहावा शोधकांनीं ॥ ३३ ॥ या सांख्यशास्त्राचा आधार। कारिका आहेत बहात्तर। या शास्त्रानें परमेश्वर। नाहीं ऐसें ठरविलें ॥ ३४ ॥ ह्या योगाचे पुरस्कर्ते। पतंजलि महान् होते। त्यांनीं लोकांत ऐशीं मतें। आपुलीं प्रसिद्ध केलीं कीं

॥ ३५ ॥ जीवाचा जीवपणा । नाहींसा व्हावया जाणा । हठयोग-साधना । केलेंच पाहिजे प्रत्येकां ॥ ३६ ॥ जीवास येण्या शिवपण । हठ-योग हें साधन । तें कर्म उपासनेंकरून । होणें नाहीं केव्हांहि ॥ ३७ ॥ क्रियमाण आणि संचित । अन्य उपायें नासेल सत्य । परी या प्रारब्ध कर्माप्रत । भोगल्याविण गति नसे ॥ ३८ ॥ म्हणून प्रत्येकानें योगी व्हावें । प्रारब्ध कर्म नासावें । भोगोनिया पाहा बरवें । मुक्त व्हावें त्याच जन्मीं ॥ ३९ ॥ एकशें पंचाण्णव सूत्रें । असतीं योगशास्त्रातें । चार पद असती त्यातें । समाधि, साधन, कैवल्य, विभूति ॥ ४० ॥ या योग्यां-सांख्यांनीं ऐसें केलें । एकेक तत्त्वा वाखाणिलें । आणि तेंचि अवघ्यांच्या बसविलें । नेऊनिया उरावरी ॥ ४१ ॥ म्हणजे एकानें साखर । आहे गोड आणि मधुर । म्हणून तिचाच करा स्वीकार । दुसऱ्या द्रव्यास घेऊं नका ॥ ४२ ॥ एक म्हणे पयःपान । श्रेष्ठ आहे सर्वांहून । तिशी न करा मिश्रण । मुळींच या शर्करेचें ॥ ४३ ॥ म्हणजे साधनांत फूट पाडिली । खीर कोणा खाऊं न दिली । पय-साखर वेगळीं केलीं । आपुल्या प्रयत्नांनीं ॥ ४४ ॥ वेद म्हणे दूधसाखर । करून घ्या रे भराभर । तरीच तुमचें शरीर । निरोगी सशक्त होईल कीं ॥ ४५ ॥ या वेदाच्या हेतूला । या दोघांनीं विरोध केला । पुढील आलेल्या आपत्तीला । जोड न कोठेंच राहिली ॥ ४६ ॥ पुढे चार्वाकांनीं आपुली । इमारत पाहा उभारिली । वेदपुराणें शोधिलीं । सामग्री ती जमवावया ॥ ४७ ॥ बृहदारण्यकांतलें । एक वाक्य जमेस घेतलें । आणि त्याचेच शास्त्र केलें । त्याचा विध्वंस करावया ॥ ४८ ॥

'विज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानु विनश्यति न प्रेत्य संज्ञास्ति'

हा विज्ञानें पूर्ण भरलेला । जीव भूतापून जन्मे भला । आणि तेथेंच विलीन अखेरीला । जाऊनिया होतसे ॥ ४९ ॥ म्हणजे मरणोत्तरकाळीं । चैतन्य नसतें मुळीं । परलोक पापपुण्य सगळीं । आहे अर्थात् थोतांड हें ॥ ५० ॥ महामोहाच्या तोंडचीं । वाक्यें विष्णुपुराणाचीं । तीनशें अठरा अध्यायांचीं । उचलिते झाले चार्वाक ॥ ५१ ॥ रामायण अयोध्याकांडांत । सर्ग एकशें आठांत । जें का जाबालि वदला तेथ । तेंहि त्यांनीं उचलिलें ॥ ५२ ॥

यदि भुक्तमिहान्येन देहमन्यस्य गच्छति ।
दद्यात्प्रवसतां श्राद्धं न तत्पथ्यशनं भवेत् ।।
दानसंवनना ह्येते ग्रन्था मेधाविभिः कृता ।
यजस्व देहि दीक्षस्व तपस्तप्यस्व सत्यज ।।
स नास्ति परमित्येतत्कुरु बुद्धि महामते ।
प्रत्यक्ष यत्तदा तिष्ठ परोक्षं पृष्ठतः कुरु ।।

एकाप्रति घालितां अन्न । पावे दुसऱ्याकारण । हें असल्या जाण । ऐसें झालें पाहिजे ।। ५३ ।। प्रवासास गेला कोणी । त्यास मिळावें अन्न-पाणी । ऐसा उद्देश धरूनि । त्याचें नांवें श्राद्ध केल्या ।। ५४ ।। त्या अन्नाचा लाभ त्याला । पाहिजे प्रवासामाजीं झाला । हें ऐसें प्रत्ययाला। नाहीं आलें जोंवरी ।। ५५ ।। तोंवरी श्राद्धादिक । खोटें मानणें आहे देख । पापपुण्य न परलोक । निश्चयानें समज रामा ! ।। ५६ ।। पापपुण्य देणें घेणें । हें ठरविलें धूर्तानें । केवळ स्वार्थाकारणें । त्यावर विश्वास ठेवूं नका ।। ५७ ।। तैसें महाभारत । जो विबुधमान्य असे ग्रंथ । त्याच्या शांतिपर्वात । अध्याय एकशें शाहाऐंशीमध्यें ।। ५८ ।। भारद्वाज जें का वदला। तोहि आधार उचलिला। आपुल्या चार्वाकमताला। पोषक होईल म्हणूनिया ।। ५९ ।। त्या त्या मताचें खंडण । केलें त्यां त्या पुराणांतून । परी तें दिलें सोडून । त्या अवघ्या चार्वाकांनीं ।। ६० ।। एवंच ठिकठिकाणची चोराचोरी । चार्वाकांनीं केली खरी । आणि एक पंथ भूवरी । वेदद्वेष्टा स्थापिला ।। ६१ ।। या चार्वाकाच्या मता । जवळ जवळ येईल जुळता । ऐशा एक्या निर्मिलें पंथा । जीवक नाम जयाचें ।। ६२ ।। या पंथाचे स्थापिते । भूवरी तीन झाले होते । नांव आहे पहिल्याचें । वत्सनंद म्हणोनि ।। ६३ ।। किस-संकिच हा दुसरा । मत्खली गोसल होय तिसरा । हाहि पंथ आहे खरा । वेदद्वेष्टा जैनासम ।। ६४ ।। यांच्यापरीच बौद्ध जैन । वेदद्वेष्टे परिपूर्ण । झाले असती अवतीर्ण । वैदिक पंथ तुडवावया ।। ६५ ।। ही खबर इंद्रासी । देतां झाला नारद ऋषि । तीच इंद्रानें ब्रह्मयाचापाशीं । येवो-निया निवेदिली ।। ६६ ।। मग तो ब्रह्मा चतुरानन । सांगता झाला येऊन । कैलासीं शिवालागून । संगें घेऊन देवांतें ।। ६७ ।। मग आपण गुहाला । झालांत धाडिते महीतला । कर्मकांडाच्या उद्धाराला ।

जयमंगल गांवामध्यें ॥६८॥ नांव कुमारिल भट्ट ऐसें। हल्लीं त्यानें धरिलें खासें। ब्रह्मदेवहि आलासे। मंडणमिश्र महेश्वरीं ॥ ६९ ॥ वेदोद्धारासाठीं। आपण आलांत धूर्जटि! । या पूर्णा नदीच्या कांठीं। पोटीं शिवगुरु पंडिताच्या ॥ ७० ॥ आपुल्या आज्ञेप्रमाणें। इतरांनींहि केलें येणें। नांव धरिलें वायूनें। हस्तामलक जन्मूनिया ॥ ७१ ॥ पद्मपाद विष्णु झाले। आपुलें शिष्यत्व करण्या भले। बृहस्पति तेहि आले। आनंदगिरि होऊनि ॥ ७२ ॥ सनंदन सूर्यनारायण। चित्सुक तो झाला वरुण। विष्णुमित्राची होऊन। कन्या आली सरस्वती ॥ ७३ ॥ आतां कोणी यावयाचें। राहिलें नाहीं हरा! साचें। काम वेदोद्धाराचें। रेंगाळत ठेवूं नका ॥ ७४ ॥ तें रेंगाळलें म्हणून। आम्ही आलों अवघे जन। सूचना देण्यालागून। आपणांसी सदाशिवा! ॥ ७५ ॥ कां कीं सोळा वर्षांची। मुदत तुमच्या आयुष्याची। सात आतांच सरलीं त्याचीं। बाकी राहिलीं नऊ पाहा ॥ ७६ ॥ तया नऊ वर्षांत। कामें हीं न संपती खचित। तुम्ही कैलास लोकाप्रत। गेल्या वेदोद्धार कशाचा! ॥ ७७ ॥ म्हणून हे दयाघना! । वेदाची येऊं दे करुणा। मूठमाती चार्वाकांना। देण्या तूंच समर्थ ॥ ७८ ॥ असुरें गांजितां महीस। ती आपत्ति श्रीनिवास। नाना घेऊनि अवतारास। निरसन पाहा करीतसे ॥ ७९ ॥ रोगराई अवर्षण। याचें करतां येतें निरसन। अनुष्ठानाच्या द्वारें जाण। संत-साधू-ऋषींना ॥ ८० ॥ ही चार्वाक वेदद्वेष्टयांची। तार्किक जैन-बुद्धांची। जेव्हां सांथ पसरते साची। रोगासम या महीतला ॥ ८१ ॥ तेव्हां त्यांच्या निरसना। तुम्हीच योग्य दयाघना! । तम पृथ्वीचा सूर्याविना। कोणाच्यानें हरण न होई ॥ ८२ ॥ या चार्वाकरूप सांथीचें। स्वरूप दिसतें लहान साचें। परि काम तयाचें। अति मोठें होतसे ॥८३॥ अहो देवा! टोळकिडे। जेव्हां माजती चोहींकडे। शस्त्रास्त्रांनीं मुळीं न घडे। सर्वस्वीं तो नाश त्यांचा ॥८४॥ तोफा, बंदुका, कटियारी। बरच्या, भाले, तलवारी। हीं न उपयोगी पडतीं खरीं। नाश टोळांचा करावया ॥ ८५ ॥ समूळ त्यांचें नाशन। प्रखर सूर्याचें करी ऊन। किडा आहे अति हीन। परि नाशिता बहु थोर ॥ ८६ ॥ या वेदद्वेष्टयाच्या टोळांसी। तूंच मारिता व्योमकेशी। कांहीं न चलती सूर्यापाशीं। तमाच्या त्या चेष्टा पाहा ॥ ८७ ॥ तूं देवाधिदेव सर्वेश्वर। तुजविण

न कोणी थोर। वैदिक पंथाचा जीर्णोद्धार। मदनदहना! शीघ्र करी ॥ ८८ ॥ सुखोपभोग कीर्ति मिळविण्याला। तुम्ही न आलांत नीलकंठा!। या सुखाची आपणांला। वाण कां आहे कैलासीं? ॥ ८९ ॥ सर्वांगसुंदर रूपवती। अर्धांगीं तुमच्या पार्वती। जिला पाहतां प्रत्यक्ष रति। तीहि जाय लाजून ॥ ९० ॥ सुवर्णाच्या आंवळ्यांनीं। सदन टाकिलें भरोनि। एका द्विजाचें म्हणती कोणी। याचें कौतुक तुम्हां नसे ॥ ९१ ॥ पुलस्तिपुत्र कुबेरातें। त्वां संपत्तीचा राजा केलें। मग त्यानेंच एका द्विजातें। संपन्न केलें यांत काय? ॥ ९२ ॥ ज्यानें गंगा जटीं धरिली। त्यानें, पूर्णा फिरविली। ही कां गोष्ट विशेष झाली। सांगा त्याची महेश! ॥ ९३ ॥ बरें झालें पार्वती। आली न तुझ्या संगतीं। अवतार घेऊन भूमीवरती। आपणांतें पर्णावया ॥ ९४ ॥ आतां चतुर्थाश्रम घेण्यास। अडचण कांहीं न तुम्हांस। या कालडीचा मोहपाश। सोडा महत् कार्यास्तव ॥ ९५ ॥ आपणां आज्ञा करण्याला। आम्ही न योग्य जगत्पाला!। मात्र आमुच्या विनंतीला। कानामागें टाकूं नका ॥ ९६ ॥ विनंती न आज्ञा होत। हें सर्वत्र आहे श्रुत। सोळा वर्षे आणिक त्यांत। आयुर्मर्यादा वाढवावी ॥ ९७ ॥ म्हणजे बत्तिसाव्या वर्षी। आपण परत यावें कैलासीं। करून वेदोद्धारासी। खंडून पाखंड मतातें ॥ ९८ ॥ ऐसें ऋषि बोलले। तें आचार्यांनीं ऐकिलें। परम चित्तीं संतोषले। ज्या आनंदा जोड नाहीं ॥ ९९ ॥ इतक्यांत आचार्यांची माता। येथें येऊन समस्तां। घालिती झाली दंडवता। विनंती करूनि येणे रीतीं ॥१००॥ अहो! तुम्ही तपोधन! माझें असो तुम्हां नमन। आपुल्या सारख्यांचें दर्शन। दुर्लभ या कलीमध्यें ॥ १०१ ॥ माझ्या पुत्रासवें भल्या। तुम्ही ज्या ज्या गोष्टी केल्या। त्या त्या कांहींबाही ऐकिल्या। कांहीं न ऐकूं आल्या हो! ॥ १०२ ॥ माझ्या पुत्राचे अमोल गुण। काय सांगूं तुम्हांलागून। एक्या दरिद्र्याचें सदन। भरिलें यानें सुवर्णानें ॥ १०३ ॥ पाहा माझ्या स्नानासाठीं। पूर्णा आणिली दारवंटी। हा ऐसा ज्ञानजेठी। आहे तरी कोण सांगा? ॥ १०४ ॥ आयुष्य यालागून। याचें कधीं होईल लग्न। वंशवृद्धि करून। फेडील का हा पितृऋणा ॥ १०५ ॥ अगस्ति म्हणे अंबाबाई!। तुझ्या भाग्यास पार नाहीं। तुझ्या पवित्र कुशीठायीं। हा पुरुष जन्मला ॥ १०६ ॥ याच्या गुणांचें वर्णन।

करितां भागले वेद तीन । तेथें आमुचा पाड कोण । सूर्यापुढें खद्योत ॥ १०७ ॥ बाई ! तुझ्याच नवऱ्यानें । म्हणजे शिवगुरु पंडितानें । केलें देवास विनवणें । ती आहे ठावें तुला ॥ १०८ ॥ शतायुषी मूर्ख सुत । मुळींच नको मजप्रत । सर्व कावळे दिवाभीत । या कां आयुष्य थोडें असे ॥ १०९ ॥ मला सद्गुणी पुत्र द्यावा । हेंच मागणें देवदेवा ! । पडले भाग सदाशिवा ! । म्हणून तुझा पुत्र होणें ॥११०॥ पूर्वी सोळा वर्षांचें । आयुष्य नियमित होतें याचे । परी कांहीं जरुरीचे । कामामुळें वाढलें तें ॥ १११ ॥ म्हणजे आणखी वर्षे सोळा । हा राहील जगतीतला । आणवील हा गोड फळां । वैदिक् पंथ तरूतें ॥ ११२ ॥ या मुलाच्या जायास्थानीं । अंबिके ! बसला आहे शनि । याचा विवाह म्हणूनि । करण्याचा न विचार करा ॥ ११३ ॥ वंशवृद्धि करण्याचें । यासी प्रयोजन नाहीं साचें । याच्या अवघ्याच पितरांचें । महभाग्य सांगूं किती ? ॥११४॥ हा शुकासम साचार । करील तुमचा उद्धार । नाहीं मुळींच अंतर । दत्तांत आणि याच्यामध्यें ॥११५॥ ऐसें बोलून तियेशीं । वंदूनिया आचार्यांसी । स्वस्थानास गेले ऋषि । तेथे आले होते जे ॥११६॥ प्रचंडशा झंझावातें । झाड जसें महीस पडतें । त्या वातापरीच साध्वीतें । वाटतें झालें ऋषिवचन ॥ ११७ ॥ मुलगा आपुला अल्पायुषी । असून होईल संन्यासी । त्याचा धक्का साध्वीसी । जबर बसता जाहला ॥११८॥ भोंड येऊन पडली खालीं । आचार्य तै आले जवळीं । घेऊनि संध्येची ती पळी । पाणी घातलें मुखांत ॥ ११९ ॥ जननीला सावध केलें । आणि बोलूं लागले । हे अंबे ! न जाणिलें । मृत्युलोकाच्या राहाटीला ॥ १२० ॥ या मृत्युलोकाप्रति । प्राणी उपजती आणि जाती । जैशा कां त्या लाटा उठती । सागरामाजीं असंख्य ॥ १२१ ॥ शरीर रथाच्या ध्वजापरी । याला नाहीं स्थिरता खरी । म्हणून चंचलतेचा अंतरीं । विचार याचा करूं नको ॥१२२॥ जेंवि सरितेचें जीवन । तेंवि मानवी आयुष्य जाण । तें मृत्युसागरालागून । मिळावया धांव घेतें ॥१२३॥ कन्या, पुत्र आणि गोत । हे पुरांतील काष्ठवत् । क्षणैक यांची संगत । याचा विचार करूं नको ॥१२४॥ वा पक्षी झाडावरती । बैसती आणि सवेंचि जाती । तैशी तंतोतंत स्थिति । आहे जननी प्रपंचाची ॥ १२५ ॥ दुपारच्या छायेपरी । बाल्य, तारुण्य निर्धारीं । तीं गेल्या-

आल्याचा कोण करी । विचार तो सांग माते ! ॥१२६॥ जन्म जो झाला मानवा । तो मोक्ष साधण्यासी बरवा । मला वाटतें आतांच घ्यावा । संन्यास तुझ्या आज्ञेनें ॥ १२७ ॥ हें वचन ऐकतां क्षणीं । माता बेशुद्ध होवोनि । पडती झाली सवेंच अवनीं । तिला आचार्यें सांवरिलें ॥१२८॥ आणि मनीं विचार केला । आचार्यांनीं ऐसा भला । हें नुसत्या सांगून ज्ञानाला । काम होणार नाहीं कीं ॥ १२९ ॥ आज्ञा मिळेपर्यंत । हिला न दुखवावें यत्किंचित् । हेंच सध्यां योग्य दिसत । मला सर्व बाजूंनीं ॥ १३० ॥ मी पुत्र एकुलता । हिच्या पोटीं सर्वथा । तशांत माझ्यावरी ममता । आहे फार जन्मींची ॥ १३१ ॥ दृष्टिआड घटकाभर । मी होतां साचार । जी काठी टेकीत गांवभर । फिरते मला धुंडावया ॥ १३२ ॥ आपुला विचार ठेविला गुप्त । सावध केलें जननीप्रत । आणि गुंतवलें गृहकृत्यांत । मनाप्रमाणें बोलून तिच्या ॥ १३३ ॥ मग माता दुसऱ्या दिवशीं । बोलती झाली आचार्यांसी । तुझ्या जायास्थानाशीं । आहे शनि हें ऐकिलें ॥ १३४ ॥ त्या शनीचें अनुष्ठान । करण्या एखादा ब्राह्मण । बशीव आजपासून । कृपा शनीची संपादण्या ॥ १३५ ॥ किंवा तूंच होऊन कांहींतरी । अनुष्ठान त्याचें करी । अवघ्या ग्रहांभीतरीं शनि हाच प्रबल असे ॥ १३६ ॥ तव लग्नाच्या विचारांत । मी गढून गेलें अत्यंत । मुलगी एकहि दृष्टीं न पडत । तुझ्या रूपाला साजेलशी ॥१३७॥ कन्या सुस्वरूप मिळेल जेव्हां । लग्न तुझें मी करीन तेव्हां । मज वाटतें खेळवावा । तुझा मुलगा मांडीवर ॥ १३८ ॥ तुला आल्या म्हातारपण । संन्यास सुखें करी ग्रहण । बालवयांत ऐसें भाषण । करणें हें न शोभे तुला ॥१३९॥ आचार्य कांहीं न बोलले । नुसतें मातेचें ऐकिलें । आपुल्या कार्यास निघून गेले । प्रपंचाच्या विबुध हों ! ॥ १४० ॥ कथा आतां यापुढची । द्वादशाध्यायीं कथीन साची । ही चरित्र ऐकण्याची । आली पर्वणी न गमवा ती ॥१४१॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १४२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय बारावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय पांडुरंगा पंढरिराया ! । भीमातटनिवासिया ! । जयजयाजी करुणालया ! । संतवरदा श्रीहरि ! ॥ १ ॥ रोगजंतू तूंच होसी । दिव्य औषधी तूंच असती । वैद्य होऊन तूंच देसी । नाडी पाहून औषधा ॥२॥ म्हणजे रोग, रोगी, औषध, वैद्य । तूंच असशी गोविंद ! । तुझ्या ठायीं नसून भेद । निरनिराळ्या करिसी लीला ॥ ३ ॥ रोगी बरा करणें येथ । तेंच आहे मुख्य सत्य । तेंवि शरणागताप्रत । भयरहित करणें तुवां ॥ ४ ॥ तैसें देवा ! करावें । दासगणूस सांभाळावें । जें जें येईल तें तें करावें । संकट कृपेनें दूर देवा ॥ ५ ॥ असो जगद्गुरूच्या लग्नाचा । माता विचार करी साचा । रोज मुलीच्या पत्रिकांचा । तिजपुढारा ढीग पडे ॥ ६ ॥ कन्यका त्या कोणी कोणी । येती दावण्या घेवोनि । कोणी धरणें धरोनि । बसती द्वारीं अंबिकेच्या ॥ ७ ॥ माय बोले त्यांकारणें । ऐसें धरणें तुम्हीं न घेणें । जें लिहिलें असेल ब्रह्मचानें । तेंच येईल घडून ॥ ८ ॥ करण्या शनीचें अनुष्ठान । मातेनें बसविले ब्राह्मण । त्वरित कोणीकडून । आचार्यांचें लग्न व्हावें ॥ ९ ॥ जों जों मुली सांगून येती । तों तों आचार्यांच्या चित्तीं । उठूं लागली सबळ वृत्ति । संन्यासदीक्षा घेण्याची ॥ १० ॥ आचार्य म्हणती मनांत । मी ऐसाच राहिल्या निवांत । माझी जननी आप्त गोत । मज पाडतील मोहामध्यें ॥ ११ ॥ श्रीरामचंद्राला । दशरथ तो सिद्ध झाला । राज्याभिषेक करण्याला । वसिष्ठाच्या सहाय्यानें ॥ १२ ॥ तया वेळीं सीतापति । योजिता झाला जैशी युक्ति । आपण करावें त्याच रीतीं । आतां थांबणें बरें नव्हे ॥ १३ ॥ रावणाच्या वधासाठीं । राम दशरथाच्या आले पोटीं । सिंहासनीं बसण्यासाठीं । आला नव्हता अयोध्येच्या ॥१४॥ सिंहासना त्यागून । वनवासा गेला रघुनंदन । म्हणून साधितां आलें मरण । रावणाचें रामचंद्रा ॥ १५ ॥ तैसेंच आपण करावें । या मोहांत न पडावें । तरीच कार्य होईल बरें । वेदोद्धाराचें माझ्या करीं ॥ १६ ॥ ऐसा योग्य विचार करोनि । शंकराचार्य एके दिनीं । समवयस्क मुलें घेऊनि । पूर्णेत उतरले स्नानाला ॥ १७ ॥ दिवसाचा तो प्रथम प्रहर । स्फटिकतुल्य वाहे नीर । पूर्णा नदीच्या कांठावर । गर्दी सघन वृक्षांची

॥ १८ ॥ घाट स्त्रीपुरुषांनीं । गेला होता गजबजूनि । तै शंकराचार्यांनीं । काय केलें तें ऐका ॥ १९ ॥ आपल्या इच्छें मगर । उत्पन्न केला भयंकर । त्याच्या तोंडीं साचार । एक पाय आपुला दिला ॥ २० ॥ आणि हाकाटी केली ऐशी । मगरानें धरिलें मजसी । याचे हातून सोडवण्यासी । कोणी-तरी धांवा हो ! ॥ २१ ॥ मुलें पळालीं दूर दूर । पाहून तो थोर मगर । मोठ्यासहि पडला विचार । पाहून त्या मगराला ॥ २२ ॥ लोकां अचंबा वाटला । म्हणती येथें हा कैसा आला ? । यासी विहार करण्याला । अथांग पाणी पाहिजे ॥ २३ ॥ मगर ओढी पाण्यांत । आचार्य वरी मारी हात । तोडावया पाण्याप्रत । वरती येण्याकारणें ॥ २४ ॥ लोक अवघे दुरून पाहती । परि न कोणाची होय छाती । जाऊन सोडवण्याप्रति । तेथें शंकराचार्यांना ॥ २५ ॥ कठीण प्रसंग येतां कोणा । त्याचा तोच सोसी जाणा । अन्य कोणीहि पडेचिना । उपयोगी ऐशा वेळीं ॥ २६ ॥ जीं पोरें बरोबरी । स्नानास आलीं सरितातीरीं । तीं आचार्यांच्या जाऊन घरीं । सांगूं लागलीं मातेला ॥ २७ ॥ ऊठ ऊठ हे अंबिके माय ! । शंकराचा एक पाय । मगरें धरिला हाय ! हाय ! । त्या सोडवण्या चला तुम्ही ॥ २८ ॥ ऐसें वृत्त ऐकतां । नदीकडे धांवली माता । निजपुत्रास पाहण्याकरितां । परम घाबरी होऊन ॥ २९ ॥ तों पुत्रा मगरें धरिलें । ऐसें तिनें पाहिलें । पाणी साच पळून गेलें । तिच्या मुखाचें तेधवां ॥ ३० ॥ छाती उडे धडधडां । लोळूं लागली गडबडां । फोडिती झाली हंबरडा । तिच्या शोका पार नसे ॥ ३१ ॥ देवा अनंत नवस केले । परी कोणी न धांवले । मग आचार्य बोलते झाले । आपुल्या मातेस येणें रीतीं ॥ ३२ ॥ आई ! हा मगर म्हणतो मला । तूं संन्यासदीक्षेला । साच घेतल्या ये वेळां । तुजलागीं सोडीन ॥ ३३ ॥ जरी होणें संन्यासी । न पटेल बाळा ! तुजसी । तरी त्या यमलोकासी । जाणें आहे भाग तुला ॥ ३४ ॥ ऐसें मगर आहे म्हणत । सांग करूं कैशी गत । सारूनिया शोकाप्रत । संन्यासाची आज्ञा दे ॥ ३५ ॥ तरीच माझे वांचतील प्राण । टिकेल तुझें पुत्रवतीपण । नको करूं अनमान । मला आज्ञा देण्याविषयीं ॥ ३६ ॥ यावरी माता वदली त्यास । घेई बाप्पा ! संन्यास । परी तुझ्या प्राणांस । मगरें पाहिजे सोडिलें ॥ ३७ ॥ ऐसा शब्द ऐकिला । मगरें पाय सोडिला । आचार्यांनीं

मातेला। येऊन केला नमस्कार ॥ ३८ ॥ शंकराचार्यांबरोबर। मगर तोहि आला वर। प्रचंड त्याचें शरीर। पाहतां लोक लागले पळूं ॥३९॥ मगरा पाहून जननी भ्याली। आणि आचार्यांस ऐसें वदली। मी संन्यासाची तुला दिली। आज्ञा, असून कां हा आला? ॥ ४० ॥ हा येण्याचें प्रयोजन। इतुकेंच आहे माते! जाण। माझें असत्य भाषण। तुज न वाटावें म्हणोनी ॥ ४१ ॥ नक्रराजा जाई आतां। मला संन्यास घेण्याकरितां। अडथळा न करी माता। सत्य वचन मानी हें ॥ ४२ ॥ ऐसे शब्द ऐकून। मातेप्रति वंदून। मगर पूर्णेत जाऊन। क्षणांत झाला नाहींसा ॥ ४३ ॥ घांटावरील पौरजन। म्हणती मातेलागून। आज टळलें महाविघ्न। अंबिके! तुझ्या पुत्राचें ॥ ४४ ॥ परि आज्ञा संन्यासाची। तूं न देई पुत्रा साची। जरुरी नाहीं तियेची। आपणां नंबुद्री ब्राह्मणां ॥ ४५ ॥ नंबुद्रिपाद आपण। अवघ्यांमाजी श्रेष्ठ जाण। हें वेडेवांकुडें संन्यासग्रहण। आपुल्या जातीनें करूं नये ॥ ४६ ॥ बोल संकटकाळीचे। केव्हां न खऱ्या स्वरूपाचें। महत्त्व त्या मगराचें। तूं मुळीं मानूं नको ॥ ४७ ॥ तो भूत, पिशाच्च कोणी तरी। मगर असावा निर्धारीं। आला असेल शंकरकरीं। अविधिकृत्य घडवावया ॥ ४८ ॥ त्या मगररूप सोंगाड्याचा। तूं न विचार करी साचा। रिवाज आपुल्या जातीचा। तूं केव्हांहि मोडूं नको ॥ ४९ ॥ नंबोदरीपाद ब्राह्मणांत। झाला न कोणी पाहा सत्य। संन्यासी आजपर्यंत। ती प्रथा इतरांची ॥५०॥ त्यांतून आपुला शंकर। अधिकारी आहे थोर। हें अविधि कृत्य केल्यावर। तो थोरपणा न टिकेल ॥ ५१ ॥ म्हणून आपुल्या पुत्रास। करूनिया सदुपदेश। घेऊं न द्यावा संन्यास। हेंच आहे सांगणें ॥ ५२ ॥ आर्यांबा बोलली त्यावर। तुम्हीहि करा एकवार। कान उघाडणी साचार। त्या माझ्या शंकराची ॥ ५३ ॥ मीहि आपुल्याकडून। शंकरा सांगून पाहीन। परी शास्त्रवाक्याचें प्रमाण। न देतां येईल मला ॥५४॥ तें प्रमाण तुम्हीं द्यावें। मन त्याचें वळवावें। अविधि कृत्य होऊं न द्यावें। माझ्या शंकराकडून ॥ ५५ ॥ तों इतुक्यांत आले तेथ। शंकराचार्य धांवत। हे पौर हो! ऐका मात। अभिनव अशी मम मुखीं ॥५६॥ प्रवाह पूर्णासरितेचा। जेथूनिया वळला साचा। त्या ठिकाणीं हरीचा। वास बहुत दिसांपून ॥ ५७ ॥ पौर हो! त्या ठिकाणीं। पडतां झाला

माझ्या कानीं । परम गंभीर ऐसा ध्वनि । तो तुम्हां सांगतों ॥ ५८ ॥ मला काढा येथूनि । स्थापा योग्य ठिकाणीं । पूर्णा नदी फिरल्यानीं । स्थान माझें भ्रष्ट झालें ॥ ५९ ॥ म्हणून त्या मूर्तीला । आपण वरी काढूं चला । बरें झालें भगवंताला । स्थापूं आपुल्या गेहांत ॥ ६० ॥ आचार्यांच्या बरोबरी । लोक निघाले सत्वरीं । जननी ती गेली घरीं । गृहकृत्यें करावया ॥ ६१ ॥ प्रवाह ओघ नदीचा जेथून । गांवाकडे वळला पूर्ण । त्याच ठिकाणीं शोभायमान । कृष्णमूर्ति हो ॥ ६२ ॥ ती लोकांच्या सहाय्यानीं । वरती काढली आचार्यांनीं । समारंभानें अपुल्या सदनीं । घेऊन आले मूर्तीस ॥ ६३ ॥ मूर्ति सदनीं स्थापिली । स्थापनेची सांगता केली । पूजेअर्चेची ठेविली । 'पुढची सोय करून ॥ ६४ ॥ हा मूर्तिस्थापनेचा । उत्सव पूर्ण झाला साचा । परि मुखेंदु जननीचा । चिंताग्रस्त होताच कीं ॥ ६५ ॥ तैं आचार्य म्हणती आई ! । उत्साह दिसेना तुझ्या ठायीं । घरास आला शेषशायी । तुझ्या विमल भक्तीनें ॥ ६६ ॥ तीर्थ जवळ करण्या स्नान । तुझ्यासाठीं आलें जाण । तैसा हा भगवान् । दर्शन द्याया आला तुज ॥६७॥ माता म्हणाली पुत्रराया ! । काय सांगूं तुला सदया ! । काहूर माझ्या चित्ता ठायां । उठलें नाना विचारांचें ॥६८॥ तूं संन्यासी होणार । हा मनीं येतां विचार । दुःख होतें मलाफार । तें काय सांगूं तुला ! ॥ ६९ ॥ आचार्य म्हणाले त्यावरी । माते ! सुख या संसारीं । नाहीं नाहीं लेशभरी । विचार करून पाहा याचा ॥ ७० ॥ या प्रपंचरूपी नदींत । भ्रमाचें पाणी ओतप्रोत । संसार सुखाचा यांत । प्राणघातकी मगर मोठा ॥ ७१ ॥ हा मगर प्राण घेतो । परि न मुळीं कळूं देतो । जैसा कां निर्भय राहतो । बेडूक सर्पमुखींचा ॥ ७२ ॥ माते ! त्या बेडकापरी । स्थिति जगाची संसारीं । या गोष्टीचा अंतरीं । विचार करी सर्वकाळ ॥ ७३ ॥ पूर्णा नदींत जेव्हां मला । मगर येऊन धरिता झाला । तेव्हां तुझ्या बुद्धीला । जें वाटलें तें ध्यानीं धर ॥ ७४ ॥ तेविं संसाररूपी मगरास । पाहून माझ्याविषयीं ज्यास । प्रेमा ऐसा जगन्निवास । तो तुझ्या परीच चिंतावला ॥ ७५ ॥ म्हणून हा योग घडला । आतां आज्ञा द्यावी मला । संन्यास तो घेण्याला । त्याचसाठीं आलों मी ॥ ७६ ॥ माता बोले तयासी । तूं ज्ञानांबरींचा ज्ञानशशी । ऐसें विद्वान् म्हणती तुसी । तें मीं सर्व ऐकिलें ॥ ७७ ॥ बाळा ! आम्हां

स्त्रियांप्रत । व्यवहारशास्त्र माहीत । आणि तेंच खरें वाटत । आम्हां सर्व बाजूंनीं ॥ ७८ ॥ हा ऐसा व्यवहार । निर्मिता झाला परमेश्वर । मग त्या शास्त्राचा अव्हेर । सुज्ञ सांग कैसा करी ॥ ७९ ॥ एक तुझ्यावांचून । पोटीं मुळीं न संतान । पति तोहि पावला मरण । देहास आला वृद्धपणा ॥ ८० ॥ ऐशा स्थितींत सोडून मशीं । तूं झाल्यास संन्यासी । हें खऱ्या खऱ्या ज्ञात्यासी । मनांतून पटेल कां ? ॥ ८१ ॥ आतां 'मातृदेवो भव' । ऐसा शास्त्राचा गवगवा । काय हेतूनें असावा । याचा विचार केलास कां ? ॥ ८२ ॥ तूं संन्यासी झाल्यावर । मला कोण पोसणार ? । आणि मेल्यावरी करणार । कोण माझी क्रिया सांग ? ॥८३॥ आचार्य म्हणती आई ! । पोसण्याची ददात नाहीं । मालमत्ता महीठायीं । आहे विशेष आपुली ॥ ८४ ॥ तिच्या आधारें संगोपन । तुझें कोणीहि करील जाण । आहेत आपुलें त्यांतून । गणगोत मायाळू ॥ ८५ ॥ ते कदां न टाकिती तुला । या मान माझ्या वचनाला । जेव्हां जेव्हां होईल तुला । इच्छा मला पाहण्याची ॥ ८६ ॥ तेव्हां तेव्हां करी स्मरण । माझें, तत्काळ येईन । तुला भेटण्याकारण । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ८७ ॥ मी नारायण-स्वरूपीं होतों । आणि हा मूर्तिरूपी ठेवितों । नारायण, तुझा सांभाळ तो । करील शंका धरूं नको ॥ ८८ ॥ कौसल्येनें रामाला । जावयासी वनवासाला । मुळींच नाहीं अडथळा केला । त्याचें कारण शोध तूं ॥८९॥ माते ! व्यवहारशास्त्राचा । उत्पादक ईशचि साचा । परी प्रसंग पाहून तयाचा । उपयोग करणें ज्ञात्यानें ॥ ९० ॥ अग्नीचें औपासन । योग्य ब्राह्मणालागून । परि पाहा पेटतां सदन । तो विझविलाच पाहिजे ॥९१॥ संसार तो करण्याला । माझा जन्म नाहीं झाला । त्या ईश्वरी संकेताला । मज टाळितां न ये कीं ॥ ९२ ॥ एके दिवशीं आप्त आपुले । आचार्यांनीं जमविले । थोरथोरांनाहि केलें । आमंत्रण गांविच्या ॥ ९३ ॥ अवघ्यां-पुढें पसरून पदर । विनयें जोडिले दोन्ही कर । अहो पौर हो ! मजवर । प्रेम पूर्ण असूं द्या ॥९४॥ मी तुमच्या गांविचा । एक घटक आहें साचा । विसर या गोष्टीचा । तुम्हां कदाहि पडूं नये ॥ ९५ ॥ विशेष कामासाठीं भला । संन्यास घेणें आहे मला । माझ्या मागें मातोश्रीला । तुम्हीं पाहिजे सांभाळिलें ॥ ९६ ॥ माझ्याठायीं आजपून । तुम्हीच आहां तिजकारण । पोटापुरतें अन्न । तिच्या आहे, हें ठावें तुम्हां ॥ ९७ ॥ झालों मी जरी

संन्यासी । तरी न विसरेन तुम्हांसी । या माझ्या जन्मभूमी । कालडी ग्रामाकारणें ॥ ९८ ॥ जो जो जन्मभूमीला । आहे आपुल्या विसरून गेला । मनुष्य ऐसें तयाला । केव्हांहि मानूं नये ॥ ९९ ॥ तो जंतची साक्षात् । जन्मून झाला भारभूत । आपुल्या मायभूमीप्रत । हें ध्यानांत असूं द्या ॥१००॥ मग आप्त स्वकीय पौरजन । बोलले आचार्यांकारण । तूं न करावा संन्यासग्रहण । हेंच इष्ट वाटे आम्हां ॥ १०१ ॥ उच्च नंबुदरीपाद कुलांत । तूं आलास जन्माप्रत । आपुले नंबुदरी ब्राह्मणांत । संन्यास कोणीं न घेतला ॥१०२॥ संन्यासदीक्षा अति हीन । ती न करावी त्वां ग्रहण । बट्टा नंबुदरीलागून । तूं हा वृथा लावूं नये ॥१०३॥ शिवाय हा संन्यास । मान्य नाहीं श्रुतीस । श्रुतिबाह्य वर्तनास । ब्राह्मणांनीं करूं नये ॥ १०४ ॥ मग आचार्य वदले तयांसी । आहे जाबाल श्रुतीसी । आधार संन्यास दीक्षेसी । ती ही ऋचा अवधारा ॥ १०५ ॥

'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत'

आतां आजपर्यंत । आपणां नंबुदरी ब्राह्मणांत । जरी वहिवाट नव्हती खचित । संन्यासदीक्षा घेण्याची ॥ १०६ ॥ तरी देशकाल वर्तमान । यांकडे लक्ष देऊन । चालरीतीकारण । बदलविलें पाहिजे ॥ १०७ ॥ मूळ चाल बदलूं नये । नवे ढंग काढूं नये । केल्याविण राहूं नयें । समय येतां सुधारणा ॥ १०८ ॥ सांप्रत आपुल्या धर्मावरी । उलटले असती दुराचारी । श्रुतीची निंदा सर्वतोपरी । होऊं लागली चोहींकडे ॥ १०९ ॥ त्यास आळा घालण्याला । संन्यास घेणें आहे मला । हें न तुमच्या जातीला । दूषण होईल साच कीं ॥ ११० ॥ पौरवासी वदले त्यावर । जाबाल श्रुतीचा आधार । देऊनिया निरुत्तर । तूं जरी केलेंस आम्हां ॥ १११ ॥ तरी नंबुदरी ब्राह्मणांनीं । संन्यास घेऊं नये कोणीं । ही आमुची विनवणी । मान्य करावी शंकरा ! ॥ ११२ ॥ वाटल्या तीर्थयात्रा करी । परि आपुल्या अंतरीं । विनंतीचा अत्यादरीं । विचार आमुचा करावा ॥ ११३ ॥ आचार्य म्हणती मनांत । हे दुराग्रही समस्त । रिवाज आणि रीतभात । हेंच ब्रह्म वाटे यां ॥ ११४ ॥ वरघडीचें म्हणून । यांसी करून संभाषण । आपलें घ्यावें साधून । काम येथून निघण्याचें ॥ ११५ ॥ ऐसा विचार त्यांनीं केला । आणि म्हणाले पौरजनांना । तुम्हीं केलेल्या विनंतीला ।

पाहीन विचार करून ॥ ११६ ॥ तूर्त जातों यात्रेस। सांभाळा माझ्या जननीस। ऐसें बोलून सर्वत्रांस। नमस्कार तो केला असे ॥ ११७ ॥ ऐसें निरवून लोकांना। अखेरचा तो मातेला। आचार्यांनीं पाहा केला। अष्टांगेंसीं नमस्कार ॥ ११८ ॥ हृदय आलें भरून। प्रक्षाळिले दोन्ही चरण। नेत्रींच्या त्या जलेंकरून। शब्द न फुटे वाचेस ॥ ११९ ॥ माता बहुत गहिंवरली। आचार्यांच्या गळां पडली। तनू त्यांची न्हाणिली। निज नेत्रांच्या जलानें ॥ १२० ॥ पुत्रास दिलें* आलिंगन। मस्तक त्याचें हुंगून। हनुवटीला धरून। बोलूं लागली येणेंरीतीं ॥ १२१ ॥ विशेष कार्य करावया। तुला आज्ञा पुत्रराया! दिली आहे संन्यास घ्याया। परि पौरविनंती आण मनीं ॥ १२२ ॥ कीर्ति मिळवी भूमीवर। यावत् चंद्रदिवाकर। जे गातील नारीनर। ऐशी निर्दोष राजसा! ॥ १२३ ॥ माझें उत्तरकार्य भलें। पाहिजे बा तूंच केलें। तरीच पाहा सार्थक झालें। उभयतांच्या जन्माचें! ॥ १२४ ॥ मी आठवण जेव्हां जेव्हां। तुझी करीन तेव्हां तेव्हां। भेट मला, हा पुरवावा। हेतु माझा हीच आस ॥ १२५ ॥ ऐसें बोलून हातावरी। दहीं घातलें निर्धारीं। तें पाहून गांवकरी। कांहीं झाले शोकाकुल ॥ १२६ ॥ आचार्यांनीं पुन्हां पुन्हां। जननीच्या वंदून चरणां। थोडे करून कठीण मना। निज सदना सोडिलें ॥ १२७ ॥ गांवकऱ्यांनीं दर्शन। आचार्यांचें घेऊन। दिधला मनापासून। निरोप त्यांसी जावया ॥ १२८ ॥ अवघे आले बोळवीत। तयांना शिवेपर्यंत। आचार्यांनीं दंडवत। घातिलें असें अवघ्यांसी ॥ १२९ ॥ आणि बोलले ऐशी गिरा। बुध हो! आतां मागें फिरा। हा मोहाचा पसारा। नाहीं बरा वाढविणें ॥ १३० ॥ माझी आहे तुम्हां शपथ। एकहि न टाका खचित। पाऊल आपुलें हा पथ। क्रमावयाकारणें ॥ १३१ ॥ सदनीं बसून आठवण ठेवा। जननीचा सांभाळ करावा। येतों लोभ असूं द्यावा। अकृत्रिम मजवरी ॥ १३२ ॥ ऐसें सांगून निघाले। मागें पाहत पाहत भले। जोंवरी तया दिसलें। सदन आपुलें तेधवां ॥ १३३ ॥ इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १३४ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय तेरावा

।। श्रीगणेशाय नमः ।। हे सर्वसाक्षी वासुदेवा ! । देवाधिदेवा माधवा ! । आपुले दिव्यचरण दावा । दासगणूकारणें ।।१।। हीच आस माझ्या मनीं । ती पुरवावी चक्रपाणि ! । अजाण बालकालागोनि । माता न कदा विसंबे ।। २ ।। मी हीन दीन अजाण । माझें करा हो ! संरक्षण । मी धरितों चरण । तुझे देवा पांडुरंगा ! ।। ३ ।। माझें मन अनावर । तें न कोठें राहे स्थिर । भलेबुरे विचार । एकसारखे करीत राही ।। ४ ।। घटकेंत पुण्यकर्मी रत । घटकेंत पापाकडे धांवत । ऐसें हें ओढाळ चित्त । त्यातें आणिलें तुजपाशीं ।। ५ ।। उनाड पोर शाळेसी । घालितां होतें ज्ञानराशि । तैसें तुझ्या पायांपाशीं । मन माझें पुनीत होवो ।।६।। आचार्यांनीं सोडिलें घर । दिशा लक्षून उत्तर । आक्रमिला असे गिरिवर । सौगंधाचा आश्रम जो ।।७।। म्हणून ज्याला मलय म्हणती । पुढें वंदिलें हरिहरांप्रति । कावेरीचें स्नान निगुतीं । साधूनि श्रीरंग वंदिला ।। ८ ।। शांतादुर्गा, मंगेश । गोकर्ण क्षेत्र विशेष । जेथें फसविलें रावणास । गजाननानें श्रोते हो ! ।। ९ ।। दक्षिण काशी, कोल्हापूर । पंचगंगेचें जें का तीर । जेथें इंदिरा राहिली स्थिर । आपुल्या भक्तांकारणें ।। १० ।। त्या कमलेचें दर्शन केलें । आचार्य पुढें वाडीस आले । पंचगंगासंगमीं भले । स्नान कृष्णेचें साधावया ।। ११ ।। धौम, जेजुरी, पंढरपुर । भगवंत बार्शी, तुळजापूर । दक्षिणेचा राजराजेश्वर । सकल तीर्थांचा जो असे ।। १२ ।। त्या ब्रह्मगिरीसी । आचार्य आले अति हर्षी । स्नान करितां गौतमीसी । समाधान पावले ।। १३ ।। जी गौतमी गंगा गोदावरी । दर्शनमात्रेंच त्रिताप हरी । जी बसली त्र्यंबकशिरीं । जिचें नांव वृद्धा असे ।। १४ ।। म्हणजे भरतवर्षांत । जी श्रेष्ठ अवघ्या तीर्थांत । म्हणून तिला झालें प्राप्त । वृद्धा हें विशेषण ।। १५ ।। त्रिरात्र तेथें राहिले । गौतमीस वंदन केलें । सर्वेचि वेरुळाप्रति आले । श्रीघृष्णेश्वर वंदावया । ।। १६ ।। परळी, औंढें, मातापूर । ऐशीं क्षेत्रें थोर थोर । करून आले अखेर । आचार्य नर्मदातीराला ।। १७ ।। जेथें मांधाता भूपति । होऊन गेला प्रतापज्योति । जयाची ती विमल कीर्ति । गातीं अजून पुराणें ।।१८।। जेथें रमला ओंकार । परमात्मा पार्वतीवर । जें रमणीय मनोहर ।

तीर तया नर्मदेचें ॥ १९ ॥ जी मोठमोठ्या पहाडांप्रत । फोडून आली धांवत । अपुल्या पवित्र उदकासहित । वंद्य गंगा नर्मदा ॥ २० ॥ तोय निर्मल अपरंपार । मोठमोठाले जलचर । मत्स्य, कासवे, मगर । विहार करिती जलामधें ॥ २१ ॥ दोन्ही तट जिचे भले । वृक्षराजांनीं झांकिले । नाना जाती बैसले । विहंगम ज्या वृक्षावरी ॥ २२ ॥ तटींच्या वृक्ष-कुसुमांचे । पराग जलीं पडतां साचे । भक्षण त्या सुमनरजांचें । मत्स्य करिती वरच्यावरी ॥ २३ ॥ मंद पवनें लाटा उठती । नर्मदेच्या जला-वरती । त्यांत मिसळतां किरणें तीं । अरुणोदयींच्या सूर्याचीं ॥ २४ ॥ तेणें लहरी हाच पीतांबर । चमचमा जो चमके फार । तोच नेसली साचार । बाला अमरकंटकाची ॥ २५ ॥ वृक्षावरी बैसोन । आपुल्या मधुर शब्देंकरून । वाटतें खग करिती भजन । त्या पवित्र नर्मदेचें ॥२६॥ भव्य घाट दो बाजूंना । असती ज्या नर्मदेला । ज्यायोगें न राहिला । उंच सखल भाग तीरीं ॥ २७ ॥ त्या श्रीनर्मदेचें भलें । आचार्यांनीं स्नान केलें । दर्शनासाठीं त्वरित आले । मंदिरीं ओंकारेश्वराच्या ॥ २८ ॥ आचार्य जों जोडती कर । तों ध्वनि उठला गंभीर । आतां न कोठें जावें दूर । तुझा गुरु येथेंच असे ॥ २९ ॥ येथून जवळ नर्मदातीरीं । एक्या अनुपम अरण्याभीतरीं । बैसला गुहेमाझारीं । गोविंदगुरु ब्रह्मवेत्ता ॥३०॥ जो अवतार शेषाचा । गौडपाद गुरु ज्याचा । शिष्य शुकाचार्यांचा । तो तुला दीक्षा देईल ॥३१॥ ऐसा ध्वनि परिसोनिया । आचार्य मुदित चित्ता-ठायां । होऊन लागले धुंडावया । अरण्य नर्मदातीरींचें ॥ ३२ ॥ जो साक्षात् शंकर । त्याला कां हें अरण्य थोर । माहीत नव्हतें साचार । म्हणून धुंडूं लागला ॥ ३३ ॥ कारण एवढेच धुंडण्याचें । मनुष्य नाटच धरिलें साचें । म्हणून रक्षण व्यव-हाराचें । करणें होतें भाग तया ॥ ३४ ॥ निमित्तास विचारिलें । अरण्य लोकांलागीं भलें । माहीत असल्यापरीच आले । आचार्य त्या वनाला ॥ ३५ ॥ शोभा तया अरण्याची । काय तुम्हां सांगूं साची । चढाओढ वृक्षांची । वाटे लागली जे ठायां ॥ ३६ ॥ एकापेक्षां एक मोठे । गगनाशीं भेदिती वाटे । कित्येकांनीं बांधिले फेटे । शुष्क मेघाचे निजशिरां ॥ ३७ ॥ साल, तमाल, देवदार । अश्वत्थ, वट, औदुंबर । बकुल, वृक्ष ते अपार । असती ज्या काननां ॥ ३८ ॥ फलतरु ते

फलभारें । वांकून गेले असती सारे । द्राक्षें, पपनस, अंजिरें । आम्र, फणस बहुसाल ॥ ३९ ॥ सुमन तरूंच्या नाना जाती । त्या मी तुम्हां सांगूं किती ? । सौगंधिक वाहती । वारे हमेशा विबुध हो ! ॥ ४० ॥ पाच, सबजा आणि दवणा । केतकीचीं बेटें नाना । जाई, जुई, गुलाब, बाणा । बहार अक्षयींचा विशेष ॥ ४१ ॥ निर्भय विहार करिती वनीं । पशु सर्व आनंदानीं । गेले वैरभाव विसरोनी । आपसांतील त्या ठायां ॥ ४२ ॥ चरे व्याघ्राच्या शेजारीं । धेनु तया कांतारीं । मोराचिया पुढारी । वासुकी फिरती निर्भय ! ॥ ४३ ॥ हें जें कांहीं अघटित घडून आलें बुध हो ! तेथ । तो पुण्यप्रभाव साक्षात् । एका महान् पुरुषाचा ॥ ४४ ॥ तो पूर्वज्ञानी पुरुष । प्रत्यक्ष अवतरला शेष । द्यावयासी संन्यास । श्रीमत् शंकराचार्यांना ॥ ४५ ॥ गोविंद गुरु नाम ज्याचें । जे दाते कैवल्याचे । वा मायपोट भाविकांचें । असामान्य पुरुष तो ॥ ४६ ॥ तो गुरुराज या वनांत । बैसला होता गुहेंत । आचार्य तया शोधीत । संनिध पातले गुहेच्या ॥ ४७ ॥ आचार्य काननामाजीं येतां । आनंदित झाल्या वृक्षालता । क्रूर पशु आपुला माथा । नमवूं लागले त्यांच्यापुढें ॥ ४८ ॥ अरण्याच्या मध्यंतरीं । एक लहानसा होता गिरि । त्या पर्वता होती खरी । गुहा गोविंद गुरूंची ॥ ४९ ॥ ती गुहा नजरेस पडतां । आचार्य घालिती दंडवता । जैसा स्वातीघन पाहतां । चातक ते आनंदती ॥ ५० ॥ त्या गुहेचें तें द्वार । श्रोते अरुंद होतें फार । दोन मोठाले विखार । द्वारासंनिध बैसले ॥ ५१ ॥ ते न विखार पहारेकरी । गोविंद गुरुजींच्या बैसले द्वारीं । कोण करील बरोबरी । सत्पुरुषाच्या सत्तेची ॥ ५२ ॥ पंचभूतें आज्ञेत । सदैव ज्या राहतात । ज्यांच्यापुढें यत्किंचित् । नाहीं प्रतिष्ठा इतरांची ॥ ५३ ॥ आचार्य येतां गुहाद्वारीं । दोन्ही विखार झाले दुरी । आचार्यांनीं अति आदरीं । केला प्रवेश गुहेमध्यें ॥ ५४ ॥ तों मृग-आसनावरी । पद्मासन घालून खरी । बैसली होती स्वारी । गोविंदगुरूंची विबुध हो ! ॥ ५५ ॥ नासाग्र दृष्टि मुद्रा शांत । डोलती निजानंदांत । तपःसामर्थ्ये प्रकाशित । जयाचिया होती गुहा ॥ ५६ ॥ त्या गोविंदगुरूंना । पाहून आचार्यांनीं केला । साष्टांग नमस्कार भला । भाव चित्तीं धरोनिया ॥ ५७ ॥ आणि मांडिला तयाचा । निज वाणीनें स्तव साचा । या आचार्यवाणीचा । प्रभाव

आधींच लोकोत्तर ॥ ५८ ॥ गुरुराया ! आपुली कीर्ति । एक्या मुखें वानूं किती ? । आपण आहां प्रत्यक्ष मूर्ति । श्रीशेषाची निःसंशय ॥५९॥ जो पृथ्वीशीं आधार पूर्ण । शंकराचें कंठभूषण । जो कृष्ण अवतारीं संकर्षण । होवोनिया आला असे ॥ ६० ॥ आपुलीं पाहून हजार वदनें । वाटेल भय शिष्याकारणें । म्हणून कां हो केलेंत येणें । येथें एक्या मुखानें ॥ ६१ ॥ आपुले अवतार भूमीवरी । झाले अनंत आजवरी । त्यांची न करवे खरी । गणति कवणाकारणें ॥ ६२ ॥ अवतार परशुरामाचा । झाला एक्याच विष्णूचा । त्याच परी झाला तुमचा । पतंजलीचा अवतार तो ॥ ६३ ॥ म्हणजे पतंजली तुम्हीच झालां । आतां गोविंदपाद होऊनि आलां । महाराज आपुली लीला । ऐशीच आहे अतर्क्य ! ॥६४॥ व्यासपुत्र शुकाचा । जया अनुग्रह झाला साचा । त्या गौडपादाचार्यांचा । वरदहस्त तुमच्या शिरीं ॥ ६५ ॥ म्हणजे साक्षात् जें ब्रह्मज्ञान । तेंच आहां आपण । म्हणून आलों तुम्हां शरण । उद्धार माझा करा हो ! ॥ ६६ ॥ या परीची गंभीर वाणी । ऐकून वदले कैवल्यदानी । कोण तूं या ठिकाणीं । आला असशी कशास्तव ? ॥ ६७ ॥ आचार्य करिती उत्तर । नम्रपणें जोडून कर । करितों आपणां सादर । मी कोण आहे तें ॥ ६८ ॥

स्वामिन्नहं न पृथिवी न जलं न तेजो ।
न स्पर्शनो न गगनं न च तद्गुणा वा ॥
नापींद्रियाण्यपि तु विद्धि ततोऽवशिष्टो ।
यः केवलोऽस्ति परमः स शिवोऽहमस्मि ॥ १ ॥

मी न पृथ्वी, जीवन । तेज, आकाश आणि पवन । इंद्रियांचा समुदाय मी न । त्याहून निराळा शिव मी ॥ ६९ ॥ ऐसे शब्द ऐकिले । गोविंद गुरु आनंदले । अंतर्ज्ञानीं जाणिलें । हा शंकर साक्षात् ॥ ७० ॥ ब्रह्मज्ञान सांगण्याची । यातें न उरता उरली साची । हा मूर्तीच ब्रह्मज्ञानाची । आहे भूवरी प्रत्यक्ष ॥ ७१ ॥ वेश घेतला म्हणोन । आला आहे मशीं शरण । हा साक्षात् मदनदहन । वेदोद्धारा अवतरला ॥७२॥ ऐसें बोलून मानसीं । ठेवून घेतलें आचार्यासी । त्या गुहेंत आपणांपाशीं । शिष्य आपला जाणोनिया ॥ ७३ ॥ सेवा निरलसपणानें । आचार्य करिती आनंदानें । प्रसन्न चित्त झालें जेणें । गोविंदगुरूंचें यांचेविषयीं ॥ ७४ ॥

हे गुरुशिष्य नांवाला । दोन दिसती लोकांना । जो विचारें पाहील यांना । त्याला एकचि दृष्टि पडे ॥ ७५ ॥ गोविंदपाद एके दिनीं । बोलते झाले आपुल्या मनीं । यास येथें ठेवोनि । घेऊं आतां किती दिवस ॥ ७६ ॥ हा वेदोद्धार करावया । आला आहे महीठायां । न लगे यास शिकावया । कोणतीहि विद्या ती ॥ ७७ ॥ केवळ व्यवहाराप्रमाणें । यास आहे दीक्षा देणें । भाग आजीं मजकारणें । तें काम आतां करूं ॥ ७८ ॥ पुढें गोविंदपादांनीं । एक शुभ दिवस शोधोनि । दिधली आचार्यांलागोनी । संन्यासदीक्षा विबुध हो ! ॥ ७९ ॥ सशास्त्र दीक्षेचें झालें ग्रहण । शंकर-भारती नामाभिधान । ठेविलें आचार्यांलागून । गोविंदगुरूंनीं विबुध हो ! ॥ ८० ॥ ब्रह्मचर्चा गुरूंपाशीं । होऊं लागली अहर्निशीं । तेथल्या आनंदासी । काय पाहणें राहिलें ॥ ८१ ॥ गुरुशिष्य दोघेजण । अधिकारी मुळचेच समान । एक विष्णु, एक नागभू ण । सूर्य एक, एक शशी ॥८२॥ या वेळीं आचार्यांतें । आठवें वर्ष लागलें होतें । घेतलें संन्यासदीक्षेतें । वेदोद्धार करावया ॥ ८३ ॥ सेवा करीत गुरूंपाशीं । आचार्य नर्मदातटाशीं । असतां अपूर्व एके दिवशीं । ऐसें आलें घडून ॥ ८४ ॥ चातुर्मास सुरूं झाला । श्रावण मास लागला । व्यापितें झाले गगनाला । मेघ चोहों-बाजूंनीं ॥ ८५ ॥ झंझावात सुटला फार । विजा तळपती वरच्यावर । वृक्ष मोडती भराभर । कडकड शब्द करोनिया ॥ ८६ ॥ पर्जन्य तो मुसळधारा । वर्षू लागला एकसरा । आच्छादिलें भास्करा । कृष्ण ऐशा जलदांनीं ॥ ८७ ॥ विजा चमकती क्षणक्षणां । ओढा नाला उमगेना । पात्रामध्यें मावेना । जल मुळींच नर्मदेच्या ॥ ८८ ॥ वाताघातें तरुवर । उन्मळून पडले अपार । वाहूं लागले भराभर । पात्रामध्यें नर्मदेच्या ॥ ८९ ॥ नदी, मही न भेद उरला । जलमय अवघा प्रांत झाला । लोकसमुदाय घाबरला । हा प्रकार पाहूनी ॥ ९० ॥ गोविंदगुरूंचें तप-स्थान । जलमय बसलें होऊन । गुहेंत शिरलें जीवन । अवधि उरला थोडासा ॥ ९१ ॥ गुरु समाधिसुखांत । निमग्न होते अत्यंत । तें जाणून ध्यानांत । आचार्यांनीं ऐसें केलें ॥ ९२ ॥ म्हणूं लागले पौरांशीं । तुम्हीं न भ्यावें मानसीं । सोडूनियां गांवाशीं । सैरावैरां पळूं नका ॥ ९३ ॥ मृत्युभयानें कोठेंहि । गेलां तरी तो चुकत नाहीं । तो एक टाळितां येई । सर्वशक्तिमान् ईश्वराला ॥ ९४ ॥ त्याला शरण जाण्याचें ।

तुम्हीं दिलें टाकून साचें । हें का शहाणपण तुमचें । शोधून पाहा अंतरीं ॥ ९५ ॥ स्थिर व्हा, हो ! पळूं नका । नर्मदा न देई तुम्हां धक्का । पाहा तियेच्या कौतुका । किती दयाळू आहे ती ! ॥ ९६ ॥ गुरु होते समाधिस्थ । त्यांना प्रथम दंडवत । करूनिया जोडिले हात । आचार्यांनीं नर्मदेला ॥ ९७ ॥ हे नर्मदे ! देवि मंगले ! । लोक तुजवरी विश्वासले । म्हणून तटीं राहिले । घरेंदारें बांधूनिया ॥ ९८ ॥ तयांलागीं बुडविण्यास । तूं प्रवृत्त झालीस । हा कलंक तुझ्या कीर्तीस । लागेल मला वाटतें ॥ ९९ ॥ तूं दुःख-दैन्यसंहारिणी । सर्वत्रांची आहेस जननी । तूंच मांजरी होऊनि । भक्षिसी कां बालकांतें ॥१००॥ माते ! तुझें वाढलें नीर । भूमिवरी सागराकार । म्हणून सुटता झाला धीर । तव तीरींच्या लोकांचा ॥ १०१ ॥ आपुलें जननित्व सांभाळी । कोणाची न करी होळी । मीं तुझी प्रार्थना केली । ती आण लक्ष्यांत ॥१०२॥ तुला अंबे ! सामावण्याला । मीं हा कमंडलु मांडिला । आपुल्या सर्व आवरूनि जला । बैस कमंडलूमध्यें ॥ १०३ ॥ हें वचन ऐकिलें । भाविक ते स्तब्ध झाले । चार्वाकांनीं आपुलें । केलें ऐकून हास्यवदन ॥१०४॥ हा बाल संन्यासी । वेडा दिसतो निश्चयेंसी । 'ये' म्हणतो नर्मदेशीं । लहानशा कमंडलूंत ॥ १०५ ॥ याचें वचन ऐकूं नका । क्षण एक येथें राहूं नका । घेऊन मुलें बायका । चला जाऊं निर्भय स्थलीं ॥१०६॥ याच्या नादीं लागल्यास । मूर्ख म्हणतील आपणांस । लहानशा कमंडलूंत । नर्मदा ती मावे कशी ? ॥१०७॥ तों इकडे काय झालें । पाणी उतरूं लागलें । कमंडलूंत येतें झालें । आचार्यांनीं ठेविलेल्या ॥१०८॥ नर्मदेस पूर आलेला । क्षणामाजीं नाहिंसा झाला । तें पाहून आचार्यांना । स्तवूं लागले सारे जन ॥१०९॥ म्हणती धन्य धन्य ! । आहे हा आजिचा दिन । अगस्तीनें एक आचमन । करून समुद्र शोषिला ॥११०॥ ही कथा कविनिर्मित । वाटत होती आजपर्यंत । त्या गोष्टीचें सत्यत्व । या बालसंन्यासें दाखविलें ॥ १११ ॥ यावरून हा कोणीतरी । आहे महान् अधिकारी । चला याचें दर्शन तरी । जाऊन घेऊं अवघे जण ॥ ११२ ॥ फुलेंतुळशी घेऊन हातीं । आचार्यांवरी उधळती । लालीलाल झाली अति । नर्मदा ती गुलालानें ॥ ११३ ॥ आचार्यांच्या नांवें भले । लोक अवघे गर्जिन्नले । हें वर्तमान पसरलें । क्षणांत आसमंत भागामध्यें ॥११४॥ आचार्य वदती त्यावर ।

यांत मुळीं न चमत्कार। हें सामर्थ्य अपार। वेदमंत्रांचें ध्यानीं धरा ॥११५॥ मीं वेदमंत्रें अभिमंत्रित। केलें या कमंडलूप्रत। म्हणून मावतें झाले यांत। जल अफाट नर्मदेचें ॥११६॥ ऐशा अतुल सामर्थ्याचे। मंत्र या चहू वेदांचे। त्यांचें दैन्य झालें साचें। म्हणून प्रसंग येती हे ॥११७॥ वेदनिष्ठा डळमळीत। जेव्हां होते जगांत। तेव्हांच येण्या फावतें। या महान् महान् संकटांना ॥११८॥ याचा विचार कांहीं करा। वेदांविषयीं आदर धरा। वेदमंत्रांची कधीं न करा। टवाळी ती विबुध हो ! ॥११९॥ मंत्र, तंत्र आणि यंत्र। अवघे कथिता वेदमात्र। तोच तुम्हीं तुडविलांत। पायातळीं आपुल्या ॥ १२० ॥ म्हणून नर्मदा रागावली। तुम्हां बुडविण्यालागीं भली। तुम्ही शरण जातां बैसली। कमंडलूंत येऊन ॥ १२१ ॥ गोविंदपादांच्या कानांवर। हा झालेला चमत्कार। घातला लोकांनीं साचार। आपुल्या नम्र वाणीनें ॥ १२२ ॥ गोविंदपाद म्हणती त्यासी। जो प्रत्यक्ष व्योमकेशी। त्यानें कमंडलूसी। सामावली नर्मदा ॥ १२३ ॥ यांत कांहींच आश्चर्य नाहीं। वास गंगेचा ज्याच्या डोई। त्याची सहज लीला ही। हें ध्यानांत धरावें ॥ १२४ ॥ नर्मदातीरीं लौकिक झाला। या आचार्यकृतीचा भला। पुढें वृत्तान्त कैसा झाला। तो आतां सांगतों ॥ १२५ ॥ गोविंदपाद एके दिनीं। बोलले आचार्यांलागूनि। तुम्ही आतां येथूनि। दिग्विजया आरंभ करा ॥१२६॥ चहूं वेदांच्या उद्धारार्थ। तुझें येणें झालें सत्य। कालडी नामें ग्रामांत। केरल देशाकारणें ॥१२७॥ निमित्तास मी तुझा गुरु। तूं ज्ञानाचा सागरू। शरणागताचा कल्पतरु। येथूनिया व्हावें तुवां ॥ १२८ ॥ वेदरहस्य शोधावें। अद्वैत मत स्थापावें। ब्रह्मसूत्रास करावें। भाष्य सोपें रसाळ ॥ १२९ ॥ थोतांडचांचीं अवघीं मतं। तुवां करावीं खंडित। सुलभ करावा भक्तिपंथ। खऱ्या मुमुक्षूकारणे ॥ १३० ॥ येथून पुढे काशीस। राहा जाऊन कांहीं दिवस। ब्रह्मसूत्रावरी भाष्य। तेथें आहे करणें तुला ॥ १३१ ॥ ये विषयींची एक कथा। सांगतों मी ऐक आतां। अत्रि नामें ऋषि होता। पूर्वी महातपस्वी ॥ १३२ ॥ त्यांनीं हिमालयीं येऊन। एक मोठा केला यज्ञ। या यज्ञाकारण। मोठमोठे देव आले ॥ १३३ ॥ इंद्र, पूषा, आर्यमा, वरुण। भृगु, जमदग्नि, कौंडिन्य। गौतम, कपि, अरुंधतिरमण। ऐसे मुनी मिळाले ॥ १३४ ॥ मीहि होतों तया स्थानीं। पराशरपुत्र व्यासमुनि।

ते सांगत होते विशद करूनि। उपनिषदांचे कांहीं भाग ।। १३५ ।। आधींच तो हिमालय। सर्व संपत्तीचें आलय। तो साक्षात श्वशुर होय। भगवान् श्रीशंकरांचा ।। १३६ ।। तो पर्वत राजराजेश्वर। हिमरूपी ज्याच्यावर। छत्र शोभतें मनोहर। सूर्य-प्रकाशें तळपे जें ! ।। १३७ ।। श्वेत गज स्वैर फिरती। खळखळां वाहे भागीरथी। यमुना, ब्रह्मपुत्रा, गंडकी ती। ज्या सख्या भागीरथीच्या ।। १३८ ।। ऐशा रम्य स्थलां भले। तें ज्ञानसत्र होतें चाललें। ऋषि आनंदित झाले। व्यासवाणी ऐकूनिया ।। १३९ ।। तैं मीं केला प्रश्न। वेदव्यासांलागून। कीं हे आर्य ! आपण। अतिश्रम घेऊनिया ।। १४० ।। वेदाचे ते भाग पाडिले। समजावयासी सुलभ केले। हे अति उपकार झाले। आपुले वेदविद्येवरी ।। १४१ ।। परि "अथातो ब्रह्मजिज्ञासा"। हा जो भाग बहु सरसा। तो राहिला जशाचा तसा। भाष्यावांचून आजवर ।। १४२ ।। जीं सूत्ररूपें कथन केलीं। तींच ब्रह्मसूत्रें झालीं। तीं समजण्या पडूं लागलीं। अडचण भाष्याविण पाहा ।।१४३।। त्या ब्रह्मसूत्रा घेऊन। लुंगासुंगा विद्वान्। ठेवी भाष्य लिहून। भरमसाट कांहीं तरी ।।१४४।। ज्या भाष्यें वेदाचा। खरा अर्थ लोपे साचा। सुळसुळाट चार्वाकांचा। झाला आहे ज्यायोगें ।।१४५।। जेंवि कां तलवारी। दिधल्या बालकांच्या करीं। घात होतो सर्वतोपरी। तैसेंच तें होतसे ।। १४६ ।। म्हणून ब्रह्मसूत्रावर। भाष्य करावें सुंदर। तो करण्याचा अधिकार। आपुलाच आहे स्वामिया ! ।। १४७ ।। मग वेदव्यास म्हणाले। तुम्हांपरीच विचारिलें। मागें कैलासासी जाऊन भले। अवघ्या देवांनीं शिवाला ।। १४८ ।। तैं तो वदला परमेश्वर। भवभयांत भवानीवर। नीलकंठ कर्पूरगौर। नागभूषण विश्वपति ।।१४९।। हे देव हो ! ऐका वचन। वेदव्यास जो बादरायण। याच्या ब्रह्मसूत्रालागून। मीच भाष्य करीन कीं ।। १५० ।। त्या ब्रह्मसूत्रावर करण्याचा। कोणत्याहि विद्वानाचा। भाष्याधिकार नाहीं साचा। हें ध्यानांत असूं द्या ।। १५१ ।। कां कीं विद्वानांच्या जवळ। शब्दसाहित्य निव्वळ। बेटकुळी कां समुद्रतळ। पाहून येण्या योग्य असे ! ।। १५२ ।। जें ब्रह्मसूत्र वेदाचें। प्रत्यक्ष हृदय आहे साचें। त्याचें न कदा कळावयाचें। मर्म शब्दपंडिताला ।। १५३ ।। ब्रह्मसूत्राचियावरी। भाष्य समजा तोच करी। कीं जो स्वानुभवाच्या गिरि। प्रत्यक्ष आला चढून ।। १५४ ।। तुम्ही नका

करूं चिंता । मीच अवतार घेऊन आतां । ब्रह्मसूत्रावरी तत्त्वता । भाष्य करीन समजेलसें ।। १५५ ।। जो कोणी नर्मदेसी । कोंडील कमंडलूशीं । तोच मी हें मानसीं । तुम्ही समजा निःसंशय ।। १५६ ।। जयालागीं संन्यास । देतां होईल पाहा शेष । व्यवहार तो सांभाळण्यास । तोच मी हें समजा तुम्ही ।। १५७ ।। ऐसें वेदव्यासांनीं । सांगितलें मजलागूनि । तेंच आलें घडूनि । आज तुझ्या करानें ।। १५८ ।। आतां शंका नाहीं उरली । भगवान् चंद्रमौलि । शंकाकुशंका समूळ उरली । तव विषयींची राजसा ! ।। १५९ ।। व्यासें शुक उपदेशिला । शुकानें गौडपादाला । ब्रह्मोपदेश असे केला । जो व्यासें कथिला असे ।। १६० ।। तोच गौडपादांनीं । तुझ्यास्तव माझ्या कानीं । ठेविला होता सांगूनि । तो मी तुझा तुला दिला ।। १६१ ।। आतां सांगणें तुला कांहीं । मजकडे तें राहिलें नाहीं । सर्वत्र व्हावें तुवां विजयी । हा आशीर्वाद देतों तुला ।। १६२ ।। तूं अवतार घेऊन । येथें आलास म्हणून । तुला हें आशीर्वचन । देणें आलें भाग मला ।। १६३ ।। तुझ्यापुढें माझी कोण । किंमत-मीच भूषण । तव कंठीचा शेष जाण । मालक मुळींच तूं आमुचा ।। १६४ ।। असो. म्हणून ब्रह्मसूत्रावरी । भाष्य करावें अति कुसरी । जेणें व्यासाच्या अंतरीं । संतोष अति होईल ।। १६५ ।। विरुद्धाविरुद्ध वेदाप्रती । जेथें वाक्यें असती । ज्या वाक्यानें पडे भ्रांति । खरेंखोटें निवडावया ।।१६६।। त्या वाक्याची छाननी । तूंच करावी भाष्यांतूनि । वेदहृद्गत तुजवांचूनी । कोणी न सांगूं शके ।।१६७।। हें भाष्य लिहिण्यास । तुवां जावें काशीस । जें क्षेत्रविशेष । पवित्र या भरतखंडीं ।। १६८ ।। जिचें नांव वाराणसी । जी सुखद भाविकांसी । जी देत कैवल्यासी । कलियुगीं मानवातें ।।१६९।। जी भागीरथीच्या आहे तीरीं । जेथें विश्वनाथ त्रिपुरारि । बैसला आहे भूमीवरी । पतितातें तारावया ।। १७० ।। अवघे देव तया ठायीं । तुज साह्य करतील पाही । चिंता मुळींच पडणार नाहीं । कशाचीहि तुला भिक्षो ! ।। १७१ ।। ऐसा आशीर्वाद दिला । गोविंदगुरूंनीं आचार्यांना । वरदहस्त ठेविला । आचार्यांच्या मस्तकीं ।। १७२ ।। गुरूचे सोडण्या चरण । आचार्यांचें न इच्छी मन । येऊं लागलें भडभडून । वरच्या वरी तयांना ।। १७३ ।। तान्हें वासरूं गायीचें । धेनूपासून दूर साचें । कधीं न इच्छी जावयातें । तैसेंच झालें आचार्यांना ।। १७४ ।। वा कन्या सास-

न्यासी । जातां वाटे जेंवि तिसी । तेंच झालें आचार्यांसी । गुरुगृह सोडितांना ॥ १७५ ॥ दृष्टि ठेवून आज्ञेवर । त्रिवार केला नमस्कार । पायांवरी ठेवून शिर । आचार्यांनीं गुरूंच्या ॥ १७६ ॥ घेतां गुरूंचें दर्शन । आसवांनीं भरले लोचन । जेंवि चंद्रास पाहून । चंद्रकांत मणि द्रवे ॥१७७॥ गुरूंनीं आलिंगन दिधलें । आचार्य तेथूनि निघाले । वाराणशीस जाया भले । वंदूनिया नर्मदेला ॥ १७८ ॥ आचार्यांची बालमूर्ति । सूर्यापरी अंगकांति । पायीं खडावा शोभती । काषायवस्त्र अंगावर ॥ १७९ ॥ भूमिचित्त आनंदले । म्हणे भाग्य माझें उदेलें । म्हणून हे लागते झाले । आचार्यांचे पाय मला ॥ १८० ॥ मार्गामधून जात असतां । पशू घालती दंडवता । वृक्षांवरून जोडितो हातां । खगगण तो आचार्यांसी ॥ १८१ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १८२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय चौदावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय हरिहरस्वरूपा ! । जयजग्राजी मायबापा ! । पांडुरंगा त्रिविधतापा ! । दासगणूच्या निवारणें ॥ १ ॥ देवा! तुझ्यावांचून । माझी फिर्याद ऐके कोण ? । नको करूं निष्ठुर मन । मजविषयीं पंढरीशा ! ॥ २ ॥ नामा ज्ञानेश्वरांनीं । तुजकडे बोट करोनि । ठेविलें आहे सांगूनि । आम्हां ऐसें दीनबंधो ! ॥ ३ ॥ हा सर्व सुखांचें आगर । बाप रुखमादेवीवर । हाच व्यापूनि चराचर । राहिला आहे विश्वामध्यें ॥ ४ ॥ त्या तुझ्या दिव्य पायां । नमन माझें पंढरिराया ! । कृपाप्रसाद करावया । देवा ! वेळ करूं नको ॥ ५ ॥ असो आचार्य नर्मदेसी । सोडून आले उज्जनीसी । तेथें वंदिलें आदरेंसी । श्रीमहांकालाकारणें ॥ ६ ॥ पुढें पुष्कर, मथुरा, वृंदावन । इत्यादि क्षेत्रालागून । आचार्यांनीं पावन । केलें अपल्या पादस्पर्शे ॥ ७ ॥ जगत्पापा तीर्थे हरिती । आणि तींच तीर्थे पावन होतीं । महापुरुषाची संगति । क्षण एक झाल्या विबुध हो ! ॥ ८ ॥ भागीरथीच्या तटाकासी । जी

वसली वाराणशी । तया पुरीच्या सान्निध्यासी । आचार्य येते जाहले ॥ ९ ॥ वाराणशी लिंगाकार । असें परम मनोहर । जिचें आहे महत्त्व फार । अवघ्या क्षेत्रांत जंबुद्वीपीं ॥ १० ॥ गंधांत जेवीं कस्तुरी । वा देवांत त्रिपुरारि । किंवा नक्षत्रांभीतरीं । रोहिणी-रमण चंद्रमा ॥ ११ ॥ तैशी अवघ्या क्षेत्रांत । काशी अति पवित्र । जेथें तारक मंत्राप्रत । शिव प्रत्यक्ष उपदेशी ॥ १२ ॥ महापापी असला जरी । तो काशींत उद्धरे निर्धारीं । यमदूत ते तीरावरी । येती कदा न गंगेच्या ॥ १३ ॥ ऐशा त्या क्षेत्रा भले । आचार्य येते जाहले । भागीरथीचें स्नान केलें । तीर्थ-जननी जाणूनिया ॥ १४ ॥ मग मुख्य जो कां विश्वेश्वर । त्याचा स्तव अपार । केला रचून साचार । नवे श्लोक आचार्यांनीं ॥ १५ ॥ काळेश्वर, अमृतेश्वर । तैसा अविमुक्तेश्वर । व्यासेश्वर, गौतमेश्वर । यांचें दर्शन घेतलें ॥ १६ ॥ काळभैरव, दंडपाणि । अन्नपूर्णा, उमा, मृडानी । सूर्य, चंद्र, मंगळ, शनी । वंदिते झाले आचार्य ॥ १७ ॥ जेथें प्रत्यहीं गंगेवर । स्नानास येती नारीनर । गजबजून जातें शहर । ज्या भजनें हराच्या ॥ १८ ॥ 'नमो-चमे' वरच्यावरी । द्विज म्हणती उच्च स्वरीं । विश्वेश्वराच्या मंदिरीं । तो न थाट वर्णवे ! ॥ १९ ॥ ब्राह्मण अवघे शुचिर्भूत । रुद्राक्ष-माळा कंठांत । पीत रक्त कोठें हरित । बनातीच्या टोप्या शिरीं ॥२०॥ भालीं विभूतीचें भूषण । ढळढळीत आणि शोभायमान । अवघें पावित्र्य येऊन । काशींत नांदूं लागलें ॥ २१ ॥ अग्निहोत्र घरोघरीं । सवत्स गाय द्विजद्वारीं । द्विज कुमाराच्या करीं । शोभती पोथ्या वेदांच्या ॥ २२ ॥ शाळांतून संहितापाठ । चालले असती घडघडाट । ऐसें तें विद्यापीठ । त्रिभुवनीं श्रेष्ठ झालें असे ॥ २३ ॥ अस्तमानीं पुराणें । होतीं प्रत्येक मंदिरानें । सायंसंध्येकारणें । द्विज अवघे घांटावरी ॥ २४ ॥ असो तया पुरींत । आचार्य राहिले आनंदांत । तै काय घडला वृत्तान्त । तो आतां अवधारा ॥ २५ ॥ एक चोल देशीचा । सनंदन नांवाचा । द्विज कावेरी-तीराचा । राहिला होता काशीत ॥ २६ ॥ तो द्विजकुमार होता तरुण । स्वरूप मन्मथासमान । स्वशाखेचें अध्ययन । झालें होतें जयाच्या ॥ २७ ॥ तनु निकोप साजिरी । तांब्याचिया पत्र्यापरी । नुकतीच फुटूं लागली खरी । ओठीं मिसूर जयाच्या ॥ २८ ॥ वैराग्य ज्याचें कडकडीत । मनोनिग्रह अत्यंत । इंद्रियें ज्याच्या आज्ञेंत । वागत होतीं सर्वदा ॥ २९ ॥

तो जन्ममरण चुकवण्यासी। आला होता काशीसी। सोडून आपल्या देशासी। तत्त्वबोध करून घ्याया॥ ३०॥ काशींतील विद्वान्। तो अवघे आला पाहून। परी कोठेंहि समाधान। नाहीं झालें तयाला॥ ३१॥ कोठें नुसता शब्दछल। होत राही सर्वकाळ। कोठें कोठें न पडे मेळ। बोलण्याचा कृतीशीं॥ ३२॥ कोठें वेदान्त सांगती। निवृत्तीला मान देती। परी आपण स्वतः बनती। प्रवृत्तीचे कीटक पाहा! ॥ ३३॥ ऐसें दृश्य पाहून। हिरमुष्टी झालें त्याचें मन। म्हणे कानां-डोळ्यांलागून। अंतर जमीन-अस्मानचें ॥ ३४॥ मी जो वाराणशीचा। लौकिक निजदेशीं साचा। ऐकिला, लेशही त्याचा। ये ठायीं न दृष्टीं पडे ॥ ३५॥ विश्वेश्वरा! ही तुझी पुरी। दांभिक झाली आहे खरी। आहे मृगजलापरी। परमार्थ देवा! येथला॥ ३६॥ दोन वर्षे झालीं मला। येथें येऊन नीळकंठा!। नाहीं कोठेंच भेटला। स्वानुभवाचा ब्रह्मवेत्ता.॥ ३७॥ ऐसा विचार करतां भला। सनंदन झोंपीं गेला। तों अरुणोदयाच्या समयाला। स्वप्न एक पडलें तया॥ ३८॥ हे सनंदन द्विजकुमारा!। हताश ऐसा होई न जरा। ब्रह्मवेत्ता पुरा पुरा। येथेंच तूं पाहशील॥ ३९॥ येतो जो प्रति-दिवशीं। आठ वर्षांचा संन्याशी। स्नानाकारणें जान्हवीशीं। शंकरभारती नाम ज्याचें ॥ ४०॥ जो गोविंद पूज्यपादांचा। शिष्य आहे जाण साचा। अवतार प्रत्यक्ष हराचा। या कलियुगीं झाला "असे ॥ ४१॥ त्याच्या पदां शरण जावें। हेतु आपुले पुरवावे। ऐसें स्वप्नीं सांगून बरवें। गुप्त झाला सदाशिव॥ ४२॥ तों झाली प्रभात। प्राची झाली आरक्त। लोक स्नानाप्रीत्यर्थ। जाऊं लागले गंगेवरी ॥ ४३॥ ऐशा त्या समयाला। सनंदन जागा झाला। प्रातर्विधि आटोपला। आणि गेला स्नानासी ॥ ४४॥ म्हणे हे माय भागीरथी!। स्वप्नांतील भेटीव मूर्ति। आज जान्हवी मजप्रति। अंत माझा पाहूं नको ॥ ४५॥ तों त्याच वेळेसी। आचार्य आले स्नानासी। बघून त्या बालमूर्तीसी। सनंदन मनीं संतोषले ॥ ४६॥ मागोमाग तांतडी। आचार्यांच्या बिऱ्हाडीं। सनंदन आला अति आवडीं। पदां शरण रिघावया ॥ ४७॥ आचार्य बैसले असतां। सनंदनानें ठेविलें चरणीं। मस्तक आपुलें आदरानीं। साष्टांग नमन करोनिया ॥ ४८॥ आणि म्हणाला "गुरुराया!। या दुस्तर भवापासूनिया। नाहींच कोणी

सोडवावया । समर्थ तुम्हांवांचूनी ॥ ४९ ॥ मी अनुतापें तप्त झालों । म्हणून पदां शरण आलों । मूढ होऊनिया गेलों । ही पाहून विश्वरचना ॥ ५० ॥ कोण याचा उत्पादिता । कोण याचा संरक्षिता । कोण अवघे संहारिता । विश्व कशाचें झालें हें ॥ ५१ ॥ या चार गोष्टींचा विचार । करीत राहिलों आजवर । बहुत केलें पाठांतर । वेद आणि वेदांगांचें ॥ ५२ ॥ तेणें शाब्दिक ज्ञान झालें । अनुभवास नाहीं आलें । म्हणून हे गुरु माउले ! । आलों शरण तुजलागीं ॥ ५३ ॥ तूं ज्ञानाचा सागर ! । स्वानुभवाचा दिनकर । तुझी कृपा झाल्यावर । पथ स्पष्ट दिसतो कीं" ॥ ५४ ॥ हें पाहून आचार्याला । विस्मय अति वाटला । मग पूसूं लागले तयाला । तूं कोठील कोण हें ॥ ५५ ॥ सनंदन बोले त्यावर । मुलूख माझा बहुत दूर । कावेरी नदीचें तीर । चोल नांव तयाचें ॥ ५६ ॥ वेदविद्या स्वसदनीं । मी अवघी संपवुनी । निघालों नम्र व्हाया चरणीं । श्रेष्ठ साधू-संतांच्या ॥५७॥ क्षेत्रें तीर्थें पाहत पाहत । आलों वाराणशींत। परी स्वानुभवी गुरु मजप्रत । कोणी न भेटला दयाळा ! ॥ ५८ ॥ काल रात्रीं शंकरांनीं । स्वप्नांत माझ्या येवोनि । लीन व्हाया आपुल्या चरणीं । आज्ञा साच केली असे ॥ ५९ ॥ आजचा दिवस धन्य धन्य । आपुले देखिले दिव्य चरण । आतां परतें लोटून । या दासास देऊं नका ॥ ६० ॥ तूं भवार्णवींचें तारूं । तूंच माझा सद्गुरु । तूंच अससी कल्पतरु । मला परतें लोटूं नको ॥ ६१ ॥ तूं ज्ञानसरितासलिल पूर्ण । मी तृषित आलों धांवून । तुझ्या मुखींचें अमृतवचन । पान करायाकारणें ॥ ६२ ॥ तुम्ही मूळचेच त्रिकालज्ञ । आहां गुरुराया ! म्हणून । नाहीं उरलें कारण । कांहीं एक सांगण्याचें ॥ ६३ ॥ मनीं वाटे संन्यास घ्यावा । आपुला सहवास करावा । हाच हेतु पुरवावा । आज दिनीं अर्भकाचा ॥ ६४ ॥ तें आचार्यांनीं मानिलें । जवळ ठेवून घेतलें । सुयोग पाहून देते झाले । संन्यासची दीक्षा तया ॥ ६५ ॥ करतल भिक्षा मागती । पवित्र आगरीं पोटापुरती । वटवृक्षाच्या तळीं राहती । हे दोघे गुरुशिष्य ॥ ६६ ॥ तो वटवृक्ष असून । भासे इंद्राचें नंदनवन । सुगंधित वाहे पवन । तितक्याच पुरतें ते ठायीं ॥ ६७ ॥ रात्रीं कारण दिव्याचें । मुळींच नव्हतें पडत साचें । कां कीं तेज आचार्यांचें । फांकत होतें दिव्या-परी ॥६८॥ हा प्रकार पाहण्यासी । लोक जमती बहुवसी । यांतील खरें

वर्म तयांसी । परि कांहीं कळेना ॥६९॥ कोणी म्हणती मांत्रिक । हें पोर असावें निःशंक । सर्पशिरींचा अमोलिक । मणि याजवळ असावा ॥७०॥ कोणी कोणी म्हणती जन । हा मूळचाच देदीप्यमान् । सूर्य कां आपुलें सदन । भूषवील दीपांनीं ? ॥ ७१ ॥ आचार्य सनंदनाप्रति । जेव्हां पाठ द्यावया बैसती । तयीं ते ऐकावया येती । विद्वान् मोठमोठाले ॥ ७२ ॥ आचार्यांची विद्वत्ता । थक्क करी विद्वच्चित्तां । मोठमोठे ज्ञाते माथा । त्यांचे चरणीं नमविती ॥ ७३ ॥ कोणी म्हणती हा वामन । काश्यपाचा नंदन । अदितीचें हृदयरत्न । पुनरपि हें अवतरलें ॥ ७४ ॥ हा ज्ञानी दुजा वामन । भक्तिमार्गी प्रल्हाद पूर्ण । निश्चयें ध्रुवासमान । शरणागतांचा कल्पतरु ॥ ७५ ॥ श्रोते ! त्या जान्हवीतीरीं । चित्सुख आणि आनंदगिरि । सनंदाचिये परी । दीक्षा घेऊन शिष्य झाले ॥ ७६ ॥ शिष्य दाढी–मिशांचे । गुरु अल्प वयाचे । कौतुक या गोष्टीचें । काशींत झालें चोहींकडे ॥ ७७ ॥ सोप्या सरळ भाषेंत । उपनिषदांचा गुह्यार्थ । आचार्य स्वशिष्यांप्रत । सांगत होते नित्यशः ॥ ७८ ॥ अर्थ-श्रवणें समाधि । कित्येकांची कधीं कधीं । लागूं लागली, नव्हती साधी । पद्धत अर्थ सांगण्याची ॥ ७९ ॥ श्रीमत् आचार्यांचें मुख । हीच कोणी प्राची एक । उपनिषदार्थ हाच अर्क । तेथें उदय पावे जयीं ॥ ८० ॥ तै शिष्यरूपी पल्वलाप्रति । मनकमलें विकासती । बोधमकरंदें पूर्ण भरती । मुमुक्षुभ्रमरा सुखवावया ॥ ८१ ॥ ऐसें व्याख्यान आचार्यांचें । तें नव्हतें दांभिकाचें । तन मन हरपे श्रोत्यांचें । तें किती म्हणून सांगावें ! ॥ ८२ ॥ असो आचार्य एके दिनीं । निजशिष्यांसी घेऊनी । जाऊं लागले पंथांनीं । स्नान कराया जान्हवीचें ॥ ८३ ॥ तैं अर्ध्या पंथांत । भेटला एक चांडाळ सत्य । होतें जयाच्या समवेत । चार कुत्रे विबुध हो ! ॥ ८४ ॥ काळी कुट्ट अवघी काया । एक लंगोटी नेसावया । होती नुसती मुखाठायां । चपटी खूण नाकाची ॥ ८५ ॥ करीं कांदा भाकर । पांघरण्या फाटकें धोतर । येत होती घाण फार । जयाचिया देहाला ॥ ८६ ॥ कंठीं मनगटीं काळा दोरा । उंच धिप्पाड बांधा खरा । बुबुळें दोन्ही जशा गारा । कान आंकडे चिंचांचें ॥ ८७ ॥ तो आचार्यांच्या निकट आला । येण्या मुळीं न मनीं भ्याला । तै आचार्य बदले तयाला । थोडें बाप्पा ? दूर होई ॥८८॥ आम्हां न तुवां शिवावें ।

माझें वचन मानावें । जाणें असल्या लांबून जावें । अमुचा मार्ग सोडून ॥ ८९ ॥ ऐसें आचार्य बोलतां । चांडाळ झाला गालांत हंसतां । म्हणे यानें घेतलें वृथा । सोंग संन्यास दीक्षेचें ॥ ९० ॥ चांडाळ म्हणे, 'यतिवरा । फोड करून सांगा जरा । हा ब्रह्मांडपसारा । सत्य किंवा थोतांड ॥ ९१ ॥

अद्वितीयमनवद्यमसङ्गं सत्यबोधं सुखरूपमखण्डम् ॥
आमनन्ति शतशो निगमात्मा स्तत्र भेदकलना तव चित्रम् ।

ब्रह्म एक अद्वितीय सत्य । निरवयवी संगरहित । आनंदरूप अनंत । ब्रह्म आत्मा एकचि ॥ ९२ ॥ ऐसें ज्ञाते मानिती । उपनिषदें हेंच सांगती । आणि तुझें व्याख्यान याचे वरती । रोज होतें जान्हवी-तटा ॥ ९३ ॥ तुला अवघी काशीपुरी । म्हणती वेदान्तकेसरी । भेदभाव आहेच परी । तुझ्या ठायीं जागृत ॥ ९४ ॥ तूं दाढीमिशांना मुंडिलें । काषाय वस्त्र सेविलें । हे अवघे तुझे चाळे । द्योतक बुवाबाजीचें ॥ ९५ ॥ तूं झालास संन्यासी । गृहस्थ-लोकां फसवण्यासी । वा भोळ्या बापड्या भाविकांसी । उगीच नादीं लावावया ॥ ९६ ॥ बहुरूप्याच्या सोंगापरी । तुझा संन्यास भूमीवरी । तत्त्वबोध अंतरीं । नाहीं मुळींच झाला तुझ्या ॥ ९७ ॥ तूं नट नाटकींचा । सजूनिया आलास साचा । हा आखाडा शिष्यांचा । जमविला तूं ढोंगास्तव ॥ ९८ ॥ तूं दूर हो जें म्हणालासी । तें आत्म्यासी कां शरीरासी । हें एवढें सांग मशीं । फोड करून ये वेळां ॥ ९९ ॥

गच्छ दूरमिति देहमुताहो । देहिनं परिजिहीर्षसि विद्वन् ॥
भिद्यतेऽन्नमतोऽन्नमयं किं । साक्षिणश्च यतिपुङ्गव ! साक्षी ॥

दूर हो हें तुझें वचन । जरी आत्म्यासी असेल लक्षून । तरी आत्म्याठायीं भिन्नपण । ये न मुळीं प्रत्यया ॥ १०० ॥ आणि तेच शब्द शरीराविशीं । जरी तूं बोलला अससी । तरी तें चुकेल सर्वांशीं । शरीरें एक्याच तत्त्वांचीं ॥ १०१ ॥ हाडें, मांस, त्वचा, रुधिर । यांनीं बनतें शरीर । तें तुझें माझें साचार । आहे एकसारखें ॥ १०२ ॥ मग मातीनें मातीला । आहे कधीं का विरोध केला । येऊन प्रत्यक्ष शिवण्याला । हें एवढें सांग पाहूं ॥ १०३ ॥ पाहा गंगेच्या घागरींत । आणि मद्याचिया पिपांत । सूर्य-किरणें पडतात । म्हणून कां तीं विटाळतीं ? ॥ १०४ ॥

तैसे चांडाळ आणि ब्राह्मण । हे घागरीपिपांच्या समान । आत्मा जो सूर्यकिरण । दोन्ही ठिकाणीं सारखा ॥ १०५ ॥ आतां म्हणशील कदाचित् । हें मजला आहे माहीत । केवळ व्यवहार रक्षिण्याप्रत । मी आहें बोललों ॥ १०६ ॥ परि ज्यानें भगवें घ्यावें । त्यांनीं व्यवहारीं न गुंतावें । सर्वकाल शोधीत जावें । सच्चिदानंद तत्त्वाला ॥ १०७ ॥ सांभाळणें व्यवहार । याची न तुम्हां जरूर । भगवत्-माया दुर्धर । ती हि तुम्हां गुंतविते ॥ १०८ ॥ यांनींच बुडालें जगत् । क्रियेत आणि भाषणांत । मेळ न पडे यत्किंचित् । हा कां दोष शास्त्राचा ?॥ १०९ ॥ तुझ्यासारखे ज्ञानी पुरुष । आचरती जनरूढीस । याचेंच वाटे मनास । सखेदाश्चर्य माझिया ॥ ११० ॥ कोल्हे भितील कानना । म्हणून आपुली गर्जना । करणें सिंह थांबवीना । हें तूं आण विचारीं ॥ १११ ॥ शिवाय ही काशीपुरी । मोक्षमार्गाची पेठ खरी । त्या मोक्षाच्या बाजारीं । भेद पावटे विकूं नको ॥ ११२ ॥ केशरकस्तुरीसमोर । डिकेमालीचा जयजयकार । आहे कधीं कां होणार । तें तूं कराया आलासी ॥ ११३ ॥ भेदबुद्धि टाकावी । तेव्हांच ती चढावी । मोक्षाची पायरी बरवी । हें पूर्णपणें ध्यानीं धर ॥ ११४ ॥ ऐसे बोलतां चांडाळ । आचार्य गर्हिवरले तत्काळ । अभ्रें झांकिती कांहीं काळ । प्रखर सूर्याच्या प्रकाशा ॥ ११५ ॥

सत्यमेव भवता यदिदानीं । प्रत्यवादि तनुभृत्प्रवरैतत् ।
अन्त्यजोऽयमिति संप्रति बुद्धि । संत्यजामि वचसाऽऽत्मविदस्ते ॥

चांडाळा ! तूं धन्य धन्य । सत्य तुझें भाषण । आहेस तूं महान् । कोणी तरी अधिकारी ॥ ११६ ॥ खरोखरी आजपासून । हा हीन, हा ब्राह्मण । या विषमतेचें उत्थान । नाहीं होऊं देणार मी ॥ ११७ ॥ शब्दज्ञानी बहुत झाले । परि खरें तत्त्व न कोणा कळे । आणि जें कां कळे तेंच वळे । ऐसा पुरुष एखादा ॥ ११८ ॥

भाति यस्य तु जगत् दृढबुद्धेः । सर्वमप्यनिशमात्मतयैव ।
स द्विजोऽस्तु भवतु श्वपचो वा । वन्दनीय इति मे दृढनिष्ठा ॥

बुद्धि निव्वळ भेदरहित । कोणाचीहि न कधीं होत । निश्चयें आत्मा आणि जगत् । एक मानी तोच ज्ञाता ॥ ११९ ॥ ऐसा जो ज्ञानी थोर । तो ब्राह्मण असो वा हीन महार । त्याच्या जातीचा विणेंचार । कर

मुळींच नको कीं ॥ १२० ॥ थोरशा ब्रह्मदेवापासून । तों पिपीलिकेपर्यंत जाण। एकचि भरलें चैतन्य । ऐसा भाव होऊनिया ॥ १२१ ॥ निर-भिमान जो झाला। मी सद्गुरु समजतों त्याला। तत्त्वबोध अभिमान्याला। नाहीं होणार केव्हांहि ॥ १२२ ॥ तूं पुरा तत्त्वज्ञानी। मी चुकतों हें पाहूनि । आलास वेष घेऊनि । माझी चुकी दाखवावया ॥ १२३ ॥ झाले तुझे उपकार। आतां न पडे कधीं विसर । या समयाचा साचार। या आयुष्यांत कधींहि ॥ १२४ ॥ ऐसे आचार्य वदतां तेथ। चांडाळ झाला असे गुप्त । तेथल्या तेथ पंथांत । लोक बघती टकमकां ॥ १२५ ॥ चांडाळाच्या जागेवर। प्रकट झाला शंकर। शूलपाणि पार्वतीवर। दशभुज पंचवदन ॥ १२६ ॥ जीं कुत्रीं बरोबरी । आणिलीं होतीं आपुल्या खरीं । तींच झालीं वेद चारी। ऋग्, यजुः, सामा, आथर्वण ॥ १२७ ॥ ऐसें कौतुक पाहूनि । आचार्यांनीं जोडिले पाणि । लोक लोळूं लागले चरणीं । तया विश्वोद्धाराच्या ॥ १२८ ॥ स्तोत्र या वेळेचें । अष्टमूर्ति शंकराचें । तत्काळ रचूनिया साचें । अपार स्तव मांडिला ॥ १२९ ॥

भाषमाण इति तेन कलावा नेष नैक्षत तमन्त्यजमग्रे ।
धूर्जटिं तु समुदैक्षत मौलि स्फूर्जदैन्दवकलं सह वेदैः ॥
भयेन भक्त्या विनयेन धृत्यः । युक्त। स हर्षेण च विस्मयेन ।
तुष्टाव शिष्टानुमतः स्तवैस्तं । दृष्ट्वा दृशोर्गोचिरमष्टमूर्तिम् ॥

देह दृष्टीनें देवदेवा ! । मी आपुला दास बरवा। कृपाप्रसाद असूं द्यावा। सर्वदा या दासावरी॥ १३० ॥ जीव दृष्टीनें विचार करतां। मी अंश तुझा सर्वथा। आत्मदृष्टीनें पाहतां। तूंच मी हें साक्षात् ॥१३१॥ हेंच सांगत आहे श्रुति। त्याची आली प्रचीति । हे भगवन् पशुपति। कांहीं न कोठें तुम्हांविण ॥ १३२ ॥ हा चमत्कार पाहण्यास। लोक मिळाले बहुवस। प्रत्यक्ष पाहून शंकरास। भाविक लागले नाचावया ॥ १३३ ॥ ही शिव प्रकट झाल्याची। वार्ता पसरली काशींत साची। गर्दी स्त्री-पुरुषांची। लोटूं लागली वरचेवर ॥ १३४ ॥ पौरवासी लोक म्हणती । ही संन्याशाची बालमूर्ति । दिवटीच झाली आम्हांप्रति। प्रत्यक्ष प्रभु दाखवावया ॥ १३५ ॥ मग आचार्यांकारण । बोलता झाला पंचवदन। मदंशा ! करी श्रवण। माझें वचन शुद्ध मनें ॥ १३६ ॥ तूं

बादरायण व्यासापरी। आहेस मला प्रिय भारी। म्हणून ब्रह्मसूत्रावरी। तूंच भाष्य करावें ॥ १३७ ॥

'अथातो ब्रह्मजिज्ञासा' 'जन्माद्यस्य यतः'

'शास्त्रयोनित्वात्' 'तत्तु समन्वयात्'

त्या त्यांच्या वाक्यांची। दुर्दशा केली साची। या शब्दज्ञानी पंडितांची। कींव करावी तितकी थोडी ॥१३८॥ हे शब्दज्ञानी पंडित। आपल्या मतें त्याचा अर्थ। वाटेल तसा लावितात। व्याकरणाच्या जोरावरी ॥ १३९ ॥ तेणें मतमतांतरें। चहूंकडे पसरलीं बा रे! । द्वेषमूलक ऐसे वारे। वाहूं लागले सर्व देशीं ॥ १४० ॥ कोणीं वेदार्थ भलताच केला। कोणा त्याविषयीं भ्रम पडला। कोणी वेदत्रयीला। मुळींच दिलें पिटाळून ॥ १४१ ॥ कोणीं पाखांड मतें काढिलीं। भारताची दैना केली। खऱ्या तत्त्वाचा तूंच वाली। होऊन भाष्य करावें ॥ १४२ ॥ कां कीं सांप्रत भूमीवरी। शब्दपंडित माजले भारी। त्यांची खबर घ्यावी खरी। आपुल्या भाष्यबलानें ॥ १४३ ॥ ते भेदाभेदवादी भास्कर। शाक्त मताचा प्रसार। ज्यानें केला भूमीवर। तो अभिनव गुप्त पाहा ॥१४४॥ नीलकंठ, प्रभाकर, मंडण। यांचें पद्धतशीर खंडण। करून करावें संरक्षण। या वैदिक पंथांचें ॥१४५॥ कां कीं तुझ्यावांचून। वेदार्थ जाणण्या कोणीच न। दिवाभीत सांगे कोठून। सूर्य उन्हाच्या रहस्या? ॥१४६॥ तुझ्या भाष्यालागून। देवहि देतील मान। त्या भाष्यांचें पठण। ब्रह्मलोकांत होईल ॥ १४७ ॥ तुझ्या भाष्याची अवहेलना। जे जे कोणी करतील त्यांना। यमलोकींच्या यातना। भोगणें भाग येईल कीं ॥१४८॥ तुझ्या सूत्रभाष्याची। जो एक ओळ नियमें वाची। तया महत्पुण्याची। प्राप्ति होईल निःसंशय ॥ १४९ ॥ ऐहिक आणि पारमार्थिक। भाष्यपठणें लाभेल सुख। हीच माझी आहे भाक। तुझ्या अद्वितीय भाष्याला ॥१५०॥ असो वैदिक पंथाच्या संरक्षणा। करणें मठाची स्थापना। हें कृत्य झाल्याविना। ये न बळकटी तयासी ॥ १५१ ॥ सुबोध वेदान्ताच्यावरी। नाना प्रकारें ग्रंथ करी। हीं कामें सारून सारीं। गमन करावें कैलासा ॥ १५२ ॥ ऐसें आचार्यांसी बोलून। प्रभु पावला अंतर्धान। पाहत असतां अवघे जन। त्या काशीच्या पंथामध्यें ॥ १५३ ॥ असो भाष्य करण्यासाठीं। आचार्य राहिले जान्हवीतटीं। शिष्यमांदी जमली

मोठी । भोंवतालीं तयांच्या ॥ १५४ ॥ सनंदन चित्सुख आनंदगिरि । हे मुख्य अवघ्यांमाझारीं । अवांतरांची कोण करी । गणति ती विबुध हो ! ॥१५५॥ गणति करण्यासारखे । हे तिघेच होते निके । गुरुसहवासांचीं सुखें ।अमोल तीं लुटावया ॥१५६॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥१५७॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय पंधरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे वसुदेवदेवकीनंदना ! । हे गोपीगोपमनरंजना! । हे कालियासुरमर्दना ! । भक्तवत्सला श्रीहरि ! ॥१॥ पूतना बालघातिनी । तुवां वधिली बाळपणीं । सहा महिन्यांचा असतांनी । ऐसें भागवत सांगतें ॥ २ ॥ जेव्हां तो विधाता । गायी-गोप झाला नेता । तेव्हां तितकीं रूपें भगवंता ! । एक वर्ष धरिलीं तुवां ॥ ३ ॥ ऐसा तूं अतुल बली । बाल होऊनि गोकुळीं । खेळूं लागलास खेळीमेळीं । गोप सवंगडी जमवूनिया ॥ ४ ॥ गोवर्धन तो उचलिला । कालिया जलीं तुडविला । संकट वेळीं गोकुळाला । तूंच रक्षिलें ख्यात जगीं ॥ ५ ॥ ऐसे तुझे पवाडे । भक्त गाती चोहींकडे । पाही दासगणूकडे । तैशाच कृपादृष्टीनें ॥ ६ ॥ बालक अजाण हट्ट करी । मातेच्याच पुढारी । नाहीं नाहीं दुसरी । जागा हट्ट करावया ॥ ७ ॥ मी अजाण तुझें लेकरूं । नको माया पातळ करूं । तूं सत्कृपेचा सागरू । कृपा करी मजवरी ॥८॥ तुझी कृपा झाल्यावरती । अवघेच हेतु पूर्ण होती । कल्पवृक्षाच्या खालतीं । बसल्या दैन्य कशाचें ? ॥ ९ ॥ असो आचार्य असतां काशींत । मिळेना कधींच एकांत । होऊं लागली अतोनात । गर्दी विबुधा जनांची ॥ १० ॥ कोणी म्हणती आजारी । बायको माझी आहे घरीं । तिला बरें वाटूं द्या लौकरी । स्वामी आपुल्या कृपेनें ॥ ११ ॥ कोणी संतति मागती । कोणी कर्ज फिटो म्हणती । कोणी म्हणती द्यावी मुक्ति । आमच्या ब्रह्मसमंधा ॥१२॥ तेणें आचार्य त्रासले । शिष्य संगतीं घेतले । हिमालयासी निघाले । पवित्र यात्रा करावया ॥ १३ ॥ रुद्रप्रयाग, देवप्रयाग । तैसें तिसरें

कर्णप्रयाग । केदारशिखरीं उमारंग । डोळा भरून पाहिला ।।१४।। नारायण मानससरोवर । अशा यात्रा थोर थोर । करून ब्रह्मसूत्रावर । भाष्य लिहिण्या आरंभ केला ।। १५ ।। भाष्य गेलें शेवटास । तया बद्रिक्षेत्रास । पुढें दशोपनिषदास । भाष्य श्रींनीं आरंभिलें ।। १६ ।। ईश, कठ, केन । मुंड, मांडूक्य, आणि प्रश्न । छांदोग्य, तैत्तिरेय, बृहदारण्य । ऐतरेय दहावें ।। १७ ।। ऐशा दशोपनिषदांवरी । भाष्य लिहिलें अत्यादरीं । पवित्र जान्हवीतीरीं । लेखक यांचा सनंदन ।। १८ ।। त्या सनंदन शिष्यावर । आचार्यांचें प्रेम फार । तें पाहून शिष्य इतर । थोडे कुरकरूं लागले ।। १९ ।। शिष्य म्हणती आपसांत । सनंदन जो अत्यंत । प्रिय झाला स्वामींप्रत । त्याचें कारण हेंच कीं ।। २० ।। केरलदेशीं कालडीस । आचार्य आले जन्मास । सनंदन कावेरीतटास । चोल देशीं जन्मला ।। २१ ।। म्हणजे स्वामींच्या शेजारीं । हा सनंदन भूमीवरी । आपण नाहींत त्यांच्या परी । चोल केरल देशींचे ।।२२।। हें आचार्यांच्या आलें ध्यानीं । मुळीं न दाखविलें बोलूनि । उथळ पाण्यालागूनी । खळाळ तो राहतसे ।। २३ ।। सनंदनाचा अधिकार । दावण्या इतरां साचार । गंगेच्या पैल तीरावर । आचार्य जाया निघाले ।। २४ ।। सनंदनासी जातां जातां । ऐसें बोलले तत्त्वतां । मी या घेऊन इतरांस आतां । जातों गंगेपलीकडे ।। २५ ।। तूं जाऊन गांवांत । भिक्षा मागून आण त्वरित । थांबे न कोठें यत्किंचित् । वेळ होईल भाष्याला ।। २६ ।। तें सनंदनें मानिलें । आचार्य गंगेपार गेले । इतर शिष्य घेऊन भले । आपुलियाबरोबर ।। २७ ।। सनंदन भिक्षा घेऊन आला । जाण्या पैल तटाला । तों त्या महानदीला । पूर आला भयंकर ।। २८ ।। नाव, पेटा, सागड कांहीं । चालवण्याची सोय नाहीं । येत नव्हतें अंशेंहि । पोहतां त्या सनंदना ।। २९ ।। सनंदन म्हणे मानसीं । भिक्षा राहिली मजपाशीं । सशिष्य आहेत उपवासी । सद्‌गुरु माझे पैलतटा ।। ३० ।। पलीकडे नाहीं वस्ती । चढूं लागली भागीरथी । करूं कैशी आतां युक्ति । मी जाण्या पैलतटा ।। ३१ ।। याहीपेक्षां दुस्तर । जी संसारनदी साचार । तिच्याहि करिती पार । चरण माझ्या आचार्यांचे ।। ३२ ।। लक्ष ठेवितां त्यांच्या चरणीं । उद्धरून जाती प्राणी । संसारसागरामधूनि । मग या नदीचा पाड कोण ? ।। ३३ ।। हे जान्हवी गंगे

स्वर्धुनी ! । हे भागीरथी पापहारिणी ! । घटकेंत हें तुला पाणी। आलें कैसें अपार गे ! ॥ ३४॥ आचार्य माझे पैलतीरीं। विश्वासून माझ्यावरी। बैसले, राहिली माधुकरी। माझ्याजवळीं ये वेळां ॥ ३५ ॥ मी न तिकडे गेल्यास। घडेल त्यांना उपवास। अंतर पडेल लिहिण्यास। आज उपनिषद् भाष्याच्या ॥ ३६ ॥ कांहीं असो थांबणें। आतां न योग्य मजकारणें। ऐसें म्हणून सनंदानें। नमन केलें गंगेस ॥ ३७॥ प्रवेश केला जलांत। सद्गुरूंचें स्मरण करीत। तों काय घडलें अघटित। तें आतां अवधारा ॥ ३८ ॥ इकडे मनांत भागीरथी। बोलती झाली ऐशा रीतीं। धन्य याची गुरुभक्ति। पुरा न यानें जुमानिलें ॥ ३९ ॥ आचार्यांचा परम भक्त। जरी बुडाला आज येथ। तरी कालिमा जगतांत। लागेल माझ्या कीर्तीला ॥ ४० ॥ ऐसा विचार करून चित्तीं। प्रकट झाली भागीरथी। नेण्या पैल तटाप्रति। सनंदनाकारणें ॥ ४१ ॥ जरी त्याच्या धरून करा। नेऊं म्हणे पैलतीरा। तरी तो संन्यासी आहे खरा। स्पर्श त्यासी कैसा करूं ॥ ४२ ॥ ती महा चतुर भागीरथी। तिनें अमोल योजिली युक्ति। नेण्या पैल तटाप्रति। आचार्यांच्या भक्ताला ॥ ४३ ॥ सनंदन भागीरथींत। पाय ठेवी जेथ। उत्पन्न व्हावें तेथ तेथ। कमल एकेक पायातळीं ॥ ४४ ॥ म्हणजे कमळांचा सेतु केला। सनंदनासी जाण्या भला। साह्य भागीरथी जयाला। त्यास कांहीं कमी नसे ॥ ४५ ॥ पाय ठेवीत कमलावर। सनंदन चालला भराभर। हा अघटित प्रकार। लोक पाहते झाले ॥ ४६ ॥ भागीरथीच्या पैलतीरीं। सनंदन पोहोंचला निर्धारीं। उभा राहिला समोरी। कर जोडून आचार्यांच्या ॥ ४७ ॥ सनंदनासी पाहतां। आनंद झाला आचार्यचित्ता। इतर शिष्यांसी योग्यता। कळून आली सनंदनाची ॥ ४८ ॥ सनंदनासी आलिंगिलें। दोन्ही हातें कुरवाळिलें। वरदहस्त ठेविते झाले। आचार्य त्याच्या मस्तकीं ॥ ४९ ॥ वत्सा ! आजपासून। तुझें नामाभिधान। पद्मपाद म्हणून। मीं ठेविलें आहे कीं ॥ ५० ॥ भागीरथीचा लाडका। कोणी नाहीं तुझ्या इतुका। तिनें कमलपादुका। तुझ्या पदीं घातिल्या रे ! ॥ ५१ ॥ पद्मपादा तूं धन्य जनीं। राबविलीस स्वर्धुनी। गंगा जगत्पावनी। केवढा तुझा अधिकार ! ॥ ५२ ॥ त्या पवित्र वाराणसीशीं। पाठ शिकविती प्रतिदिवशीं। आपुल्या शिष्यवर्गाशीं। नीट

प्रकारें समजावून ॥ ५३ ॥ तो पाठ ब्रह्मविद्येचा । सोलीव तत्त्वज्ञानाचा । थोर अधिकार आचार्यांचा । बृहस्पतीचे समान ॥ ५४ ॥ तों एके दिवशीं ऐसें झालें। पाशुपतमती पंडित आले । पाठ ऐकतां कुजबुजले । निषेध-प्रदर्शक मुद्रेनें ॥ ५५ ॥ एक पंडित त्यांतला । आचार्यांसी बोलता झाला। तुम्ही या थोतांडमताला। कां हो ! फैलावितां जगांत ॥ ५६ ॥ खरें रहस्य वेदाचें। दिलें टाकून सांगण्याचें। सोंग ब्रह्मवेत्त्याचें। आणूं नका बळें तुम्ही ॥ ५७ ॥ देव एक पशुपति। अवघीं सूत्रें ज्याच्या हातीं। त्यानें कथिलें येणें रीतीं। मोक्ष साधण्या जीवातें ॥ ५८ ॥ कार्यकारण योग्य विधि। दुःखांत हे पांच आधीं। जो पूर्णपणें शोधी। तोच अधि-कारी मोक्षाचा ॥ ५९ ॥ जग झालें निर्माण। प्रकृतीच्यापासून। तीच त्याचें उपादान। मुळीं नाहीं ब्रह्म तुझें ॥ ६० ॥ पशुपति निमित्तकारण। आहे या जगालागून। याच अर्थाचें श्रुतिवचन। " स ईक्षां चक्रे " हें असे ॥ ६१ ॥ कां कीं ब्रह्म निर्गुण। आहे मग त्यापासून। हें सावयवी सगुण। जग निर्माण व्हावें कसें ॥ ६२ ॥ ब्रह्म अनादि अनंत। जग पाहतां असें सान्त। ब्रह्मचेतन साक्षात्। आणि अचेतन हें जग कसें ॥ ६३ ॥ म्हणून या जगताला । ईश निमित्त कारण झाला। उपादान तोच भला। मान प्रकृतिकारणें ॥ ६४ ॥ कां कीं जें जयापासून होतें। तें मूळ कार्यांत दिसतें। पाहा घटामाजीं न लोपलें जातें? मृत्तिका, ती तूंच पाहा ॥ ६५ ॥ आचार्य म्हणती त्यावरी। ही तुमची समजूत नाहीं खरी। वेद वाक्याचा अंतरीं। विचार करणें सांगोपांग ॥ ६६ ॥ पाहा " उत तमादेशमप्राक्ष्यः " म्हणून। एक आहे वेदवचन। त्याचें करा अवलोकन। अर्थदृष्टीनें येधवां ॥ ६७ ॥ जया जाणिल्याच्यामुळें। जें न ऐकिलें तेंच कळे। जें न दिसत तेंच डोळे। पाहूं लागले स्वानुभवी ॥ ६८ ॥ ह्या वेदवाक्याचा विचार करतां। ऐसें कळतें तत्त्वतां। प्रकृतीला न ये म्हणतां। उपादान कारण मुळींच ॥ ६९ ॥ ब्रह्म हेंच उपादान। आहे जगा-कारण। ध्यानीं आणा हें वचन। ' एकमेवाद्वितीयम् ' हें ॥ ७० ॥ आतां कार्यामाजीं कारण । प्रत्यक्ष येतें दिसोन। हें जें तुमचें भाषण। तें न खरें सर्वथा ॥ ७१ ॥ पाहा गोमयापासून । कीटक होतो निर्माण । तेथें गोमयाचा एकहि कण। किड्यांमाजीं न प्रत्यया ये ॥ ७२ ॥ प्राणोदाना पासून। निर्माण होतें जीवन । परी या दोहींचे गुण । उदकामाजीं न

दिसती कीं ॥ ७३ ॥

अद्वितीय निरता सति भेदे । भुक्तिरीश समतैव कथं स्यात् ।
ध्यानजा किमिति सा न विनश्येद् । भावकार्यमखिलं हि न नित्यम् ॥

अहो ! ईश समानता । आणि अद्वितीय निरुता । ऐसें आहे लक्ष्मण म्हणतां । तुम्ही तया मुक्तीचें ॥ ७४ ॥ हें मुक्तीचें लक्षण । जीव ब्रह्म मानिल्या भिन्न । चुकणार आहे संपूर्ण । त्याची वाट लागे कशी ॥ ७५ ॥ आतां म्हणाल ध्यानानें । हें साधेल पूर्णपणें । जें साधतें भावानें । तें मुळींच नाशवंत ॥ ७६ ॥ पाहूं जातां हें ध्यान । भावकार्य असे जाण । मुक्ति ती तत्संमान । ठरेल कीं विनाशी ॥ ७७ ॥ आतां म्हणाल मोक्ष वेळे । पशुपतीचे गुण सगळे । येती जीवाठायीं वेगळे । ते न राहती मुळींच मग ॥ ७८ ॥ हें असंभवनीय सर्वतोपरी । जी निरवयवी वस्तु खरी । ती साकार वस्तु भीतरी । व्हावी कैशी संक्रमित ? ॥ ७९ ॥ आतां तुम्ही कदाचित् । ऐसें म्हणाल मजप्रत । पद्मगंध वायूंत । जैसा कां मिसळतो ॥ ८० ॥ तेवीं ब्रह्म आणि जीवाची । गांठ पडली पाहिजे साची । परी हीच आहे मुळांत तुमची । खोटी पाहा कल्पना ॥ ८१ ॥ वायु आणि गंधाचा । समवाय संबंध नाहीं साचा । तो गंध आणि पद्मकणाचा । आहे हें ध्यानीं धरा ॥ ८२ ॥ ते पद्मकण निश्चितीं । संयोगसंबंधें राहती । ठायीं वायूच्या ही प्रचीति । येत आहे सर्वांना ॥ ८३ ॥ जीव ब्रह्म म्हणोनि । निराळें न माना कोणी । हेंच कथन श्रुतींनीं । ठायीं ठायीं केलें असे ॥ ८४ ॥ एवंच पशुपतिमत । आचार्यांनीं केलें खंडित । अभिमान झाला गलित । त्या अवघ्या पंडितांचा ॥ ८५ ॥ आपुलीं मतें सोडिलीं । आचार्यांचीं मान्य केलीं । आणि संन्यासदीक्षा घेतली । तत्काळ त्यांच्यापासून ॥ ८६ ॥ सूर्यापुढें आली रात । करावया वादाप्रत । ती येतांच नुरलें खचित । रूप जैसें तिचें तिला ॥ ८७ ॥ तीच सूर्याच्या प्रकाशीं । सामावली वेगेंसी । आचार्य हे तेजोराशि । तम तेथें कोठून टिके ? ॥ ८८ ॥ हां हां म्हणतां ही मात । पसरती झाली काशींत । वाद कराया कोणी न धजत । श्रीमत् शंकराचार्यांसी ॥ ८९ ॥ उत्तरोत्तर भाष्यश्रवणा । जमूं लागले जन नाना । त्यायोगें शांतपणा । जाऊं लागला विलयास ॥ ९० ॥ शिष्यांस पाठ देते वेळीं । गर्दी जनांची नसावी मुळीं । म्हणून पाठजागा रोज भली ।

बदलीत होते आचार्य ॥ ९१ ॥ जैशी का मांजर । आपुल्या पिलांचें स्थलांतर । करीतसे वरचेवर । रक्षण व्हाया पिलांचें ॥ ९२ ॥ त्याचपरी पाठापुरतें । जागा ते बदलत होते । त्या जागेची माहितो । शिष्यांस मात्र होतसे ॥ ९३ ॥ असो श्रोते ! एक वेळां । जान्हवीच्या तीराला । पाठ देण्याचें शिष्यांना । आचार्यकार्य सुरूं होतें ॥ ९४ ॥ तों एक ब्राह्मण । आला तेथें सहज जाण । तनु धनूचे समान । झाली होती तयाची ॥ ९५ ॥ जरा ध्वज फडफड करी । अवघ्या तनुदुर्गावरी । दृष्टि फिरली माघारी । चांचपडत चालत असे ॥ ९६ ॥ अंगावरी एक शाल । आजानुबाहु भव्य भाल । भ्रुकुटीमाजी होता लाल । तिलक तो शेंदुराचा ॥ ९७ ॥ भस्म लाविलें कपाळास । रुद्राक्षमाला कंठास । हरिहरांच्या स्मरणास । स्मरणी एक होती करीं ॥ ९८ ॥ ॐ नमः शिवाय । नमो भगवते वासुदेवाय । विचार आणि विनिमय । ठायीं जागृत जयाच्या ॥ ९९ ॥ ऐसा द्विज तेथें आला । शिष्यासी विचारूं लागला । हा बालवयाचा बसलेला । कोण आहे संन्यासी ? ॥ १०० ॥ आणि कशाचा पाठ येथ । हा देतसे तुम्हांप्रत । हें नसल्या हरकत । ऐकावया इच्छितों मी ॥ १०१ ॥ ऐसें ऐकतां त्याचें वचन । शिष्य बोलले विनयानं । हे बालसंन्यासी आहेत पूर्ण । वेदवेदांग जाणते ॥ १०२ ॥ हे आमुचे गुरुवर । थोर यांचा अधिकार । यांनीं ब्रह्मसूत्रावर । भाष्य केलें व्यासांच्या ॥ १०३ ॥ समूळ भेद वादाचा । नास करण्या अवतार यांचा । चालतसे उपनिषदाचा । प्रत्यहीं पाठ ये ठायीं ॥ १०४ ॥ श्रीशंकराचार्य म्हणून । आहे यांचें नामाभिधान । यांनींच दिला आम्हांलागून । शारीरभाष्याचा पाठ आजी ॥ १०५ ॥ ऐसा वृत्तान्त ऐकिला । ब्राह्मण आचार्यांसी बोलला । या गोष्टीनें संशय मला । तुमच्याविषयीं येतो बहु ॥ १०६ ॥ चौदा पंधरा वर्षांचें । वय दिसतें मला तुमचें । अशा वयांत भाष्याचें । काम होणें नाहीं मुळीं ॥ १०७ ॥ तूं तरणें बांड अल्लड पोर । ओठांवरचा तुझा जार । नाहीं वाळला साचार । हें तुझेंच तोंड सांगतसे ॥ १०८ ॥ ब्रह्मसूत्रें असामान्य । जे रचिते झाले बादरायण । ज्या सूत्रास पाहून । भय पावला बृहस्पति ॥ १०९ ॥ ऐशी योग्यता तयाची । ती न तुजला कळावयाची । हो पोकळ बुवाबाजीची ।

दुकानदारी उघडूं नको ॥ ११० ॥ अनधिकारी पोटभरू । सांप्रत होऊन बसले गुरु । होती न कदा कल्पतरु । वृक्ष बोरी-बाभळींचे ॥ १११ ॥ मुला ! क्षुल्लक गार खरी । हिऱ्याची ती बरोबरी । कधीं न साच करी । हें ध्यानांत असूं दे ॥ ११२ ॥ अभिमानें डोमकावळा । पिसें लावून मोर झाला । परी न ये नृत्य त्याला । करितां मोरासारखें ॥ ११३ ॥ त्यांतून ही वाराणसी । येथे प्रत्यक्ष व्योमकेशी । येथें विद्वान बहुवसी । नांदती वसिष्ठासारखे ॥११४॥ पाहून तुझ्या वयाला । मीं सिद्धान्त असे केला । धरून व्यवहारशास्त्राला । यांत कांहीं चुकलें नसे ॥ ११५ ॥ खरेंच ब्रह्मसूत्रावरी । भाष्य केलें असशील जरी । एखादें सूत्र दाव तरी । म्हणून मजला ये वेळां ॥ ११६ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । आचार्य बोलते झाले । मीं नाहीं भाष्य केलें । कर्ता करविता निराळा ॥ ११७ ॥ आजोबा ! लेखणी बरूची । अक्षरें काढी उत्तम साची । परी किंमत धरणाराची । जगीं तियेच्या होतसे ॥११८॥ स्वतंत्रता लेखणीसी । नाहीं कोणत्याहि अंशीं । धारणकर्त्याच्या मानसीं । जें जें असेल तें तें लिही ॥ ११९ ॥ तें तियेचें लिहिणेंहि । धारणकर्त्याच्या बळें पाही । येथें मुळींच टिकणें नाहीं । लेखणीचा अभिमान ॥ १२० ॥ मीं लेखणीचें काम केलें । सद्गुरूंनीं जें वदविलें । तेंच आहे पत्रीं लिहिलें । त्याचा अभिमान नाहीं मला ॥ १२१ ॥ आतां सूत्र कोणतें । इच्छितां आपण ऐकण्यातें । तें सांगा सत्य मातें । म्हणजे उलगडा होईल ॥ १२२ ॥ मग ब्राह्मण बोले ऐसी गिरा । ब्रह्मसूत्राचा अध्याय तिसरा । त्यांत आरंभींच आहे खरा । विषय तो येणेंपरी ॥ १२३ ॥

'तदंतरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम् ।'

हृद्गत या सूत्राचें । सांग पाहूं मला वाचें । म्हणजे निरसन संशयाचें । होईल कीं माझिया ॥१२४॥ फार बरें म्हणून । आचार्य करिती भाषण । निजगुरूचें तें स्मरण । प्रथमारंभीं करोनिया ॥ १२५ ॥ मरणसमयीं ऐसें होतें । हें जड शरीर जरी सुटतें । तरी न सुटे जीवातें । भूत सूक्ष्म देह पाहा ॥ १२६ ॥ भूत सूक्ष्म देहाप्रति । लिंग देह ऐसें म्हणती । जो वासनात्मक निश्चितीं । त्यासह जीव जातसे ॥ १२७ ॥ मन बुद्धि अहंकार । रूप हें लिंग शरीर । असें सूक्ष्मात् सूक्ष्मतर । जो देह तोच हा ॥ १२८ ॥ मागें गौतम जैबलाला । याच रीतीं पुसता झाला । तेव्हां

जैंबलानें तयाला । उत्तर ऐसें दिधलें कीं ॥ १२९ ॥ जीव लिंगशरीरा-समवेत । जाई चंद्रमंडळापर्यंत । तेथून तो ओषधींत । येवोनिया वसतसे ॥ १३० ॥ तेथून तो धान्यद्वारा । पुरुष रेतांत जाई खरा । तें रेत योनी-द्वारा । गर्भाशयीं पोहोंचे मग ॥ १३१ ॥ कर्माप्रमाणें तयाप्रत । देह तेथें प्राप्त होत । रज आणि रेत । यांच्या योगें वाढतसे ॥ १३२ ॥ ऐशा ऐकून व्याख्यानास । ते ब्राह्मणरूपी वेदव्यास । पावते झाले संतोषास । परी आणखी कांहीं प्रश्न केले ॥ १३३ ॥ त्याचीं हीं सर्व उत्तरें । बिन-चूक दिलीं अत्यादरें । कोठेंहि न अंश उरे । जागा शंका घ्यावया ॥ १३४ ॥ तै पद्मपाद बोलला । कर जोडून आचार्यांना । हा ब्राह्मण नोहे व्यास आला । प्रत्यक्ष आपणां भेटावया ॥ १३५ ॥ ऐसें येधवां मज वाटे । यांत किमपिहि न होय खोटें । सारख्यास सारखें जेव्हां भेटे । तेव्हांच लागे निर्णय खरा ॥ १३६ ॥ ते वेदोनारायण । आपण साक्षात् मदनदहन । उपमा देण्या नाहीं स्थान । तुम्हां दोघांस कोठेंहि ॥१३७॥ आमुचें भाग्य धन्य धन्य । उभयतांचें दर्शन । झालें आम्हांलागून । व्यास आणि शिवाचें ॥ १३८ ॥ ऐसें पद्मपाद बोलतां । आठवलीसे अचार्य-चित्ता । मागील ती सारी कथा । अत्रींचिया यज्ञांतील ॥ १३९ ॥ मग श्रीमत् शंकराचार्यांनीं । आपुलें ते जोडूनि पाणि । ब्राह्मणा केली विन-वणी । प्रकट व्हायाकारणें ॥ १४० ॥ ऐशी विनवणी ऐकून । भगवान् श्रीबादरायण । करिते झाले विसर्जन । घेतलेल्या वेषाचें ॥ १४१ ॥ तनु सजल मेघापरी । नील श्यामल साजिरी । जटा मुकुट शोभे शिरीं । कृष्णा-जिन अंगावर ॥१४२॥ ऐसी प्रकटतां व्यासमूर्ति । जयजयकार अवघे करिती । आचार्यपायां लागती । शिष्यांसहित आपुल्या ॥ १४३ ॥ व्यास म्हणती त्यावर । आम्हां नका जोडूं कर । तुम्ही साक्षात् शंकर । आहांत हें मी जाणतों ॥ १४४ ॥ माझ्या ब्रह्मसूत्रावरी । कोणी न भाष्य करी । तो अधिकार सर्वतोपरी । आहे शिवा ! आपुला ॥ १४५ ॥ एक कैलासीचा शिवगण । नांव ज्याचें संभाकण । तो बोलला येऊन । मजलागीं येणें रीतीं ॥ १४६ ॥ प्रभूंनीं धरूनि अवतार । तुमच्या ब्रह्मसूत्रावर । भाष्य केलें मनोहर । विस्तृतशा स्वरूपाचें ॥ १४७ ॥ तेंच पाहण्यासाठीं आलों । भाष्य पाहून संतोषलों । याची मी पाहत बसलों । होतों आजवरी वाट ॥ १४८ ॥ मग आचार्य म्हणाले त्याकारण । सुमंतु, जैमिनी, पैल,

वैशंपायन । ऐसे आपुले महान् महान् । शिष्य अधिकारी असोनिया ॥१४९॥ ही भाष्य करण्याची पर्वणी । आणून दिलीत मजलागूनि । परम कृपावंत होऊनि । हे व्यास बादरायण ! ॥ १५० ॥ असो आतां माझेंहि । कार्य कांहीं उरलें नाहीं । थोडें थांबा ये ठायीं । मी येतों तुमच्या सवें ॥ १५१ ॥ अवधी सोळा वर्षांचा । आजदिनीं संपला साचा । निरोप मी भागीरथीचा । घेऊन इतक्यांत येतों हो ॥ १५२ ॥ मग बादरायण बोलले । भाष्य लिहिण्याचें काम संपलें । परि प्रचाराचें राहिलें । तें कोण करी तुजवांचून ॥ १५३ ॥ आणिक सोळा वर्षांची । वाढ तुमच्या आयुष्याची । विधात्यानें केली साची । वेदांचिया भिडेनें ॥ १५४ ॥ नुसत्या भाष्यें वेदोद्धार । कदापि नाहीं होणार । त्या भाष्याचा प्रसार । झाला पाहिजे चोहींकडे ॥ १५५ ॥ नुसतें मेघांतील उदक । पिकवूं न शके पाहा पीक । त्याचा पर्जन्यरूपी प्रसार देख ! । होईल तेव्हांच पीक पिके ॥ १५६ ॥ यापुढील सोळा वर्षांत । प्रसार करावा सर्वत्र । मत स्थापूनिया अद्वैत । वैदिक पंथ जीववावा ॥ १५७ ॥ थोतांड मता जिंकावें । सदाचारा वाढवावें । वेदरहस्य सांगावें । समजून अवघ्या मुमुक्षूंना ॥ १५८ ॥ यावत् चंद्र-दिवाकर । तुझें भाष्य भूमीवर । जागृत राहील साचार । पोषक होऊन वैदिक पंथा ॥ १५९ ॥ तुझा अद्वैत सिद्धान्त । जे न कोणी मानिती गत । ते कल्पपर्यंत । साच राहतील यमलोकीं ॥ १६० ॥ भारत, भागवत, रामायण । या ग्रंथांचे समान । तुझें आहे चरित्र गहन । ते वाचिल्या तत्त्व कळे ॥ १६१ ॥ याची जे करतील निंदा । ते ते न सुखें होतील कदा । तुझ्या चरित्रपठणें आपदा । भाविकांच्या निरसतील ॥ १६२ ॥ माझ्या प्रिय पुत्र शुकासमान । तुझें भाष्यहि मला मान्य । जो जो करी पठण । तो ज्ञानी होईल शुकापरी ॥ १६३ ॥ ऐसें आचार्यें सांगितलें । व्यास अंतर्धान पावले । शिष्य अवघे मुदित झाले । दर्शनानें उभयतांच्या ॥ १६४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १६५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सोळावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे प्रल्हादवरदा नरहरि ! । हे कमलवदना श्रीहरि ! । हे सीतापते रावणारि ! । हे वामनभार्गवा ! ॥ १ ॥ तुझे सर्व अवतार । जे जे झाले भूमीवर । त्याचें त्याचें शोधितां सार । ऐसें कळून येतें कीं ॥ २ ॥ दुष्ट द्वेषी धर्मघ्न । यांचें काराया हनन । आणि भक्तांचें करण्या संरक्षण । हींच दोन कामें तुझीं ॥ ३ ॥ तीं तूं प्रत्येक अवतारीं । बजाविलीं आहेस हरि ! । हीन दीन दुबळ्यांवरी । कृपा साच करिसी तूं ॥ ४ ॥ मात्र तें दुबळे हीन दीन । आलें पाहिजे तुला शरण । तुझे एक धरिल्या चरण । सर्व सुखें प्राप्त होतीं ॥ ५ ॥ ऐशा त्या दिव्य पदां । मी शरण आहें सर्वदा । त्रिविध ताप गोविंदा ! । दासगणूच्या निवारणें ॥ ६ ॥ असो, मत स्थापण्या अद्वैत । आचार्य निघाले शिष्यांसहित । येते झाले फिरत फिरत । प्रयाग क्षेत्राकारणें ॥ ७ ॥ जेथें त्रिवेणी संगम । झाला असे अत्युत्तम । जेथें वेणीमाधव पुरुषोत्तम । वट तळवटीं राहिला ॥ ८ ॥ त्या गंगा-यमुनासंगमासी । आचार्य आले पुण्यराशि । स्नान कराया अतिहर्षी । त्या पवित्र जलाचें ॥ ९ ॥ त्रिवेणीचें स्तोत्र केलें । त्रिरात्र तेथें राहिले । पुढें भेटण्या निघाले । भट्टपाद पंडिताला ॥ १० ॥ जो भट्टपाद पंडित । कर्ममार्गी सदा रत । वेदनिष्ठा, अत्यंत । चित्तीं ज्याच्या वसतसे ॥ ११ ॥ ज्यांनीं बुद्ध आणि जैनांचें । मत खंडित केलें साचें । ज्यानें प्रामाण्य वेदांचें । दावण्या उडी घेतली ॥ १२ ॥ ऐशा भट्टपादाप्रत । आचार्य आले शोधीत । येतां येतां विंध्य पर्वत । त्यांनीं नयनीं पाहिला ॥ १३ ॥ जो पर्वत राजराजेश्वर । ज्याचे फाटे अपार । मध्यभागासी साचार । पसरले भारत वर्षाच्या ॥ १४ ॥ त्या पर्वताचे आसमंत भागीं । येते झाले आचार्य योगी । तो कानीं कीर्ति जागजागीं । भट्टपादांची ऐकिली ॥ १५ ॥ मग पुसूं लागले लोकांप्रत । ऐसे भट्टपाद पंडित । कोठें आहेत सांप्रत । तें आम्हांस सांगावें ॥ १६ ॥ तै सांगूं लागले लोक । तमालशालिनी नदी सुरेख । आहे जवळी येथून एक । जी असे विंध्यतनया ॥ १७ ॥ या तमालशालिनीच्या कांठीं । हे भट्टपाद जगजेठी । अग्निप्रवेश करण्यासाठीं । येऊनिया बैसले ॥ १८ ॥ मग आचार्य लोकां पुसती । हे अग्निप्रवेश कां करिती ? । ऐशी मोठी

आपत्ति । आली कोणती त्यांचेवर ।। १९ ।। लोक म्हणाले यतिवर्या ! । तें साकल्य सांगावया । आम्ही न योग्य आहों सदया ! । लोकवार्ता ऐशी असे ।। २० ।। सुधन्व्याच्या करांनीं । बुद्ध जैनांलागुनी । मारिलें भट्टपादांनीं । ज्या हत्येचें गणित नसे ।। २१ ।। विद्या ज्याचे जवळ शिकला । त्याचाच यानें द्रोह केला । हे दोन दोष जावयाला । प्रायचित्त हें तो करीतसे ।। २२ ।। ऐसें वृत्त ऐकिलें । आचार्य सवेंच निघाले । भट्टपादा भेटले । आपुल्या सर्व शिष्यांसह ।। २३ ।। निज देहाच्या सभोंवार । कोंड्याचे रचिले डोंगर । त्यांस लावून वैश्वानर । भट्टपाद बसले मधें ।। २४ ।। ऐसें धाडस पाहिलें । आचार्य त्यासी बोलले । हे बाप्पा ! काय आरंभिलें । भट्टपादा या वेळीं ।। २५ ।। भट्टपाद म्हणे कर जोडून । स्वामी मी धन्य धन्य ! । म्हणून झालें दर्शन । अंतकालीं आपुलें मला ।। २६ ।। मी नाहीं जीव देत । करतों हें प्रायचित्त । दोन दोष जायाप्रत । हे केल्याविण गति नसे ।। २७ ।। मी न मानिला ईश्वर । निष्ठा वेदत्रयीवर । मनापासून ठेविली फार । कर्ममार्गी रत झालों ।। २८ ।। एक होते पंडित जैन । नांव ज्यांचें निकेतन । विद्या अवघ्या त्यांपासून । मी शिकता जाहलों ।। २९ ।। आणि उलटलों त्यांच्यावरी । आचार्या ! मी सर्पापरी । हा गुरुद्रोह माझ्या करीं । झाला जाणूनबुजून ।। ३० ।। कर्ममार्गासी महत्त्व दिलें । ईश्वरासी अवमानिलें । हें अघोर पाप झालें । माझ्या करें निःसंशय ।। ३१ ।। या दोन्ही दोषांप्रत । देहान्त हें प्रायश्चित्त । सांगितलें असे शास्त्रांत । तें आज करितों मी ।। ३२ ।। तें आचार्यांनीं ऐकिलें । आणि अग्नीकडे पाहिलें । संकेतें त्या खुणावलें । पेट न घ्यावा म्हणोन ।। ३३ ।। अग्नि तत्काळ मंदावला । जो होता भडकला । तोच ज्योतीच्या स्वरूपाला । येता झाला दिव्याच्या ।। ३४ ।। आचार्य म्हणाले, भट्टपादा । तूं नससी मानव साधा । गुरुद्रोह हें पाप कदा । नाहीं तुला लागणार ।। ३५ ।। जैनशास्त्र हें विद्याच नाहीं । मग गुरुद्रोहाचें पाप कांहीं । चव्हाटचाच्या होणें नाहीं । कुटाळचा त्या शास्त्र कदा ।। ३६ ।। तूं केवळ हेरापरी । होतास निकेतनाच्या घरीं । नाटकीच्या नटापरी । होता तुम्ही गुरुशिष्य ।। ३७ ।। हें अवघें ध्यानीं आण । गुरु न तुझा निकेतन । ज्यांनीं केलें मौंजीबंधन । तोच होय गुरु तुझा ।। ३८ ।। तूं हेराचें काम केलें । जैन-बुद्धां जिंकिलें । म्हणून तुला नाहीं

घडलें । पाप गुरुद्रोहाचें ॥ ३९ ॥ जैन बुद्ध जे का मेले । ते सुधन्व्यानें मारिले । हें तुझ्याच मुळें झालें । ऐसें तूं मानूं नको ॥ ४० ॥ दावण्या वेदप्रामाण्य । ज्यानें पर्वतावरून । उडी दिली टाकून । तोच ना तूं भट्ट-पाद ॥ ४१ ॥ जैसें का उपवनाप्रति । कांटेरी तरु न वाढूं देती । तीं उपजतांच टाकिती । माळी लोक उपटूनिया ॥ ४२ ॥ तैसेंच आहे हेंहि जाण । समाज आपुला उपवन । त्यांत कांटेरी झुडपांसमान । वाढीस लागले जैन-बुद्ध ॥ ४३ ॥ तीं त्वां उपटिलीं । ही कां तुला हत्त्या घडली ? । नको बाप्पा ! पडूस बळि । या खुळचट कल्पनेला ॥ ४४ ॥ मारिले गेले उंदीर । म्हणून कां तें मांजर । प्रायश्चित्ताचा विचार । मनामाजीं आणीतसे ! ॥ ४५ ॥ हें सर्व कांहीं तुला कळतें । परि एक शंका येते । या कृत्यावरून मातें । ती ऐक सांगतों ॥ ४६ ॥ मागें बौद्ध-जैनांनीं । वैदिकांपाशीं राहूनि । घेतली विद्या शिकवूनि । म्हणजे ज्ञानसृष्टीची इत्यंभूत ॥ ४७ ॥ आणि मग त्याच ज्ञानावरी । मारिते झाले भरारी । भरमसाट कांहीं तरी । ज्याला ताळमेळ नसे ॥ ४८ ॥ ती जी मारिली भरारी । तीच त्यांचें शास्त्र खरी । त्या शास्त्राच्या जोरावरी । अशि-क्षितां जिंकिलें ॥ ४९ ॥ परि खऱ्या खऱ्या विद्वानां । जिंकण्या छाती होईना । त्याहि विद्वानांचा सोठेपणा । होता शब्दसाहित्यांत ॥ ५० ॥ शब्दछळाचा निर्णय । कदापि न मान्य होय । तें मी मुखें सांगूं काय । त्याची प्रचीति तुला असे ॥ ५१ ॥ त्या वेळींच भूमीवरी । जरी ब्राह्मण असले सदाचारी ! तरी या नास्तिका मान वरी । करतां आली नसती रे ! ॥ ५२ ॥ एक नसल्या सदाचार । घडे ना अघटित प्रकार । शक्ति नसल्या तलवार । जाय करींची गळून ॥ ५३ ॥ बाप्पा ! जैन बुद्धांनीं । राजे घेतले वश करोनी । आणि राजसत्तेच्या जोरांनीं । वैदिक पंथा तुडविलें ॥ ५४ ॥ तुडविलें इतकेंच नाहीं । असंख्य ब्राह्मण मारविले पाही । परी त्यांतून एकानेंहि । घेतलें नाहीं प्रायश्चित्त ॥ ५५ ॥ उलट मारविणें दुबळ्याला । हाच साक्षात्कार मानिला । म्हणून तया हिण-विण्याला । तूं हें ऐसें करिसी गमे ॥ ५६ ॥ कीं आमुचा वैदिक पंथ । केवढा थोर जगतांत । कौतुकेंहि घडल्या यत्किंचित । नातें गुरुशिष्यांचें ॥ ५७ ॥ त्या नाटकी गुरूचा । द्रोह जो लुटुपुटीचा । तोहि करें घडला साचा । प्रायश्चित्त वैदिक घेती ॥ ५८ ॥ हा तुझ्या मनींचा हेत । एकी-

कडे राहील खचित । आणि त्याचा विपरीत । परिणाम होईल ऐसा जगीं ॥ ५९ ॥ जैनबुद्धांचें खरें मत । शब्दसाहित्यें खंडित । केलें म्हणून प्रायश्चित्त । घेणें आलें भट्टपादा ! ॥ ६० ॥ ऐसें भाषण ऐकिलें । भट्टपाद मनीं तोषले । आणि विनयें ऐसें वदते झाले । श्रीमत् शंकराचार्यांना ॥ ६१ ॥ स्वामी ! आपुलें भाषण । केलें मीं अवघें श्रवण । जैन-बुद्धांलागून । मीं न कधीं मान दिला ॥ ६२ ॥ निकेतनाचिये घरीं । मी खचित होतों हेरापरी । याची माझ्या अंतरीं । पूर्णपणें जाणीव आहे ॥ ६३ ॥ जैनबुद्धांच्या चाहत्यांनीं । हें खूळ उठविलें अवनीं । गुरुद्रोह घडला म्हणूनी । भट्टपाद्र प्रायश्चित्त करी ॥ ६४ ॥ तें मला कित्येकांनीं । पुशिलें असे येऊनि । हा एक वर्षापासूनि । गवगवा ऐसा सुरू झाला ॥ ६५ ॥ त्यांत कांहीं नव्हतें सार । म्हणून त्यांच्या प्रश्नावर । नाहीं दिलें उत्तर । त्याचा प्ररिणाम हा झाला ॥ ६६ ॥ तें कांहीं कां म्हणेनात । कंड्या पिकूनिया अमित । श्वानाचिया भुंकण्याप्रत । जुमानी तो गज नव्हे ॥ ६७ ॥ कर्ममार्गा गौरविलें । ईश्वरा न मानिलें । हेंच आहे पाप घडलें । माझ्या करें बलवत्तर ॥ ६८ ॥ त्याच एका पापास्तव । मीं हा योजिला उपाव । इतर गप्पा अवघ्या वाव । त्या खऱ्या मानूं नका ॥ ६९ ॥ आतां माझी विनंती । स्वामी ! एक आपणांप्रति । तुम्हां पाहूनिया चित्तीं । ऐसें वाटूं लागलें ॥ ७० ॥ आपली करावी पाद्यपूजा । शिष्यांकरवीं स्वामिराजा । हा हेतु पुरवा माझा । तारक मंत्र सांगूनिया ॥ ७१ ॥ कां कीं आतां मला उठतां न येत । सोडूनिया अग्नीप्रत । मीं घेतलें आहे व्रत । या अग्नि-प्रवेशाचें ॥ ७२ ॥ माझा संकल्प मोडवूं नका । हीच माझी विनंती देखा । आपण स्वामी ! जाऊं नका । उपदेश तो केल्याविण ॥ ७३ ॥ स्वामी म्हणाले त्यावर । आपण आहांत विद्वान फार । मीं हें केलेलें एकवार । भाष्य आपण पाहावें ॥ ७४ ॥ पाद्यपूजा भिक्षा खरी । मी येथें घेईन साजिरी । अग्नि तुम्हां कांहीं न करी । तो तुमची माता असे ॥ ७५ ॥ भट्टपादा ! आजवरी । कर्ममार्ग भूमीवरी । तुम्हीं आचरिला निर्धारीं । पूर्वमिमांसेप्रमाणें ॥ ७६ ॥ समिधा, दर्भ, स्थंडिल । आज्य, अक्षता, तिळ, हरळ । यांच्यामध्यें तुमचा काळ । आजवरी गेला असे ॥ ७७ ॥ हें काम ज्या केलें देहानीं । तो देह आजदिनीं । समिध शेवटची म्हणोनि । अर्पण करा वैश्वानरा ॥ ७८ ॥ म्हणजे कर्म

जाईल सांगतेप्रत । देह होऊनि भस्मीभूत । आणि घडेल प्रायश्चित्त । ईशासी न मानण्याचें ॥ ७९ ॥ ऐसें म्हणून आपुलें । भाष्य भट्टपादां दाविलें । तें पाहतांच संतोषले । भट्टपाद निज मनीं ॥ ८० ॥ वाहवा आचार्य माउले ! । भाष्य सर्वांगसुंदर झालें । वेदविद्येचें निवटिलें । काठिण्य अवतार धरून ॥ ८१ ॥ या पहिल्याच अध्यायावर । वार्तिकें होतील हजार । आतां न राहिली साचार । वेळ, मला ती करण्याची ॥ ८२ ॥ हेंच जर आपण आधीं येतां । स्वामी ! मला जिंकण्याकरितां । तरी सर्व कांहीं सर्वथा । आलें असतें घडून ॥ ८३ ॥ वादांत मला जिंकून । करविलें असतें अपरोक्ष ज्ञान । तेणें उरलें नसतें कारण । हें प्रायश्चित्त घेण्याचें ॥ ८४ ॥ असो जे झालें तें बरेंच झालें । माझें न कांहीं कार्य उरलें । जिकण्याचें जें कां राहिलें । कार्य तुमचें स्वामी ! मला ॥ ८५ ॥ तें तुम्हीं उरकून घ्यावें । मंडणमिश्रा जिंकून बरवें । त्यास जिंकण्याप्रति जावें । नर्मदातटीं महेश्वरीं ॥ ८६ ॥ तो माझा शिष्य जाणा । आहे नात्यानें मेहुणा । माझी बहीण अंगना । आहे त्याची सरस्वती ॥ ८७ ॥ त्या मंडणा जिंकल्यावर । तोच तुमच्या भाष्यावर । वार्तिकें करील साचार । उत्तमोत्तम पाहा ऐशीं ॥ ८८ ॥ तुमचा आणि मंडणाचा । जेव्हां वाद होईल साचा । तेव्हां निवाडा करण्याचा । सरस्वतीस द्या अधिकार ॥ ८९ ॥ कां कीं साक्षात् सरस्वती । ती आली महीवरती । जिची असे स्पष्टोक्ति । सर्वदाच जगामधें ॥ ९० ॥ कोणाची न भीड तिला । हें गुह्य आपणांला । सांगण्याचें न कारण मला । आपण सर्व जाणतसां ॥ ९१ ॥ आतां भूवरी जगण्याचें । कारण मला न उरलें साचें । अंतकालीं दर्शन तुमचें । झालें, खरा मी भाग्यवान् ॥ ९२ ॥ तुम्ही साक्षात शंकर । नीलकंठ कर्पूरगौर । करावया वेदोद्धार । संन्यास आपण घेतला ॥ ९३ ॥ तुम्ही आधींच जगद्‌गुरु । निज शिष्यांचे कल्पतरु । मुमुक्षूंना प्रत्यक्ष तारूं । भवसागरीं तारावया ॥ ९४ ॥ भट्टपादाच्या आग्रहानीं । पूजा स्वीकारिली स्वामींनीं । भिक्षा ग्रहण करोनि । तारक मंत्र उपदेशिला ॥ ९५ ॥ तो करूनिया ग्रहण । भट्टपादें केलें वंदन । तोंच भडकला हुताशन । चहूंकडून एकसरा ॥ ९६ ॥ असंभाव्य ज्वाला उठती । परि निर्धास्त आसनावरती । भट्टपाद बसले असती । जैसा अचल पर्वत ॥ ९७ ॥ व्योमीं विमानें दाटलीं । भट्टपादा पाहण्या भलीं । शिव-

गणांची गर्दी झाली । आले सामोरे भट्टपादा ॥ ९८ ॥ ज्यांच्यासाठीं एक विमान । आले मोकळें घेऊन । शंख शिंगांचे मधुर स्वन । ऐकूं आले सर्वांना ॥ ९९ ॥ देवांनीं गर्जना केली । भट्टपादाच्या नांवें भली । सुमनें वर्षूं लागलीं । पर्जन्यासम ते ठायां ॥ १०० ॥ जयजय कार्तिकेया कुमारिल-भट्टा ! । हे भट्टपादा सर्वश्रेष्ठा ! । ही जी तुझी कर्मनिष्ठा । जे जे कोणी गातील ॥ १०१ ॥ त्यांना सर्व यागाचें । फळ, पठणेंच मिळेल साचें । ऐसें देव स्वर्गींचे । गर्जिन्नले ते काळीं ॥ १०२ ॥ असो सर्वदेखत । भट्टपाद झाले ब्रह्मीभूत । अग्नीचिया पोराप्रत । भय अग्नीचें वाटेल कां ? ॥ १०३ ॥ जो कार्तिकस्वामी कुमार । अग्निगर्भी झाला थोर । त्याचीच झाली अखेर । ठायींच त्या तुषाग्नीच्या ॥ १०४ ॥ जेवीं जलीं लाट उठली । आणि सवेंच ती विलया गेली । तैशीच ती गोष्ट घडली । अवताराची कुमाराच्या ॥ १०५ ॥ असो, ज्या अग्नींत । शरीर झाले भस्मीभूत । तो अग्नि समूळ शांत । होता जेव्हां जाहला ॥ १०६ ॥ तेव्हां त्याचा अंगारा । जो तो येऊन भालीं खरा । लावूं लागला एकसरा । तें कौतुक सांगूं किती ? ॥ १०७ ॥ एवंच त्या जागेवर । रक्षा न राहिली चिमूटभर । जे जे कोणी खरेंच थोर । त्यांचेच होय कौतुक असे ॥ १०८ ॥ असो पुढें आचार्य तेथूनि । निजशिष्यांसी घेऊनि । जावया निघाले जाणी । महेश्वर क्षेत्राकरणें ॥ १०९ ॥ भट्टपाद गेल्याची । वार्ता सर्वत्र पसरली साची । गोष्ट त्यांच्या मृत्यूची । कथिती विविध प्रकारें ॥ ११० ॥ कोणी कोणी ऐसें म्हणती । जैन-बुद्धांची घडली होती । हत्या भट्टपादांप्रति । म्हणून अग्नीस देह दिला ॥ १११ ॥ कोणी म्हणती ईश्वर । अवमानिला साचार । म्हणून त्याचा परिहार । व्हावया कृत्य केलें हें ॥ ११२ ॥ कोणी ऐसें म्हणतात । हा कर्ममार्गी होता रत । म्हणून देहसमिध साक्षात् । त्यानें अर्पिली अग्नीला ॥ ११३ ॥ ऐशीं हीं तीन मतें । सांगितलीं मीं तुम्हांतें । त्यांचा निर्णय आपुल्या मतें । लावून घ्यावा तुमचा तुम्ही ॥ ११४ ॥ इति श्रीदास-गणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ११५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सतरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे शूर्पकर्णा गजानना ! । हे गौरीच्या नंदना ! । वक्रतुंडा परिपूर्णा ! । चतुर्भुज चिंतामणि ! ॥ १ ॥ तूंच प्रत्यक्ष तत्त्वमसि । श्रुति गर्जना करी ऐशी । अध्यात्मविद्याकलांसी । आरंभ झाला तुझ्यापून ॥ २ ॥ तूं शंकराचा प्रिय पुत्र । हें प्रसिद्ध आहे सर्वत्र । असंख्य राक्षसांचें सत्र । केलेंस आपुल्या फरशानें ॥ ३ ॥ तूंच देवा सच्चिद्धना । विधिहरिहरां गजानना । तूंच केलें साह्य पूर्ण । व्यासवाल्मीकि कवींना ॥ ४ ॥ हे मयूरेश्वरा दयाघना ! । माझी न करी वंचना । मी अनन्य तुझ्या चरणां । अवघे हेतु पूर्ण करी ॥ ५ ॥ तमाल शालिनीच्या तीरीं । श्रीमत् शंकराचार्य साक्षात्कारी । निज शिष्यांस ऐशापरी । सांगते झाले तें ऐका ॥ ६ ॥ शिष्य हो ! आज महेश्वरीं । मंडणपंडिताच्या घरीं । श्राद्धतिथि आहे खरी । तयाचिया पितरांची ॥ ७ ॥ मध्यान्हाला दोन प्रहरीं । श्राद्धकर्माभीतरीं । मी पोहोंचल्यास त्याच्या घरीं । विशेष काम होईल ॥ ८ ॥ योगसामर्थ्येंकरून । मी आकाशमार्गे जाईन । एका क्षणांत पोहोंचेन । महेश्वराकारणें ॥ ९ ॥ तुम्ही मागून लवकर या । पायमार्गे तया ठायां । ऐसें शिष्यांस सांगोनिया । आचार्य गुप्त जाहले ॥ १० ॥ एका क्षणांत महेश्वरीं । पोहोंचले त्या नर्मदातीरीं । आन्हिक स्नानसंध्या सारी । माध्यान्हीची उरकली तेथ ॥ ११ ॥ पुसूं लागले लोकांप्रत । येथें कोणत्या आळींत । मंडण पंडित राहतात । त्या घराची खूण सांगा ॥ १२ ॥ तंव मंडणाच्या दोन दासी । आल्या होत्या नर्मदेसी । त्या सदनखूण आचार्यांसी । सांगूं लागल्या येणें रीतीं ॥ १३ ॥

स्वतः प्रमाणं परतः प्रमाणं कीरांगना यत्र गिरं गिरंति ।
द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ १ ॥
फलप्रदं कर्मफलप्रदोजः कीरांगना यत्र गिरं गिरंति ।
द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ २ ॥
जगत्ध्रुवं स्यात् जगदध्रुवं स्यात्कीरांगना यत्र गिरं गिरंति ।
द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ ३ ॥

या वेदत्रयालागून । स्वतः प्रामाण्य वा परतः प्रामाण्य । फल

कर्माचें देतो कोण । ईश्वर अथवा कर्म तें ॥ १४ ॥ जग हें मिथ्या किंवा सत्य । हा वाद आपसांत । ज्याच्या द्वारीं करतात । राघु आणि मैना पाहा ॥ १५ ॥ तेंच मंडण पंडिताचें । सदन समजा तुम्ही साचें । ऐसें वदूनिया वाचें । दासी गेल्या निघून ॥ १६ ॥ तेणें आचार्य थक्क झाले । तपास करीत शहरांत आले । दासीनें जें कथन केलें । तेंच देखिलें प्रत्यक्ष ॥ १७ ॥ मनीं बोलले ऐशापरी । हा मंडण केवढा अधिकारी । गीर्वाण भाषा पाणी भरी । याच्या सदनीं प्रत्यक्ष ॥ १८ ॥ मंडणाचें पुढचें द्वार । बंद होतें साचार । तें पाहून यतिवर । ऐसें करिते जाहले ॥ १९ ॥ योगबलें वरती गेले । आणि चौकांतून खालीं आले । निमंत्रित ब्राह्मणांजवळी बैसले । जाऊन मृगासनावरी ॥ २० ॥ आचार्यांतें पाहूनि । मंडण साशंकित झाला मनीं । पुसूं लागला क्रोधोनि । श्रीमत् आचार्यांकारणें ॥ २१ ॥

मंडण उवाच :— कुतो मुंडी ?'।

हे संन्याशा कोठुनी । तूं आलास सांग झणीं । याच शब्दाचा आचार्यांनीं । अर्थ केला निराळा ॥ २२ ॥

आचार्य उवाच :— आगलात् ।

वरती गळ्यापासून । मीं केलें आहें मुंडण । हे शब्द ऐकून मंडण । गेला फार चिरडीस ॥ २३ ॥

मंडण उवाच :—मया ते पृच्छ्यते पंथाः ।

हे भिक्षो ! तुजप्रत । मुंडण कोठपर्यंत । केलें हें न विचारीत । तव पंथाला विचारितों ॥ २४ ॥

आचार्य उवाच :—किमाह पंथाः ? ।

बरें झालें पंडिता ! । तूं विचारिलें माझ्या पंथा । मग त्या पंथें काय आतां । उत्तर दिधलें सांग तुज ॥ २५ ॥ हें भाषण ऐकून । मंडण गेला संतापून । बोलता झाला गर्जून । अपशब्द श्रीआचार्यांना ॥ २६ ॥

मंडण उवाच :—त्वन्माता मुंडेत्याह ।

पंथांनीं कथिलें ऐसें । तुझी माय विधवा असे । येणें येतें जाहलें हांसें । गालांत श्रीआचार्यांना ॥ २७ ॥

आचार्य उवाच :—(समीचीनं) तथैव हि ।

पंडिता जें बोलला पंथ । तें अवघेंचि आहे सत्य । खोटें न त्यांत

यत्किंचित । तेंच ध्यानीं धरा तुम्ही ॥ २८ ॥ आपुल्या प्रत्येक शब्दाला । हा भिक्षु चकविता झाला । तेणें मंडणपंडिताला । क्रोध विशेष आला कीं ॥ २९ ॥

मंडण उवाच: —अहो पीता किमु सुरा ? ।

हे भिक्षो ! हाय हाय ! तूं दारू पिऊन आलास काय ? । नाहीं उरली मुळींच सोय । तुझ्यासवें बोलण्याची ॥ ३० ॥ आचार्य म्हणाले पंडिता । उगीच कां हो ! ऐसें चिडतां । धरा कांहीं शांतता । रागावणें बरें नव्हे ॥ ३१ ॥

आचार्य उवाच :—नैव नैव श्वेता ।

नाहीं दारूचा वर्ण पीत । ती पंडिता ! आहे श्वेत । भरमसाट शब्दांप्रत । विद्वानांनीं बोलूं नये ॥ ३२ ॥

मंडण उवाच :—किं त्वं जानासि तद्वर्ण ? ।

वाहवा ! वर्ण दारूचा । तुला आहे ठाऊक साचा । मग हा वेष संन्याशाचा । व्यर्थ कां रे ! घेतलास ? ॥ ३३ ॥

आचार्य उवाच :—अहं वर्ण भवान् रसम् ।

वर्ण नुसता ठावा मशीं । तिची रुचि तूंच जाणसी । ती न कळे इतरांसी । तेथें स्वानुभव पाहिजे ॥ ३४ ॥

मंडण उवाच :—

कंथां वहसि दुर्बुद्धे ! गर्दभेनापि दुर्वहाम् ।
शिखा यज्ञोपवीताभ्यां कस्ते भारो भविष्यति ॥ १ ॥

मूर्खा ! एका गाढवासी । भार होईल कंथा ऐशी । तनूवरी वागविशी । आणि त्राससी शेंडी-जानव्यांना ॥ ३५ ॥

आचार्य उवाच :—

कंथां वहामि दुर्बुद्धे ! तव पित्रापि दुर्भराम् ।
शिखा यज्ञोपवीताभ्यां श्रुतेर्भारो भविष्यति ॥ २ ॥

हे महापंडिता मंडणा ! । उग्या न करी वलगना । ही कंथा उगीच ना । हिचें महत्त्व फार असे ॥ ३६ ॥ जी तुझ्या बापालाहि । मुळीं उचलतां आली नाहीं । तीच मी या बालवयीं । सहज वाहिली देहावर ॥ ३७ ॥ उचलण्याचें कंथेप्रत । बळ न तुझ्या बापांत । तो राहिला क्रीडा करीत । गर्दभासम स्त्रियेसी ॥ ३८ ॥

मंडण उवाच :—त्यक्त्वा पाणिगृहीतीं स्वामशक्त्या परिरक्षणे ।
शिष्यपुस्तकभारेच्छोर्व्याख्याता ब्रह्मनिष्ठता ॥ ३ ॥

हां समजलें इंगित । तुझें भिक्षो ! मजप्रत । अंगीं न उरली ताकद । धर्मपत्नी वागवावया ॥ ३९ ॥ शिष्य तैसें समजून ग्रंथ । ब्रह्मनिष्ठाचें सोंग सत्य । आणवून प्रौढी जगतांत । आपली वाढवूं पाहसी ॥ ४० ॥ धिक्कार असो सर्वथा तुला । तैसाच तुझ्या कृत्याला । तूं खराच नाश केला । या कावेचा निरर्थक ॥ ४१ ॥

आचार्य उवाचः—गुरुशुश्रूषणालस्यात्समावर्त्य गुरोः कुलात् ।
स्त्रियाः शुश्रूषमाणस्य व्याख्याता कर्मनिष्ठता ॥४॥

मंडण ! आपुल्या दोषासी । तूं न मुळीं पाहसी । शब्दसाहित्यें इतरांसी । दूषण देसी हें बरें नव्हे ॥ ४२ ॥ गुरुकुलाला पराङ्मुख । गुरुसेवा न केली देख । करीत बैसला कौतुक । सदनीं आपुल्या बायकोचें ॥ ४३ ॥ ही कां तुझी कर्मनिष्ठा । सांग सांग मला भ्रष्टा ! । कर्मपंथाच्या वाटा । चालावया तूं न योग्य ॥ ४४ ॥

मंडण उवाचः—स्थितोसि योषितां गर्भे ताभिरेव विवर्धितः ।
अहो कृतघ्नता मूर्ख ! कथं ता एव निंद्यसि ॥ ५ ॥

वाहवा ! तुझी अक्कल भली । भिक्षो ! फार वाढली । ती अनायासें कळून आली । या तुझ्या भाषणानें ॥ ४५ ॥ ज्या स्त्रियांनीं तुजप्रत । वाहिलें असे गर्भाप्रत । पुढें सोशिलें दुःख अमित । प्रसूतीच्या वेळेचें ॥ ४६ ॥ तुझें लालन, पालन । ज्या स्त्रियांनीं केलें जाण । त्या स्त्रियांना दूषण । तूं लाविसी ज्ञानांधा ॥ ४७ ॥

आचार्य उवाचः—यासां स्तन्यं त्वया पीतं यासां जातोसि योनितः ।
तासु मूर्खतम, स्त्रीषु पशुवद्रमसे कथं ? ॥ ६ ॥

हे अरण्यपंडिता ! । कळली तुझी योग्यता । ज्या स्त्रियांचें दूध पिता । झालास तूं बाळपणीं ॥ ४८ ॥ आणि ज्या स्त्रियांपासून । मूर्खा ! तुझें झालें जनन । त्या स्त्रीजातीचें सेवन । पशूप्रमाणें करिसी तूं ॥४९॥

मंडण उवाचः—"वीरहत्यामवाप्नोसि वन्हिनुद्वास्य यत्नतः ।"

अरेरे ! अग्नीचा । म्हणजे गार्हपत्य आहवनीय दक्षिणाग्नीचा । केलास ना स्वीकार साचा । तेणें दोषी ठरलास ॥ ५० ॥ वीरहत्या, इंद्रहत्या । ह्या बैसल्या तुझ्या माथा । कशास नरोळें केलें वृथा । आपुल्या

त्या टाळक्याचें ! ॥ ५१ ॥

आचार्य उवाचः—" आत्महत्यामवाप्तस्त्वमविदित्वा परं पदं । "

अरे परमपदासी । तूं जाणणें विसरलासी । त्यायोगें जाहलासी । तूंच आत्महत्यारा ॥ ५२ ॥ आत्महत्या अवघ्यांत । मोठी टाकिते नरकांत । यमलोकीं कल्पपर्यंत । याची सुटका होणें नको ॥ ५३ ॥ भ्रूणहत्या, वीरहत्या । स्त्रीहत्या, बालहत्या । या न पासंगा येती पुरत्या । त्या आत्महत्येच्या ॥ ५४ ॥ ती तूंच केलीस । म्हणजे गाय मारलीस । आणि मांजर पाळलीस । पुण्यसंचय व्हावया ॥ ५५ ॥ सर्व शक्तिमान ईशास । पूजन करणें सोडलेंस । आणि भूत वेताळ पिशाच्चांस । आणवून बसविलें देव्हारीं ॥ ५६ ॥

मंडण उवाचः—" दौवारिकान् वंचयित्वा कथं स्तेनवदागतः । "

फसवून द्वारपालांसी । ज्या अर्थी आंत. आलासी । त्या अर्थी निश्चयेंसी । चोर तूं हें वाटे मज ॥ ५७ ॥

आचार्य उवाचः—" भिक्षुभ्योऽन्नमदत्वा त्वं स्तेनवद्भोक्ष्यसे कथम् ? । "

मी नव्हे तूंच चोर । कळून चुकलें साचार । उगी न करी चरचर । आपुल्या या पांडित्याची ॥ ५८ ॥ भाग भिक्षूचा भिक्षूला । न देतां सेविसी भला । हा कां साहूपणा झाला । सांग तुझा मजलागीं ? ॥५९॥ आपणां प्रत्येक शब्दांत । भिक्षु हा करी कुंठित । त्यायोगें पंडिताप्रत । राग आला मनस्वी ॥ ६० ॥ परी उगीच बसवेना । अपमानहि साहेना । जेंवि शेंदाड शिपायांना । स्फुरण येतें बोलण्याचें ॥ ६१ ॥

मंडण उवाच :–" कर्मकाले न संभाष्य अहं मूर्खेण संप्रति । "

भिक्षू तुझ्या वटवटीप्रत । बंद एका झपाट्यांत । मी करीन आज येथ । परी एक अडचण आली ॥ ६२ ॥ सध्यां मी गुंतलों कर्मांत । अशा वेळीं मूर्खाप्रत । भाषण करणे हें न उचित । मजसारख्या कर्मठा ॥ ६३ ॥ तें ऐकून आचार्य हंसले । मंडणासी बोलते झाले । या भाषणें कळून आलें । किती विद्वान् आहेस तूं ! ॥ ६४ ॥

आचार्य उवाच :—" अहो प्रकटितं ज्ञानं यतिभंगेन भाषिणा । "

अरे संभाष्य आणि अहं । येथलें तूं शोधी वर्म । तेथच्या यतीकडून धाम । पावलास अपजयाचें ॥ ६५ ॥ तो यतिभंग झाल्याचें । मर्म पंडिता कळलें साचें । बोलण्याच्या भरांत त्याचें । नाहीं राहिलें स्मरण तया

॥ ६६ ॥ परि अवसान आणून। करिते झाले भाषण। ते पंडित मंडण। हें आचार्यांकारणें ॥ ६७ ॥

मंडण उवाच -- " यतिभंगे प्रवृत्तस्य यतिभंगो न दोषभाक्। "

यतीच करण्या नामशेष। मी जन्मलों महीस। म्हणून मला नाहीं दोष। यतिभंगाचा समज हें ॥ ६८ ॥

आचार्य उवाच -- " यतिभंगे प्रवृत्तस्य पंचम्यंतं समस्यताम्। "

यतिभंग हा समास। न करी षष्ठीतत्पुरुष। तोच पंचमी तत्पुरुष। केल्यास काम होईल कीं ॥ ६९ ॥

मंडण उवाच :--क्व ब्रह्म क्व च दुर्मेधाः क्व संन्यासः क्व वा कलिः।
स्वाद्वन्नभक्ष्यकामेन वेषोऽयं योगिनां धृतः ॥

बोलूं नको कळलें कळलें। तुझें वर्म मला सगळें। तूं हें निव्वळ स्वीकारिलें। सोंग गोड खाण्यास्तव ॥७०॥ तें ब्रह्म कोणीकडे। तुझी दुर्बुद्धि कोणीकडे। हीं भगवीं लक्तरें कोणीकडे। कोणीकडे तें कलियुग ॥७१॥ कशास कशाचा मेळ नाहीं। शब्दसाहित्ये पांडित्य पाही। करी न चावटा ये ठायीं। वेळ न तें मज ऐकण्या ॥ ७२ ॥

आचार्य उवाच :--क्व स्वर्गः क्व दुराचारः क्वाग्निहोत्रं क्व वा कलिः।
मन्ये मैथुनकामेन वेषोयं कर्मिणां धृतः ॥

मला जें बोलिलासी। तें अवघेंच लागे तुसी। उगी न आणी सोंगासी। या गृहस्थाश्रमाच्या.॥७३॥ स्वर्ग तो कोणीकडे। तुझें दुष्कर्म कोणीकडे। अग्निहोत्र कोणीकडे। आणि कोणीकडे हें कलियुग ॥ ७४ ॥ पोथ्या पाहून कांहीं तरी। तूं करितोस भूमीवरी। खेळ गारुड्याच्यापरी। या कर्मकांडाचा ॥७५॥ मनगटासी मनगट भेटे। तेव्हांच कळे खरें खोटें। अंधश्रद्धेचिया वाटें। निमूटपणें चालती मूर्ख ॥७६॥ वादविवाद करावा। खराखोटा पडताळावा। तेव्हांच विश्वास ठेवावा। येरव्हीं नव्हे ॥७७॥ वाद झाला त्या ठिकाणीं। व्यास आणि जैमिनी। बैसले होते येऊनी। ब्राह्मणाच्यारूपांनीं ॥७८॥ त्यांपैकीं श्रीव्यास। बोलले मंडणपंडितास। अरे! ज्यांनीं केला संन्यास। ब्रह्म तें जाणावया ॥ ७९ ॥ ज्यानें ब्रह्म जाणिलें। षड्रिपूला जिंकलें। मोक्षासाठीं सोडिलें। पाणी जयानें संसारीं ॥ ८० ॥ ऐशा योग्य यतीस। तूं न लावणें कदा दोष। चालून येतां गृहास। गृहस्थें करावी त्याची पूजा ॥ ८१ ॥ म्हणून आपली सदाचारता। तूं

न टाकी सर्वथा। हे मंडणपंडिता ! । यतीस या पूजी तूं ॥ ८२ ॥ ऐशापरी वदतां व्यास । मंडणा झाला संतोष । त्यांनीं अर्घ्यपाद्यांस । आणून पूजिलें स्वामींना ॥ ८३ ॥ पूजन यथासांग केलें । त्या विष्णु-स्वरूप मानिलें । आणि यथाविधि देते झाले । भिक्षेचें त्या आमंत्रण ॥ ८४ ॥ आचार्य म्हणती पंडिता । माझें वचन ऐक आतां । शांतपणानें सर्वथा। उतावीळपण नाहीं बरें ॥ ८५ ॥ अन्नभिक्षेसी विशेष । मला नाहीं जरुरी खास । थांबेन तूं घालीत असल्यास। वादभिक्षा मजकारणें ॥ ८६ ॥ फार उत्तम यतिवर्या ! । वादभिक्षा घालावया । तत्पर असें मी ये ठायां । त्याची मला हौस मोठी ॥ ८७ ॥ चिंता कांहीं करूं नका। वादभिक्षा घालीन देखा । अतिथि तुझ्यासारखा । विन्मुख लावणें बरें नव्हे ॥ ८८ ॥ मी आजपर्यंत । वादीयाची वाट होतों पाहत । तो सफल झाला माझा हेत । भिक्षो ! तुम्ही आल्यानें ॥ ८९ ॥ आतां भोजनोत्तर । वाद करूं साचार । भरून गेले दोन प्रहर । आतां थांबणें बरें नव्हे ॥ ९० ॥ अवघ्यांचीं भोजनें झालीं । मंडळी एक्या ठायीं बसली । तों पुन्हां निघाली। वादाची ती गोष्ट श्रोते ! ॥ ९१ ॥ पंडित म्हणती आचार्यांना । तूं योग्य करण्या वादाला । आहेस कां नाहीं ह्याच पडला । पेंच मशीं ये ठायां ॥ ९२ ॥ तूं अल्पवयी साचार । मी वयानें आहें थोर । तुझ्या माझ्यांत अंतर । आहे जमीनअस्मानांचें ॥ ९३ ॥ तवसवें वाद केल्यास । लोक मलाच देतील दोष । म्हणतील जिंकल्या कोल्ह्यास । नाहीं महत्त्व वाघांचें ! ॥ ९४ ॥ ढेकूण होऊन शिरजोर । आला मारुतीच्या समोर । लढावयासी साचार। बला न आपुल्या जाणतां ॥ ९५ ॥ तेथें हनुमान ब्रह्मचारी । न जाय ढेकुणावरी । तो त्याची उपेक्षाच करी । मूर्ख तया समजून ॥ ९६ ॥ तोच प्रसंग आज मला । ये ठायीं प्राप्त झाला । हे बालसंन्याशा ! आपुला । हट्ट सोडावा हें बरें ॥ ९७ ॥ अरे ! सहस्रमुखांच्या शेषला । मशीं वाद करण्याला । सामर्थ्य नाहीं तेंच मुला ! । आलें कैसें हें न कळे ॥ ९८ ॥ उगीच तुटपुंजें व्याकरण । आला असशील शिकून । हें काषायवस्त्र पांघरून । ऐट ज्ञात्याची आणूं नको ॥ ९९ ॥ मी मीमांसक आहें पुरा । ईश्वरासी न मानणारा । कर्मकांडाचा पसारा । मशीं सारा अवगत असे ॥ १०० ॥ सिंहगर्जना जोंवरी । नाहीं झाली कांतारीं । कोल्हेकुई तोंवरी । अरण्या-

माजीं होतसे ॥ १०१ ॥ अजून याचा विचार करी । शब्द घे आपुले माघारी । उगीच मोठ्यांची बरोबरी । अर्भकांनी करूं नये ॥ १०२ ॥ मग आचार्य बोलले । तुमचें सर्व ऐकिलें । हातचें कांकण पाहण्या भलें । नाहीं आरशाचें प्रयोजन ॥ १०३ ॥ शब्द मागें घेण्यास । मी न आलों महेश्वरास । ऐकून तुझ्या कीर्तीस । वादभिक्षा मागितली ॥ १०४ ॥ पंडित तें ऐकून । करिता झाला भाषण । बरें आहे उद्यांपासून । वाद आपुला सुरूं करूं ॥ १०५ ॥ व्यास आणि जैमिनीला । मंडणपंडित बोलला । आपण आमच्या वादाला । असा उभयतां साक्षीदार ॥ १०६ ॥ बोलले व्यास जैमिनी । अन्य साक्षी नकोत कोणी । मंडण तुझी कामिनी । करील वादाचा निवाडा ॥ १०७ ॥ तिला अध्यक्ष नेमावें । प्रत्येकानें करावें । कांहीं बरव्या प्रतिज्ञेतें । म्हणजे रंग येईल ॥ १०८ ॥ ऐसें अवघ्यांनीं ठरविलें । जे ते आपुल्या स्थानीं गेले । श्रीमत् आचार्य येते जाहले । नर्मदातटीं शिवलायीं ॥ १०९ ॥ ताबडतोब मंडणानें । विद्वानां धाडिलीं आमंत्रणें । स्वशिष्याच्या हातानें । आळोपाळी चोंहीकडे ॥११०॥ मंडणपंडिताची कीर्ति । आधींच लोकांस माहीत होती । प्रत्येकास आतुरता ती । झाली वादश्रवणाची ॥१११॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ११२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय अठरावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जय जय कृपार्णवा कृपाराशि ! । तूं सर्वदा संरक्षिसी । आपुल्या परम भक्तांसी । विसंबसी न कदा तया ॥ १ ॥ प्रल्हाद भक्तासाठीं भलें । तूंच अग्नीस शीतल केलें । प्रल्हाद खरा करण्यातें । दारुकास्तंभीं प्रगटलास ॥ २ ॥ सुदाम्याच्या पोह्यास । तूं आदरें भक्षिलेंस । दारिद्र्य त्याचें नासण्यास । दिली तूं त्या सुवर्णपुरी ॥ ३ ॥ ऐशी तुझी विमल कीर्ति । शास्त्र पुराणें वाखाणती । पाव पाव गा जगत्पति ! । या दासगणूकारणें ॥ ४ ॥ दैन्य, दुःख, पाप, चिंता । हरण करी रे अनंता ! । नाहीं नाहीं कुणी त्राता । या दासगणूकारणें

॥ ५ ॥ असो मंडणानें आपुल्या घरीं । केली सभेची तयारी । दिवाण-खान्यामाझारीं । प्रशस्त जागा पाहून ॥ ६ ॥ मध्यभागीं सिंहासन । दोन बाजूंस आणखी दोन । सभा केली शोभायमान । नाना बिछायती घालूनिया ॥ ७ ॥ एकमेकांसमोर । गालिचे असती थोर थोर । लोड तक्क्या साचार । टेकावयाकारणें ॥ ८ ॥ एका बाजूस वैदिक । जटाघन-पाठी देख । प्रत्येकाच्या शिरीं सुरेख । टोप्या असती बनातीच्या ॥ ९ ॥ भालीं त्रिपुंड्र चंदनी । पदक्रमांपर्यंत कोणी । अध्ययन आले करोनि । शासनरूप वेदांचें ॥ १० ॥ वैदिकांच्या समोर । शास्त्रीपंडित थोरथोर । त्यांच्या पदव्यांचा प्रकार । सांगतां भारत होईल ॥ ११ ॥ काव्यतीर्थ कोणी कोणी । कोणी श्रेष्ठ वैयाकरणी । महामहोपाध्याय कोणी कोणी । कोणी कोणी न्यायरत्न ॥ १२ ॥ शुभ्र अंगरखे अंगांत । भव्य पागोटीं डोक्यांत । कित्येकांच्या झळकतात । बोटांमधुनी मुद्रिका ॥ १३ ॥ उभयतांच्या मागें गृहस्थ । बसले वाद ऐकण्याप्रत । गोसावीबैरागी शुचिर्भूत । होऊनिया तेथ आले ॥ १४ ॥ एवंच वेदां मानणारे । चतुर्वर्ण आले सारे । पाहा ! केवढें होतें खरें । महत्त्व तेव्हां वेदांचें ॥ १५ ॥ नातरी हल्लीं भूमीवरी । बहुतेक फिरले वेदांवरी । जे ब्राह्मणाच्या आले उदरीं । तेहि निंदिती वेदांतें ॥ १६ ॥ हल्लीं हेच चार वर्ण । एकमेकांचें निर्मूलन । करण्या बसले होऊन । तया सर्व बाजूंनीं ॥ १७ ॥ त्याचें वर्णन करूं जातां । उगीच वाढेल भाकडकथा । उकिरड्याचें वानूं जातां । महत्त्व, भेट घाणीची ॥ १८ ॥ असो, मंडणाचें बोलावणें । मान्य केलें सर्वत्रानें । एकेक क्रमाक्रमानें । आसनीं येऊन बसले कीं ॥ १९ ॥ श्रीमत् आचार्यज्ञानतरणी । आन्हिका आपुल्या आटोपूनि । येते झाले सभा-स्थानीं । वाद करण्या मंडणासवें ॥ २० ॥ आचार्य येतां उत्थापन । दिलें अवघ्यांनीं उठून । सभेच्या व्यवस्थापकानं । सिंहासनीं बसविलें त्यां ॥ २१ ॥ मागून आपुल्या भार्येसहित । आले मंडणपंडित । आचार्यांच्या सन्मुख सत्य । बसते झाले सिंहासनीं ॥ २२ ॥ मधल्या मुख्य सिंहासनीं । बसली पतीच्या आज्ञेनी । सरस्वती ती येवोनि । वादनिवाडा करण्यास ॥ २३ ॥ मग आचार्य उठून । अवघ्या सभेस लक्षून । प्रतिज्ञा-पूर्वक भाषण । ऐसें करिते जाहले ॥ २४ ॥ ब्रह्म हेंच आहे सत्य । त्याविण न कांहीं जगतांत । हेंच मी सिद्ध करीन येथ । आधारें श्रुतिस्मृ-

तोंच्या ॥ २५ ॥ तें न सिद्ध झालें जरी । संन्यासदीक्षा टाकीन तरी । आणि लग्न करून भूमीवरी । गृहस्थाश्रमा आचरीन ॥ २६ ॥ त्या माझ्या वादाचा । सरस्वती निवाडा करील साचा । तिनें दिलेल्या निर्वाणाचा । स्वीकार आम्ही दोघें करूं ॥ २७ ॥ मग प्रतिज्ञा मंडणपंडित । ऐशी करिते झाले तेथ । कर्म हेंच अवघ्यांप्रत । मूळ कारण असे कीं ॥ २८ ॥ पूर्वमीमांसा ज्याकारण । करिती झाली आहे मान्य । तें कर्म अवघ्यांकारण । हें सिद्ध करीन मी ॥ २९ ॥ तें सिद्ध माझ्या हस्तें । जरी न झालें अहो श्रोते ! । तरी मी चतुर्थाश्रमातें । तत्काळ धारण करीन ॥ ३० ॥ निकाल या वादाचा । मम भार्या देईल साचा । तोच मान्य करावयाचा । आहे आम्ही उभयतांनीं ॥ ३१ ॥ मग शारदा अंबा सरस्वती । ऐसें झाली बोलती । पाहून त्या सभेप्रति । तें ऐका सांगतों ॥ ३२ ॥ या उभयतांच्या वादाचें । काम निवाडा करण्याचें । आलें आहे मजकडे साचें । या दोघांच्या संमतीनें ॥ ३३ ॥ म्हणून मी ऐसें करितें । हें सुमनहार दोघां घालितें । आणि तुम्हां सांगून ठेवितें । स्पष्टपणें तें ऐका ॥ ३४ ॥ हार ज्याच्या गळ्यांतील । कोमेजला जाईल । तोच हरला हें होईल । प्रख्यात या जगामध्यें ॥ ३५ ॥ ऐसें बोलून हार घातिले । सरस्वतीनें दोघां भले । उभयतांना वंदन केलें । आणि गेली निघून ॥ ३६ ॥ वादास झाला आरंभ । श्रोते जैसे सभास्तंभ । सागरामाजीं जैसें अंभ । तैसे ग्रंथ उभयांपुढें ॥ ३७ ॥ बहुत कालपर्यंत । वाद चालला असे तेथ । तों आचार्यांचे शिष्य समस्त । येऊन तेथें पोहोंचले ॥ ३८ ॥ शिष्य त्या उभयतांचे । गुरु आज्ञेनुरूप साचे । आधार काढून पुस्तकांचे । दाखवूं लागले विबुध हो ! ॥ ३९ ॥ शृंगारविषय चैनीजनां । गान विषय गवय्यांना । तेंवि वादविषय पंडितांना । आनंददायी होतसे ॥ ४० ॥ वा आगंतुकासी पक्वान्न । भिक्षुकाला दक्षिणा जाण । वा वारांगनेसी तारुण्य । वाटे असावें सर्वकाळ ॥ ४१ ॥ तेंवि शास्त्रवाद पंडितासी । आवडतो अहर्निशीं । वा व्यावहारिक तंटे वकिलासी । ब्रह्मस्थानीं वाटतात ! ॥ ४२ ॥ असो, वाद ऐकतां श्रोते । मयूरापरी डोलत होते । चंद्रप्रभा मोदविते । जेंवि चकोर पक्ष्यांना ॥ ४३ ॥ हा भूमीवर थाट झाला । आतां गगनींचा राहिला । आलें वाद ऐकण्याला । देव, मुनि, गंधर्व ॥ ४४ ॥ यम, इंद्र,

अग्नि, वरुण । कुबेर, विष्णु, चतुरानन । वसिष्ठ, भृगु, वैशंपायन । शांडिल्य, पाराशर, जमदग्नि ॥ ४५ ॥ अत्रि, वामदेव, विभांडक । कौंडिन्य, अंगिरा, कपिल, शुक । जैमिनी, कणाद, पाणिनी देख । ऐसे ज्ञाते मिळाले ॥ ४६ ॥ प्राणवाह रघु, विदेही जनक । पुरूसम राजे पुण्यश्लोक । वाद ऐकण्या आले देख । अंतरिक्षांत विमानीं ॥ ४७ ॥ ऐसा तेथें पंधरा दिवस । वाद चालला सभेस । हार कोणी कोणास । जाईनात ऐसें जाहलें ॥ ४८ ॥ जे जें बोलला मंडण । त्याचें त्याचें खंडण । तत्काळ टाकिलें करून । पुण्यश्लोक आचार्यांनीं ॥ ४९ ॥ मग मंडण म्हणाला । श्रीमत् शंकराचार्यांना । जीवेश्वराच्या ऐक्याला । प्रमाण नसे श्रुतीस ॥ ५० ॥ जीवेश्वराचें जेथ जेथ । तुम्ही ऐक्य करितां प्रस्थापित । तेथें उपनिषद् वाक्यें त्यांप्रत । प्रमाण म्हणून देतां तुम्ही ॥ ५१ ॥ परि उपनिषद् वाक्यांसीं । पुरुषार्थत्व न निश्चयेंसी । म्हणून उपनिषद् वाक्यांसी । प्रमाण आम्ही मानूं न कदा ॥५२॥ तें आचार्यांनीं ऐकिलें । निव्वळ श्रुतीचे आधार दिले । मग सहज खुंटलें । वादघोडें पंडिताचें ॥ ५३ ॥ इकडे मंडणाच्या गळ्यांतला । हार तोहि सुकून गेला । विजयानें घातिली माळा । आचार्यांच्या कंठांत ॥ ५४ ॥ त्या महासभेंत । मंडण बसला खालीं पाहत । सरस्वतीचें पडलें मत । जय झाला आचार्यांचा ॥ ५५ ॥ सरस्वती सर्व लोकांना । म्हणाली कीं आज भला । आचार्यांचा जय झाला । अद्वैत सिद्धांत खरा असे ॥ ५६ ॥ ब्रह्म हेंच जगाचें । उपादान कारण आहे साचें । म्हणून अन्य मताचें । कोणी ग्रहण करूं नये ॥ ५७ ॥ ऐसें सर्वांस सांगितलें । उभयतांस भोजना नेलें । भोजन मुळींच नाहीं रुचलें । मंडणपंडितास तया दिनीं ॥ ५८ ॥ पुत्रशोक म्हातारपणीं । वा भ्रतारमृत्यूनें सुवासिनी । तैसा अपमान जाचक जाणी । होतो विद्वानांकारणें ॥ ५९ ॥ भोजनोत्तर सरस्वती । आचार्यां झाली बोलती । महाराज आज्ञा मजप्रति । असावी आतां जावया ॥ ६० ॥ पूर्वीच्या अवघ्या वृत्ता । आहांत आपण जाणतां । दुर्वासाचा झाला होता । शाप तो मजकारणें ॥६१॥ तूं मृत्युलोकीं जन्मशील । मंडणपत्नी होशील । तेथें तव पतीला जिंकील । वादामाजीं एक यति ॥ ६२ ॥ तो यति साक्षात् । नीलकंठ भोलानाथ । त्याचें दर्शन तुजप्रत । तुझ्या सदनीं होईल जेव्हां ॥ ६३ ॥

त्याच दिनीं मुक्तता । होईल शापाची तत्त्वता । ती वेळ घडून आतां । आली आहे आजदिनीं ।। ६४ ।। म्हणून आज्ञा आनंदानें । द्यावी स्वामी मजकारणें । मी आपुल्या दर्शनानें । धन्य धन्य झालें कीं ! ।। ६५ ।। ही सरस्वतीची विनंती । आचार्यांनीं आणून चित्तीं । बोलते झाले तिजप्रति । आपुल्या मधुर वाणीनें ।। ६६ ।। हे सरस्वती शारदे माते ! । अवघेंच कांहीं तुला कळतें । दुर्वासाचें काय होतें । शाप देण्याचें कारण तुला ।। ६७ ।। हें नीट आण ध्यानांत । म्हणजे ऐसें न वदसी सत्य । पुढील अवघें भाकित । जाणलें होतें मुनींनीं ।। ६८ ।। तूं आणि मंडण । तैसा कुमारिलभट्ट जाण । कां झालों अवतीर्ण । या मृत्युलोकामधीं ।। ६९ ।। याचा पोक्त विचार करी । तूं जाणिवेची देवता खरी । तुझी कृपा झाल्यावरी । पंगुहि लंघे पर्वता ।। ७० ।। येथून जावयाकारण । जें उतावीळ झालें तुझें मन । त्याचें करितों बंधन । अरण्यदुर्गा मंत्रांनीं ।। ७१ ।। म्हणजे त्या तुझ्या मना । येता होईल स्थिरपणा । येथील कामे झाल्याविना । जाणें न कदा होईल तुझें ।। ७२ ।। शिवाय ये अवतारीं । तूं मंडणपंडिताची अस्तुरी । पतिपत्नी मिळून खरी । व्यक्ति होय गृहस्थाची ।। ७३ ।। म्हणून अर्धांगा जिंकिलें । अर्धांग तसेंच राहिलें । तें पाहिजे आणिलें । पूर्णपणें विचारीं ।। ७४ ।। ऐसा इशारा मिळतां क्षणीं । सरस्वती संतोषली मनीं । आचार्यांतें वंदूनि । गेली निघून निमूटपणें ।।७५।। आचार्यहि शिष्यांसहित । आले शिवालयांत । मंडणपंडिताच्या मनांत । एक खुटखूट राहिली ।। ७६ ।। मंडणमिश्रबिऱ्हाडीं । आले आचार्य तांतडी । आपुल्या मनाची ती आढी । निवटावयाकारणें ।। ७७ ।। आचार्या म्हणे पंडित । मी वादांत झालों पराभूत । त्याचें न मला वाटत । वाईट फारसें ये काळीं ।।७८।। परी जे सर्वज्ञतेचे सागर । कर्ममार्गाचे प्रभाकर । मीमांसाशास्त्र जें कां थोर । त्याचा प्रत्यक्ष कर्ता जो ।। ७९ ।। ऐसें तें सर्वमान्य जैमिनीमत । तुम्हीं केलें खंडित । याचें राहून वाटत । दुःख मशीं अनावर ।। ८० ।। म्हणून सांगा मज आतां । काय जैमिनी ज्ञानी नव्हता । त्यानें भरमसाट गाथा । लिहिला कां हा मीमांसा ।। ८१ ।। आचार्य म्हणती पंडितासी । तूं येथेंचि चुकतोसी । जैमिनी होते ज्ञानराशि । येविषयीं शंका नसे ।। ८२ ।। परी त्यांच्या सूत्राचा । अंतर्गत अभिप्रायाचा । तूं न विचार

केला साचा । मीमांसा पाहिली वरवर ।।८३।। वरवरीच्या पाहण्याप्रत । खोली-रुंदी न कळून येत । पूर्वमीमांसा हें शास्त्र । उत्तरमीमांसे-साठीं केलें ।। ८४ ।। बाळपणींचे व्यवहार । थोरपणीं न वाटती सार । त्यांतलाच हा प्रकार । त्याचें वाईट मानूं नको ।। ८५ ।। पंडिताच्या सर्व शंका । आचार्यांनीं निवटिल्या देखा । परी म्हणण्यासारखा । उपयोग त्याचा झाला नसे ।। ८६ ।। मंडणपंडित घरीं आले । मृगा-सनावरी बैसले । आणि अनन्य भावानें ध्यान केलें । जैमिनीच्या स्तुतीस या ।। ८७ ।। ऐसें ध्यान करिताक्षणीं । प्रगट झाले जैमिनी । वदले पंडिता-लागूनि । डोळे उघडून पाहा आतां ।। ८८ ।। डोळे उघडून पाहतां । दिसले जैमिनी तत्त्वतां । तयांचिया चरणीं माथा । ठेवता झाला मंडण ।। ८९ ।। जैमिनी म्हणती दुःखित । तूं न हो ऐसा किंचित । माझें शास्त्र पाया खचित । आहे वैदिक पंथाचा ।। ९० ।। इमारतीची बरोबरी । पाया न तो कधीं करी । कर्ममार्गा पाहा सरी । ज्ञानमार्गाची येणें नसे ।। ९१ ।। तैसेंच आहे पाहा येथ । स्वामींनीं जो कथिला अर्थ । तोच आहे पाहा सत्य । येथें शंका घेणें नको ।। ९२ ।। आचार्य न सामान्य विभूति । तो साक्षात् दक्षिणामूर्ति । आला आहे स्थापण्याप्रति । अद्वैत पंथ जगतीतला ।। ९३ ।। तयास तूं जाऊन शरण । चुकीव आपुलें जन्ममरण । अद्वैताचा अभिमान । धरणें भाग येथूनिया ।। ९४ ।। ह्री आली साच पर्वणी । हें मंडणा ! तुजलागूनि । ती घेईं साधूनि । तिला दवडून लावूं नको ।। ९५ ।। ऐसा योग वरचेवर । कधींच नाहीं येणार । पुरे झाला संसार । त्यांत आतां मजा नसे ।। ९६ ।। तुझ्या प्रतिज्ञेप्रमाणें । तुला आहे संन्यास घेणें । सुज्ञ जे वदती वाचेनें । त्याला बाध आणिती ना ।। ९७ ।। तत्त्वविचार करावया । ईश्वरें दिली नरकाया । तिला न जाऊं द्यावी वायां । आचार्य हेच तुझे गुरु ।। ९८ ।। कर्मकांड पाया खचित । ज्ञानोपासना इमारत । हें आणून ध्यानांत । कर्ममार्ग हा आचरणें ।। ९९ ।। श्रीमत् स्वामी शंकराचार्य । हे भुवनत्रयाचे गुरुराय । ज्ञानो-पदेशार्थ त्यांचे पाय । तुला धरणें भाग असे ।। १०० ।। ते महान् अधिकारी । त्यांची न होय बरोबरी । कवणाच्यानेंहि खरी । जो साक्षात् सदाशिव ।। १०१ ।। अरे ! माझे गुरु जे व्यास । त्यांच्याहि ब्रह्मसूत्रास । या यतीनें केलें भाष्य । तेथें माझा पाड कोण ? ।।१०२।। ऐसे अद्वितीय

पुरुष भले। आजपर्यंत तीन झाले। हे चौथे उदया आले। त्यांचीं नांवें ऐक तूं ॥ १०३ ॥ कृतयुगांत कपिलमुनी। त्रेतायुगीं दत्त जाणी। आणि द्वापारयुगालागूनि। बादरायण व्यास झाले ॥१०४॥ आतां कलियुगांत। श्रीशंकराचार्य झाले सत्य। त्यांच्याविषयीं किंचित्। संशय मनीं आणूं नको ॥ १०५ ॥ म्हणून मंडणा! त्यांची वाणी। खोटी मानूं नये कोणी। ऐसें तयासी बोलूनि। जैमिनी गेले स्वस्थाना ॥१०६॥ पुढें ते मंडणपंडित। होऊनिया दर्पहत। श्रीशंकराचार्यांप्रत। शरण आले अनन्येंसी ॥ १०७ ॥ हे योगयोगेश्वरा यतिवरा! । शंकराचार्या जगदुद्धारा! । आज निवाडा झाला खरा। या मायावी रूपाचा ॥ १०८ ॥ तूं साक्षात् शंकर। कैलासपति पार्वतीवर। भाष्य ब्रह्मसूत्रावर। लिहिलें आपण भाष्यांच्या ॥१०९॥ ज्या वेदाचा अर्थ भला। कणाद, कपिल, गौतमांना। यथातथ्य न समजला। तो विशद केला तुम्हीं ॥ ११० ॥ कृष्ण गोकुळीं अवतरला। गोपी म्हणाल्या गोप त्याला। तोच प्रकार माझा झाला। मी न आपणां जाणिलें ॥१११॥ दुरुत्तराचा अहेर। केला तुम्हीं वरचेवर। आतां कृपेची पाखर। करा स्वामी! मजवरी ॥ ११२ ॥ मी तुमच्या पडतों पायां। मला संन्यासदीक्षा द्यावया। वेळ करूं नका वांया। प्रतिज्ञेप्रमाणें सिद्ध मी ॥११३॥ आचार्य वदती त्यावरी। आधीं कांतेसी विचारी। कां कीं ती आहे खरी। अर्धांग तुझें मंडणा! ॥ ११४ ॥ तिसी न माझा वाद झाला। मीं जिंकिलें आहें तुला। कदाचित् तुझ्या दीक्षेला। ही आडवी येईल ॥११५॥ आणि तुझी कांता म्हणेल जरी। मला न वादाची जरुरी। मी आहें जिंकिल्यापरी। आतां आणिक जिंकणें नको ॥११६॥ तरी मग हरकत नाहीं। तुला दीक्षा देण्या पाही। संन्यासदीक्षा घ्यायाहि। पाहिजे कांतेची अनुज्ञा ॥११७॥ ऐसा संवाद उभयतां। ते दोघे करीत असतां। येती झाली तत्त्वता। शारदा अंबा शीघ्र पुढें ॥११८॥ आचार्यांतें करून नमन। करिती झाली भाषण। मी आपुला संवाद पूर्ण। आतांपर्यंत ऐकिला ॥११९॥ आपुला अभिप्राय कळला मशीं। आपण माझ्या अर्धांगासी। जिंकिलें आहे सभेसी। हें सर्वांस श्रुत असे ॥ १२० ॥ समर्था! मी असतां लहान। ऐसें घडलें वर्तमान। त्याची आहे आठवण। अजूनपर्यंत मजलागीं ॥१२१॥ एक तपस्वी अधिकारी। आला माझ्या माहेरीं। त्यांस पूजिलें अत्यादरीं। मम जननीनें स्वामिया! ॥१२२॥ आणि

विचारलें त्यांप्रत । मजविषयींचें भाकित । मी होतें अत्यंत । माझ्या जननीस आवडती ॥१२३॥ तापसी ऐसें म्हणाला । अवैदिक पंथ महीतला । माजूं लागले, चार्वाकांना । महत्त्व विशेष आलें कीं ॥ १२४ ॥ त्याचें कराया खंडण । ब्रह्मदेव तो चतुरानन । तो होऊनी येईल मंडण । नर्मदातटीं महेश्वरीं ॥ १२५ ॥ तुझी मुलगी भार्या त्याची । होईल शिवउमांची । जोडी लक्ष्मीनारायणांची । त्यापरी शोभे दांपत्य हें ॥ १२६ ॥ संतति, संपत्ति भोगील । यज्ञयाग आचरील । परी उपनिषदुद्धारा होईल । अवतार शिवाचा मृत्युलोकीं ॥१२७॥ तो शिव होऊनी संन्याशी । वाद करील मंडणासी । आणि जिंकून तयासी । संन्यास दीक्षा देईल ॥१२८॥ तें आज घडून आलें । माझ्या पतीला जिंकिलें । प्रतिज्ञेप्रमाणें आलें । संन्यास घेणें भाग त्यांसी ॥१२९॥ परी मी त्यांची जाया । मला जिंकल्यावांचूनिया । तुम्हां न तो येईल द्याया । संन्यास माझ्या पतीसीं ॥ १३० ॥ मशीं वाद करावा । माझा पक्ष खंडावा । आणि मग सुखें द्यावा । संन्यास मंडणाकारणें ॥ १३१ ॥ आत्मनोर्द्धपत्नी । ऐशी आहे वेदवाणी । श्रुति मान्य तुम्हांलागुनी । आहेत कीं मूळच्याच ॥ १३२ ॥ आपण प्रत्यक्ष शंकर । हें मी जाणितें साचार । परी पतिपत्नींचा व्यवहार । सांभाळण्या वाद करणें आले ॥१३३॥ ऐशी तिची विनवणी । आचार्यांनीं आणिली मनीं । परी बोलले मधुर वचनीं । वादा एक अडचण असे ॥१३४॥ यतिधर्मेकरून । स्त्रियांसी तें संभाषण । आहे आम्हां वर्ज्य जाण । हें तूं जाणत असती कीं ॥१३५॥ मग सरस्वती वदली वाचें । हें व्यावहारिक भाषण तुमचें । नाहीं तात्त्विक स्वरूपाचें । तें मीं काय सांगावें ॥१३६॥ स्वमत स्थापण्याचा । विचार आहे जयाचा । त्यानें विरुद्ध पक्षाचा । मोड केलाच पाहिजे ॥१३७॥ स्त्रीपुरुष हा भेद तेथ । त्यानें न आणावा मनांत । शिवाय दाखला पुराणांत । ऐशा रीतीचा आढळतसे ॥१३८॥ पाहा बृहदारण्यालागून । गार्गी, याज्ञवल्क्य दोघेजण । वादल्याचें उदाहरण । स्पष्टपणें आहे कीं ॥१३९॥ तेंवि महाभारत ग्रंथांत । मोक्षधर्मी शांतिपर्वांत । जनक, सुलभा या दोघांत । वाद आहे जाहला ॥ १४० ॥ मग याज्ञवल्क्य आणि जनक ते । काय सांगा महात्मे नव्हते । तात्त्विक वाद करण्यातें । स्त्रीपुरुष हा भेद नाहीं ॥१४१॥ तें सरस्वतीचें भाषण । आचार्यांनीं केलें मान्य । वाद ऐकण्या आमंत्रण । पूर्वीं परी सर्वां दिलें ॥१४२॥ तें आमं-

त्रण पोहोंचतांक्षणीं । पहिल्यापेक्षां दुप्पट जाणीं । गर्दी झाली सभास्थानीं । तो वाद ऐकावया ।।१४३।। एक जगमान्य विदुषी । करणार आहे वादासी । हेंच कौतुक समस्तांसी । होतें झालें तेधवां ।।१४४।। सर्व-शास्त्रें पारंगत । सरस्वती होती खचित । सुरू झाला सभेत । तिचा वाद आचार्यांसी ।।१४५।। जें जे सरस्वतीनें मांडावें । तें तें आचार्यांनीं खंडावें । तिच्या कोणत्याहि नुरूं द्यावें । आचार्यांनीं मुद्याला ।।१४६।। मग सरस्वती कंटाळली । तिनें एक युक्ति योजिली । आचार्यां जिंकण्या भली । ती ऐका सांगतों ।।१४७।। सरस्वती म्हणे मनांत । हे सर्वशास्त्रपारंगत । अवघीं शास्त्रें मूर्तिमंत । हेच प्रत्यक्ष ये ठायां ।। १४८ ।। एकचि शास्त्र आहे यांसी । योग्य जिंकावयासी । हा यति कामशास्त्रासी । नसेल मुळींच जाणत ।। १४९ ।। शब्दसृष्टीच्या बलावर । जरी जिंकण्याचा करील जोर । तरी अनुभव विचारितां माघार । घ्यावी लागेल साच याला ।। १५० ।। कां कीं बालपणापासून । संन्यास यांनीं केला ग्रहण । कामशास्त्राचें म्हणून । ज्ञान याला मुळींच नाहीं ।। १५१ ।। ऐसा विचार तिनें केला । दुसऱ्या दिवशीं आचार्यांना । सभेंत ऐसा टाकिला । कामशास्त्राचा प्रश्न तिनें ।। १५२ ।। अहो आचार्य ज्ञानराशि ! । आतां एक प्रश्न आपणांसी । करितें मी आज दिवशीं । त्याचें यथार्थ उत्तर द्या ।। १५३ ।।

सरस्वती उवाच — कलाःकियंत्यो वद पुष्पधन्विनः ।
किमात्मिकाः किंच पदं समाश्रिताः ।।
पूर्वे च पक्षे कथमन्यथा स्थितिः ।
कथं युवत्यां कथमेव पूरुषे ।। १ ।।

हे आचार्य सन्मती ! । मन्मथाच्या कला किती ! । आणि त्या कोठें राहती ! स्त्रीपुरुषांच्या देहांतून ।। १५४ ।। स्वरूप तया कलांचें । आहे कोण्या प्रकारचें । स्त्रीपुरुषांच्या ठायीं साचे । परिणाम घडून काय येती ? ।।१५५।। हें साकल्य करा कथन । ठेवूं नका कांहीं न्यून । हें भाषण ऐकून । आचार्य मनीं घोटाळले ।।१५६।। शारदा चतुर खरीच । इनें मला पाडिला पेंच । ज्ञान कामशास्त्राचें । यतीस असणें योग्य नव्हे ।। १५७ ।। जरी याच दीक्षेंत । कामशास्त्र बसूं पाहत । तरी यतिधर्माचा भंग खचित । होईल माझ्या हस्तानें ।। १५८ ।। तेंहि करणें न बरें कांहीं । शब्दछलें होणें नाहीं । समाधान अंशेंहि । या मंडणकांतेचें

॥ १५९ ॥ असो आचार्य वदले तियेसी। यतिधर्माविरुद्ध आम्हांसी। गोष्ट ही तूं विचारिसी। याचेंच वाटे आश्चर्य ॥ १६० ॥ याचीं उत्तरें देण्याप्रत। एक महिन्याची द्यावी मुदत। म्हणजे अवघें सांगूं तुजप्रत। त्याची चिंता करूं नको ॥ १६१ ॥ तें सरस्वतीनें मानिलें। आचार्यांसी बोलणें केलें। एक महिन्यानें पाहिजे आले। येथें वाद करण्यास्तव ॥ १६२ ॥ तिसी 'होय' म्हणून। आचार्य गेले निघोन। निज शिष्यांना घेऊन। आपुल्या त्या बिऱ्हाडासी ॥ १६३ ॥ सभा झाली विसर्जन। पडतें झालें गूढ पूर्ण। श्रीशंकराचार्यालागून। या तिच्या प्रश्नाचें ॥ १६४ ॥ इति श्रीदासगुणविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १६५ ॥ श्रीहरिहरार्पण-मस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय एकोणिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी दत्तात्रेया ! । वेदवंद्या करुणालया ! ॥ हे औदुंबर निवासिया ! । अत्रितनया ! पावा मशीं ॥ १ ॥ दक्षिण काशी, कोल्हापूर । वाडी, माहूर, गाणगापूर । कुरुगड्डी, औदुंबर । ऐशीं निवासस्थानें तुझीं ॥ २ ॥ तूं कित्येकांचे रोग हरिले । कित्येकांसी संपन्न केलें । कित्येकांसी दिधले । जीवदान तें दयाळा ॥ ३ ॥ देवा ! तुझें नाम घेतां । समूळ पळे दैन्य, चिंता । अति दुर्घट येत हातां । कैवल्य तुझ्या कृपेनें ॥ ४ ॥ आतां दासगणूवर । कृपा करावी निरंतर । मी तुझें अजाण पोर । माझी उपेक्षा करूं नको ॥ ५ ॥ आचार्य आपुल्या शिष्यांसहित । विचार करिती एकान्तांत । कामशास्त्राचे सिद्धान्त । कोणत्या रीतीं अभ्यासावे ॥ ६ ॥ माझा देह यतीचा । त्या देहास कामाचा । नाहीं मुळींच उपयोगाचा । होणें कांहीं संसर्ग ॥ ७ ॥ जरी न द्यावें उत्तर । तरी न जिंकिली जाणार । सरस्वती ती भूमीवर । भार्या मंडण पंडिताची ॥ ८ ॥ म्हणून ऐसें करितों । कोणाच्या तरी देहांत जातों । तेथें जाऊन अभ्यासितों । या कामशास्त्राला ॥ ९ ॥ म्हणजे काम होईल सगळें । देह तोहि न मळे । आणि सरस्वतीला कळे । सामर्थ्य योग-

शास्त्राचें ॥ १० ॥ हा विचार आपुला । त्यानें शिष्यांस कळविला । परि तो पद्मपादाला । पटला नाहीं मुळींच ॥ ११ ॥ पद्मपाद म्हणे जोडून कर । कामशास्त्राचा विचार । नुसता न आणा तिळभर । मनामाजीं गुरुवर्या ! ॥ १२ ॥ आपणां विचार सांगण्याची । पात्रता नाहीं आमुची । सागरापुढें डबक्याची । काय सांगा किंमत ? ॥ १३ ॥ आपण विचारिलें म्हणून । सांगणें आलें मजकारण । पूर्वी वैराग्यसंपन्न । मच्छेंद्र नामें योगी होता ॥ १४ ॥ परकायाप्रवेश । कैसा करितां ये योग्यास । तें आपल्या शिष्यांस । दावण्यातें सिद्ध झाला ॥ १५ ॥ मच्छेंद्र म्हणे गोरखासी । सांभाळ माझ्या देहासी । मी प्रवेश परकायेसी । कसा करितों तें पाहा । ॥ १६ ॥ ऐसें तयासी बोलून । देह दिला टाकून । एका मृताचें पाहून । शरीर त्यांत प्रवेश केला ॥१७॥ तो देह एका राजाचा । होता विलासी पुरुषाचा । कोणत्याहि सुखाचा । तोटा नव्हता ते ठायीं ॥ १८ ॥ ऐशा नृपशरीरांत । प्रवेशले मच्छेंद्रनाथ । गोरख एक्या गुहेंत । देह सांभाळीत राहिले ॥ १९ ॥ मग काय विचारतां । चहूंकडे सुबत्ता । नांदू लागली सर्वथा । त्या भूपाच्या राज्यांत ॥२०॥ भांडणें सवतीसवतींचीं । मिटून गेलीं अवघीं साचीं । मूर्ति झाली राजाची । प्रिय प्रत्येकीकारणें ॥२१॥ प्रधान कारभारी मनांत म्हणती । कोणी तरी थोर विभूति । या राजाच्या निश्चितीं । शिरली आहे देहांत ॥ २२ ॥ त्यास या देहांतून । जाऊं न देण्याकारण । काय करावें विदान । तें कांहीं कळत नसे ॥ २३ ॥ सुखोपभोग भोगण्याला । हा योगी येथें आला । तो पाहिजे ठेविला । गुंतवून येथें असाच ॥ २४ ॥ नाना प्रकारच्या विलासांची । त्यानें केली रगाडी साची । ज्यायोगे पूर्वीची । स्फूर्ति न उरली मच्छेंद्रा ॥ २५ ॥ इकडे पर्वताच्या गुहेंत । गोरख बसला वाट पाहत । निघून गेले दिवस बहुत । तरी न मच्छेंद्र आले कीं ॥ २६ ॥ मग गोरखनाथानें । हें जाणून अंतर्ज्ञानानें । त्या राजदरबारीं केलें येणें । सोंग घेऊन गवयाचें ॥२७॥ राजाची घेतली गांठ । एकान्तांत ऐसा धीट । म्हणे गुरुराया ! पाहूं वाट । अजून किती आपुली ॥ २८ ॥ आपण भोग भोगीत बसलां । मी सांभाळीत देहाला । राहिलों त्या पर्वताला । आतां काय करूं तया ? ॥ २९ ॥ गोरख दृष्टीस पडतां क्षणीं । पूर्वस्मरण झालें ज्ञणीं । तो नृपदेह सोडूनि । तत्काळ गेले मच्छेंद्र ॥ ३० ॥ तो प्रकार पाहिला । गोरख

मागोमाग निघाला । योगबळानें क्षणांत आला । आपुल्या पूर्व ठिकाणीं ॥३१॥ मच्छेंद्रासारखा तत्त्ववेत्ता। विषयभोग भोगीत असतां। विस्मरण पडलें त्याच्या चित्ता। आपण कोण हें पूर्वीचें ॥ ३२ ॥ तैसा हाहि प्रकार । झाल्या कैसा करावा विचार। आपण सर्वज्ञ आहां थोर । भूत-भविष्य कळतें तुम्हां ॥ ३३ ॥ आपुली योग्यता कोणीकडे । आणि तें कामशास्त्र कोणीकडे । आदर्श म्हणून ठेविती पुढें । लोक थोरांच्या चरित्राला ॥ ३४ ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ १ ॥

श्रेष्ठ साधु ज्याचें ज्याचें । आचरण करिती त्याचें त्याचें । लोक अनुकरण करिती साचें । त्या वाटाडया कल्पून ॥ ३५ ॥ विचार याचा सांगोपांग । करणें इथे स्वामी ! चांग । तुम्हीं बांधिला आहे चंग । यतिधर्म तो चालवण्याचा ॥ ३६ ॥ आचार्य म्हणती पद्मपादा ! । हा तुझा सिद्धान्त साधा । तत्त्ववेत्त्याप्रति बाधा । कशाचीच होणें नसे ॥३७॥ तत्त्वबोध अंतरीं । नाहीं झाला जोंवरी । सांभाळणें आहे तोंवरी । या सर्व विधींतें ॥ ३८ ॥ तत्त्ववेत्ता महाज्ञानी । लिप्त न होय कशानेंहि । मळला न जाय वासरमणि । केव्हांहि सूर्य आकाशींचा ॥ ३९ ॥ ज्ञाता सर्व कर्में करितो । पण त्यापासून अलिप्त राहतो । पद्मपत्राचा सिद्धान्त तो । आण मनीं पद्मपादा ! ॥ ४० ॥ मीं याच वेषांत । जरी अनुभविलें कामशास्त्र । तरी न घडे यत्किंचित् । दोष त्याचा मजलागीं ॥ ४१ ॥ भगवान् गोपालकृष्णाला । आहे कां कशाचा दोष लागला । ज्ञानी सर्वदाच सोंवळा । असतो सर्व बाजूंनीं ॥ ४२ ॥ बंध पाहा कोणताहि । होण्यास संकल्प कारण पाही । फल न दे कदाहि । स्वप्नींचें पाप-पुण्य ॥ ४३ ॥ मी आहें ज्ञानी जरी । तरी माझ्यावर जबाबदारी । चालवण्याची आहे खरी । स्वधर्माचा पंथ पाहा ॥ ४४ ॥ केवळ जनहित साधावया । वेदोद्धार करावया । मी जन्म घेऊनिया । आलों या मृत्यु-लोकीं ॥४५॥ तें सिद्धीस न्यावयास । झटलें पाहिजे विशेष । तें करतां कांहीं दोष । घडले तरी त्या मानूं नये ॥ ४६ ॥ मीं जी आंखली योजना । दोष त्यांत मुळींच ना । कामसेवेनें माझ्या मना । नाद न त्याचा लागेल ॥ ४७ ॥ तुम्ही एक महिनाभर । हें सांभाळून ठेवा शरीर । मी विषयाचा किंकर । होणार

नाहीं कदाहि ॥ ४८ ॥ हें गुह्य दोघांतिघां । त्यांनीं सांगितलें बघा। गलबला न केला उगा। उगीच अलबत्या गलबत्यांशीं ॥ ४९ ॥ इकडे अमरुक राजा तरणा ज्वान। एकाएकीं पावला मरण। त्याच्या रूपसंपन्न। दहा पांच राण्या होत्या ॥ ५० ॥ त्या त्याच्या सभोंवतीं। बसून रडाया लागल्या अति। नौकर चाकर हृदय पिटिती। पोशिंदा गेला म्हणून ॥५१॥ सचिव कारभारी सल्लागार। करूं लागले पुढचा विचार। एकचि उडाला हाहाःकार। ज्या शोका जोड नसे ॥ ५२ ॥ ही संधि पाहून। पहिला देह सोडून। आचार्य बसले येऊन। अमरुक नृपाच्या शरीरीं ॥ ५३ ॥ श्रोते! एका क्षणांत। नृप जाहला पूर्ववत्। हत्तीवरून गांवांत। वाटूं लागले शर्करा ॥ ५४ ॥ पूर्वीचा राजा दुराचारी। हा अत्यंत सदाचारी। मंगल कार्यें घरोघरीं। होऊं लागलीं एकसरा ॥ ५५ ॥ दुःख शोक दैन्य अनीति। ह्या नामशेष झाल्या असती। सूर्योदय झाल्यावरती। भाव न घुबडा-पिंगळ्यांचा ॥ ५६ ॥ त्या एक महिन्यांत। कामशास्त्र झाले अवगत। बारीक सारीक अंगांसहित। वात्स्यायनाचार्यांचें ॥ ५७ ॥ राण्या म्हणती आपसांत। हा न पूर्वीचा नृपनाथ। कोणी तरी देव सत्य। शिरला देहांत नृपाच्या ॥५८॥ याची अक्षय्य संगती। असावी कीं आपणांप्रति। विटे कां कोणी कल्पांतीं। अधरामृत सेवावया ॥ ५९ ॥ मधुर याचें बोलणें। मधुर याचें चालणें। परम खुबीचें सेवणें। आहे याचें विषयसुख ॥ ६० ॥ पौरवासी लोक म्हणती। हा हल्लींचा भूपति। आहे साक्षात् रमापति। येविषयीं शंका नसे ॥ ६१ ॥ याचें घडतां दर्शन। अशुभ जाय नासून। कोणाचेंहि घे ना मन। अनीति ती करावया ॥६२॥ ऐसा आनंदी आनंद झाला। यास एक महिना झाला। तेणें पद्मपाद चिंतावला। गुरु न आले म्हणून ॥ ६३ ॥ इकडे प्रधान सचिव आणि रयत। यांनीं केलें खलबत। या नृपाच्या देहांत। महापुरुष आला असे ॥ ६४ ॥ त्यासी या देहांतूनि। जाऊं नका देऊं कोणी। नाना लाघवेंकरूनि। ठेवून घेतलें पाहिजे ॥ ६५ ॥ हा ज्ञानी आहे म्हणून। जाईल कदाचित् निघून। सोडून देहाकारण। आपुल्या पूर्व देहामध्यें ॥६६॥ पूर्व देह कोठें तरी। याचा असेल भूवरी। तो शोधून काढा सत्वरी। आणि टाका जाळून ॥ ६७ ॥ म्हणजे मात्र योग्याला। सोडितां न ये या देहाला। आणि सुसंगतीचा आपणांला। अक्षय

लाभ घडेल कीं ॥ ६८ ॥ शोध करण्या त्वरित। धाडिले दूत अनंत। बुध हो ! चारी दिशांप्रत। अमरुकाच्या प्रधानानें ॥ ६९ ॥ प्रधान म्हणे दूतांसी। तुम्ही पहाडपर्वतगुहांशीं। शोधा मानव शरीराशीं। कसोशीनें अत्यंत ॥ ७० ॥ पुरें, नगरें आणि खेडीं। मळे, वस्त्या आणि झोंपडी। माळ आणि किर्र झाडी। असेल ज्या ज्या स्थलीं ॥ ७१ ॥ तीं पाहा बारकाईनें। आपुल्या परम चातुर्यानें। नरशरीर दिसल्या न ठेवणें। त्याला तत्काळ जाळा तुम्ही ॥ ७२ ॥ ऐशी आज्ञा करून सत्य। मुलखों-मुलखीं धाडिले दूत। इकडे पद्मपाद महाधूर्त। काय करी तें ऐका ॥ ७३ ॥ अमरुकाच्या देहांतून। गुरूला परत आणण्या जाण। निघाला गवयी घेऊन। पद्मपाद श्रोते हो ! ॥ ७४ ॥ कांहीं शिष्य संरक्षणा। देहाच्या ठेविलें जाणा। घेऊन दोघांतिघांना। शोधा निघाला पद्मपाद ॥ ७५ ॥ मृदंग वाजवी आनंदगिरि। चित्सुखाच्या होता करीं। रुद्र-वीणा ज्याची भारी। किमत सामशास्त्रांत ॥ ७६ ॥ ऐसे ते तिघेजण। आले राजधानीकारण। गवई ऐसें सांगून। राजवाड्यांत प्रवेशले ॥७७॥ नाना रागा लावूनि। आळविलें पद्मपादांनीं। ज्याचें गान ऐकूनि। अप्सराहि थक्क झाल्या ॥ ७८ ॥ त्यांनीं गायनामधून। आचार्यासी पट-विली खूण। आपण आहां कोठील कोण ?। येथे बैसला कशास्तव ? ॥ ७९ ॥ तुम्ही आमुचे गुरुवर। तुम्ही शिवगुरूचे कुमार। तुम्हीं ब्रह्म-सूत्रावर। भाष्य केलें व्यासांच्या ॥ ८० ॥ आज एक महिना झाला। आपुल्या पूर्व देहाला। सांभाळीत बसलों महीतला। त्या पर्वतगुहेमध्ये ॥ ८१ ॥ अजून वात्स्यायननिर्मित। कामशास्त्र अवगत। झालें कीं नाहीं तुम्हांप्रत। एवढे कथा गुरुवर्या ! ॥ ८२ ॥ ऐशी खूण पटतांक्षणीं। नृपदेह दिला सोडूनी। पडला चक्कर येऊनि। भूपति तो भूमीवरी ॥८३॥ एकचि उडाला हाहाःकार। राण्या आक्रोश करिती फार। धडधडा भूमी-वर। कपाळ आपटूं लागल्या ॥ ८४ ॥ हृदय पिटती नारी नर। ओस पडला बाजार। प्रधानाचा उतरला नूर। पहिली तरतरीमावळली ॥८५॥ त्या गर्दीत पोबारा। पद्मपादें केला खरा। आपुल्या घेऊन साथिदारां। येता झाला पूर्वस्थळीं ॥८६॥ इकडे राजदूतांनीं। देह काढिला हुडकुनी। शिष्यांलागी दटावूनी। गुहेमधून पर्वताच्या ॥८७॥ सत्तेपुढें शहाणपणा। शिष्यांचा कांहीं चालेना। पालीस पाहून विंचवांना। नांगी टाकणें भाग

येतें ॥ ८८ ॥ राजदूतांनीं चितेवर। ठेविलें आचार्यांचें शरीर। दहन करण्या साचार। आज्ञेनुरूप प्रधानाच्या ॥ ८९ ॥ चितेस अग्नि लाविला। तों प्रकार ऐसा झाला। चलनवलन देहाला। येतें झालें स्वामींच्या ॥९०॥

श्रीमत्पयोनिधिनिकेतन चक्रपाणे।
भोगीन्द्रभोगमणिरञ्जित पुण्यमूर्ते ॥
योगीश शाश्वत शरण्य भवाब्धिपोत।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ १ ॥
ब्रह्मेंद्ररुद्रमरुदर्ककिरीट कोटि।
संघट्टिताङ्घ्रिकमलामलकान्तिकान्त ॥
लक्ष्मीलसत्कुचसरोरुहराजहंस।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ २ ॥
संसारघोरगहने चरतो मुरारे।
मारोग्रभीकरमृगप्रवरार्दितस्य ॥
आर्तस्य मत्सरनिदाघनिपीडितस्य।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ३ ॥
संसारकूपमतिघोरमगाधमलं।
संप्राप्य दुःखशतसर्पसमाकुलस्य ॥
दीनस्य देव कृपणापदमागतस्य।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ४ ॥
संसारसागरविशालकरालकाल।
नक्रग्रहग्रसननिग्रहविग्रहस्य ॥
व्यग्रस्य रागरसनोर्मिनिपीडितस्य।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ५ ॥
संसारवृक्षमघबीजमनन्तकर्म।
शाखाशतं करणपत्रमनङ्गपुष्पम् ॥
आरुह्य दुःखफलितं पततो दयालो।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ६ ॥
संसारसर्पघनवक्त्रभयोग्रतीव्र।
दंष्ट्राकरालविषदग्धविनष्टमूर्तेः ॥
नागारिवाहनसुधाब्धिनिवासशौरे।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ७ ॥

संसारदावदहनातुरभीकरोरु ।
ज्वालावलीभिरतिदग्धतनूरुहस्य ॥
त्वत्पादपद्मसरसी शरणागतस्य ।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ८ ॥
संसारजालपतितस्य जगन्निवास ।
सर्वेन्द्रियार्थबडिशार्थझषोपमस्य ॥
प्रोत्खण्डितप्रचुरतालुकमस्तकस्य ।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ९ ॥
संसारभीकरकरींद्रकलाभिघात ।
निष्पिष्टमर्मवपुषःसकलार्तिनाश ॥
प्राणप्रयाणभवभीतिसमाकुलस्य ।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ १० ॥
अंधस्य मे हृतविवेकमहाधनस्य ।
चौरैः प्रभो बलिभिरिंद्रियनामधेयैः ॥
मोहान्धकूपकुहरे विनिपातितस्य ।
लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥ ११ ॥
लक्ष्मीपते कमलनाभ सुरेश विष्णो ।
वैकुण्ठ कृष्ण मधुसूदन पुष्कराक्ष ॥
ब्रह्मण्य केशव जनार्दन वासुदेव ।
देवेश देहि कृपणस्य करावलम्बम् ॥ १२ ॥

पूर्ण सावध होवोनि । हा नरसिंह-स्तव केला त्यांनीं । ज्या स्तवाच्या प्रभावानीं । अग्नि पूर्ण शांत झाला ॥ ९१ ॥ जेंवि प्रल्हादाचें रक्षण । अग्निमाजीं झालें जाण । तेंच आलें घडून । याहि वेळीं विबुध हो ! ॥ ९२ ॥ येथें एक विशेष झालें । राजदूत अवघे मेले । ज्यांनीं होतें पेटविलें । त्या चितेस चोहींकडून ॥ ९३ ॥ आचार्य उठून बैसले । शिष्य अवघे आनंदले । त्यांनीं आहे ऐसें दिलें । या नरसिंह स्तोत्रासी वरदान ॥ ९४ ॥ जो या नरसिंहस्तोत्राचा । नियमे करील जप साचा । गंडांतर मृत्यु त्याचा । टळेल कीं निःसंशय ॥ ९५ ॥ भय अग्नीपासून । त्यासी होय कदापि न । हें आचार्यांचें वचन । कदापि खोटें होणें नसे

॥ ९६ ॥ कांहीं दिवस शिष्यांसहित । आचार्य राहिले गुहेंत । ते येउनी पोंचले अकस्मात् । पद्मपादादि शिष्य तिघे ॥ ९७ ॥ घेऊन त्या सर्वांसी । आचार्य आले महेश्वरासी । उत्तर देण्या सरस्वतीसी । तिनें केलेल्या प्रश्नाचें ॥ ९८ ॥ पाहून शंकराचार्यांना । मंडणासी आनंद झाला । तो आनंद वर्णण्याला । शक्ति नाहीं उरली मज ॥ ९९ ॥ षोडशोपचारें पूजा केली । आचार्यांची तेधवां भली । उत्सव करून दीधली । पंगत मोठी महेश्वरा ॥ १०० ॥ चारी वर्ण तृप्त केले । मंडणानें तेधवां भले । मग सरस्वतीसी बोलाविलें । आचार्यांनीं आपुल्यापुढें ॥ १०१ ॥ तूं दिलेली मुदत । झाली आज समाप्त । तुझ्या प्रश्नाच्या उत्तराप्रत । ऐक आतां मम मुखें ॥ १०२ ॥ तें ऐकतां सरस्वती । ऐशी झाली बोलती । स्वामी ऐकण्या उत्तरें तीं । आतां न राहिली जरुरी ॥ १०३ ॥

ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वदेहिनाम् ।
ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मन्भवान्साक्षात्सदाशिवः ॥ १ ॥

कां कीं आचार्य आपण । प्रत्यक्ष आहां ईशान । अवघ्या विद्यांचें जन्मस्थान । अवघ्या शास्त्रांचें मूळ तुम्ही ॥ १०४ ॥ तैसे सर्व भूताधिपति । आपण आहां निश्चितीं । ब्राह्मणांचे चक्रवर्ती । वैदिक धर्माचे जगद्‌गुरु ॥ १०५ ॥ हें कामशास्त्र शिकण्यास । परकायाप्रवेश । करावा लागला तुम्हांस । केवळ रूढी रक्षावया ॥ १०६ ॥ तुम्हांला माहीत नाहीं । ऐसें जगांत कांहीं नाहीं । कोणताहि आरंभ होई । मुळींच तुमच्यापासून॥१०७॥ आतां उत्तरें ऐकण्याची । इच्छा न मनीं उरली साची । आपणांसवें करावयाची । वाद कोणाची छाती नसे ॥ १०८ ॥ तुम्हीं आम्हां दोघांस । जिंकिलें आहे खास । आतां कशाची उरली आस । आज्ञा असावी जावया ॥ १०९ ॥ आज मृत्युलोकींचें । काम सर्व संपलें साचें । जें कां राहिलें आतां पुढचें । तें करण्या समर्थ तुम्ही ॥ ११० ॥ आचार्य म्हणाले तिजकारण । ऐक अंबे ! माझें वचन । तुला मृत्युलोकाहून । आधींच जातां येईना ॥ १११ ॥ यावच्चंद्रदिवाकर । हा वेद भूमीवर । टिकला पाहिजे साचार । लोककल्याण साधेल जेणें ॥ ११२ ॥ ह्या अद्वैत पंथावरी । अभक्तांच्या वरच्यावरी । स्वाऱ्या होतील नानापरी । तो बुडवायाकारणें ॥ ११३ ॥ एक कुतर्कवादी पंडित । व्याकरण शास्त्र हातांत । घेऊनिया विपरीत । अर्थ करील वेदांचा ॥ ११४ ॥ कोणी कर्मास

मानील । कोणी उपासनेस चाहील । कुणी नांवें ठेवील । बळें अद्वैत मार्गाला ॥ ११५ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । या तिहींचें संरक्षण । तुझ्याच साह्यें करून । होणार आहे सरस्वती ॥ ११६ ॥ यासाठीं भूमीवरी । पीठ जें का शृंगेरी । तेथेंच सदैव वसती करी । शारदा नांव धरून ॥ ११७ ॥ हेंच सांगण्यासाठीं भलें । होतें तव मीं बंधन केलें । त्याचें आज संपलें । काम सारें सरस्वती ! ॥ ११८ ॥ तें आचार्यांचें भाषण । सरस्वतीनें केलें मान्य । देती झाली तयां वचन । शृंगेरी राहण्याचें ॥ ११९ ॥ मग सर्वांदेखतां । सरस्वती शारदा माता । स्वामीस करूनि दंडवता । अंतर्धान पावली ॥ १२० ॥ तो पाहून प्रकार । लोक करिती जयजयकार । सरस्वतीचें त्रिवार । नांव घेऊनि निजमुखें ॥ १२१ ॥ श्रोते ! मंडण पंडिताला । जरी कांतेचा विरह झाला । परि त्यानें नाहीं केला । शोक विशेष तिच्यास्तव ॥ १२२ ॥ कां कीं जो विवेकें पूर्ण । प्रत्यक्ष होता चतुरानन । म्हणे बरें झालें केलें गमन । सरस्वतीनें माझ्या आधीं ॥ १२३ ॥ पुढें मंडण पंडित । एक याग विश्वजित् । करिते झाले पाहा तेथ । तें विदित होईल पुढें ॥ १२४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । शंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्य पेठेस जावया ॥ १२५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय विसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय पंढरीशा करुणाकरा ! । जयजय चंद्रभागातटविहारा ! । जयजयाजी रुक्मिणीवरा ! । संतप्रिया पांडुरंगा ! ॥ १ ॥ खरें खोटें कळावया । सोय न उरली पंढरिराया ! । जो तो विद्वान् ये ठायां । अहंकारवश झाला असे ॥ २ ॥ खरेंखोटें निवडण्याचें । विद्वान् हेंच यंत्र साचें । तेंच निज मताचें । घोडें नाचवूं लागल्यास ॥ ३ ॥ निस्पृहता लया जाईल । स्पष्टोक्ति शब्दीं राहील । त्यायोगें वेळ येईल । अनवस्था होण्याची ॥ ४ ॥ म्हणून तूंच माझ्या बुद्धीला । प्रेरणा करी जगत्पाला ! । हें आचार्यचरित्र लिहिण्याला । म्हणजे बरें होईल ॥ ५ ॥ हें चरित्र जगद्गुरूचें । नाहीं लुंग्यासुंग्याचें । जें आहे व्हावयाचें । आदर्श

या जगातें ॥ ६ ॥ पक्षोपपक्ष म्हणून । येथें न व्हावें उत्थान । खरें खरें तत्त्वज्ञान । याच्या बोधें व्हावें जगा ॥ ७ ॥ म्हणून या कृत्यास । साह्य आपुलें पाहिजे खास । हृदयीं माझ्या करून वास । चरित्र न्यावें शेवटासी ॥ ८ ॥ एवढी माझी विनंती । मान्य करा रुक्मिणीपति ! । अवघा भार तुजवरती । आहे दासगणूचा ॥ ९ ॥ असो सर्वांदेखत । सरस्वती जातां स्वर्गाप्रत । महेश्वरीचे लोक समस्त । आश्चर्य करूं लागले ॥ १० ॥ ही मंडण पंडिताची कांता । होती प्रत्यक्ष देवता । हें कळून आलें सर्वथा । आज आम्हांकारणें ॥११॥ त्या सरस्वतीलागून । सामान्य स्त्री विद्वान् । ऐशा परीचें जाणून । आम्ही सर्व होतों कीं ॥ १२ ॥ त्याचें दिव्य आज झालें । ती देवता हें कळालें । येथें असतां हें ना आलें । कोणाच्याहि लक्षांत ॥ १३ ॥ असो आतां हे सरस्वती ! । तुला असो आमुची प्रणति । ऐसें बोलून जोडिती । हात, लोक पाहून वरी ॥ १४ ॥ मग मंडण पंडितें भला । कांहीं वेळ विवेक केला । शोक खऱ्या ज्ञात्याला । होणें मुळींच नाहीं कीं ॥१५॥ आचार्यांची विनवणी । मंडण करी जोडून पाणि । आलें आहे माझ्या मनीं । एक याग करण्याचें ॥ १६ ॥ त्यासी द्यावें अनुमोदन । स्वामी मनापासून । म्हणजे होईल समाधान । या दासाच्या चित्तातें ॥ १७ ॥ तो विश्वजित् नांवाचा । याग आहे करण्याचा । जो या कर्मकांडाचा । कळस आहे प्रत्यक्ष । ॥१८॥ आचार्य वदले त्यावरी । याग बाप्पा ! सुखें करी । हें कर्मकांड सर्वतोपरी । पाया वैदिक पंथाचा ॥ १९ ॥ तो भक्कम भरल्यावर । इमारतीस येईल जोर । आरंभ करावा सत्वर । याग तो बा ! करावया ॥ २० ॥ ऐशी आज्ञा होतां क्षणीं । मंडण आनंदला मनीं । भव्य जागा पाहूनि । थोर मंडप उभारिला ॥ २१ ॥ चहूं बाजूंस द्वारें चार । मंडप अति सुंदर । ऐन मध्य भागावर । यज्ञकुंड श्रोते हो ! ॥ २२ ॥ तोरणें नाना प्रकारचीं । चारी द्वारां बांधिलीं साचीं । गर्दी वैदिक ऋत्विजांची । मध्यभागीं मंडपाच्या ॥ २३ ॥ प्रेक्षक लोक सभोंवार । बसले भाविक नारीनर । चित्तीं होऊनिया आतुर । आले यज्ञ पाहावया ॥ २४ ॥ ब्राह्मण चहूं वेदांचे । आले अवघ्या शास्त्रांचे । कर्म विश्वजित् यज्ञाचें । सुरू झालें तें ठायां ॥ २५ ॥ स्वाहा, स्वधा या शब्दांनीं । मंडप गेला गजबजुनी । शब्द कुणाचा कुणा कानीं । येईनासा

जाहला ॥ २६ ॥ समारंभ झाला थोर । अन्नदान तें अपार । चहुंवर्णांप्रति साचार । मंडण देता जाहला ॥ २७ ॥ फार काय त्या यज्ञासी । कोणी न राहिले उपवासी । नभोंच्या उडत्या पांखरांसी । पुरविलें पाहा धान्य त्यांनीं ॥ २८ ॥ तैसें ग्राम्य पशूंप्रत । कडबा, कुंदा, ओलें गवत । तान्ह्या अर्भकांप्रीत्यर्थ । सोय केली दुधाची ॥ २९ ॥ एवंच श्रोते ! कशाचेंहि । कमी तेथ पडलें नाहीं । जो तो मनुष्य कीर्ति गाई । मुखें मंडण पंडिताची ॥ ३० ॥ यज्ञसमारंभ थोर झाला । अवभृथ स्नानाला । अवघा महेश्वर गांव आला । कोणी न सदनीं राहिलें ॥३१॥ ऋत्विजांसी दक्षिणा । शिष्टांप्रती संभावना । गोरगरीब याचकांना । तृप्त केलें पंडितानें ॥ ३२ ॥ एवंच सर्वस्व केलें दान । मोकळा बैसला होऊन । अवघ्या उपाधींपासून । तो पंडित मंडणमिश्र ॥ ३३ ॥ मग आचार्यांपासूनि । सविधि दीक्षा घेतली त्यांनीं । 'तत्त्वमसि' हा मंत्र कानीं । आचार्यांनीं सांगितला ॥ ३४ ॥ 'सुरेश्वराचार्य' त्यांचें । आश्रम नाम ठेविलें साचें । सिद्धान्त ते उपनिषदांचे । फोड करून कथिले कीं ॥ ३५ ॥ सांगितले आश्रमधर्म । वेदान्ताचें कथिलें वर्म । निवटिते झाले त्याचा भ्रम । श्रीमत् आचार्य सिद्ध योगी ॥ ३६ ॥ कांहीं दिवस नर्मदातटीं । राहते झाले ज्ञानजेठी । सिद्ध महंतांच्या भेटी । तेथें होत्या जाहल्या ॥ ३७ ॥ नर्मदेला सोडून । निज शिष्यांसी घेऊन । दक्षिण दिशा लक्षून । आचार्य निघते जाहले ॥३८॥ वैनगंगा, वर्धा, पवना । पेनगंगा, तापी, पूर्णा । सातपुड्यांतील क्षेत्रें नाना । स्वामी पाहते जाहले ॥ ३९ ॥ कौंडिन्यपुर, लोणार । कुशीतर्पण, बासर । तेथें गोदेच्या तीरावर । शारदा अंबा वंदिली ॥४०॥ पुढें नाभिस्थानासी । श्रीगोदेच्या पुण्यराशि । येते झाले स्नानासी । तीर्थमाहात्म्य लक्षूनिया ॥ ४१ ॥ शंखतीर्थी केलें स्नान । तैसें नृहरीचें दर्शन । आदरेंसी घेऊन । अंबापुरा आचार्य आले ॥ ४२ ॥ पुढें दक्षिणदेशीं मैलार । क्षेत्र जें का मनोहर । कुंडें एक हजार । शुद्ध पाण्याचीं जे ठायां ॥ ४३ ॥ मणिमल्लांच्या वधासाठीं । जेथें अवतरला धूर्जटि । त्या मल्लारीची घेऊन भेटी । आचार्य पुढें निघाले ॥ ४४ ॥ भीमाअमरजासंगमास । आचार्य राहिले कांहीं दिवस । पुढें शैल्य पर्वतास । सहजगतीनें पातले ॥ ४५ ॥ आचार्यांच्या बरोबरी । शिष्य बहुत होते जरी । होते मुख्य त्यांत परी । चार ध्यानीं धरा ॥ ४६ ॥ पद्मपाद, चित्सुख, आनंद-

गिरि । चौथा तो वेदान्तकेसरी । ज्या सुरेश्वराची बरोबरी । करण्या कोणी धजत नसे ।। ४७ ।। प्रवासामाजीं भले । जैनबुद्धांसी जिंकिलें । कित्येक जैन पळून गेले । आचार्यांच्या भयानें ।। ४८ ।। श्रीतुंगभद्रेच्या तीरीं । आचार्यांची राहिली स्वारी । ज्या तुंगभद्रेचें वारि । पाचक आणि गोड बहु ।। ४९ ।। तिच्याच तोडीची ती प्रवरा । महाराष्ट्रांत घ्यानीं धरा । कृष्णेस मिळाली तुंगभद्रा । आणि प्रवरा गौतमीकारणें ।। ५० ।। याच नदीच्या आसमंतात । आहे शैल्य पर्वत । जेथें रमला पार्वतीकान्त । मल्लिकार्जुन नांवानें ।। ५१ ।। अरण्य मोठें भयंकर । कळकाचे तरु अपार । वन्य पशु फिरती स्वैर । निर्वैर चित्तीं होऊनियां ।। ५२ ।। त्या शैलपर्वताला । आचार्यांचा मुक्काम झाला । रोज पाठ शिष्यांना । उपनिषदाचा देत होते ।। ५३ ।। शंका कुशंका घेऊन । त्याचें करावें निरसन । चार्वाकमताचें खंडण । शिष्यांहातीं करवावें ।। ५४ ।। श्रोते ! या प्रांतांत । भैरवाचे बहुत भक्त । अघोर कर्मीं सदा रत । महाभयंकर प्राणी ते ।। ५५ ।। त्या विषयींची एक कथा । पुढिलाध्यायीं तत्त्वता । सांगेन ती ऐकण्याकरितां । तुम्हीं तत्पर असावें ।। ५६ ।। इति श्रीदासगणूविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ।। ५७ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

## अध्याय एकविसावा

।। श्रीगणेशाय नमः ।। हे कृपार्णवा दयाघना ! । हे संकटभयशोषणा ! । हे अतुलशक्ति नारायणा ! । हे अचिंत्या शेषशायी ! ।।१।। तूं आपल्या भक्तांसी । संकटें न बाधूं देसी । सत्त्व घ्याया दुर्वास ऋषि । आला जैं पांडवांकडे ।। २ ।। तैं अवसर नसतां भोजन । घातिलें साह्य होऊन । तूं पांडवांकरण । द्रौपदीहस्तें मध्यरात्रीं ।।३।। द्रौपदी पांडवांची जाया । पाहे नग्न करावया । दुःशासन सभेठायां । तैं तूं वस्त्रें पुरवलीस ।। ४ ।। एवंच आपुल्या भक्तांप्रत । रक्षण करिसी अहोरात्र । त्यांचे अवघे मनोरथ । पुरवूनिया पांडुरंगा ! ।। ५ ।। तैसेंच आतां करावें । मनोरथांतें पुरवावें । देवा ! कदा न रुष्ट व्हावें । या दीन दासावरी ।।६।। आचार्य

असतां शैलशिरीं । गोष्ट घडली ऐशापरी । एक कापालिक दुराचारी । आला वेष बदलून ॥ ७ ॥ संभाविताचा वेष धरिला । वरिवरि केल्या टिळे माळा । परि अत्यंत वेगळा । भाव होता अंतरींचा ॥ ८ ॥ तैं आचार्य एकान्तांत । बसले होते निजानंदांत । ज्या त्यांच्या आनंदाप्रत । लव मात्र च्युति नसे ॥ ९ ॥ कापालिक त्यांच्या जवळ गेला । दुरून नमस्कार केला । दीनवत् उभा राहिला । जेवीं रामापुढें मारुती ॥ १० ॥ आणि बोलला ऐशी वाणी । जोडोनिया आपुले पाणि । मी बहुत दिवसां-पासूनि । आपली कीर्ति ऐकत होतों ॥ ११ ॥ त्याचें आज प्रत्यंतर । आलें मशीं साचार । आपण ज्ञानी महाथोर । ज़ोड न आपुल्या औदार्या ॥ १२ ॥ जगाचें करण्या कल्याण । आपला आहे अवतार पूर्ण । तें मीं अवघें जाणून । पूर्वीपासून असें कीं ॥ १३ ॥ आपुल्या द्वारींचा याचक । आजवरी न गेला विन्मुख । ऐसें बोलती अवघे लोक । आपुल्याविषयीं या प्रांतीं ॥ १४ ॥ आपण ज्ञानाचें भांडार । भूतदयेचे सागर । जग हें अवघें नश्वर । हें तुम्ही जाणतसां ॥ १५ ॥ परावरी उपकार । आपण करितां निरंतर । आपली निज देहावर । नाहीं ममता ज्ञानबळें ॥ १६ ॥ जग नश्वर ज्ञाते म्हणती । परि न करवे तैशी कृति । आपण प्रत्यक्ष प्रचीति । त्याची देतसां गुरुराया ! ॥ १७ ॥ मी सदेह शिवस्वरूपांत । मिळून जावें हा धरिला हेत । आणि तो सिद्धीस नेण्याप्रत । भक्ति केली भैरवाची ॥ १८ ॥ कां कीं अवघे भैरव । अंशमात्रें आहेत शिव । मुख्य जो त्याचा ठाव । मुळींच नाहीं म्हणती कोणी ॥ १९ ॥ त्या खोल भानगडींत । मी न पडाया इच्छीत । भैरवाच्या देहांत । सामावलों तरी पुरें ॥ २० ॥ माझें नांव भैरवाख्य । मी पंथानें कापालिक । भैरव प्रसन्न झाल्या एक । कृतकृत्य होईन मी ॥ २१ ॥ त्या श्रीभैरवप्राप्तीकारण । तप केलें दारुण । गुहेमाजीं बसून । या शैल पर्वताच्या ॥ २२ ॥ तें माझें तपस्थान । आहे एक योजन । या ठिकाणापासून । एक्या भयंकर दरी-मध्यें ॥ २३ ॥ अष्टमीचे उपास केले । उलटें टांगून घेतलें । नाना प्रकारचे बळि दिले । आजवरी मीं भैरवाला ॥ २४ ॥ पुढें स्वामी एक्या दिनीं । भैरव येऊनिया स्वप्नीं । बोलता झाला ऐशी वाणी । ती मी आपणां सांगतों ॥ २५ ॥ तूं सदेह माझ्या देहांत । मिळावयाचा धरिला हेत । तो शेवटा नेण्याप्रत । ऐसें करी तूं भक्तवरा ! ॥ २६ ॥ नरकपाल

एक्या योग्याचें । किंवा सार्वभौम राजाचें । मला अर्पण केल्या साचें । काम तुझें होईल ॥ २७ ॥ नरकपाल देशील ज्याचें । रक्तहि पाहिजे त्याचें । अभिषेकास माझ्या साचें । नैवेद्य त्याच्याच मांसाचा ॥ २८ ॥ हें सारें केल्यावरी । तूं सामावशील माझ्या शरीरीं ।'खोटें न यांत तिळ-भरी। सत्य सत्य त्रिवाचा ॥ २९ ॥ ज्याचें नरकपाल देशील। तोहि कैलासा जाईल । निर्गुण शिवाचें होईल । दर्शन त्या महात्म्याला ॥३०॥ अशक्य आहे भूमीवर । मला मिळविणें साचार । सम्राटाचें तें स्वामी ! शिर । तें केव्हांहि घडणें नसे ॥३१॥ शिवाय सारे भूपति । क्षणिक सुखाला इच्छिती । आतांचे राजे न् मानिती । कैलासवैकुंठलोकांना ॥ ३२ ॥ राजे श्रीयाळासमान । न कुठें येती आढळून । आणि योगी तुमच्या समान। कोणीच नाहीं भूमंडळीं॥ ३३॥ तुम्ही कमंडलूंत । नर्मदा सांठवलींत । तुम्ही ज्ञानसूर्य साक्षात् । आहांत कळलें मला ॥ ३४ ॥ मोह कशाचा न तुमच्या चित्ता । तुम्ही परहित साधण्याकरितां । देहहि आपुला व्हाल देतां । हें मी जाणतों निश्चयें ॥ ३५ ॥ म्हणून नरकपाल तुमचें । द्याल मला जरी साचें । तेणें होईल भैरवाचें । मन परम संतुष्ट ॥ ३६ ॥ आणि मग सामाव-ण्याला । भैरव देह मिळेल मला । आणि तुम्हीहि कैलासाला । जाल या महत् पुण्यानें ॥ ३७ ॥ नरकपाल मशीं द्यावें । हेतूस या पुरवावें । आपणहि करून घ्यावें । सार्थक आपुल्या तपाचें ॥ ३८ ॥ शिवाय आपुलें दर्शन । झालें ज्या ज्या कारण । त्याचे त्याचे हेतु पूर्ण । होते झाले सर्वहि ॥ ३९ ॥ आमुच्या कापालिक पंथांत । दिवस आजिचा अत्यंत । श्रेष्ठ आणि मंगल सत्य । आहे ऐसें कथियेलें ॥ ४० ॥ म्हणून शिराची याचना । करण्या मी आलों जाणा । नाहीं ऐसें मला न म्हणा । हीच विनंती अखेरीं ॥ ४१ ॥ आतां स्वामी ! यावर । ऐसें आपण म्हणाल जर । बाप्पा ! कृत्य हें अघोर । कां रे वृथा करिसी तूं ? ॥ ४२ ॥ तरी नाना संकटें आणि क्लेश । यांनीं व्यापिलें जगास । जन्ममरणांचा आहे त्रास । मागें लागला सारखा ॥ ४३ ॥ म्हणून त्यातें चुकवावें । भैरव-शरीरीं मिळून जावें । म्हणून माझें करावें । काम एवढें गुरुवर्या ! ॥ ४४ ॥ वृत्रासुराच्या वधासाठीं । इंद्रानें धरिली हनुवटी । दधीचि जे ज्ञानजेठी । त्यांच्या अस्थि मागावया ॥ ४५ ॥ जरी न त्यांच्या मिळत्या अस्थि । गुरुवर्या ! पुरंदराप्रति । तरी मेला नसतां निश्चितीं । वृत्रासुर

केव्हांहि ॥ ४६ ॥ इंद्रानें तो आपुला । स्वार्थ अवघा साधण्याला । केली प्रार्थना दधीचींना । निज अस्थि द्यावयास ॥ ४७ ॥ दधीचि ज्ञाता होता । म्हणून झाला अस्थि देता । खऱ्या ज्ञात्याची नसे ममता । मृत्तिकेच्या देहावरी ॥ ४८ ॥ त्याच पुरंदरापरी । मी ही विनंती करतों खरी । नरकपाल द्यावें सत्वरीं । जेणें होईल कार्य माझें ॥ ४९ ॥ ऐशी त्याचो प्रार्थना । आचार्यांनीं आणून मना । करिते झाले भाषणा । कापालिकास येणें रीतीं ॥ ५० ॥ तूं जें का हें करिसी कृत्य । तुझें निंद्य अथवा आहे स्तुत्य । हें जाणण्याच्या भानगडींत । मला मुळीं पडणें नसे ॥ ५१ ॥ अवघे कर्ता ईश बरवा । दोष कोणीं कोणास लावावा । साक्षि होऊन अवलोकावा । व्यवहार जगाचा ज्ञात्यांनीं ॥ ५२ ॥ माझें नरकपाल सुखें घेई । त्या न माझी हरकत कांहीं । परि एक अडचण पाही । येईल या कृत्याला ॥ ५३ ॥ माझे शिष्य आहेत येथ । ते तुझा धरतील हात । करूं न देतील हें कृत्य । तुजला मज मारण्याचें ॥ ५४ ॥ म्हणून दोघे आपण । जाऊं भैरवा येथून । ये एखादी पाहून । गुहा योग्य या कामातें ॥ ५५ ॥ तूं मी तेथें जाऊं आधीं । मी लावीन समाधि । मग तूं आपुलें कार्य साधी । माझें मुंडकें घेऊन ॥ ५६ ॥ फार बरें म्हणून । भैरव गेला निघून । येतों इतक्यांत परतून । शोध करून गुहेचा ॥ ५७ ॥ तों अस्तमान झाला । सूर्यप्रकाश निमाला । आचार्यशिष्य आन्हिकाला । करायास गेले होते ॥ ५८ ॥ रात्र होऊं लागली । पश्चिमेची मावळली । उरली होती जी कां लाली । त्या समयास श्रोते हो ! ॥ ५९ ॥ वाघूळ, पिंगळे, दिवाभीत । फिरूं लागले आकाशांत । ठळक चांदण्या दृष्टीप्रत । पडूं लागल्या हळूंहळूं ॥ ६० ॥ स्वामी बैसले शांतचित्त । कापालिकाची वाट पाहत । तोहि आला तितक्यांत । आचार्यांसी न्यावया ॥ ६१ ॥ रंग कुळकुळीत काळा अति । केंस मोकळे पाठीवरती । रक्तसिंदूर भालाप्रति । त्रिपुंड्रवजा लाविलासे ॥ ६२ ॥ माळा हाडांची कंठांत । भव्य शूल हतांत । कटीं लंगोट कशिला सत्य । कर्णीं काळीं कुंडलें ॥ ६३ ॥ केलें मद्याचें प्राशन । नेत्र झाले रक्तवर्ण । आला तलवार घेऊन । नग्न सव्य हातामध्यें ॥ ६४ ॥ थयथया नाचूं लागला । आचार्यांसी म्हणे चला । मी आलों पाहून गुहेला । येथून जवळ आहे ती ॥ ६५ ॥ हें आचार्यांनीं ऐकिलें । त्याच्या मागोमाग निघाले । उभयताहि

गुहेंत आले । एका भयंकर दरीच्या ॥ ६६ ॥ आचार्य बैसले असनावर । आणि म्हणाले घटकाभर । थांब, समाधि लावल्यावर । मुंडकें उडीव माझें तूं ॥ ६७ ॥ आचार्य गुहेमाजीं भले । समाधि लावूं लागले । तों इकडे काय झालें । तें आतां परियेसा ॥ ६८ ॥ हें सर्व अंतर्ज्ञानानीं । कळलें पद्मपादालागुनी । कीं आचार्यास नेऊनि । कापालिक वधितो गुहेंत ॥६९॥ तेथें त्यांचें रक्षण । केलें जावें म्हणून । करता झाला पाहा ध्यान । पद्मपाद नरसिंहाचें॥७०॥ नरसिंह मंत्र जपतांक्षणीं । नरसिंह झाला पूर्णपणीं । गेला गुहेंत धांवूनि । गुरूस रक्षाया पद्मपाद ॥७१॥ त्या नरसिंहरूपाचें । वर्णन काय करूं वाचें । हें सामर्थ्य मंत्राचें । उग्या नव्हत पोरचेष्टा ॥ ७२ ॥ अति क्रोधें गुहेंत आला । तो कापालिक करें धरिला । आणि मांडीवरी घेतला । हिरण्यकश्यपूच्या परी ॥ ७३ ॥ पोट केलें विदारण । आंतलीं आंतडीं काढून । गळा धरला दाबून । प्राण त्याचा गेला हो ! ॥७४॥ देह छिन्नविछिन्न केला । चहूंकडे फेंकून दिला । रक्ताचा तो सडा झाला । गुहेमाजीं त्यायोगें ॥ ७५ ॥ तुकडे तुकडे मस्तकाचे । नरसिंहानें केले साचे । आणि सिंहनाद आपुल्या वाचें । करूं लागला नरहरि ॥ ७६ ॥ तो भयंकर ऐकून ध्वनि । शिष्य आले धांवूनि । त्या गुहेलागूनि । पाहावया प्रकार हा ॥ ७७ ॥ तों निर्भय आसनीं होते स्थित । समाधीच्चें सुख भोगीत । श्रीमत् आचार्य सद्गुरुनाथ । पुढें प्रत्यक्ष नरहरि ॥ ७८ ॥ गुर्‌गुर ऐसा भयप्रद ध्वनि । होऊं लागला ज्यांच्या वदनीं । नेत्र खदिरांगाराहूनि । आरक्त दिसूं लागले ॥ ७९ ॥ दांत, दाढा भयंकर । जीभ लळलळे हृदयावर । कापालिकाचें रुधिर । गुहेंत अवघ्या पसरलें ॥ ८० ॥ देहाचे ते तुकडे तुकडे । पडले असती चोहींकडे । त्या कापालिकाचे रोकडे । चिखल झाला मांसाचा ॥ ८१ ॥ नरसिंहाची गर्जना । होऊं लागली क्षणक्षणां । जी काननींच्या श्वापदांना । पळवूं लागली वनांतूनि ॥ ८२ ॥ शिष्य गुहेच्या बाहेर । उभे राहिले जोडून कर । तेथून हा प्रकार । सर्व त्यांनीं अवलोकिला ॥ ८३ ॥ इकडे लाविलेल्या समाधीचा । त्याग आचार्यांनीं केला साचा । तों पुढें नरसिंहाचा । पुतळा पाहिला प्रत्यक्ष ॥ ८४ ॥ मनोमय जाणिली खूण । हा पद्मपाद सनंदन । नरसिंहमंत्राचा करून । जप नरसिंह झाला हा ॥ ८५ ॥ त्यानेंच कापालिकास । मारिलें या गुहेस । मंत्रशास्त्राची धरितां कांस ।

**अशक्य तेंच करतां येई ॥ ८६ ॥ असो त्या नरसिंहरूपा पाहून। आचार्यांनीं केलें स्तवन। अकरा श्लोकांमाजीं जाण। द्रुतविलंबित वृत्ताच्या ॥ ८७ ॥**

नरहरे हर कोपमनर्थदं। तव रिपुर्निहतो भुवि वर्तते।
कुरु कृपां मयि देव सनातनीं। जगदिदं भयमेति भवद्दृशा ॥ १ ॥
तव वपुः किल सत्त्वमुदाहृतं। तव हि कोपनमण्वपि नोचितं।
तदिह शान्तिमवाप्नुहि शर्मणे। हरगुणं हरिराश्रयसे कथम् ॥ २ ॥
सकलभीतिषु दैवतमस्मरन्। सकलभीतिमपोह्य सुखी पुमान्।
भवति किं प्रवदामि तवेक्षणे। परमदुर्लभमेव तवेक्षणम् ॥ ३ ॥
स्मृतवतस्तव पादसरोरुहं। मृतवतः पुरुषस्य विमुक्तता।
तव कराभिहतो मृतभैरवो। न हि स एष पुनर्भवमेष्यति ॥ ४ ॥
दितिजसूनुममुं व्यसनार्दितं। सकृदरक्षदुदारगुणो भवान्।
सकलगत्वमुदीरतमस्फुटं। प्रकटमेव विधित्सुरभूत्पुरा ॥ ५ ॥
सृजसि विश्वमिदं रजसावृतः। स्थिति विधौश्रितसत्त्व उदायुधः।
अवसि तद्धरणे तमसावृतो। हरसि देव तदा हरसंज्ञितः ॥ ६ ॥
तव जनिर्न गुणास्तव तत्त्वतो। जगदनुग्रहणाय भवादिकम्।
तव पदं खलु वाङ्मनसातिगं। श्रुतिवचश्चकितं तव बोधकं ॥ ७ ॥
नरहरे तव नाम परिश्रवात्। प्रमथगुह्यकदुष्टपिशाचकाः।
अपसरन्ति विभोऽसुरनायका। न हि पुरःस्थितये प्रभवन्त्यपि ॥ ८ ॥
त्वमेव सर्गस्थितिहेतुरस्य। त्वमेव नेता नृहरेऽखिलस्य।
त्वमेव चिन्त्यो हृदयेऽनवेद्य। त्वामेव चिन्मात्रमहं प्रपद्ये ॥ ९ ॥
हतो वराको हि रुषं नियच्छ। विश्वस्य भूमन्नभयं प्रयच्छ।
एते हि देवा शममर्थयन्ते। निरीक्ष्य भीताः प्रतिखेदयन्ते ॥ १० ॥
द्रष्टुं न शक्याहि तवानुकंपा। हीनैर्जनैर्निह्नुत कोटिशंपाम्।
मूर्ति तदात्मन्नुपसंहरे मां। पाहि त्रिलोकीं समतीतसीमाम् ॥ ११ ॥

॥ इति श्रीमहाद्यशंकराचार्यकृतनृसिंहस्तवः ॥

ज्या देहाच्या संरक्षणा। रूप हें धरिलें नारायणा!। तें काम दयाघना!। निर्विघ्नपणें पार पडलें ॥ ८८ ॥ कापालिक अपुल्या हातें मेला। म्हणून विचारा मुक्त झाला। मुक्त होण्याची आस त्याला। होती मनापासून ॥ ८९ ॥ आतां काम न याचें म्हणून। रूप करावें विसर्जन।

हा नरसिंह झाला कोण । तें आतां प्रकट करावें ।। ९० ।। ऐशी ऐकतां विनवणी । स्वरूप गेलें मावळूनि । दिसला त्याच्याच ठिकाणीं । पद्मपाद शिष्य तो ।।९१।। पद्मपादाकारण । याचें न राहिलें कांहीं भान । स्वप्न जातां मावळून । पहिलीच स्थिति उरतसे ।। ९२ ।। पद्मपादें उठून । केलें असे साष्टांग नमन । श्रीमत् जगद्‌गुरूंकारण । भावचित्त ठेवूनिया ।। ९३ ।। गुरुशिष्य आले बाहेर । तों रात्र झाली दोन प्रहर । रात्रीचा तो शब्द कीर्र । ऐकूं येऊं लागला ।। ९४ ।। आचार्य म्हणती शिष्यांना । आतां आपण येथून चला । या कापालिकाच्या देहाला । वन्य पशूंस भक्षूं द्यावें ।। ९५ ।। आपण गेल्यावांचून । हें कार्य साधेल न । येथें येण्याकारण । भीति वाटेल त्यांलागीं ।। ९६ ।। अवघें करून स्नानाला । जाऊं आपल्या बिऱ्हाडाला । हा जो कापालिक मारिला । आज दिनीं नृसिंहानें ।। ९७ ।। त्या त्या कथेचें स्मरण । जे जे कोणी करतील जन । त्यांची त्यांची मुक्तता जाण । होईल संकटांमधूनी ।। ९८ ।। वा या नृसिंहस्तोत्राचा । जप ज्याची करील वाचा । त्याच्या कसल्याहि संकटाचा । परिहार नृसिंह करील ।। ९९ ।। भूतबाधा शरीरबाधा । त्यास न होईल कदा । हें स्तोत्र जपतां सदा । विजय त्याचा सर्वत्र ।। १०० ।। भानामती, जादूटोणा । त्याच्यावरी न चाले जाणा । हें स्तोत्र वज्र म्हणा । संकट-रूपी पर्वताचें ।। १०१ ।। वा हा अध्याय शनिवारीं । जो नियमानें वाचील घरीं । मनकामना त्याची सारी । श्रीनृसिंह पुरवील ।। १०२ ।। होऊनिया शुचिर्भूत । या स्तोत्राचा पाठ जेथ । होईल त्या त्या घरांत । भूत-समंध शिवतील न ।। १०३ ।। संकटें स्तोत्रपठकाचीं । शिमगा करीत फिरतील साचीं । खोड मोडेल शत्रूची । त्याचें अशिव चिंतितांची ।। १०४ ।। या स्तोत्रपठकावरी । कृपा करील नृहरि । भक्त प्रल्हा-दाच्या परी । सत्य सत्य त्रिवाचा ।। १०५ ।। ऐसें बोलून निघाले । आचार्य बिऱ्हाडासी आले । स्वशिष्यांसी वदते झाले । तें आतां अवधारा ।। १०६ ।। शिष्य हो ! कापालिक पंथ । वैदिक धर्मासी सम्मत । जरी असला तरी त्यांत । सार नाहीं हेंच खरें ।।१०७।। घरालागीं उकिरडा । पर्वतासी तुटका कडा । वा शौचकूप रोकडा । राजवाड्याकारणें ।।१०८।। तैसा हा कापालिक पंथ । कथिला वैदिक पंथ । हें आणून ध्यानांत । त्याज्य तो समजावा ।। १०९ ।। मंत्रतंत्र्याची योग्यता ती । आहे शत्रूस

जिंकण्यापुरती । जेव्हां अन्य उपाय न चालती । प्रबल शत्रूच्या बलापुढें ।। ११० ।। तेव्हां या मंत्रेंकरून । करतां यावें संरक्षण । जो का असेल नीतिमान । न्यायी, धार्मिक, अद्वेष्टा ।। १११ ।। त्याचें व्हाया संरक्षण । कथिता झाला अथर्वण । या मंत्रतंत्रालागून । हें न विसरा कल्पान्तीं ।। ११२ ।। कथा केनोपनिषदांत । कथिली एक ऐशी सत्य । पंचभूतें माजलीं बहुत । मानूं न लागलीं शक्तीतें ।। ११३ ।। तेव्हां उमा जी प्रकृति । तिनें तृण घेऊन हातीं । बोलती झाली अग्नीप्रति । कीं तूं या जाळ काडीला ।। ११४ ।। मंत्रसामर्थ्येंकरून । हरलें अग्नीचें अग्नीपण । न जाळितां आली जाण । काडी तया अग्नीला ।। ११५ ।। ती सदाचार-संपन्न । उमाच होती म्हणून । मंत्रसामर्थ्य तिजलागून । फळ तें झालें ध्यानीं धरा ।। ११६ ।। म्हणजे शिष्य हो ! निसर्गसत्ता । जेव्हां अनीतीस देईल हाता । ऐशा दुर्घट प्रसंगापुरता । उपयोग याचा होतसे ।। ११७ ।। या हेतूला धरून । वेदें मंत्र केले निर्माण । सदाचार सन्नीतिलागून । न तुडवायासी केले ते ।। ११८ ।। पाहा कापालिकाला । भैरव नाहीं प्रसन्न झाला । तोंच नृसिंह मंत्र फळला । पद्मपादाकारणें ।। ११९ ।। म्हणजे सिद्ध झालें यावरून । सदाचारावांचून । येणार नाहीं कळून । सामर्थ्य मंत्रशास्त्राचें ।। १२० ।। शाक्त, कापालिक, पाशुपत । इत्यादि हे अनेक पंथ । जरी आहेत सामावतात । या श्रेष्ठ वैदिकमार्गी ।। १२१ ।। तरी या शूद्र मताचा । विबुध हो ! करावा त्याग साचा । उदो उदो उकिरड्याचा । गाढवें तोंच करतील ।। १२२ ।। अहेतुक कर्म करावें । कर्ममार्गा संरक्षावें । उपासनेनें करून घ्यावें । आपुलें सात्त्विक कल्याण ।। १२३ ।। तें कल्याण झाल्यावरी । चढावी ज्ञानाची पायरी । तें ज्ञान ठसल्या अंतरीं । तोच साक्षात ब्रह्म होतसे ।। १२४ ।। हे अत्युत्तम तीन गुण । साधती वैदिक पंथेंकरून । म्हणून वैदिक मार्गा झुगारून । देऊं नका केव्हांहि ।। १२५ ।। ऐसें शिष्यांस सांगितलें । कापालिकाचें हनन झालें । आचार्य तेथून निघाले । गोकर्णासी जावया ।। १२६ ।। इति श्रीदासगणु-विरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्य-पेठेस जावया ।। १२७ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

# अध्याय बाविसावा

।। श्रीगणेशाय नमः ।। जयजयाजी पार्वतीवरा ! । जयजया जी शंकरा ! ।
सदैव करिसी हरा ! । निज भक्तांचें संरक्षण ।। १ ।। म्हणून म्हणती
-कर । तुला अवघे सुरवर । पदां शरण आल्यावर । त्याच्या न बघती
दोषां ।। २ ।। लंकाधिपति रावणाला । तो पदांप्रति शरण आला ।
णून आत्मलिंग तयाला । तूं आपुलें दिधलें कीं ।। ३ ।। दुष्ट जो कां
मासुर । त्याला तूंच दिलास वर । ऐसें तुझें औदार्य थोर । तें एक्या
वें वानूं किती ?।। ४ ।। तुझ्यासम भोळा कोणी । देव नाहीं त्रिभुवनीं ।
न्य भावें तुझ्या चरणीं । शरण सर्वदा दासगणू ।। ५ ।। असो शैल-
ता सोडून । आचार्य स्वामी दयाघन । निघाले स्वशिष्यांस घेऊन ।
श्चम यात्रा करावया ।। ६ ।। लहान मोठीं क्षेत्रें फिरत । आले गोकर्ण
ांत । ज्या क्षेत्रासी म्हणतात । प्रति कैलास भूवरचें ।। ७ ।। जेथें
भयांतक भवानीपति । नीलकंठ दक्षिणामूर्ति । धरून गोकर्णाची
कृति । लिंगरूपें स्थित झाला ।। ८ ।। जें पश्चिम समुद्राचें तीर । परम
य मनोहर । गगना भेदिती तरुवर । ताडमाडपोफळीचें ।। ९ ।। परम
ीर गर्जना । समुद्राची होय जाणा । वाटे अपांपति करी भजना ।
 वाणीनें हराचें ।। १० ।। मोठमोठालीं जलचरें । डोकीं तीं काढून
। शिवमंदिराचें शिखर । अवलोकिती निज नेत्रीं ।। ११ ।। ज्या
र्णाचा महिमा । अगोचर निगमागमा । जो देतसे विश्रामा । मुनि
सी योग्यांतें ।। १२ ।। महिमा जया क्षेत्राचा । स्कंदपुराणीं वर्णिला
ा । केला त्याच कथेचा । गुरुचरित्रें अनुवाद ।। १३ ।। असो, तया
ीं आचार्य आले । समुद्राचें स्नान केलें । आन्हिक तेथेंच उरकलें ।
णि मग गेले दर्शना ।। १४ ।। यतिधर्मानुसार । केला प्रभूसी नमस्कार ।
 मांडिला अपार । त्या विश्वोद्धाराचा ।। १५ ।। हे देवाधिदेवा
शा ! हे सच्चिदानंदा पुण्यपुरुषा ! । हे आदि अनादि अविनाशा ! ।
ुणातीत अससी तूं ।। १६ ।। म्हणजे सत्त्व-रज-तमांहूनि । तूं
ळा कैवल्यदानी । तूंच विश्व व्यापुनी । आणिलें त्या आविर्भावा
१७ ।। भेद साकार निराकार । हे नांवालाच साचार । अवघ्या
ांचा परिहार । तूंच करिसी भक्तांच्या ।। १८ ।। द्वैत आणि

अद्वैतपण । तुझ्या ठायीं दोन्ही क्षीण । काय म्हणावें तुजलागून । याचा निश्चय होत नसे ॥ १९ ॥ अस्ति, भाति आणि प्रिय । ऐसें जें तें तूंच होय । कोणालाहि नाहीं सोय । तुझ्यापुढें जाण्याची ॥ २० ॥ अस्ति, भाति जेव्हां असतें । तेव्हां नामरूपासी महत्त्व येतें । तें नामरूप कारण होतें । भक्ता करण्या भजन तुझें ॥ २१ ॥ तीन दिवसपर्यंत । आचार्य राहिले तेथ । गर्दी लोटली अतोनात । स्वामीदर्शन घ्यावया ॥ २२ ॥ स्वामींच्या त्या समाराधना । क्षेत्रस्थ करूं लागले नाना । वेदऋचेच्या गर्जना । होऊं लागल्या सभेंतून ॥ २३ ॥ पुढे गोकर्ण क्षेत्र सोडिलें । हरिशंकर क्षेत्रा आले । तेथेंहि तैसेंच झालें । गोकर्ण क्षेत्रापरी हो ! ॥ २४ ॥ या हरिहर क्षेत्रांत । शिवविष्णु आहेत स्थित । भेटण्या आपुल्या भक्तांप्रत । उपासनेप्रमाणें ॥ २५ ॥ त्या हरिहरांच्या मूर्तीचें । एकत्व कोणत्या प्रकारचें । आहे हें कळावया साचें । नवें स्तोत्र केलें एक ॥ २६ ॥ या स्तोत्राची अमोघ रचना । दोन म्हणतां एकपणा । यावा कळून भक्तमना । एक म्हणतां दोन उभे ॥ २७ ॥ म्हणजे स्तोत्रांतील वर्णन । शिवविष्णूंकारण । लागावें कीं समसमान । ऐसा हेतु स्तोत्राचा ॥ २८ ॥ म्हणजे आचार्य माउलीचा । हेतु हाच स्पष्ट साचा । बोजवारा समाजाचा । भेदबुद्धीनें होऊं नये ॥ २९ ॥ ऐसा हेतु होता म्हणून । जगद्गुरूंचा मिळाला मान । जें कां लाधे मोठेपण । तें कृतीनें प्राप्त होतें ॥ ३० ॥ हरिहरांतें वंदूनिया । आचार्य निघाले जावया । पद्मपादा घेऊनिया । शिष्य आपुल्या समागमें ॥ ३१ ॥ मूकांबिका म्हणून । लागतें झालें एक स्थान । जेथें होतें शोभायमान । मूकांबिकेचें मंदिर ॥ ३२ ॥ गांव भव्य आणि सुंदर साचा । होता बाजार पेठेचा । जेथें उंबरा ब्राह्मणांचा । होता एक हजार ॥ ३३ ॥ एका द्विजाच्या घरांत । माणूस जमलें अतोनात । नुकताच पावला पंचत्व । तीन वर्षांचा मुलगा त्याचा ॥ ३४ ॥ शव पुत्राचें मांडीवरी । घेऊन ब्राह्मण विलाप करी । मूकांबिका त्याची नारी । लोळूं लागली गडबडां ॥ ३५ ॥ ब्राह्मण म्हणे राजसा ! । हे माझ्या पाडसा ! । कां रे ! अबोला धरिला ऐसा । इतक्या बाळपणांत ॥ ३६ ॥ बोल तुझी बोबडी वाणी । जी ऐकण्यालागूनि । गेले असती हपापूनि । दोन्ही कान माझे बा ! ॥ ३७ ॥ डोळे उघडून पाही मला । एकदां तरी स्नेहाळा ! ।

जननी तुझी धरणीला । लोळूं लागली तुझ्यास्तव ॥ ३८ ॥ मृत्तिका घेऊन हातांत । मूकांबिका घाली मुखांत ॥ धडधडा आपटीत । मस्तक आपुलें भूमीवरी ॥३९॥ गृहस्थ गांवींचा होता भला । म्हणून जनसमूह लोटता झाला । कित्येक वृद्ध, द्विजाला । बोध करूं लागले ॥ ४० ॥ अरे वेड्या ! आवरी शोक । हा आहे मृत्युलोक । चार वर्षांचें बालक । गेलें त्याचा शोक करसी ! ॥ ४१ ॥ कित्येक उपजतांच गेले । कित्येक तरुणपणीं निमाले । येथें न कोणी राहिले । आपण सर्व जाणारची ॥ ४२ ॥ तूं विद्वान् म्हणविसी । आणि ऐसा शोक करिसी । वेळ पुढील कृत्यासी । होत आहे त्यामुळें ॥ ४३ ॥ या मृत्तिकामय शरीराप्रत । कांहीं नसे किंमत । नको कवटाळूं उगें प्रेत । यांत कांहीं हंशील नसे ॥ ४४ ॥ शरीर हें वस्त्रापरी । त्याचा शोक कोण करी ? । ठेव ठेव भूमीवरी । मुलाचें तें प्रेत आतां ॥ ४५ ॥ जों जों लोक बोध करिती । तों तों शोकास येई भरती । त्याचें वर्णन करूं किती ? । मुलगा एकुलता एक होता ॥ ४६ ॥ स्वामी आचार्य शिष्यांसहित । सहजगतीनें आले तेथ । शोक ऐकून द्रवलें चित्त । जगद्गुरूंचें तेधवां ॥ ४७ ॥ ते त्या प्रेताजवळ गेले । आणि द्विजाप्रति बोलले । अरे ! तुझें नाहीं मेलें । मूल, शोक करूं नको ॥ ४८ ॥ तें गाढतम निद्रेंत । येधवां आहे स्थित । मेलें ऐशी अशुभ मात । मुळींच मुखें बोलूं नको ॥ ४९ ॥ तों झाली आकाशवाणी । बुध हो ! ऐशी त्या ठिकाणीं । ती ऐका अपुले श्रवणीं । निवेदन करतों ये ठायां ॥५०॥ मृता सजीव करण्याचें । ज्याच्या अंगांत सामर्थ्य साचें । ऐशा महात्म्या पुरुषाचें । चित्त विव्हल होऊनिया ॥ ५१ ॥ त्यानें त्या मृताप्रत । जरी केलें जिवंत । तरी हें त्याचें कृत्य । दुःखद त्यालाच होईल कीं ॥ ५२ ॥ याचा विचार करावा । मग हा कुमार उठवावा । खोटा कधीं न करावा । लेख ब्रह्मयाचा ज्ञात्यांनीं ॥ ५३ ॥ याचें इतुकेंच आयुष्य होतें । तें संपलें आज निरुतें । हें आणून ध्यानातें । करणें असेल तें करा ॥५४॥ आचार्य बोलले त्यावरी । ही आकाशवाणी आहे खरी । परी जो त्रिभुवनाचें रक्षण करी । हा न्याय त्याला नसे ॥ ५५ ॥ जन्म-मरण हे दोन्ही । कल्पनाच ज्या ठिकाणीं । सूर्य तमाच्या अंधारांनीं । माखला जाणें मुळीं नसे ॥ ५६ ॥ तो उजेड आणि तमरहित । स्वतःच आहे प्रकाशवंत । त्याला कधीं न संभवत । दिवसरजनींची भीति पाहा

॥५७॥ त्यालाच माझी प्रार्थना। आहे, मुळीं न इतरांना। पुत्रशोक व्हावा ना। या द्विजाकारणें ॥ ५८ ॥ ऐसें आचार्य बोलतां क्षणीं। डोळे उघडिले बालकानीं। अग आई! ऐशी वाणी। बोलता झाला बाळ तो ॥ ५९ ॥ मग काय विचारतां?। आनंद झाला समस्तां। आचार्यांच्या पदीं माथा। ठेविला त्या उभयतांनीं ॥६०॥ बाळ घातिला पायांवर। अवघ्यांप्रति आनंद थोर। धांवूं लागले पाहा पौर। तो प्रकार पाहावया ॥ ६१ ॥ लोक म्हणती हा संन्यासी। अवतारी पुरुष निश्चयेंसी। यानें मेलेल्या प्रेतासी। पुनरपि केलें सजीव ॥ ६२ ॥ केवढा याचा अधिकार। हा कोणी तरी देव थोर। अवतरला आहे भूमीवर। जगदुद्धार करावया ॥ ६३ ॥ मूकांबिका आनंदली। स्वामीचरणीं लोळूं लागली। तिच्या आनंदा नाहीं उरली। जोड कोठें त्रिभुवनांत ॥ ६४ ॥ माझें पूर्वभाग्य म्हणून। झालें आपुलें दर्शन। माझें पुत्रवंतीपण। आपण रक्षण केलेंत की ॥ ६५ ॥ कल्पद्रुम, चिंतामणि। हें आपणांवरूनी। जरी टाकिले ओवाळूनि। तरी न किंमत होईल! ॥ ६६ ॥ आळोपाळीं ही मात। पसरली एका क्षणांत। कीं मेलेला झाला जिवंत। पुत्र एका ब्राह्मणाचा ॥ ६७ ॥ चहूंकडून येते झाले। लोक दर्शन घ्याया भले। तें लहानसें खेडें बनलें। आचार्यांमुळें महाक्षेत्र ॥ ६८ ॥ लोक विचार ऐसा करिती। हा येथेंच ठेवून घ्यावा यति। म्हणजे अडचण आपणांप्रति। नाहीं कशाची पडणार ॥ ६९ ॥ कल्पतरु असल्या द्वारीं। चिंता कशाची कोण करी?। तैशी आपुली होईल खरी। स्थिति यति राहतां येथें ॥ ७० ॥ येणेंपरी आपुला। मनोदय स्वामींस निवेदिला। तै स्वामींनीं लोकांना। येणेंपरी निवेदिलें ॥ ७१ ॥ हे पौर हो! आमुचा। यतिधर्म आहे साचा। नियम आमुच्या मुक्कामाचा। त्रिरात्र असे कीं ॥ ७२ ॥ तो आज संपला। आम्ही जातों अन्य स्थला। इतर कोणाची तुम्हांला। गरज नाहीं मुळींच ॥७३॥ मूकांबिका भवानी। मूळ प्रकृति जगज्जननी। तिला भजण्याचें सोडूनी। इतरांतें प्रार्थितां ॥७४॥ या मूकांबिकेचें होतें मेलें। तेंच मूल सजीव केलें। जेवीं मूकांबिकेनें भलें। जी बसली राउळांत ॥ ७५ ॥ याचें पाहावया प्रत्यंतर। तुम्हीं चलावें तेथवर। या अर्भकासी बरोबर। घेऊनियां येथवां ॥ ७६ ॥ म्हणजे सर्व गोष्टींचा। खुलासा तो होईल साचा। अधिकार तो जगदंबेचा। कैसा तोहि कळेल ॥ ७७ ॥ त्या बाळाची जननीजनक। आणि गांवींचे

अवघे लोक । अंबालयासी निःशंक । येते झाले स्वामींसवे ॥ ७८ ॥ आचार्यांनीं स्तुति केली । अंबा अवघ्यांस भेटविली । ही गोष्ट कलींत केली । आचार्यांनीं विबुध हो ! ॥ ७९ ॥ ज्यांनीं ब्रह्म जाणिलें । त्यांसी अशक्य कांहीं न उरलें । तो जें जें कांहीं बोले । तें सत्य करी परमात्मा ॥ ८० ॥ आचार्य म्हणती मूकांबिकेसी । सांभाळ या तव पुत्रासी । हा मूकांबिकेनें दिला तुसी । माझ्या विनंतीवरून ॥ ८१ ॥ ही कथा जो वाचील । त्याचीं बालकें वांचतील । अल्पायुषी न राहतील । हें ध्यानांत ठेवावें ॥ ८२ ॥ या कथेचें केल्या पठण । स्त्रियांचें जाईल वांझपण । शतायुषी नि बलवान् । पुत्र होतील तियेतें ॥ ८३ ॥ ऐसा वर देऊनि । आचार्य निघाले तेथूनि । निजशिष्यांस घेउनी । श्रीबलीग्रामाकारणें ॥ ८४ ॥ हा श्रीबली ग्राम थोर । होता ब्राह्मणांसी अग्रहार । उंबरा दोन हजार । या गांवीं ब्राह्मणांचा ॥ ८५ ॥ वेदपठण घरोघर । करिती ब्राह्मणांचे कुमार । बाजारपेठ धनंतर । भव्य दुकानें वैश्यांचीं ॥ ८६ ॥ मध्यभागीं मंदिर । पार्वतीचे सुंदर । भव्य जयाचें गोपुर । बुरुज चारी बाजूंना ॥ ८७ ॥ प्रत्येक द्विजाचें सदन । अग्निहोत्रानें भूषित जाण । इतर शास्त्रांचें अध्ययन । मोठ्या प्रमाणीं होत होते ॥ ८८ ॥ आचार-भ्रष्टता हे विष । पसरलें नव्हतें समाजांत । वेड्यावांकड्या दोषांस । जागाच नव्हती ते ठायां ॥ ८९ ॥ हल्लींच्या राजे लोकांना । धर्माचाच कंटाळा । मग तें कोठून ब्राह्मणाला । अग्रहार देतील ॥ ९० ॥ कडु-लिंबासी बहर आला । परि तो मेजवानी कावळ्याला । तेथें उपास कोकिळेला । सहज आहे पडणार ॥ ९१ ॥ या राजांना पूर्वजांचें । राज्य भोगण्या पाहिजे साचें । त्यांच्या धर्मचालीरीतींचें । वाटोळें करण्या जन्मले हे ॥ ९२ ॥ ज्या राजाचिया हातीं । तोंडपुजे पोसले जाती । धर्मकृत्याच्या नांवावरती । सगळा धंदा लबाडीचा ॥ ९३ ॥ असो आचार्य शिष्यांसहित । आले श्रीबलीग्रामांत । एक्या भव्य मंदि-रांत । जाऊन उतरले हराच्या ॥ ९४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ९५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय तेविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय भक्तवत्सल परेशा ! । श्री पांडुरंगा रुक्मिणीशा ! । तूं सद्भक्तीतें पुराणपुरुषा ! । वश होतोस भक्तांसी ॥ १ ॥ ऐसें सांगतें भागवत । मोठमोठाले साधुसंत । छातीस लावूनिया हात । तें कालत्रयीं न खोटें होई ॥ २ ॥ साधनें तुझ्या भक्तीचीं । बहुत प्रकारें कथिलीं साचीं । आणि उदाहरणें तयांचीं । दिलीं आहेत ग्रंथांतून ॥ ३ ॥ कोणीं केलें अर्चन । कोणीं केलें वंदन । कोणीं केलें सप्रेम भजन । कोणीं पूजन ध्यान कोणीं ॥ ४ ॥ कोणीं नुसतें दास्य केलें । कोणीं नुसतें सख्य सांभाळिलें । कोणाच्या त्या वांटयास आलें । आत्मनिवेदन देवदेवा ! ॥ ५ ॥ या भक्तिबळेंकरून । त्या त्या भक्तालागून । प्राप्त झाले तुझे चरण । जे अत्यंत सुखदायी ॥ ६ ॥ त्या चरणांची प्राप्ति । कोठून देवा मजप्रति । कां कीं नाहीं पात्रता ती । माझ्या अंगीं मुळींच ॥ ७ ॥ मी सर्वतोपरी हीन दीन । अवघ्या साधनांची असे वाण । माझ्या ठायीं परिपूर्ण । हें कळतें माझें मला ॥ ८ ॥ आपुल्या कृपाकृशानेंकरून । जाळ माझें हीनपण । लोखंडाला पाहून । खरा परीस लपत नसे ॥ ९ ॥ मी लोखंड तूं परीस । पूर्ण करी माझी आस । हेंच विनवी गणूदास । तुजलागी पांडुरंगा ! ॥ १० ॥ असो त्या श्रीबली शहरांत । आचार्य आल्याची मात । अवघ्यांप्रति झाली श्रुत । चहूं वर्णाच्या लोकांसी ॥ ११ ॥ ज्यानें मृत पुत्र उठविला । तो यति येथें आला । चला चला पाहूं त्याला । ऐशी पर्वणी पुन्हां न ये ॥ १२ ॥ ऐसें गांवींचे लोक भले । आपसांत बोलूं लागले । थवेच्या थवे लोटले । आचार्यांसी पाहावया ॥ १३ ॥ तेथें एक प्रभाकर । नामें गृहस्थ होता थोर । विद्वानांचा अग्रेसर । वेदवेदांगें जाणता ॥ १४ ॥ घरचा असे संपन्न । बागबगीचे शोभायमान । शेतामाजीं पिकें धान्य । गोठयांत खिल्लारें धेनूंचीं ॥ १५ ॥ गांवीं मानमान्यता । होती त्या प्रभाकरपंता । विद्वानांचा चाहता । असून होता रसिक ॥ १६ ॥ बैल, घोडे, दासदासी । विपुल ज्याच्या सदनासी । घरालागीं साजेलसी । वधूहि मिळाली सुस्वरूप ॥ १७ ॥ इतकेंहि असून । प्रभाकराचें मन खिन्न । प्रभातइंदूच्या समान । मुख निस्तेज तयाचें ॥ १८ ॥ कांतेचीहि तीच स्थिति । दोघें सर्वदा घरांत बसती ।

वस्त्राभरणें अंगावरती । कदां न घालतीं दोघेहि ॥ १९ ॥ कारण त्यांच्या खिन्नतेचें । हेंच होतें श्रोते ! साचें । नव्हतें नशिबीं उभयतांचे । अपत्य-सुख येतुलेंहि ॥ २० ॥ एक तेरा वर्षांचा । पुत्र त्यास होता साचा । तोच डोंगर दुःखाचा । होऊन राहिला होता तयां ॥ २१ ॥ मुलगा सर्वांग-सुंदर । गोरापान बाणेदार । वाटे दुजा मन्मथशर । काय आला भूमीवरी ॥ २२ ॥ परी कोणासी बोलेना । सदा बैसे एकांतस्थाना । करी न कशाच्या अध्ययना । कधीं भटके रानोमाळ ॥ २३ ॥ पित्यानें त्या वर-च्यावरी । माणसें धाडून कांतारीं । धरून आणावें कीं घरीं । जबर-दस्तीनें विबुध हो ! ॥ २४ ॥ कोंडून ठेवावें खोलींत । तेथें बसावें ध्यानस्थ । बरोबरीच्या मुलांत । कधीं न जावें खेळावया ॥ २५ ॥ कोणी करो गालिप्रदान । कोणी करो कठोर भाषण । परि त्या एकाहिलागून । उत्तर मुलगा देत नसे ॥ २६ ॥ गंडे दोरे बहुत केले । अनंत देवां नवस झाले । परि न कोणी पावले । मुलगा जशाच्या तसा ॥ २७ ॥ चिंतेहून चिंता कठीण । हें जें कां शास्त्रवचन । याचा अनुभव आला पूर्ण । त्या प्रभाकर द्विजाला ॥ २८ ॥ ऐके दिवशीं एक ब्राह्मण । बोलला त्यासी येऊन । नका बसूं ऐसें खिन्न । काळजी करीत मुलाची ॥ २९ ॥ एक बालवयी संन्यासी । आलेत आपुल्या गांवासी । ज्यानें मूकांबिकेच्या गेहासी । मृत बालक उठविलें ॥ ३० ॥ ऐसा महान् अधिकारी । तेज प्रत्यक्ष सूर्यापरी । समागमें ग्रंथ भारी । आहेत नाना शास्त्रांचे ॥ ३१ ॥ समागमे शिष्य त्यांचे । मोठमोठ्या वयाचे । तो तुमच्या मूढ पुत्राचें । कांहीं तरी सांगेल ॥ ३२ ॥ तैं बोलला प्रभाकर । ही बातमी माझ्या कानांवर । कालपासून साचार । आली आहे द्विजोत्तमा ! ॥ ३३ ॥ चला हाहि एक प्रयत्न । पाहावा वाटतें करून । एकांताचा समय साधून । भेट घेऊं स्वामींची ॥ ३४ ॥ छे ! छे ! हे प्रभाकरा ! । एकान्ताची न पाही जरा । वाट, नभींच्या दिनकरा । विश्रांति ती कोठून ? ॥ ३५ ॥ झुंडीच्या झुंडी वरच्यावर । नरनारींच्या येती फार । दर्शनासी साचार । हौसे, नौसे, गौसे पाहा ॥ ३६ ॥ तें प्रभाकरासी मानवलें । दर्शन घेण्याचें ठर-विलें । भार्यामुलांस घेतलें । समागमें आपुल्या ॥ ३७ ॥ प्रभाकर म्हणे पुत्रासी । येतोस कां दर्शनासी । आम्हांसवें आजदिवशीं । शंकराच्या मंदिरांत ॥ ३८ ॥ स्वामींचिया समोर । करूं नकोस वेडेचार । शांत बैस घटकाभर । बाळा

तयांचिया पुढें ॥ ३९ ॥ स्वामी हें नांव ऐकतां । कुमार झाला गालांत हंसता । जेणें त्याची प्रसन्नता । येती झाली कळोन ॥४०॥ श्रीफळ घेऊन हातांत । तिघे पातले मंदिरांत । प्रभाकरासी पाहतां त्वरित । गर्दी थोडी फांकली ॥ ४१ ॥ श्रीफळ पुढें ठेवून । तिघांनीं केलें वंदन । त्यांत बालकानें स्वामीचरण । दोन्ही हातें घट्ट धरिले ॥ ४२ ॥ नेत्रांवाटे अश्रुधारा। वाहूं लागल्या एकसरां । त्यायोगे झाला खरा । स्वामिचरणां अभिषेक ॥ ४३ ॥ कांहीं केलें तरी चरणां । कुमार तो सोडीना । तें पाहून समस्तांना । आश्चर्य बहु वाटलें ॥ ४४ ॥ स्वामींस बोले प्रभाकर । आपुले दोन्ही जोडून कर । हें दुर्दैव माझें साचार । पुत्ररूपी जन्मलें ॥ ४५ ॥ याच्या वयास गुरुवरा ! । आज वर्षे झालीं तेरा । एक शब्द ह्याची गिरा । आजपर्यंत बोलली नसे ॥ ४६ ॥ नुसतीं अक्षरें बाबा, आई । हेंहि पोर बोललें नाहीं । वांटचास याच्या अक्कल कांहीं। आली नाहीं वाटतें ॥ ४७ ॥ हे दोष पूर्वजन्मार्जित । किंवा एखादे लागलें भूत । वा जादूटोणा करून सत्य । कोणीं याला भ्रमिष्ट केलें ॥ ४८ ॥ किंवा एखादी शारीरिक व्यथा । आहे ही पुण्यवंता !। हा पुत्र माझा एकुलता । एक आहे स्वामिराया ! ॥ ४९ ॥ आपण आहां त्रिकालज्ञ । म्हणून आलों आपणां शरण । माझ्या पुत्राचें पिसेंपण । आपण हरण करावें ॥ ५० ॥ ऐसें प्रभाकराचें भाषण । आचार्यांनीं ऐकून । बोलते झाले मधुर वचन । तया प्रभाकरपुत्रासी ॥ ५१ ॥ ऐसी जडवृत्ति धरून । राहसी ऐसा आहेस कोण ? । हें न करतां अनुमान । सांगावें कीं ये वेळां ॥ ५२ ॥ पुत्र म्हणे आचार्यातें । जडपणा न माहीत मातें । मात्र माझ्या आधारें राहतें । जड अवघें जगदिह ॥ ५३ ॥ आतां म्हणाल तूं कोण ? । मी हें करितों कथन। असूं द्यावें अवधान। स्वामि ! आपुले त्याकडे ॥ ५४ ॥

निमित्तं मनश्चक्षुरादिप्रवृत्तौ । निरस्ताखिलोपाधिराकाशकल्पः ।
रविर्लोकचेष्टा निमित्तं यथा यः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥१॥
यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं । मनश्चक्षुरादीन्यबोधात्मकानि ।
प्रवर्तत आश्रित्य निष्कम्पमेकं । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥२॥
मुखाभासको दर्पणे दृश्यमानो । मुखत्वात्पृथक्त्वेन नैवास्ति वस्तु ।
चिदाभासको धीषु जीवोऽपि तद्वत् । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥३॥

यथा दर्पणाभाव आभासहानौ । मुखं विद्यते कल्पनाहीनमेकम् ।
तथा धीवियोगे निराभासको यः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।४।।
मनश्चक्षुरादेर्वियुक्तः स्वयं यो । मनश्चक्षुरादेर्मनश्चक्षुरादिः ।
मनश्चक्षुरादेरगम्यस्वरूपः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।५।।
य एको विभाति स्वतः शुद्धचेतः । प्रकाशस्वरूपोऽपि नानेवधीषु ।
शरावोदकस्थो यथा भानुरेकः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।६।।
यथाऽनेकचक्षुः प्रकाशो रविर्न । क्रमेण प्रकाशीकरोति प्रकाश्यम् ।
अनेकाधियो यस्तथैकः प्रबोधः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।७।।
विवस्वत्प्रभातं यथारूपमक्षं । प्रगृण्हाति नाभातमेवं विवस्वान् ।
यदाभात अभासयत्यक्षमेकः । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।८।।
यथा सूर्य एकोऽप्यनेकश्चलासु । स्थिरास्वप्यनन्यद्विभाव्यस्वरूपः ।
चलासु प्रभिन्नाः सुधीष्वेक एव । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।९।।
घनच्छन्नदृष्टिर्घनच्छन्नमर्कं । यथा निष्प्रभं मन्यते चातिमूढः ।
तथा बद्धवद्भाति यो मूढदृष्टे । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।१०।।
समस्तेषु वस्तुष्वनुस्यूतमेकं । समस्तानि वस्तूनि यन्न स्पृशन्ति ।
वियद्वत्सदा शुद्धमच्छस्वरूपं । स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।११।।
उपाधौ यथा भेदता सन्मणीनां । तथा भेदता बुद्धिभेदेषु तेऽपि ।
यथा चन्द्रिकाणां जले चञ्चलत्वं । तथा चञ्चलत्वं तवापीह विष्णो।।१२।।

शोक, मोह, तृषा हे तीन । क्षुधा, जरा आणि मरण । ऐशा सहा विकारांहून । मी अत्यंत वेगळा ।। ५५ ।। क्षय, वृद्धि, उत्पत्ति, स्थिति । नाश परिणाम निश्चितीं । याही सहा दोषांप्रति । मजठायीं जागा नसे ।। ५६ ।। मी शुद्धबुद्ध आनंदघन । सच्चिदानंद परिपूर्ण । माझ्या ऐक्यावांचून । कांहींच नाहीं कोठेंहि ।। ५७ ।। यापरीचे श्लोक बारा । जेव्हां कुमाराची वदली गिरा । या बारा श्लोकांत पसारा । ब्रह्मांडाचा कथिला त्यांनीं ।। ५८ ।। ते श्लोक ऐकून । थक्क झाले अवघे जन । प्रभाकरालागून । भरतें आलें प्रेमाचें ।। ५९ ।। या कुमाराच्या भाषणांनीं । आचार्य प्रसन्न झाले मनीं । त्यास आपुल्या हातांनीं । उठविते झाले तेधवां ।। ६० ।। ऊठ, ऊठ, हे कुमारा ! । तूं ब्रह्मज्ञानी आहेस खरा । हे श्लोक रचून बारा । थोर ख्याति केलीस ।। ६१ ।। या बारा श्लोकांत । काय आहे वेदान्त । हें करतलींच्या आवळ्यावत् । विशद तुवां केलेंस ।। ६२ ।।

म्हणून वत्सा ! तुजकारण । दिलें मीं आजपासून । हस्तामलक नामाभिधान । तें तूं ग्रहण करावें ॥ ६३ ॥ आचार्य म्हणती प्रभाकरा ! । तूं पुण्यवान् पुरा पुरा । म्हणून आलें तुझ्या उदरा । हें ऐसें अमोल रत्न ॥ ६४ ॥ या कल्पवृक्षाकारण । तू कंटक वृक्ष लेखिलें जाण । अरे ! हा ज्ञानपरीस परिपूर्ण । तूं पाषाण मानिलें ॥ ६५ ॥ या ज्ञानकामधेनूस । तूं गणिली वांझोटी म्हैस । किंमतवान् अमोल रत्नास । तूं मानलेंस गारगोटी ॥ ६६ ॥ पशुपक्ष्यांकारण । तूं तरी कोठें भाषण । करितोस हें शोधून । पाहा आपुल्या मनातें ॥ ६७ ॥ सजात जेव्हां कोणी भेटे । तेणें भाषण होय गोमटें । कोकिळेला वाणी फुटे । वसंतऋतूमाझारीं ॥ ६८ ॥ कुटाळचाच्या अड्डयाप्रत । खरा खरा जो संभावित । तो न थांबे यत्किंचित । कितीहि आग्रह केला जरी ॥ ६९ ॥ कसबिणीच्या मोहल्यांतून । सज्जन खालीं पाहून । चालला असें म्हणून । तो कां नपुंसक मानावा ? ॥ ७० ॥ हा कुमार नाहीं वेडा । हा प्रत्यक्ष ज्ञानगाढा । याची तुम्ही आस सोडा । हा न तुमच्या उपयोगी ॥ ७१ ॥ परसांतील आडासी । कोंडा न देवमाशासी । त्यास मोठ्या सागरासी । सोडणें हाच न्याय असे ॥ ७२ ॥ संसाराच्या उकिरडयांत । हा घोडा जातिवंत । राहणार नाहीं खचित । हें ध्यानांत असूं द्या ॥ ७३ ॥ वानराच्या कंठांतूनि । बांधूं नये चिंतामणि । हा पूर्वजन्मींचा महाज्ञानी । तो न संसार करील ॥ ७४ ॥ याची सांगतों पूर्वकथा । ती सावचित्तें ऐक आतां । हा यमुनातटीं बैसला होता । पूर्ण समाधि लावून ॥ ७५ ॥ तों ब्राह्मणाची एक नारी । स्नानास आली यमुनातीरीं । तान्हें बालक कडेवरी । घेऊनिया आपुलें ॥ ७६ ॥ मूल होतें खोडकर । चपळ आणि अगोचर । म्हणून केला विचार । त्या साध्वीनें येणें रीतीं ॥ ७७ ॥ वृद्धाधिकारी महंत । यमुनातटीं पाहून स्थित । त्यास म्हणाली जोडून हात । मूल हें थोडे संभाळा ॥ ७८ ॥ मी स्नान करून येतें । आणि यास घेऊन जातें । तुम्ही सांभाळा तितक्यापुरतें । या अर्भकाला दयानिधे ! ॥७९॥ ऐसें तयासी बोलून । मूल दिलें ठेवून । आपण कराया गेली स्नान । त्या पवित्र यमुनेचें ॥ ८० ॥ योगी होते समाधींत । त्या न हें माहीत । मूल रांगत रांगत । जाऊन पडलें यमुनेमध्यें ॥ ८१ ॥ उदकीं पडतां प्राण गेला । मुडदा वाहत वाहत आला । जेथ ही बाई स्नानाला ।

करीत होती तेथ हो ! ॥ ८२ ॥ मुलाचें पाहून प्रेत । बाई झाली दु:खित । प्रेत घेऊन हातांत । आली क्रोधें योग्याकडे ॥ ८३ ॥ त्याची समाधि पाहून । बोलती झाली ओरडून । बरेंच मेल्या ! धरिलें मौन । मज पाहून ये वेळां ॥ ८४ ॥ मी हें मूल तुजपासीं । दिलें होतें सांभाळण्यासी । तेंच तूं यमुनाडोहासी । नेऊनिया बुडविलें ॥ ८५ ॥ आपुलें पूर्ण करण्या साधन । बळि बालका दिलें जाण । मांगा ! राख फांसून । बसलास कशाला आसनावरी ? ॥ ८६ ॥ पिशाचाचीं साधनें करिसी । तीं साधण्या बळि देसी । बालकांचे यमुनेसी । मजसारख्या दुबळ्यांच्या ॥ ८७ ॥ तुझा पाहून जटाभार । मी विश्वासलें तुजवर । त्याचा फेडिला उपकार । पोर माझें मारूनिया ॥ ८८ ॥ आरडाओरडा बहुत केला । योग्यानें उतरलें समाधीला । ती उतरतां कळून आला । तया हा झालेला प्रकार ॥ ८९ ॥ शोकाकुल पाहून बाई । योगिवरानें केलें काई । आपुला देह सोडून पाही । बालतनूंत प्रवेश केला ॥ ९० ॥ प्रेतास आलें चलनवलन । मूल झालें पहिल्यासमान । तया बालका घेऊन । बाई गेली आपुल्या घरीं ॥ ९१ ॥ दोन वर्षे राहून तेथें । आतां हा जन्मला येथें । प्रभाकरा तव गेहातें । हा सामान्य मनुज नाहीं ॥ ९२ ॥ हा तुम्ही आम्हांस द्यावा । शोक मुळीं न करावा । तुझी दया येईल देवा । त्याची चिंता करूं नको ॥ ९३ ॥ अवघें बरें होईल तुझें । वचन प्रमाण मानी माझें । तुझ्या कल्याणाचें ओझें । आहे प्रभूच्या शिरावरी ॥ ९४ ॥ तें तो खास उतरील । तुला सुखी करील । कमी कशाचें न पडेल । तुजलागीं प्रपंचांत ॥ ९५ ॥ ऐशी ऐकून आचार्योक्ति । आनंद झाला अवघ्यांप्रति । जयजय हस्तामलक सन्मति । ऐसें त्रिवार गर्जिन्नले ॥ ९६ ॥ प्रभाकर विनयें बोलला । आपुली आज्ञा मान्य मला । हा हस्तामलक आपुला । आहे, माझा न आतां हा ॥ ९७ ॥ प्रभाकराचिये घरीं । स्वामींची पूजा झाली खरी । ब्रह्मवृंदांची मंडळी सारी । आली होती प्रसादा ॥ ९८ ॥ पंच पक्वान्नांचें भोजन । स्वामींप्रती घालून । पुत्रहि केला अर्पण । त्या प्रभाकर विप्रानें ॥ ९९ ॥ लोक त्या श्रीबली गांवाचे । चित्तीं आनंदले साचे । अवघे अद्वैत मताचे । बसले होऊन अनुयायी ॥ १०० ॥ अद्वैत सिद्धान्तावरी । रोजच्या रोज मंदिरीं । प्रवचनें होऊं लागलीं भारी । आचार्यांचीं लोकांस्तव ॥ १०१ ॥ त्या

प्रवचनरूप पर्जन्यें भला । अज्ञान धुराळा निमाला । चहूं वर्णीं आनंद झाला । तो मुखें वानूं किती ? ॥ १०२ ॥ मुक्कामाच्या अखेरीसी । आचार्य वदले अवघ्यांसी । अहो तुम्ही ग्रामवासी ! । माझें बोलणें अव-धारा ॥ १०३ ॥ या हस्तामलकाचे श्लोक बारा । जो नियमानें पठण करील खरा । ब्रह्मज्ञान त्याच्या घरां । येईल हुडकीत तयासी ॥ १०४ ॥ या श्लोकांचा पाठ जेथ । नियमें होईल तेथ तेथ । अद्वैत तें मूर्तिमंत । नांदावया लागेल कीं ॥ १०५ ॥ म्हणून तुम्ही अवघ्यांनीं । हे श्लोक वदावे वदनीं । त्याच्या अर्थाकडे देऊनी । पूर्ण लक्ष आपुलें ॥ १०६ ॥ तो होईल जीवन्मुक्त । संशय न मुळींच येथ । हे बारा श्लोक अमृत । आहेत अध्यात्मविद्येचे ॥ १०७ ॥ तें मान्य केलें अवघ्यांनीं । हस्तामलका-पासूनी । श्लोक घेतले उतरोनी । रोज पाठ करावया ॥ १०८ ॥ असो हस्तामलका घेऊनी । आचार्य निघाले तेथूनी । तुंगभद्रेच्या कांठांनीं । आपुल्या सर्व शिष्यांसह ॥ १०९ ॥ तुंगभद्रा नदीचें तीर । परम रम्य आणि सुंदर । तेथे एक गिरिवर । होता शृंगगिरि नांवाचा ॥ ११० ॥ त्या शृंगगिरीवरी । आचार्यांची आली स्वारी । संन्यास दीक्षा दिली खरी । हस्तामलकास ते ठायां ॥ १११ ॥ यापुढील अवघें वृत्त । पुढीला-ध्यायीं होईल विदित । येथेच स्थापिला सत्य । पहिला मठ आचार्यांनीं ॥ ११२ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ११३ ॥ श्रीहरि-हरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय चोविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ अहो देवा वैकुंठनायका ! । माझी विनंती शीघ्र ऐका । कानांत बोळे घालूं नका । देवा ! माझ्याविषयीं ॥ १ ॥ तूं सर्वज्ञ सर्वशक्ति । अवघेंच आहे तुझिया हातीं । माझी इच्छा पुरविणें ती । नाहीं तुजला अशक्य ॥ २ ॥ पाणी देणें एक पेला । अशक्य आहे का जान्हवीला । वा चार कौड्या कुबेराला । देणें अशक्य होईल का ? ॥ ३ ॥ मी न तुला मागत । त्रैलोक्याचें राज्य सत्य । भिऊं नकोस पंढरि-

नाथ ! । मजलागीं भेटावया ॥ ४ ॥ मी तुझ्या दर्शनाचा । देवा ! भुकेला आहें साचा । तुमाच आश्रय पायांचा । मजला असो निरंतर ॥ ५ ॥ तो एक मिळाल्यावरी । कांहीं न कमी भूवरी । पडत त्याला आहे खरी । साक्ष आहे बहुतांची ॥ ६ ॥ चित्तीं वास करावा । या आचार्यचरितातें वदवा । कोप केव्हांहि न करावा । या अजाण गणूवरी ॥ ७ ॥ असो कन्या मलय पर्वताची । जी तुंगभद्रा होय साची । पुण्याई फळा आली तिची । आचार्य राहिले तिच्या तीरा ॥ ८ ॥ येथें शृंग पर्वतास । आचार्यांनीं केला वास । प्रार्थूनिया विभांडकास । जागा मागून घेतली ॥ ९ ॥ जी पर्वताच्या पायथ्याशीं । जागा होती हो ! भव्यशी । श्रोते ! याच भूमीसी । आचार्यांनीं बांधिला मठ ॥ १० ॥ तो शृंगपर्वत । मनोहर रम्य अत्यंत । वृक्षलतांनीं आच्छादित । माथा ज्या पर्वताचा ॥ ११ ॥ तुंगभद्रा वाहे खालती । सुगंधित वारे वाहतीं । हरिण-बालकें बागडती । जननी-सह चोहींकडे ॥ १२ ॥ श्वापदें झालीं निर्वैर । हा आचार्यांचा अधिकार । सर्पासवें खेळती मोर । व्याघ्र चाटिती धेनूला ॥ १३ ॥ नळ, नीळ, वानर, माकडें । त्यांनीं अलंकृत पर्वतकडे । गोड पाण्याचे रोकडे । झरे वाहती अनुपम ॥ १४ ॥ ऐशा रमणीय जागेसी । पाठ निज शिष्यांसी । आचार्य देती प्रतिदिवशीं । उपनिषद् भागाचा ॥ १५ ॥ आचार्याच्या शिष्यांत । मंदबुद्धि तो अत्यंत । एक शिष्य होता सत्य । नांव ज्याचें गिरि असे ॥ १६ ॥ त्याची निष्ठा आचार्यचरणीं । होती मनापासूनि । सेवेस तत्पर निशिदिनीं । हनुमंताच्या समान ॥ १७ ॥ आचार्य राजा रघुवीर । गिरि हाच वायुकुमर । किंवा आचार्य रमावर । गरुड हाच गिरि येथें ॥ १८ ॥ छाटच्या आचार्य स्वामींच्या । गिरि हाच धुई साच्या । जलानें तुंग-भद्रेच्या । नेऊन सरितेस प्रतिदिनीं ॥ १९ ॥ एवंच सेवा कोणतीहि । गिरि हाच करी पाही । तों एके दिनीं घडलें कांई । तें आतां अवधारा ॥ २० ॥ छाटच्या घेऊन नदीवर । गेला धुवाया साचार । तों आला थोडा पूर । नदीस नव्या पाण्याचा ॥ २१ ॥ म्हणून गिरीनें झरा केला । नवी छाटी धुवायाला । त्यामुळें वेळ झाला । टळली वेळ पाठाची ॥२२॥ तै पद्मपाद म्हणे स्वामींना । आज पाठासी वेळ झाला । दिवस अवघा कलून गेला । तीन प्रहर भुक्त झाले ॥ २३ ॥ आचार्य म्हणती त्यावर । थांबा थोडे घटकाभर । छाटी धुवावया नदीवर । गिरि सांप्रत गेला असे

॥ २४ ॥ तो येथें आल्यावरी । पाठ सांगेन निर्धारीं । आज त्याला वेळ खरी । कां झाली हें कळेना ॥ २५ ॥ पद्मपाद बोले त्यावर । जोडून आपुले दोन्ही कर । असून नसून साचार । सारखा गिरि ये ठायां ॥२६॥ पाठ काय तो कळेना । सांगितलें तें वळेना । कोणतेंच ग्रहण होईना । ज्ञान त्याच्या बुद्धीसी ॥ २७ ॥ तो सजीव धोंड्यापरी । आहे आम्हां-भीतरीं । उगीच पालथ्या घागरीवरी । पाणी ओतून अर्थ काय ? ॥२८॥ आचार्य म्हणती पद्मपादा । ऐसें नको वदूं कदा । शहाण्यानें मतिमंदा । सवें घेऊन चालावें ॥ २९ ॥ तूं मंदबुद्धि म्हणसी त्यासी । परि हें चुकेल सर्वांशीं । चपलता न दिसे गजासी । परि पळतां जिंकी हरणातें ॥३०॥ हें ध्यानांत ठेवावें । त्याचें प्रत्यंतर पाहावें । कोणी कोणा न बोलावें । हा पंथ सज्जनांचा ॥ ३१ ॥ तों तितुक्याभीतरीं । छाट्या धुवून आला गिरि । येऊन बैसला समोरी । छाटचा वाळत घालोनिया ॥ ३२ ॥ गिरीकडे आचार्यांनीं । पाहिलें कृपादृष्टीनीं । आपल्या यौगिक सामर्थ्यांनीं । अज्ञान त्याचें निवटिलें ॥ ३३ ॥ गिरि पूर्ण ज्ञानी झाला । एका क्षणामाजीं भला । भरती आणतां ये सागराला । चंद्रम्यास केव्हांहि ॥ ३४ ॥ प्रयोजन हें करण्याचें । इतकेंच होतें तेधवां साचें । इतर शिष्यांच्या गर्वाचें । करणें होतें खंडण ॥ ३५ ॥ कां कीं गर्वासारखा । प्रबळ शत्रु नाहीं देखा । मोठमोठे गेले नरका । त्याच्र एका गर्वानें ॥ ३६ ॥ निजशिष्यांस बाधा त्याची । होऊं नये अंशें साची । म्हणून या गोष्टीची । केली योजना स्वामींनीं ॥ ३७ ॥ गिरिसमोर बैसला । वंदन करून आचार्यांना । तै आचार्य वदले तयाला । आपल्या मधुर वाणीनें ॥ ३८ ॥ अळम्, टळम् पाठास । तूं कां ऐशी करि-तोस ? । वा हें उपनिषद्रहस्य । आकलन तुला होत नसे ॥ ३९ ॥ गिरि बोलला त्यावरी । आपली कृपा जोंवरी । आहे स्वामी ! माझ्या-वरी । तोंवरी कांहींच अशक्य नसे ॥ ४० ॥ आजन्म जो असेल मुका । तोहि होईल बोलका । पांगळाहि क्षणांत एका । जाई डोंगर चढून ॥ ४१ ॥ जें जें आपण कथन केलें । तें तें मीं ध्यानीं धरिलें । थोडकेंहि न जाऊं दिलें । आजवरी ज्ञान वांयां ॥ ४२ ॥ आज्ञा झाल्यास परवचा । देतों मी आज त्याचा । ती ऐकून वदली वाचा । आचार्यांची येणें रीतीं ॥ ४३ ॥ सांग पाहूं भाग कांहीं । त्या उपनिषदाचा लवलाही । जें जें

निज बुद्धीठायीं । आजवरी तूं सांठविलेंस ॥ ४४ ॥ ऐसें आचार्य स्वामी वदतां । गिरि झाला बोलता । आपुल्या जोडूनि हातां । अस्खलित वाणीनें ॥ ४५ ॥

भगवन्नुदधौ मृतिजन्मजले सुखदुःखझषे पतितं व्यथितं ।
कृपया शरणागतमुद्धर मामनुशाध्युपसन्नमनन्यगतिम् ॥ १ ॥
विनिवर्त्य रतिं विषये विषमां परिमुच्य शरीरनिबद्धमतिम् ।
परमात्मपदे भव नित्यरतो जहि मोहमयं भ्रममात्ममते ॥ २ ॥
विसृजान्नमयादिषु पंचसु तामयमस्मि ममेति मतिं सततम् ।
दृशिरूपमनन्तमजं विगुणं हृदयस्थमवैहि सदाहमिती ॥ ३ ॥
जलभेदकृता बहुतेव रवेर्घटिकादिगता नभसोऽपि यथा ।
मतिभेदकृता नु तथा बहुता तव बुद्धिदृशो विकृतस्य सदा ॥ ४ ॥
दिनकृत्प्रभया सदृशेन सदा जनवित्तगतं सकलं स्वचिता ।
विदितं भवता विकृतेन सदा यत एव मतोसि सदेव सदा ॥ ५ ॥

सुखदुःखांचे मत्स्य भारी । ज्या जन्ममृत्यूच्या सागरीं । मी पडलों भीतरीं । गटांगळ्या खात गुरुराया ! ॥४६॥ येथें माझें तारण । तुम्हीच करा हो ! दयाघन । मी आहें अनन्य शरण । आपुल्या दिव्य पदांते ॥ ४७ ॥ विषयावरचें प्रेम उडो । तेंच आत्म्यासाठीं जडो । स्वस्वरूपाचा कधीं न पडो । विसर तो येतुलाहि ॥ ४८ ॥ अन्नमय पंचकोशाठायीं । जी कां अहंबुद्धि राही । ती सोडून लवलाही । आत्म्याठायीं रममाण हो ॥ ४९ ॥ सूर्याचें तें अनेकत्व । जलाठायीं जैसें मिथ्य । घटमठांच्या आकाशांत । भेद तो नाहीं जसा ॥ ५० ॥ तेवीं चैतन्याचे ठायीं । भेद दिसतो मिथ्या पाही । भेदवार्ता मुळींच नाहीं । तत्त्वतः चैतन्यातें ॥ ५१ ॥ सूर्यप्रकाशासमान । अवघ्या ठायींचें चैतन्य । एकचि आहे परिपूर्ण । आणि तें ब्रह्म तूंच होसी ॥ ५२ ॥ श्रोते ! ऐशा अर्थाचे । श्लोक तोटक वृत्ताचे । गिरीनें रचून साचे । उपनिषद् सार कथियेले ॥ ५३ ॥ तें गिरीचें व्याख्यान । करूनिया पाहा श्रवण । गेले अवघे आनंदून । शिष्य आचार्य स्वामींचे ॥ ५४ ॥ पद्मपाद निरभिमान झाला । ऐकुनी गिरीच्या व्याख्यानाला । तो आपुल्याशींच बोलता झाला । येणें रीतीं विबुध हो ! ॥ ५५ ॥ ज्यास कालापर्यंत । कांहीं नव्हतें मुळींच येत । त्यानें बृहस्पतिवत् । आज केलें व्याख्यान हें ॥५६॥ ती शक्ति न तयाची ।

अवघी कृपा सद्‌गुरूची । धन्य धन्य माउली आमुची । शंकराचार्य श्रीमहाराज ।।५७।। अल्प वयांत द्विजद्वारां । ज्यांनीं आणविली इंदिरा । घटकेंत कुबेर केला खरा । यांनीं दरिद्री द्विज एक ।। ५८ ।। जननीच्या स्नानासाठीं । पूर्णा केली दारवंटी । एका कमंडलूच्या पोटीं । पूर सांठविला नर्मदेचा ।। ५९ ।। सहज परकायाप्रवेश केला । मुलगा मेलेला उठविला । तेथें हा प्रकार झाला । आचार्य ईश प्रत्यक्ष ।। ६० ।। सर्व शिष्यांनीं गिरीचा । गौरव तो केला साचा । सद्‌गुरूंच्या सेवेचा । लाभ तूंचि मिळविलास ।। ६१ ।। गिरीनें तोटक वृत्तांत । उपनिषदाचें इत्थंभूत । सार कथिलें थोडक्यांत । अति कुशाग्र बुद्धीनें ।। ६२ ।। तें पाहून आचार्यांनीं । अति आनंदित होवोनी । तोटकाचार्य म्हणूनी । पदवी अर्पिली गिरीतें ।। ६३ ।। हे आचार्यस्वामींचे शिष्य चार । ज्ञानमार्तंड भूमीवर । वा हे भासती दिग्गज चार । या चारी दिशांचे ।। ६४ ।। वा हीं ब्रह्मदेवाचीं । मुखकमळें होतीं साचीं । वा ती एकेक वेदाची । मूर्तीच होय प्रत्यक्ष ।। ६५ ।। मोक्ष, धर्म, काम, अर्थ । हे चारी पुरुषार्थ । तेच पुरुषार्थ मूर्तिमंत । शिष्य हे आचार्य स्वामींचे ।। ६६ ।। वा हे भासती धाम चारी । किती वानावी त्यांची थोरी । हे व्याख्यान-केसरी । असती वादाटवीचे ।। ६७ ।। असो श्रृंगगिरीचे पायथ्याला । आचार्यांनीं स्थापिला । अद्वैतमठ आपुला । पहिलाच जो भरतखंडीं ।। ६८ ।। नांव दिलें श्रृंगेरी । त्या मठास अत्यादरीं । बांधकाम जेथलें करी । विश्वकर्मा प्रत्यक्ष ।। ६९ ।। दगडी देऊळ शारदेचें । अति सुंदर बांधिले साचें । विश्वकर्म्याच्या कामाचें । मोल सांगा कोण करी ? ।। ७० ।। स्वतः केली स्थापना । शारदा अंबेची सिंहासना । आणि केली प्रार्थना । जगदंबेची येणे रीतीं ।। ७१ ।। हे शारदा अंबे सरस्वती ! । येथेच करावी आपुली वस्ती । अद्वैत मार्ग रक्षिण्याप्रति । येथून कोठें जाऊं नको ।। ७२ ।। हें मीं तुला महेश्वरीं । कथिलें होतें नर्मदातीरीं । त्याची सिद्धता झाली सारी । आतां वास येथें करा ।। ७३ ।। या वैदिक पंथावर । संकटे येतील अपार । कां कीं सोन्यालाच बसती फार । ताव हें ठावें आहे तुला ।। ७४ ।। येतील संकटे तीं तीं वारी । अद्वैत मताचें रक्षण करी । थोतांड मतें भूमीवरी । प्रबल होऊं देऊं नको ।। ७५ ।। तें ऐकून जगदंबा । तथास्तु बोलली शारदा अंबा । जी मूळ प्रकृति

सकलारंभा । त्या सच्चिदानंदाची ।। ७६ ।। विक्रम संवत बाविसांत । शृंगेरीमठ स्थापिला सत्य । तुंगातीरीं कर्नाटकांत । श्रीमत्-जगद्‌गुरूंनीं ।। ७७ ।। या शृंगेरी मठावर । स्थापन केला सुरेश्वर । पाहून त्यांचा अधिकार । विशाल धोरण स्वामींचें ।। ७८ ।। अवघी व्यवस्था लागे-पर्यंत । जगद्‌गुरु राहिले तेथ । अधिकारानुरूप शिष्यांप्रत । ग्रंथ करण्यास सांगितलें ।। ७९ ।। पुढें श्रोते ! एके दिनीं । श्रीमत्-जगद्‌गुरूंनीं । आपुले शिष्य जमवूनि । भाषण ऐसें आरंभिलें ।। ८० ।। सुरेश्वरा ! तोटका !। हे पद्मपादा ! हस्तामलका ! । तुम्ही अवघे माझें ऐका । बोध आपुल्या ब-यास्तव ।। ८१ ।। तुम्ही पूर्वी कोठें होतां ? । येथें आला कशाकरितां ? । या दीक्षेची आवश्यकता । कां पडली हें आणा मनीं ।। ८२ ।। जगापरी वेद चार । ईशें निर्मिले साचार । जयामाजीं सारासार । तत्त्वें अवघीं सांगितलीं ।। ८३ ।। अशाश्वतातें प्रतिपादिलें । शाश्वत तेंहि सांगितलें । विचारवंता उरविलें । स्थान प्रत्येक शास्त्रांत ।। ८४ ।। त्या अविचारवंत लोकांनीं । याचा उपनिषदापासूनि । व्याकरणाच्या बलांनीं । अर्थ काढिले निरनिराळे ।। ८५ ।। तेणें अव-घाच घोटाळा । भूतलावरी झाला । कर्मभक्ति ज्ञानाला । असंख्य फाटे फुटले कीं ।। ८६ ।। तेणें मत-मतांतरें माजलीं । समाजांत दुफळी झाली । एकी कोठेंच न राहिली । भरला बाजार द्वेषाचा ।। ८७ ।। अवघेंच कांहीं लागतें । या जगाच्या राहाटीतें । आणि तें प्रत्येक तत्त्व असतें । अंश सच्चिदानंदाचा ।। ८८ ।। हें कळायाकारण । अद्वैत हेंच साधन । जें जें होईल द्वैतभान । तें विचारें मावळतें ।। ८९ ।। तो अद्वैत पंथ रक्षावया । आपण आलों महीठायां । हें ध्यानांत धरूनिया । वैदिक पंथा रक्षिणें ।।९०।। मागें अद्वैताचें रक्षण । करण्या जन्मले बादरा-यण । ब्रह्मसूत्रें लिहून । वैदिक पंथा जीवविले ।। ९१ ।। मुलांनो ! तीच कामगिरी । पुन्हां आली आपणांवरी । म्हणून ठेवणें सावधगिरी । आहे भाग आपणांतें ।। ९२ ।। कुतर्कवादी तार्किक । मताभिमानी मूर्ख । हें नानामतें भ्रामक । निर्माण करतील जगामध्यें ।। ९३ ।। द्वेष कोणाचा करूं नका । अद्वैतास लागेल धक्का । पंथ या अद्वैतासारखा । निर्माण कोठें झाला नसे ।। ९४ ।। कर्ममार्ग जो वेदानें । सांगितला जीवाकारणें । त्याचें मर्म ध्यानीं धरणें । विधीकडे पाहूं नका ।। ९५ ।।

हें कर्मांतील कर्माचरण । म्हणजे बालसंगोपन । करावयाचें आहे ज्ञान । ज्यामध्यें तें कर्म पाहा ॥ ९६ ॥ पाहा बाळास बाळपणीं । दूध पाजिती बोळच्यांनीं । तोंच दोन महिन्यांनीं । जननी स्तनीं लावी तया ॥ ९७ ॥ एक वर्षाचें झाल्या पोर । पय पीतें वाटीभर । वयाप्रमाणें वाढे आहार । पुढतपुढती कितीतरी ॥ ९८ ॥ कर्माचरणें शक्ति येते । प्रकृति निकोप राहते । मन अति पवित्र बनतें । हा उपयोग कर्माचा ॥ ९९ ॥ निष्कलंक ज्याचें बालपण । गेलें त्यालाच तरुणपण । सुखदायी होतें जाण । ऐहिक सुखें भोगावया ॥ १०० ॥ येथें तारुण्य उपासना । ती उपास्याविना होईना । उपास्यांचा असणेंपणा । आकाराच्या हातीं असे ॥ १०१ ॥ नाम आणि आकार । लागती उपासनेस साचार । अनन्यतेनें येईल जोर । त्या उपासनेकारणें ॥ १०२ ॥ उपासनामार्गांत । थोडा अद्वैत सिद्धान्त । मानिला पाहिजे सत्य । व्हावया फलद उपासना॥१०३॥ या सगुण उपासनेठायीं । साक्षात्कार होतो पाही । अवश्य जें जें घडे कांहीं । तें उपासनेच्या जोरावर ॥ १०४ ॥ या उपासनामार्गांत । विचार करितां अहोरात्र । अति थोडें उरतें द्वैत । म्हणजे भक्त भगवंत हेंच पाहा ॥ १०५ ॥ ऐशी उपासना झाल्यावरी । पुढे ज्ञानाची पायरी । ती चढावी कैशापरी । हें शास्त्रांत कथन केलें ॥ १०६ ॥ पूर्ण झाल्या ब्रह्मज्ञान । मग कशाचें जन्ममरण । जिकडे पाहील तिकडे दर्शन । होईल तया ब्रह्माचें ॥ १०७ ॥ उपासनेच्या वांचून । जें का उपजलें असेल ज्ञान । तें ज्ञान नव्हे आहे विघ्न । समूळ वाटोळें करणारें ॥ १०८ ॥ कर्मबाह्य उपासना । ती फलद होई ना । उलट करणें वात्रटपणा । चित्त त्याचें इच्छीतसे ॥१०९॥ नुसता कर्ममार्ग तोहि । आचरणें बरा नाहीं । रांगणें तें शोभत नाहीं । तरुण मनुष्याकारणें ॥ ११० ॥ या वैदिक मार्गांत । हे तिन्ही मुद्दे कथिले सत्य । या तिहींचा संबंध जेथ । त्यालाच फळ येत असे ॥१११॥ म्हणजे वैदिक धर्मात । मुख्य आहे अद्वैत । कर्म उपासनेप्रत । त्याचीं अंगे म्हणावीं ॥ ११२ ॥ म्हणजे कर्माचिया काढ्यांत । उपासना ही शर्करा सत्य । टाकून मात्रा अद्वैत । भवरोग्यास पाजावी ॥ ११३ ॥ आणि तेंच करायाकारण । तुमचें झालें आहे जनन । अद्वैताचें मुख्य धोरण । ठेवून तुम्ही ग्रंथ रचा ॥ ११४ ॥ तैं सुरेश्वराचार्य म्हणती । वार्तिकें आपुल्या भाष्यावरती । करण्याविषयीं आज्ञा ती । व्हावी या दासाला ॥ ११५ ॥

तें पद्मपाद म्हणे स्वामीसी । वार्तिकें करण्या भाष्यासी । आज्ञा सुरेश्वरासी । न करावी हेंच बरें ॥ ११६ ॥ कां कीं तो कर्ममार्गी रत । होता आजपर्यंत । या जिंकिलें म्हणून अद्वैत । पंथ यानें स्वीकारिला ॥ ११७ ॥ हा कर्ममार्गाला सम्मत । ऐसेंचि कथील सिद्धान्त । म्हणून अन्य कोणाप्रत । वार्तिकाची आज्ञा व्हावी ॥ ११८ ॥ आनंदगिरि म्हणे स्वामीराया ! । वार्तिकें ती करावया । भाष्यावरी आपुल्या सदया । पद्मपाद योग्य असे ॥ ११९ ॥ जो लहानपणापासून । आहे वैराग्यसंपन्न । झालें आहे अध्ययन । वेदवेदांगांचें जया ॥ १२० ॥ निष्ठा पद्मपादाची । आहे आपुल्या विषयाची । अति वरच्या दर्जाची । ज्या निष्ठेस मोल नसे ॥ १२१ ॥ जावया पुरांतून । प्रत्येक पदाकारण । कमल झालें निर्माण । हा अधिकार जयाचा ॥ १२२ ॥ शिवाय अद्वैताचे सिद्धान्त । आहेत त्यासी अवगत । आपुल्या तो सहवासांत । लहानपणापासून असे ॥ १२३ ॥ म्हणून वार्तिकें करण्याची । आज्ञा त्यालाच करावी साची । निवड सुरेश्वराची । त्यापुरती होऊं नये ॥ १२४ ॥ एक म्हणाला आनंदगिरि । स्वामी आपुल्या भाष्यावरी । वार्तिकें तीं करील खरी । तोहि आतां योग्य असे ॥ १२५ ॥ किंवा हे हस्तामलक सन्मति । योग्य वार्तिकें करण्याप्रती । कां कीं अद्वैत सिद्धान्त याचे चित्तीं । पूर्ण आहे ठसावला ॥ १२६ ॥ ऐशीं शिष्यांचीं बोलणीं । ऐकलीं शांत चित्तांनीं । श्रीजगद्गुरु आचार्यांनीं । तुंगभद्रा तटातें ॥ १२७ ॥ मग आचार्य बोलते झाले । तुमचें भाषण मीं ऐकिलें । तुम्हीं सर्वांनींच केलेलें । वरघडीचें भाषण ॥ १२८ ॥ अरे ! विचार प्रत्येक गोष्टीचा । सांगोपांग करील साचा । जो कोणी त्याचीच वाचा । हिशोबीं धरावी ज्ञात्यांनीं ॥ १२९ ॥ वार्तिकें करण्याचें तें ज्ञान । आहे हस्तामलकालागून । परी नाहीं घडलें अध्ययन । त्यास या जन्मीं वेदांचें ॥ १३० ॥ ज्ञान जें आहे त्याप्रती । ती मागील जन्माची संपत्ति । ये जन्मीं याप्रती । घडला नसे संस्कार ॥१३१॥ जें जें संस्कारविरहित । तें तें अवघेंच आहे व्यर्थ । जल वाळूच्या विरहित । असल्या न सुखदायी ॥ १३२ ॥ पद्मपाद हा आपुला । जरी ज्ञानानें पूर्ण असला । तरी वार्तिकें करण्याइतुकें त्याला । व्यवहार शास्त्र ठावें नसे ॥ १३३ ॥ तो आजन्म ब्रह्मचारी । राहिला या भूमीवरी । व्यवहारशास्त्राभीतरीं । त्याची मुळीं गति नसे ॥ १३४ ॥ तुम्ही ज्ञानानें सारे

समान । कोणी नाहीं अधिक न्यून । सुरेश्वरासी संपूर्ण । संस्कार ते झाले असती ।। १३५ ।। हा कर्ममार्गी रत । जरी पूर्वीच्या आश्रमांत । होता तरी त्याप्रत । आतां त्याची भीति नसे ।। १३६ ।। बाळपणींचे व्यवहार । तारुण्यांत आल्यावर । मावळून जाती साचार । लेशहि त्यांचा उरत नसे ।। १३७ ।। म्हणून तुम्हीं अवघ्यांनीं । एकेक ग्रंथ करोनी । मज दाखवा आणोनी । म्हणजे बरें होईल ।। १३८ ।। ऐशी गुरूंची आज्ञा होता । आनंद झाला समस्तां । जो तो ग्रंथ करण्याकरितां । झाला असे तयार ।। १३९ ।। नैष्कर्म्य सिद्धि नांवाचा । ग्रंथ अत्यंत वहारीचा । सुरेश्वरांनीं रचिला साचा । जगद्गुरूंच्या कृपेनें ।। १४० ।। तैत्तिरीय आणि बृहदारण्यक । उपनिषदद्वयावरी सुरेख । करिती झाले वार्तिक । श्रीसुरेश्वराचार्य स्वामी ।। १४१ ।। पद्मपादांनीं भाष्यावर । टीका केली मनोहर । पंचपादिका साचार । नाम पहिल्या भागाचें ।। १४२ ।। त्याच्याच दुसऱ्या भागाप्रति । नांव दिलें असे वृत्ति । ही पद्मपादाची असे कृति । कळसा गेली गुरुकृपें ।। १४३ ।। श्रीव्याससूत्राकारणें । सोप्या टीकेचें केलें लेणें । याच पद्मपादानें । विजयडिंडिमा नांव दिला ।। १४४ ।। आनंदगिरि आदिकरून । शिष्य जे का ज्ञानसंपन्न । ग्रंथ रचण्याचें त्याकारण । आज्ञा करिते झाले गुरु ।। १४५ ।। पुस्तकें आचार्य शिष्यांचीं । रत्नेंच ज्ञानसागरींचीं । त्यांची कदा न व्हावयाची । बरोबरी ती कोणाच्यानें ।। १४६ ।। सर्वांचे ग्रंथ पाहिले । आचार्य मनीं संतोषले । आणि अवघ्यांप्रति बोलते झाले । गर्जूनिया येणें रीतीं ।। १४७ ।। शिष्य हो ! शृंगेरी मठाचा । अभिमान तुम्ही वाहावा साचा । झेंडा अद्वैत मताचा । फडकत ठेवा सदोदित '।। १४८ ।। हा सुरेश्वराचार्य येथला । मीं अधिकारी नेमिला । पाहून त्याच्या वयाला । तुम्हां अवघ्यांत वडिल तो ।। १४९ ।। शारदा जगन्मोहिनी । जी शब्दसृष्टीची स्वामिनी । ती तुमचें साह्य करण्या जाणी । शृंगेरींत बसली असे ।। १५० ।। शारदा चंद्रमौलीश्वर । हीं दोन दैवतें साचार । तुमच्या अद्वैत पंथा आधार । आहेत हें विसरूं नका ।। १५१ ।। हीं दोन दैवतें । कां कथिलीं तुम्हांतें । याचें मर्म आणा पुरतें । तुम्ही आपुल्या मनांत ।। १५२ ।। सरस्वतीचें पूजन । म्हणजे सर्व शास्त्रांचें अध्ययन । उगीच हळदीकुंकूं घेऊन । मूर्तीस वाहणें हें नव्हे ।। १५३ ।। हळदकुंकू हा बाह्य प्रकार । अध्ययनीं

ठेवा भर । म्हणजे सेवा निरंतर । झाली समजा शारदेची ॥ १५४ ॥ अद्वैत मतामाझारीं । देव नसती साकारी । चंद्रमौलीश्वराची थोरी । मग येथें मानणें कां ॥ १५५ ॥ त्याचें हेंच कारण । सांगतों तिकडे द्यावें मन । कुस्तीआधीं पहिलवान । बनलें पाहिजे शरीरानें ॥ १५६ ॥ शरीरीं शक्ति आणावी । मग कुस्ती खेळावी । पहिलवानकी टिकवावी । मिळवलेल्या कीर्तीसह ॥ १५७ ॥ या गोष्टीचें व्हाया ज्ञान । चंद्रमौलीश्वराचें पूजन । करणें तुम्हांलागून । आहे शिष्य हो ! भाग पाहा ॥ १५८ ॥ म्हणजे पूजनमिषें उपासना । रक्षण करणें आहे जाणा । त्याशिवाय खऱ्या ज्ञाना । अधिकारी कोणी होत नसे ॥ १५९ ॥ पूजन चंद्रमौलीश्वराचें । भक्तियुक्त करणें साचें । परि स्तोत्र पठतां वाचें । म्हणा शिव तो मीच कीं ॥ १६० ॥ हें म्हणणें शब्दपारायण । नुसतें न व्हावें कदा ज्ञान । तेथें उमटली पाहिजे खूण । स्वानुभवाची शिष्यांनो ! ॥ १६१ ॥ म्हणजे ध्यान करितां शिवाचें । विस्मरण व्हावें अवघ्यांचें । आणि अनुसंधान एक आत्म्याचें । टिकावें मात्र अक्षय ॥ १६२ ॥ म्हणजेच तो अद्वैतमति । ओळखावा निश्चितीं । उगीच सोंगाडे वेदान्ती । पाहून माना तुकवूं नका ॥ १६३ ॥ जैसा शहाणा पंडित । पोरासी असतां खेळवीत । बोबडे शब्द बोलत । तें कां हें ध्यानीं धरा ॥ १६४ ॥ त्या शहाण्या पंडितापरी । अद्वैत मत निर्धारीं । द्वैत या पंथाभीतरीं । ओखदाहि न गवसेल ॥ १६५ ॥ एवढेंच विशेष आहे यांत । कोणतेंहि असो मत । तें अद्वैताचें उदरांत । सहज सामावून जातसे ॥ १६६ ॥ अनाचार दुराचार । शास्त्राविरुद्ध जे जे प्रकार । त्यांचाच करणें तिरस्कार । तोहि शुद्ध त्यां करण्यास्तव ॥ १६७ ॥ अद्वैत मतीं प्राधान्य । आहे तें तुला विशेष जाण । चुका देणें समजावून । इतर पंथां हें काम त्याचें ॥ १६८ ॥ तें तें तुम्ही करीत राहा । अद्वैताची मजा पाहा । एकमेकां जाचक न व्हा । केव्हांहि आपुल्या कृतीनें ॥ १६९ ॥ हें बोधरूपी भाषण । अवघ्यांनीं जें केलें श्रवण । बहुतेकांच्या नेत्रांतून । आनंदाश्रू येते जाहले ॥ १७० ॥ अवघे उंच स्वरानें । गर्जिन्नले आदरानें । श्रींच्या नामघोषानें । दणाणून गेला तो मठ ॥ १७१ ॥ ऐसा थाट कित्येक दिवस । चालला तेथें शृंगेरीस । वादविशेष हमेश । होय गुरुशिष्यांचा ॥१७२॥ शिष्यांची कोणतीहि शंका । आचार्य ना उरवती देखा । वक्ता

आचार्यांसारखा । पुन्हां न होय कधींहि ।।१७३।। पद्मपाद एके दिवशीं । बोलता झाला आचार्यांसी । तीर्थयात्रा करायासी । जावें वाटतें मजलागीं ।।१७४।। आचार्य म्हणती त्यावर । गुरुसान्निध्य हें साचार । गोष्ट आहे बहु थोर । त्या तीर्थयात्रेहूनि ।।१७५।। संन्यास आश्रमांत । तीर्थयात्रा न शोभत । पांगुळगाडा हातांत । शोभे जाण बाळकाच्या ।।१७६।। तोच वृद्धानें निज करीं । घेऊनिया चाले जरी । हंसूं होईल जगभरीं । त्या वृद्धाचें पद्मपादा ! ।। १७७ ।। तूं आश्रम घेतला । अवघ्यांचा न्यास केला । आणि आतां तीर्थयात्रेला । जातोस हें म्हणावें काय ? ।। १७८ ।। पद्मपाद प्रवासांत । न चाले हा यथास्थित । आश्रम-धर्म पाहा सत्य । नाद सोडी प्रवासाचा ।।१७९।। पद्मपाद म्हणे त्यावरी । सत्य आपुली वैखरी । आपुल्या वचनाबाहेरी । वागावया मी न इच्छीत ।।१८०।। देह आज्ञा मानील । मन भटकत फिरेल । एकाग्रतेचा होईल । भंग तेणें गुरुराया ! ।। १८१ ।। आपण आहां त्रिकालज्ञ । आपणांसी चोरून । कांहीं न ठेवावें म्हणून । हें निवेदन केलें असें ।। १८२ ।। आचार्यांनीं तयाचा । मनोदय जाणिला साचा । बरें आहे यात्रेचा । हेतु आपुला पूर्ण करी ।। १८३ ।। ऐसें म्हणून आज्ञा दिली । यात्रेस जावया भली । धन्य ती आचार्य माउली । कल्पतरूच निजभक्तां ।।१८४।। पद्मपाद मार्गांत । सावधगिरी ठेव बहुत । डावलून साधुसंत । कधीं पुढें जाऊं नये ।।१८५।। एके ठिकाणीं फार दिवस । करूं नको बाप्पा ! वास । चोर चहाड अभक्तास । पुरें असावें ओळखुनी ।। १८६ ।। संग्रह कशाचा न करावा । हव्यास मुळींच न धरावा । सदा सदुपदेश करावा । आपल्या धर्मबंधूंस ।। १८७ ।। बोध ऐशा परीचा । पद्मपादा केला साचा । तेणें आनंद तयाचा । दुणावता झाला कीं ।। १८८ ।। त्याची रवानगी करून । इतर शिष्यांसी घेऊन । मठालागीं सोडून । आचार्य आले पर्वतावरी ।।१८९।। हा शृंगेरी मठस्थापनेचा । अध्याय जो वाचील साचा । इच्छित कार्यभाग त्याचा । निर्विघ्न जाय सिद्धीतें ।।१९०।। हें शृंगेरीमठाचें कथन । जो वाचील प्रेमेंकरून । त्रिताप त्याचे होतील दहन । सत्य सत्य त्रिवाचा ।। १९१ ।। हा अध्याय नियमें वाचितां । हरेल अवघी मनाची चिंता । तत्त्वज्ञान येईल हातां । याच्या मनन-पठणानें ।। १९२ ।। हा अध्याय न कादंबरी । स्वानुभवाची खाण खरी । येथें जो अविश्वास

धरी । तोच बुडेल निःसंशय ॥१९३॥ मंदबुद्धि असल्या कोणी । त्यानें हा अध्याय प्रतिदिनीं । शुचिर्भुत होवोनी भावें पठण करावा ॥१९४॥ म्हणजे मंदत्व बुद्धीचें । निःसंशय जाईल साचें । आशीर्वादें आचार्यांचे । पाहा अनुभव घेऊनी ॥१९५॥ हा अध्याय चोविसावा । आचार्यचरिताचा बरवा । तो अनुभवून पाहावा । हीच आहे विनंती ॥१९६॥ इतिश्रीदासगणूविरचित श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥१९७॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय पंचविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय प्रवरातटनिवासिया ! । मोहिनीराजा परमसदया ! । दासगणूवरी करा दया । कीं हो विश्वपते ! ॥ १ ॥ तूं मोहिनीरूप धरून । केलेंस राहूचें वंचन । देवा करविलें अमृतपान । जेणें अमर झाले ते ॥ २ ॥ तुझ्या कृपेची महती । अगाध आहे भूवरती । तूं अध्यात्माची देवता ती । आहेस कीं निःसंशय ॥ ३ ॥ तूं अव्यय मूळ साचा । वेष धरिला प्रकृतीचा । म्हणजे प्रकृतिपुरुषांचा । पुतळा तूं मूर्तिमंत ॥ ४ ॥ तुला माझा नमस्कार । असो देवा ! वारंवार । करा करुणेची पांखर । या अजाण गणूवरी ॥ ५ ॥ असो शृंगेरीकारण । असतां स्वामी दयाघन । काय घडलें वर्तमान । तें ऐका विबुध हो ! ॥ ६ ॥ कालडी नामें ग्रामांत । जननी झाली अत्यवस्थ । वरचेवरी येऊन पाहत । पुढल्या द्वारास म्हातारी ॥ ७ ॥ तिनें ऐसें म्हणावें मनीं । वचन दिलें पुत्रानीं । कीं अंतकाळालागुनी । जवळ तुझ्या राहीन मी ॥ ८ ॥ तें खोटें होऊं पाहतें । आलें नेटीं मरण तें । आतां कशाचीं वांचतें । मुख पुत्राचें पाहावया ॥ ९ ॥ शंकर सोडून गेला घरा । त्यास वर्षे झालीं बारा । विचारूं तरी कोण्या नरा । कोठें आहे म्हणून ॥ १० ॥ मम पुत्राचें बोलणें भलें । आजवरी खोटें न झालें । पंचभूतां न वागण्या आलें । त्याच्या आज्ञेबाहेर ॥ ११ ॥ ज्यानें माझ्या स्नानासाठीं । पूर्णा आणिली द्वारवंटीं । मोठमोठाले ज्ञानजेठी । आले ज्याच्या दर्शना ॥ १२ ॥ कांहीं दिसेना डोळ्यांस । साउलीचा होतां भास । म्हणावें शंकरा ! आलास । बरें

झालें ऐन वेळीं ॥ १३ ॥ ऐसें मुखीं बोलून। सवेंच पाहावें न्याहळून। तों शंकर नाहीं म्हणून। पुन्हां दुःखित व्हावें कीं ॥ १४ ॥ कोणी येतां समाचारा। पौरजन ते तिच्या घरा। त्यास ती म्हणे शंकरा! । माझ्या घेऊन यावें तुम्ही ॥ १५ ॥ घरची सुखी म्हणून। आप्तशेजारी अवघे जन। घालीत होते शिजवून। अन्न म्हातारीकारणें ॥१६॥ तरी शाळूसंगत किती। सवेंच येती आणि जाती। अहोरात्र एकटी ती। सदनीं म्हातारी राहतसे ॥ १७ ॥ असो एवंच म्हातारीला। शंकराचा ध्यास लागला। रात्रीं न लागे डोळ्यास डोळा। जागत बसावें सदैव ॥ १८ ॥ आत्म स्वकीय पौर जना। ऐसें करी नित्य भाषणा। पुत्र शंकर आल्याविना। जरी आलें मरण मशीं ॥ १९ ॥ तरी तुम्ही शवाप्रत। लावूं नका माझ्या हात। पुत्र येईपर्यंत। तेलांत ठेवा प्रेत माझें ॥ २० ॥ अग्निसंस्कार त्याच्या हातें। व्हावा माझ्या देहातें। तुम्हां शपथ मी घालित्ये। अधिक उणें यांत न करा ॥ २१ ॥ जरेनें तनु जर्जर। म्हातारीची झाली फार। कफानें कंठ गुरगुर। आवाज काढूं लागला ॥ २२ ॥ ऐकणें त्यजिलें कानांनीं। कांहीं न दिसे डोळ्यांनीं। शक्ति ती निघूनी। गेली हातां-पायांची ॥ २३ ॥ हें सर्व अंतर्ज्ञानानीं। जाणिलें असें आचार्यांनीं। नयन आले आसवांनीं। भरून त्यांचें क्षणांत ॥ २४ ॥ तो पाहुनिया प्रकार। शिष्य पुसती जोडून कर। ऐसें दुःख अनावर ? झालें कोणतें येथवां ? ॥ २५ ॥ तुम्ही वैराग्यसंपन्न। दुःखाश्रूंनीं लोचन। कां जावें भरून। हें हरकत नसल्या कथा आम्हां ॥ २६ ॥ आजवरी ऐशी स्थिति। दृष्टीस आमुच्या पडली नव्हती। विवेकाची प्रत्यक्ष मूर्ति। आपण आहां स्वामिराया! ॥ २७ ॥ आचार्य म्हणती त्यावर। जे मम नेत्रीं आलें नीर। तो निसर्गाचा व्यवहार। त्यांत न विशेष कांहीं ॥ २८ ॥ शिष्य हो! आमुची मातोश्री। अत्यवस्थ पूर्णातीरीं। झाली कालडी ग्रामामाझारीं। केरल देशाकारणें ॥ २९ ॥ ती 'पुत्र पुत्र' म्हणून। करीत आहे माझें स्मरण। हा देह तिजपासून। झाला म्हणून अश्रु आले ॥ ३० ॥ मी आकाशमार्गानें। जातों कालडी ग्रामाकारणें। पुत्रधर्माप्रमाणें। भेटतों तिला जाऊन ॥ ३१ ॥ ऐसें शिष्यांस बोलून। सवेंच पावले अंतर्धान। न लागतां एकहि क्षण। आले कालडी ग्रामामध्यें ॥ ३२ ॥ जननीच्या जवळ बैसले। मोठ्यांनीं तिसी बोलले। "उघडून पाहा आई! डोळे।

तुझा शंकर आला हा ॥ ३३ ॥ तुला मीं जें वचन दिधलें । तें आज सत्य केलें । मन कशांत गुंतविलें । आहेस तूं कीं ये वेळा ॥ ३४ ॥ अंतकाळीं एकाग्रता । ठेव चित्ताची सर्वथा । उगीच कशाची लोभममता । जननी ! आतां वाहूं नको " ॥ ३५ ॥ कपिल महामुनींनीं । देवहूतीलागुनी । बोध केला तोच त्यांनीं । निज जननीस सांगितला ॥ ३६ ॥ खोल शब्दानें म्हातारी । बोलूं लागली त्यावरी । आशा मला नव्हती दुसरी । तुझ्या-वांचून शंकरा ॥ ३७ ॥ माझें क्रियाकर्मांतर । तूंच करावें साचार । करी अग्निसंस्कार । माझ्या देहास स्वतः तूं ॥ ३८ ॥ शंकरा तुझें ब्रह्मज्ञान । मीं ऐकिलें संपूर्ण । तें न होई आकलन । माझ्या बुद्धीस येतुलेंहि ॥ ३९ ॥ तुझें ब्रह्म निर्गुण । न त्यासी ठावठिकाण । शाब्दिक पक्वान्नें सेवन । केल्या पोट भरणें नसे ॥ ४० ॥ मला सगुण परमात्मा दाखवी । त्याचे जवळ पोहोंचवी । हीच आशा माझी पुरवी । आतां दुसरें कांहीं नको ॥ ४१ ॥ हें मातृवचन ऐकिलें । आचार्य मनीं संतोषले । स्तवन शिवाचें आरंभिलें । जननी न्याया कैलासीं ॥ ४२ ॥ तों एक दिव्य विमान । येते झाले घेऊन । शिवगण ते कैलासाहून । आचार्यजननीस न्यावया ॥४३॥ तों म्हणाली म्हातारी । मी यांच्या बरोबरी । न जाय कीं निर्धारीं । यांचें भय वाटे मला ॥ ४४ ॥ ऐसें बोलतां जननी । तें विमान आचार्यांनीं । दिलें परत लावोनी । कैलासलोकाकारणें ॥ ४५ ॥ आणि केली प्रार्थना । हे सच्चिदानंदा नारायणा ! । लक्ष्मीपति कमलनयना ! । वासुदेवा श्रीहरि ! ॥ ४६ ॥

श्रियाश्लिष्टो विष्णुः स्थिरचरगुरुर्वेदविषयो ।
धियां साक्षी शुद्धो हरिरसुरहंताब्जनयनः ॥
गदी शंखी चक्री विमलवनमाली स्थिररुचिः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ १ ॥
यतः सर्वं जातं वियदनिलमुख्यं जगदिदं ।
स्थितौ निःशेषं योऽवति निजसुखांशेन मधुहा ॥
लये सर्वं स्वस्मिन् हरति कलया यस्तु स विभुः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ २ ॥
असूनामभ्यादौ यमनियममुख्यैः सुकरणैः ।
निरुध्येदं चित्तं हृदि विलयमानीय सकलम् ॥

यमीड्यं पश्यंति प्रवर मतयो मायिनमसौ ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ३ ॥
पृथिव्यां तिष्ठन्यो यमवती महीं वेद न धरा ।
यमित्यादौ वेदो वदति जगतामीशममलम् ॥
नियंतारं ध्येयं मुनिसुरनृणां मोक्षदमसौ ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ४ ॥
महेंद्रादिर्देवो जयति दितिजान्यस्य बलतो ।
न कस्य स्वातंत्र्यं क्वचिदपि कृतौ यत्कृतिमृते ॥
कवित्वादेर्गर्व परिहरति योऽसौ विजयिनः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ५ ॥
विना यस्य ध्यानं व्रजति पशुतां सूकरमुखां ।
विना यस्य ज्ञानं जनिमृतिभयं याति जनता ॥
विना यस्य स्मृत्या कृमिशतजनिं याति स विभुः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ६ ॥
नरांतकोत्तंकः शरणशरणो भ्रांतिहरणो ।
घनश्यामो वामो व्रजशिशुवयस्योऽर्जुनसखः ॥
स्वयंभूर्भूतानां जनक उचिताचारसुखदः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ७ ॥
यदा धर्मग्लानिर्भवति जगतां क्षोभकरणी ।
तदा लोकस्वामी प्रकटितवपुः सेतुधृगजः ॥
सतां धाता स्वच्छो निगमगुणगीतो व्रजपतिः ।
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ८ ॥
इति हरिरखिलात्माराधितः शंकरेण ।
श्रुतिविशदगुणोऽसौ मातृमोक्षार्थमाद्यः ॥
इति वरनिकटे श्रीयुक्त आविर्बभूव ।
स्वगुणवृत उदारः शंकचक्राब्जहस्तः ॥ ९ ॥

॥ श्रीमच्छंकराचार्यविरचितं कृष्णाष्टकम् ॥

तों आलें एक विमान । वैकुंठ लोकाहून । विष्णूचे दूत घेऊन । श्रीहरीच्या आज्ञेनें ॥ ४७ ॥ तें वैकुंठींचें विमान । होतें परम शोभायमान । आले स्वतः भगवान् । आचार्यजननीस न्यावया ॥ ४८ ॥

भगवंतासी पाहतां । हर्षभरित झाली माता । पुत्रासी म्हणे येतें आतां । सार्थक माझें केलेंस तूं ।। ४९ ।। विमानांत बैसुनी । वैकुंठास गेली जननी । आपुला मृत्तिकादेह ठेवुनी । कालडीमाजी भूमीवरीं ।। ५० ।। बातमी कळाली गांवांत । म्हातारी पावली पंचत्व । आला आहे तिचा सुत । काल रात्रीस ये ठायां ।। ५१ ।। सदनीं आले पौरजन । सोयरे धायरे मिळून । आचार्यांसी पाहून । येणें रीतीं बोलले ।। ५२ ।। आम्ही पुढची तयारी । करतों इची अवघी खरी । बरें झालें अखेरीं । भेट तुझी झाली तिला ।। ५३ ।। अवघा जीव तुझ्या ठायीं । आजवरी होता तिचा पाही । तिच्यासम होणें नाहीं । दयाळू माता यापुढें ।। ५४ ।। तूं संन्यासी झालास थोर । राहिला न तुला अधिकार । करण्या क्रियाकर्मांतर । निज जननीचें येधवां ।। ५५ ।। तें आचार्यांनीं ऐकिलें । प्रत्युत्तर त्यांना केलें । खरें पाहतां नाहीं उरलें । मज या कृत्याचें प्रयोजन ।।५६।। तुम्ही अवघे विबुध जन । सशास्त्र तुमचें भाषण । नाहीं संन्याशाकारण । अधिकार क्रियाकर्माचा ।। ५७ ।। परी मी जननीकारण । दिलें आहे ऐसें वचन । मीच स्वहस्तें करीन । क्रियाकर्मांतर माते ! तुझें ।। ५८ ।। म्हणून जननीची अवघी क्रिया । मज करूं द्या ये ठायां । या मातृसेवेपासूनिया । मजला दूर लोटूं नका ।। ५९ ।। मी तिचा प्रत्यक्ष कुमार । आहे तिचेंच हें शरीर । म्हणून क्रियाकर्मांतर । मींच करणें योग्य तिचें ।। ६० ।। पौर म्हणती त्यावरी । अविधि कृत्य तुमच्या करीं । नाहीं झालें आजवरी । म्हणून हें करूं नका ।। ६१ ।। तूं सशास्त्र केलेंस वर्तन । म्हणून तुला मोठेपण । लाधतें झालें देवासमान । तें तूं नको घालवूं ।। ६२ ।। अविधि कृत्य करी जो नर । त्यास व्याधि होती अपार । पोटशूळ वा भगंदर । वा अर्धांग, पंडु, सुनभैरी ।। ६३ ।। म्हणून आमुचें सांगणें । शंकरा ! तुम्ही मानणें । क्रियाकर्मांतर संन्याशानें । करणें हा दोष मोठा ।। ६४ ।। मग म्हणती आचार्य । तुमचें म्हणणें सत्य होय । परी वचन दिलें त्यावरी सोय । लावणें आहे भाग मला ।। ६५ ।। हें अविधि कृत्य अंशेंहि । होत नाहीं ये ठायीं । कशाचाहि उरला नाहीं । दोष ब्रह्मवेत्त्याला ।। ६६ ।। ऐसें आचार्य बोलले । आप्त त्यांसी हंसते झाले । अरेरे ! उगीच केलें । हे भगवे कपडे तुवां ।। ६७ ।। अग्निस्पर्श संन्याशाला । कोठेंहि नाहीं बोलिला । हें कळत असून अवघें तुला ।

उगीच हट्ट धरतोसी ॥ ६८ ॥ आचार्य म्हणाले तयाप्रती । तुमची आहे सत्योक्ति । परि अविधि कृत्येंस विधि होतीं । विशेष प्रसंगीं ध्यानीं धरा । ॥ ६९ ॥ रेणुकेला वधायास । आज्ञा परशुरामास । करते झाले ज्ञानी पुरुष । मुनिश्रेष्ठ जमदग्नि ॥ ७० ॥ रामें आज्ञा मानिली । रेणुका ती ठार केली । आपुल्या करींच्या फरशें भली । ऐसें पुराण सांगतें ॥७१॥ मुलानें मारणें माता । हा काय विधि होय तत्त्वतां । परी जमदग्नीच्या आज्ञेकरितां । अविधि कृत्य करणें आलें ॥ ७२ ॥ देव होते परशुराम । सन्नीतीचें प्रत्यक्ष धाम । सज्जनांचें विश्राम । मुकुटमणी योगियांचे । ॥ ७३ ॥ मागें जननीकारण । तुझी क्रिया मी करीन । ऐसें दिलें आहे वचन । तें मज मानिलें पाहिजे ॥ ७४ ॥ जननीच्या कृत्यापुढें । अविधि कृत्य बापुडें । केलें तरी तो न घडे । दोष कर्त्या पुरुषाला ॥ ७५ ॥ मत्स्यभेद करून । अर्जुन आला घेऊन । द्रौपदी ती सुलक्षण । कन्या द्रुपदराजाची ॥ ७६ ॥ अर्जुन कुंतीस म्हणाला । तुझ्या कृपेनें आज मला । अमोल वस्तूचा लाभ झाला । ती आलों घेऊन ॥ ७७ ॥ कुंती म्हणाली त्यावर । तूं तसा आहेस शूर । एक सांगतें विचार । तो ऐक मम बाळा ! ॥ ७८ ॥ त्या आणलेल्या वस्तूकारण । वांटून घ्या रे ! पांचजण । करूं नका अधिक न्यून । भाग सारखे करा जा ॥ ७९ ॥ आणलेली वस्तु वरावी । तुम्ही पांचांनींहि भोगावी । एकाचीच नसावी । मालकी तया वस्तूवर ॥ ८० ॥ हें मातृवचन ऐकिलें । पांचांनींहि तिला वरिलें । हें कृत्य कां सशास्त्र केलें । सांग त्या पांडवांनीं ॥ ८१ ॥ हें अविधि कृत्य करावया । कोणीं न हरकत केली तया । प्रत्यक्ष भगवान असूनिया । पांडवांचा सल्लागार ॥ ८२ ॥ दशरथें कैकयीकारण । जें कां दिलें होतें वचन । तें खरें करण्यालागून । राम गेला वनवासा ॥ ८३ ॥ या गोष्टी ध्यानीं धरा । आणि अडथळा मला न करा । जननीच्या कर्मांतरा । करावयाकारणें ॥ ८४ ॥ मी जननीची क्रिया केल्याविणां । न जाय येथून जाणा । तुम्ही आपुला मोठेपणा । घालवूं नका निरर्थक ॥ ८५ ॥ माझ्या मातेस मंत्राग्नि । देणें आहे मजलागुनी । जा तयारी करा कोणी । अंत्यविधीचें सामान आणा ॥८६॥ ऐसें ऐकतां उत्तर । गांवकरी करिती विचार । हें शिवगुरूचें शंकर पोर । व्यवहारशून्य वेडें दिसें ॥ ८७ ॥ याला कोणी न करा मदत । या असल्या अविधि कृत्याप्रत । छीःथूः

होईल लोकांत । व्यर्थ आपुल्या कालडीची ॥८८॥ ऐसें म्हणून पोबारा । स्वकीयांनीं केला खरा । आचार्य करिती विचारा । तें कृत्य पाहूनिया ॥ ८९ ॥ तों इतुक्यांत आला तेथ । वृद्ध ब्राह्मण धांवत । पौरांप्रति जोडून हात । ऐसें बोलून गर्जून ॥९०॥ अरे वेड्यांनो ! कोठें पळतां ? । विधिअविधीचें माजवतां । ढोंग हें कां रे वृथा । येणें अकल्याण होईल ॥ ९१ ॥ तुम्हां नंबुद्रीच्या कुळीं । जन्मास आला चंद्रमौळि । त्याची प्रचीति आहे आली । तुम्हांस मागें कित्येक वेळां ॥ ९२ ॥ हें शिवगुरूचें पोर । साक्षात् आहे शंकर । शास्त्रवादाची चरचर । त्याच्यापुढें करूं नका ॥ ९३ ॥ तो जें जे कांहीं करील । तें सशास्त्र सविधि होईल । राजा जेथें राहण्या जाईल । ती ती होईल राजधानी ॥ ९४ ॥ करावया वेदोद्धार । आहे त्याचा अधिकार । तो असामान्य पुरुष थोर । हें कितिदां तरी कळलें तुम्हां ॥ ९५ ॥ ओघ फिरविला नदीचा । तो तुम्हीं पाहिला साचा । वाडा दरिद्री ब्राह्मणाचा । भरला सुवर्ण आंवळ्यांनीं ॥९६॥ जा, जा, मदत करा त्यासी । मातेच्या अंत्यविधीसी । कोणतीहि अशक्य ऐशी । गोष्ट नाहीं तयातें ॥९७॥ कित्येक तेथून पळून गेले । कित्येक तेथेंच उभे ठेले । काय करतो तें पाहण्या भले । आपुल्या निज नेत्रांनीं ॥ ९८ ॥ इकडे आचार्यांनीं सभोंवार । पाहिलें पुन्हां एकवार । कोण कोण आहे तय्यार'। आपणां मदत करण्याला ॥ ९९ ॥ कोणीच नाहीं ऐसें पाहतां । विशाद वाटला आचार्यचित्ता । घरालागीं परस होता । तेथेंच केली तयारी ॥ १०० ॥ शुभा काष्ठें चंदनी । आणते झाले वेंचोनी । आचार्य आपुल्या हस्तांनीं । जवळच्या त्या जंगलांतून ॥१०१॥ परसामाजीं रचिली चिता । दोन्ही हातें उचलुनी प्रेता । नेऊन लोकां देखतां । आणून ठेविलें चितेवर ॥ १०२ ॥ दक्षिण बाहूचें मंथन । निज-जननीच्या करून । उत्पन्न केला त्रिचरण । आचार्यांनीं तेधवां ॥ १०३ ॥ अंत्येष्टीच्या अवघ्या क्रिया । लागले आचार्य करावया । तों झाली नभाठायां । आकाशवाणी ऐशा रीतीं ॥ १०४ ॥ जो पौरजनाकारण । बोध करण्या वृद्ध ब्राह्मण । आला तोच अंतर्धान । पावून बोलला नभां-तुनी ॥ १०५ ॥ "तुम्ही कालडीचे ब्राह्मण । वेदबाह्य आजपासून । व्हाल तुमच्या गृहींचें अन्न । संन्याशी न घेतील कदा ॥ १०६ ॥ तुम्ही आपुलीं प्रेतें सकल । परसामाजीं जाळताल । आचार्यविरोधाचें फळ ।

भोगणें हें भाग तुम्हां" ॥१०७॥ ऐशी होतां आकाशवाणि। लोक गेले घाबरूनी। चिता पेटवून आचार्यांनीं। जननीदेहास अग्नि दिला ॥ १०८ ॥ जननीचें क्रियाकर्मांतर। सांग झालें साचार। आचार्यांचा अधिकार। कळून आला सर्वांसी ॥ १०९ ॥ आचार्यांच्या सदनाप्रति। अष्टसिद्धि कामें करिती। पुढीची व्यवस्था कृष्णमूर्ति। करता झाला प्रत्यक्ष ॥ ११० ॥ हें गांवकऱ्यांनीं पाहिलें। अभिमानरहित अवघे झाले। प्रत्येक खालीं पाहून चाले। तोंड वरती करीना ॥ १११ ॥ पुढें श्रोते! एके दिवशीं। अवघे मिळून ग्रामवासी। अनन्य भावें आचार्यासी। येते झाले शरण पाहा ॥ ११२ ॥ स्वामिराया! आपुला। अपराध आहे थोर केला। त्याची क्षमा करण्याला। तुम्हीच आहां समर्थ ॥ ११३ ॥ तुम्ही सर्वज्ञ सत्ताधारी। विधि अविधीची बाधा खरी। मुळींच नाहीं होणारी। तुम्हांलागीं स्वामिराया! ॥ ११४ ॥ जननीच्या भुजेंतून। केलांत अग्नि उत्पन्न। ऐसा अधिकारी आहे कोण?। तुम्हांवांचून भूमंडळीं ॥ ११५ ॥ बालकाच्या अपराधासी। माताच घालिते पोटासी। सरितेच्या पाण्यासी। सांठवण एक सागराचें ॥ ११६ ॥ तुम्ही कामधेनु कल्पद्रुम। क्षमाशांतींचें प्रत्यक्ष धाम। आम्ही सारे अधमाधम। आतां पूर्ण पस्तावलों ॥११७॥ तुम्ही नंबुद्रीच्या कुलांत। जन्म घेऊन आलांत। तीच वेदबाह्य झाल्या जात। त्याचें लांछन कोणाला? ॥ ११८ ॥ रामामुळे रघुवंश। जगीं पावला मान्यतेस। तैसें तुम्हांमुळें नंबुद्रीस। महत्त्व आलें पाहिजे ॥ ११९ ॥ आकाशवाणीनें आम्हांला। जो वेद-बाह्यतेचा शाप दिला। तो कोणी म्हणती निघाला। आहे तुमच्याच मुखांतून ॥ १२० ॥ दयाळा! ही शापवाणि। निघाली तुमच्या परसा-मधूनी। मग बोलली असे कोणी। त्यासी न आमुचें प्रयोजन ॥ १२१ ॥ तुम्ही ईश्वर साक्षात। म्हणून आकाशवाणींत। आणि तुमच्या बोल-ण्यांत। फरक नाहीं येतुलाहि ॥ १२२ ॥ आम्ही पूर्ण अभागी। समजून चुकलों आहों जगीं। दवडिली वाउगी। सुसंधि या सेवेची ॥ १२३ ॥ शिवाय कालडीच्या द्विजांनीं। अपराध केला म्हणूनी। तो अवघ्या नंबु-द्रींनीं। भोगावा हा न्याय का? ॥ १२४ ॥ कांहीं असो कालडीचा। आणि अवघ्या नंबुद्रींचा। शाप हरण करा साचा। हीच आहे विनंती ॥ १२५ ॥ ऐसें त्यांचें ऐकून। बोलते झाले दयाघन। हें शापविमोचन।

करतां येणार नाहीं मला ॥ १२६ ॥ यादवांच्या कुळाला । ब्रह्मशाप होता झाला । तो कृष्णालाहि न आला । निवारण करतां कीं ॥ १२७ ॥ वेदबाह्यता कालडीपुरती । राहील कीं निश्चितीं । थोडे दिवस भूवरती । तीहि पुढें जाईल ॥ १२८ ॥ यादवांसी शाप झाला । तो द्वारकेस नाहीं भोंवला । तिचा पहिलाच राहिला । लौकिक लोकीं जागृत ॥ १२९ ॥ सप्तपुऱ्यांत तिची गणना । योग्य झाली प्रातःस्मरणा । तैसेंच तुमच्या होईल जाणा । या कालडी ग्रामाची ॥ १३० ॥ स्मरण कालडीचें । जो का कोणी करील साचें । दहन त्याच्या दोषांचें । निःसंशय होईल ॥१३१॥ या झालेल्या प्रसंगाची । आठवण ठेवा हीच साची । तुम्ही आपुल्या प्रेताची । वासलात लावा परसामध्यें ॥ १३२ ॥ म्हणजे नंबुद्री ब्राह्मणांनीं । आपुलीं प्रेतें परसांतुनी । जाळणें आजपासुनी । यावत् चंद्रदिवाकर ॥ १३३ ॥ तें मानिलें अवघ्यांनीं । आचार्यांसी वंदूनी । जाते झाले निज सदनीं । लोक कालडी ग्रामींचे ॥ १३४ ॥ आचार्य तेथेंच राहिले । कांहीं दिवस पुढती भले । लोक येऊं लागले । हाळोपाळींचे भेटावया ॥ १३५ ॥ हा शाप म्हणती कोणी । स्वतः दिला आचार्यांनीं । कोणी म्हणती आकाशवाणी । ऐशा तऱ्हेची झाली असे ॥ १३६ ॥ खरें खोटें यांतील । एक जाणें नीळकंठ । आचार्यांसम दयाळ । शापवाणी न वदेल कदा ॥ १३७ ॥ शाप आकाशवाणीद्वारें । झाला असेल हेंच खरें । उगीच मतमतांतरें । जमेस धरूं कशाला ? ॥१३८॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १३९ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सत्ताविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जानकीपते ! । जयजयाजी विमलकीर्ते ! । राघवा ! निवारी सकळ दुरितें । कृपा करून गणूवर ॥ १ ॥ तुझ्या कृपेची अगम्य गति । वानरें डोंगर उचलती । नेऊन सागरीं टाकिती । लंकेस सेतु बांधावया ॥ २ ॥ चार बोरें घेऊन । शबरी आली तुला शरण । तिला अभय वरदान । दिलें तुम्हीं रामराया ! ॥ ३ ॥

प्रचंड शिवधनुष्याला । तुम्हींच गुण चढविला । अजरामर जगीं केला । अंजनीतनय मारुती ॥ ४ ॥ तुझें नाम जपतां ओठीं । संकटें पळतीं उठाउठी । कैवल्य मिळे शेवटीं । अक्षयीचें भोगावया ॥ ५ ॥ ऐशा तुझ्या दिव्य पायां । नमन माझें रामराया ! । कृपा करी वेगें सदया ! । या दीन दासगणूवरी ॥ ६ ॥ असो पद्मपाद स्वामींप्रत । कांहीं शिष्य पंथांत । मिळाले त्यांसमवेत । घेऊन यात्रेस चालले ॥ ७ ॥ कालहस्तीश्वरासी । पद्मपाद आले वेगेंसी । वंदावया तो व्योमकेशी । जो काल कालाचा ॥ ८ ॥ ज्याचें दर्शन घेतल्यावरी । गंडांतरें टळतीं सारीं । जो महामृत्युंजय त्रिपुरारि । पार्वतीपति परमात्मा ॥ ९ ॥ त्याचें दर्शन घेतलें । स्वामी पुंडरीक शहरा आले । जें शहर होतें वसलें । एका निर्मल सरितातीरीं ॥ १० ॥ स्वामी पद्मपाद शिष्यांसहित । आले तया शहरांत । पुसूं लागले पौरांप्रत । इतिहास त्या गांविचा ॥ ११ ॥ ब्राह्मण सांगती स्वामींप्रत । येथिचा महिमा अद्भुत । तो एकचि जाणी उमानाथ । नाहीं माहीत इतरांना ॥ १२ ॥ यतिवर्या ! या क्षेत्राप्रति । शिवगंगा ऐसें म्हणती । येथें प्रकट झाली भागीरथी । श्रीशिवाच्या आज्ञेनें ॥ १३ ॥ येथें एकदां प्रदोषकालीं । तांडवनृत्य चंद्रमौलि । करीत असतां अवतरली । जटेमधून ही पुण्यसरिता ॥ १४ ॥ या गंगेचें स्नानपान । केल्या तत्काळ होती दहन । जन्मांतरींचे दोष दारुण । कितीहि मोठे असले जरी ॥ १५ ॥ सद्भावें केल्या वंदन । या गंगेलागून । अशुभ तयापासून । दूर जातें पळूनिया ॥ १६ ॥ इचें स्मरण केल्या व्याधि । बाधक न होती कधीं । ही स्वयमेव दिव्य औषधी । आहे भवरोग्याप्रत ॥ १७ ॥ ऐसें माहात्म्य ऐकिलें । पद्मपाद तेथें राहिले । तीन दिवस करिते झाले । स्नानपान गंगेचें ॥ १८ ॥ असो शिवगंगा सोडून । दक्षिण दिशा लक्षून । करिते झाले स्वामी गमन । जाया क्षेत्र रामेश्वरीं ॥ १९ ॥ तों तयांसी मध्यंतरीं । लागली सरिता कावेरी । ती दृष्टीस पडल्या बरोबरी । आनंद झाला पद्मपादा ॥ २० ॥ आसमंत भाग कावेरीचा । मायदेश पद्मपादाचा । तो दृष्टीस पडतां साचा । आनंदलें त्यांचें मन ॥ २१ ॥ जन्मभूमीचें दर्शन । होतां अत्यंत समाधान । होतसे ज्ञात्यालागून । हा आहे न्यायचि ॥ २२ ॥ अभिमान तो स्वदेशाचा । नाहीं जया अंतरीं साचा । तो साक्षात् चौपायाचा । पशु जन्मला भूमीवरी

॥ २३ ॥ जन्मदात्या मातेहून । मायदेशाचें मोठेंपण । आहे शतपटीं-
हून । श्रेष्ठ दर्जाचें या जगीं ॥ २४ ॥ स्वदेशाचें प्रेम वाहणें । स्वधर्मासी
अनुसरणें । त्याचीं धारण करणें चिन्हें । निरलसपणें सर्वदा ॥ २५ ॥
आपुल्या धर्मबांधवांविशीं । प्रेम वाहणें अहर्निशीं । मदत एकमेकांशीं ।
करणें टाकून द्वेषभावा ॥ २६ ॥ हेंच स्वदेशी व्रत । तें पाळावें कडकडीत ।
तरीच येईल हुडकीत । सुख एकीचें तुम्हांला ॥ २७ ॥ मायदेशा पाहिलें ।
पद्मपाद आनंदले । मातुलाच्या घरीं आले । मामालागीं भेटावया ॥ २८ ॥
मामा पद्मपादाचा । विद्वान् द्वैत मताचा । होता कीं अनुयायी साचा ।
अद्वैत ज्या मान्य नसे ॥ २९ ॥ बहुत दिवसांनीं घराला । निज भगिनीचा
मुलगा आला । त्यायोगें आनंद झाला । प्रथमतः त्या मामासी ॥ ३० ॥
अति आग्रह करून । भाचा घेतला ठेवून । म्हणे साकल्य सांग वर्तमान ।
कोठें होतास आजवरी ? ॥ ३१ ॥ पद्मपाद म्हणे मामा ! ऐका ।
सांगतों मी अवघें देखा । काशींत उमानायका । वंदण्या गेलों घरांतून
॥ ३२ ॥ कृष्णा, भीमा, गोदावरी । पेणगंगा, सूर्यकुमरी । तेथून पुढें
नर्मदातीरीं । राहिलों मामा कांहीं दिवस ॥ ३३ ॥ पुढें वाराण-
शीसी । गेलों जान्हवीतटासी । जेथें भगवान् व्योमकेशी । अक्षयींचा
राहिला ॥ ३४ ॥ दोन वर्षेपर्यंत । मी होतों कशींत । उदरपूर्तीचें
निमित्त । मधुकरी मागत होतों कीं ॥ ३५ ॥ तेथें अल्पवयी संन्यासी ।
एक भेटला मामा मशीं । जो प्रत्यक्ष व्योमकेशी । अवघ्या ज्ञानाचें भांडार
॥ ३६ ॥ तो संन्याशी मीं गुरु केला । श्रीशंकराचार्य म्हणती ज्याला ।
होतों त्यांच्याच सेवेला । आजपर्यंत मामा मी ॥ ३७ ॥ थोर त्यांचा
अधिकार । त्यांनीं ब्रह्मसूत्रावर । भाष्य केलें साचार । वेदार्थ विशद
करावया ॥ ३८ ॥ ज्यांना वाराणशींत । प्रत्यक्ष भेटले पार्वतीकांत ।
ज्यांनीं लहानशा कमंडलूंत । नर्मदा ती सांठविली ॥ ३९ ॥ मामा !
काय सांगूं तुम्हांप्रत । वेदा मान्य जें अद्वैत । तेंच आहे ज्यांचा पथ ।
ऐसे श्रेष्ठ गुरु ते ॥ ४० ॥ अद्वैताचें नांव ऐकतां । मामा चपापला
सर्वथा । तो म्हणे आपुल्या चित्ता । यासी वाद करूं कांहीं ॥ ४१ ॥ या
मीं ठेवून घेतलें । तेंच मला विघ्न झालें । नवसें मूल मागितलें । तेंच
आलें मुळावर ॥ ४२ ॥ पद्मपादानें मामाचे । द्वैतसिद्धान्त खोडिले
साचे । आधारें श्रुतीस्मृतींचे । मामा केला निरुत्तर ॥ ४३ ॥ मामा

बरिवरी आनंदला । ऐकून त्या व्याख्यानाला । परि चित्ताठायीं भडकता झाला । द्वेषाग्नि तो विशेष ॥ ४४ ॥ व्याख्यानाची वरीवरी । प्रशंसा मामानें केली खरी । मनांत म्हणे हाच वैरी । होईल माझ्या द्वैत मता ॥ ४५ ॥ त्याचा खोडण्या सिद्धान्त । शक्ति न माझ्या अंगांत । हा इतक्या लहान वयांत । ज्ञानें झाला बृहस्पति ॥ ४६ ॥ उगीच बसणें नाहीं बरें । हें अद्वैताचें खूळ बरें । वाढूं दिल्यास साजिरें । द्वैत सिद्धान्त बुडेल कीं ॥ ४७ ॥ पोर सर्पाचें लहानपणीं । मारून टाकावें ज्ञात्यांनीं । त्याची चपलता पाहूनी । गौरव करणें नाहीं बरें ॥ ४८ ॥ एवंच भाचाचा करण्यास घात । मामा होता संधि पाहत । तें न आलें लक्षांत । मुळींच पद्मपादाच्या ॥ ४९ ॥ पद्मपाद म्हणे मामासी । मी घेऊन मम शिष्यांसी । सेतुबंध रामेश्वरासीं । जातों यात्रा करावया ॥ ५० ॥ म्हणून माझे कांहीं ग्रंथ । राहूं द्या तुमच्या घरांत । यात्रेहून आल्या परत । ते मी घेऊन जाईन हो ! ॥ ५१ ॥ मम गुरूच्या भाष्यावर । जी मीं टीका केली सुंदर । ज्या टीकेंत अवघें सार । आणिलें अद्वैत मताचें ॥ ५२ ॥ ती ही तुम्हां पाहावया । देतों ठेवून ये ठायां । ऐसें मामास सांगूनिया । पद्मपाद निघाले रामेश्वरा ॥ ५३ ॥ मामानें टीका पाहिली । तळची आग मस्तका गेली । ज्या टीकेंत होती केली । निंदा पूर्ण द्वैताची ॥ ५४ ॥ पूर्वींचे द्वैत पंडित । प्रभाकरादि होते प्रख्यात । त्यांचीं अवघीं मतें ज्या टीकेंत । खोडिलीं होतीं पद्मपादें ॥ ५५ ॥ ज्या टीकेस पाहून । मामा गेला जळफळून । ही टीका प्रत्यक्ष विघ्न । आहे आमच्या द्वैतमता ॥ ५६ ॥ बरें झालें आली करीं । ही टीका माझ्या घरीं । हिला अग्नि-भीतरीं । जाळून आतां टाकितों ॥ ५७ ॥ तैसे याचे अवघे ग्रंथ । जाळून टाकितों अग्नींत । शत्रूच हे साक्षात् । आहेत आमच्या द्वैतमता ॥ ५८ ॥ नुसतेच याचे टीकेसहित । जरी जाळिले येथें ग्रंथ । तरी संशय त्याप्रत । येईल मजविषयींचा ॥ ५९ ॥ तसा न संशय त्यासी यावा । आणि साधिला पाहिजे कावा । ऐसाच उपाय शोधावा । हे ग्रंथ जाळण्यास ॥ ६० ॥ कांहीं वेळ विचार करीत । मामा राहिला निवांत । तो एका-एकीं लक्षांत । गोष्ट त्याच्या ऐशी आली ॥ ६१ ॥ अग्नि आपुल्या घरास । तेधवां लावून दिल्यास । ग्रंथ जळून मला दोष । लावितां येणार नाहीं त्या ॥ ६२ ॥ मामानें ऐसा विचार केला । घरास अग्नि लाविला ।

ग्रंथसमूह जाळिला । भाचानें जो ठेविला तो ॥ ६३ ॥ द्वैत मताचे आपुले । ग्रंथ न त्यांत जळूं दिले । एक्या मतामुळें बनले । मामा भाचाचे वैरी पाहा ॥६४॥ कन्याकुमारी, दर्भशयन । मदुरा, मीनाक्षी, कुंभकोण । उभय उदधींचें संगमस्थान । जें सेतुबंध रामेश्वर ॥ ६५ ॥ ऐशा यात्रा करोनी । पद्मपाद आले परतोहि । आपुल्या मातुलगृहालागूनि । शिष्यांसहित तेधवां ॥ ६६ ॥ पद्मपादा पाहून । मातुल करूं लागला रुदन । म्हणे बाप्पा ! माझें सदन । पेटलें तुझ्या पोथ्यांमुळें ॥ ६७ ॥ तुझ्या अद्वैताच्या पोथ्या । तूं माझ्या घरीं ठेविल्या होत्या । त्याच झाल्या जाळित्या । या माझ्या सदनासी ॥ ६८ ॥ वडिलार्जित माझें घर । जळून गेलें साचार । बायकामुलें उघडयावर । राहण्याचा प्रसंग आला ॥ ६९ ॥ म्हणून सांगतों तुजप्रत । नको ठेवूं अद्वैत । हेंच तुझा करील घात । हे माझ्या भगिनीसुता ! ॥ ७० ॥ उलूक, पिंगळे पक्ष्यांत । मानवांमाजीं भूतप्रेतं । निंद्य बारा महिन्यांत । फाल्गुन मास तो जैसा ॥ ७१ ॥ तेविं अवघ्या मतांत । अशुभ हें अद्वैत । मानवांनीं याप्रत । कदापिहि सेवूं नये ॥७२॥ हें मामाचें भाषण । पद्मपादें केलें श्रवण । टीका जळाली म्हणून । अतिशय वाईट वाटलें ॥ ७३ ॥ मामा अद्वैत मताप्रति । 'श्रुति, स्मृति हीं वाखाणती । अद्वैतानें अशुभ जगतीं । होणार नाहीं कोणाचेंच ॥ ७४ ॥ श्रुतिमान्य हें अद्वैत । आहे केवळ अमृत । याची तुलना करण्याप्रत । पदार्थ नाहीं कोणताहि ॥ ७५ ॥ ऋतूंमाजीं वसंत । पुष्पतरूंत पारिजात । भागीरथी अवघ्या तीर्थांत । तैसें सर्वमतीं अद्वैत हें ॥ ७६ ॥ कामधेनु श्वापदांत । कल्पतरु वृक्षांत । कस्तुरी अवघ्या गंधांत । सर्वमतीं अद्वैत हें तसें ॥ ७७ ॥ अद्वैताच्या कृपेकरून । टीका मी ती पुन्हा लिहीन । टीका जळाली म्हणून । वाईट तुम्ही मानूं नका ॥ ७८ ॥ ऐसें बोलून मामाला । टीका लिहिण्यास आरंभ केला । तें पाहून घाबरला । मामा आपुल्या मानसीं ॥ ७९ ॥ हा मम भाचा सनंदन । ही टीका पुन्हां लिहून । करणार आहे खंडन । आमुच्या द्वैत मताचें ॥ ८० ॥ काय करावें, याला ठार । करीन येथें साचार । परी याचे बरोबर । शिष्य बहुत आहेत कीं ॥ ८१ ॥ ते लावतील माझीच वाट । ऐसे बळकट दांडगे धीट । गांवामधील अवघे श्रेष्ठ । या सनंदनातें मानिती ॥८२॥ जरी बुडवूं पाण्यांत । तरी यास पोहतां येत । हा नाहींसा करण्याप्रत । काय युक्ति योजावी

॥ ८३ ॥ याचा विचार करतां करतां । आठव झाला त्याच्या चित्ता । म्हणे आणावी मंदता । याच्या बुद्धीकारणें ॥ ८४ ॥ म्हणजे काम अवघें होईल । टीका करण्याचें राहील । शत्रु हा जिंकिला जाईल । आमुच्या द्वैत मताचा ॥८५॥ दुसऱ्या दिवशीं मेजवानी । केली भाचालागुनी । त्या मामानें आपुल्या सदनीं । भोजना पक्वान्न बासुंदीचें ॥ ८६ ॥ बासुंदींत जालीम विष । इतरां वगळून भाचास । घालिता झाला खावयास । तो कंसरूपी मामा त्याचा ॥ ८७ ॥ सर्वांगांत विष भिनलें । मंदत्व बुद्धीप्रति आलें । कशाचें न राहूं लागलें । स्मरण त्या पद्मपादा ॥ ८८ ॥ ती भाचाची पाहून स्थिति । मामा आनंदला चित्तीं । पद्मपादाची चिंता करिती । बरोबरीचे शिष्य सारे ॥ ८९ ॥ कळा सांध्याठायीं उठती । क्षणक्षणां घेऱ्या येती । शिष्य पद्मपादा म्हणती । येथून चला स्वामिराया ! ॥ ९० ॥ हवाबदल केल्याविना । मस्तकशूळ थांबेना । निदान कांहींच होईना । येथे आपुल्या प्रकृतीचें ॥ ९१ ॥ हें गांव मामाचे । धार्जिणें न झालें साचें । येथेच वाटोळें ग्रंथांचें । झालें कीं हो ! आपुल्या ॥ ९२ ॥ ह्या ऐशा कृत्याभीतरीं । कपट मामाचे कांहींतरी । आहे ऐसें अंतरीं । वाटूं लागलें आमुच्या ॥ ९३ ॥ कांहीं असो येथून चला । हीच विनंती आपणांला । पद्मपादें तत्काळ दिला । मान त्यांच्या विनंतीसी ॥ ९४ ॥ अवघे शिष्य घेऊन । पद्मपाद निघाले तेथून । करीत असतां मार्गक्रमण । ऐशी खबर लागली त्यां ॥ ९५ ॥ श्रीमत् शंकराचार्य गुरुवर । जननीचें क्रियाकर्मांतर । करण्या आलेत साचार । कालडी ग्रामाकारणें ॥९६॥ पद्मपादा ऐशी खबर । मिळतां, झाला आनंद फार । चित्त झालें बहुत आतुर । दर्शन घ्याया सद्गुरूंचें ॥ ९७ ॥ पद्मपाद शिष्यांसहित । येते झाले कालडींत । गुरूंस केलें दंडवत । अष्टांगांसहित तें ॥ ९८ ॥ प्रवासांतील प्रकार । कथन केला सविस्तर । स्वामी ! आपुल्या भाष्यावर । जी मीं टीका लिहिली होती ॥ ९९ ॥ ती मातुलाच्या घरांत । भस्म झाली अग्नींत । तिच्याबरोबर इतर ग्रंथ । तेहि जळते जाहले ॥ १०० ॥ पुन्हां ती टीका लिहिण्याला । मीं मातुलगृहीं आरंभ केला । कांहीं भाग पुरा झाला । तों ओढवलें विघ्न एक ॥१०१॥ बुद्धि अवघी मंद झाली । स्मृति न कशाची राहिली । क्षणोक्षणीं येऊं लागली । चक्कर मातें स्वामिराया ! ॥ १०२ ॥ कळा सांध्या-सांध्यांत ।

येऊं लागल्या आहेत । शूळ सारखा आहे होत । मस्तकाच्या ठायीं पाहा ।। १०३ ।। या असह्य व्याधीपासून । कोण सोडवी मजलागून । गुरुवर्या तुम्हांवांचून । त्राता मजला कोणी नसे ।।१०४।। आचार्य वदती त्यावर । वत्सा ! सोडूं नको धीर । तुझा मामा कपटागार । आहे हें न कळलें तुला ।। १०५ ।। शिवाय यात्रेस जातांना । सांगितलें तुज होतें ना । सदा ठेवी सावधपणा । प्रवासीं, गाफील राहूं नको ।। १०६ ।। स्वकीयांचा मोह न धरी । खोटी त्यांची संगत खरी । मामानें तुझा वरिवरी । केला होता आदर ।। १०७ ।। त्यानें मुद्दाम तुझी टीका । प्रयत्नानें जाळिली देखा । तुझ्या मामासारिखा । स्वार्थी मतलबी कोणी नसे ।।१०८।। त्यांनींच तुझ्या बासुंदींत । एक औषध घातिलें सत्य । ज्यानें तुझ्या बुद्धीप्रत । मंदत्व येतें जाहलें ।। १०९ ।। तुझ्या मामाचें अंतःकरण । कालकूटाचे समान । बरें झालें तुझा प्राण । त्यांनीं नाहीं घेतला ।। ११० ।। तुझी टीका मीं पाहिली । ती लक्षांत आहे राहिली । तीच सांगतों आतां भली । अक्षरशः लिहून घे ।। १११ ।। ऐसें पद्मपादा बोलून । टीका पंचपादिका केली कथन । चार दिवसांमाजीं जाण । केवढें सामर्थ्य आचार्यांचें ।। ११२ ।। रात्रंदिवस होता लिहीत । पद्मपाद टीकेप्रत । घडीची नव्हती फुरसत । त्या गुरुशिष्यांना ।। ११३ ।। पाहून पंचपादिकेला । पद्मपाद आनंदला । अवघ्यांप्रती कळून आला । आचार्यांचा अधिकार ।। ११४ ।। हें टीकेचें वृत्त भूपानें । ऐकूनिया केलें येणें । त्या केरलाधिपतीनें । नाम जया राजशेखर ।। ११५ ।। श्रीमत् शंकराचार्यांप्रति । म्हणूं लागला भूपति । या टीकेपरीच झाली स्थिति । माझ्या तीन नाटकांची ।। ११६ ।। जीं नाटकें आपणांप्रत । दाविलीं मीं येऊन येथ । तीं असल्या ध्यानांत । सांगा स्वामी ! मजकारणें ।। ११७ ।। तीं मी लिहून घेईन । आणि सांभाळून ठेवीन । स्वामींचा तो प्रसाद म्हणून । यांत अंतर पडेल न ।। ११८ ।। तें मानलें आचार्यांसी । नाटकें कथिलीं जशींच्या तशीं । तें पाहून भूपासी । अति आनंद जाहला ।। ११९ ।। भूपति विनवी जोडून कर । ऐशीच कृपा दासावर । स्वामी ! असावी निरंतर । रज मी आपुल्या पायांचा ।। १२० ।। सेवा सांगणें असल्या कांहीं । ती सांगावी लवलाही । हे सद्गुरुनाथ माझे आई ! । दास हा तत्पर सेवेला ।। १२१ ।। मीं एक वर्तमान ऐकिलें । पंधरा दिवसांपूर्वीं भलें । कीं

कालडीचे आहेत केले । जन बहिष्कृत आचार्यांनीं ।। १२२ ।। मग त्या द्विजांस आतां । अग्रहार न ये ठेवितां । कां कीं जो दिला होता । वेद-विद्या रक्षिण्यास्तव ।। १२३ ।। आचार्य म्हणती भूपास । हें न विचारी आम्हांस । उक्त जें तुझ्या बुद्धीस । दिसेल तें तूं सुखें करी ।। १२४ ।। राजा हा वैदिक पंथ । कोणी न जाणे यथातथ्य । त्याचें कळाया हृद्गत । पुण्य पाहिजे बलवत्तर ।। १२५ ।। राजा हृद्गत वेदांचें । अति उच्च दर्जाचें । तें नाहीं कळावयाचें । ईश्वरी कृपेवांचूनिया ।। १२६ ।। विधि-अविधींचीं खुळे । माजती झालीं या वेदबळे । त्याचा उपयोग करणें कळे । खऱ्या ज्ञात्या पुरुषाला ।।१२७।। शुभ वाणी वदावी । मंगल कृत्यें करावीं । ऐसी आज्ञा आहे बरवी । वैदिकांना शास्त्राची ।। १२८ ।। मृत्यु होतां घरातें । शुभ वदणें कोठून होतें । तेथे रडणे योग्य ठरतें । वाजंत्री न उपयोगी ।। १२९ ।। वा लग्नमंडपांत । बसूं नये क्षौर करीत । वैदिक-पंथ आचरण्यांत । तारतम्य बहुत पाहिजे ।। १३० ।। शुभ काय तें वेदें कथिलें । अशुभ काय तें सांगितलें । शाश्वत अशाश्वत दाविलें । पुण्य-पापा तैसेंचि ।। १३१ ।। कर्मकांड वेदे कथिलें । आणि तेंच त्यानें निषे-धिलें । उपासनेसी गौरविलें । आणि तेंच ठरविलें निंद्य पुनः ।। १३२ ।। या वेदाच्या खटपटी । शुद्ध ज्ञान होण्यासाठीं । ज्ञानमार्गाची ती मोठी । प्रतिष्ठा ती अवघ्यांत ।। १३३ ।। ज्ञानी शुभाशुभासी । तैसें विधि-अवि-धींसी । मुळीं न जाणे कोणत्याहि अंशीं । तो करील तोच विधि ।।१३४।। ज्ञान होईपर्यंत । हें अवघें पाहिजे सत्य । ब्रह्म जाणिल्यावरी न उरत । या कशाची आवश्यकता ।। १३५ ।। बोध विधि-अविधींचा । ज्ञान्यास करूं नये साचा । मात्र अविधि कृत्याचा । त्याच्या, स्वीकार करूं नये ।। १३६ ।। हें अविधि कृत्य साधकास । नाहीं ज्ञानी पुरुषास । तमाचा न बाधे दोष । केव्हांहि भास्कराला ।। १३७ ।। या कालडीच्या द्विजांनीं । तें न जाणिलें म्हणूनी । देती झाली आकाशवाणी । वेदबाह्यतेचा शाप त्यां ।। १३८ ।। शाळेच्या मुलांप्रती । जेवीं चुकतां मारिती । छडचा त्या हातांवरतीं । त्यांचे पाहा शिक्षक ।। १३९ ।। येथें छडचा मारण्याचा । हेतु इतकाच शिक्षकांचा । पुन्हां तीच करण्याचा । चुकीप्रसंग त्या येऊं नये ।। १४० ।। गुरूनें ज्ञान सांगावें । तें शिष्यानें आचरावें । तें आचरती कां नाहीं पाहावें । सत्ताधीश राजांनीं ।। १४१ ।। चुका केल्यास राजानें ।

आहे त्या शिक्षा करणें। अति दयार्द्र बुद्धीनें। शाळेंतील शिक्षकापरी ॥ १४२ ॥ याचा करून विचार। करणें असेल तेंचि कर। शिक्षा करण्याचा अधिकार। सर्वस्वीं तुझा असे ॥ १४३ ॥ तें राजांनीं मानिलें। अग्रहारा काढून घेतलें। कृतकर्मानें मिळालें। फळ कालडीकरांना ॥ १४४॥ पाहा आचार्यवचनालागुनी। कालडीच्या द्विजांनीं। न मानिलें म्हणोनी। म्हणून आपत्ति आली त्यां ॥ १४५ ॥ हें अवघें ध्यानांत ठेवा। आचार्य-आज्ञेस मान द्यावा। कुतर्क कोणीं न काढावा। तयाचिया आज्ञेठायीं ॥ १४६ ॥ या हल्लींच्या काळांत। हे संकटाचे पर्वत। आपणांवरी आले सत्य। आचार्य-आज्ञा न मानिल्यामुळें ॥ १४७ ॥ म्हणून येथून आतां तरी। सावध व्हावें लोकरी। जगद्‌गुरूच्या आज्ञेवरी। पूर्ण भरंवसा ठेवावा ॥ १४८ ॥ तरीच होईल कल्याण। सर्व तऱ्हेचें जाऊन दैन्य। चारी वर्णांनीं ठेविणें मान। आद्य शंकराचार्यांचा ॥ १४९ ॥ आपण चारी वर्ण तयांचे। शिष्य आहोंत पायाचे। म्हणून गुरुद्रोहाचें। पातक कोणी करूं नये ॥ १५० ॥ इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १५१ ॥ श्रीहरि-हरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सत्ताविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय प्रल्हादवरदा नरहरि !। जयजय भक्तसंरक्षका मुरारि !। जयजय पतितपावना श्रीहरि !। व्यंकटेशा गरुडध्वजा ! ॥ १ ॥ देवा ! तुझा कृपाकर। ठेवी माझ्या शिरावर। हीच विनंती वारंवार। तुजला माझी नारायणा ! ॥ २ ॥ ती विफल न करावी। आस माझी पुरवावी। आपुले चरण दाखवी। दासगणू-कारणें ॥ ३ ॥ पुढे कालडी ग्रामांतून। आचार्य निघते झाले जाण। जाया रामेश्वराकारण। हजार शिष्य घेऊनिया ॥४॥ मध्यंतरीं मार्गांत। एक लागलें तया क्षेत्र। ज्या तीर्थाचें नांव सत्य। मध्यार्जुन ऐसें असें ॥ ५ ॥ मध्यार्जुन क्षेत्रासी। आचार्य राहिले प्रेमेंसी। रोज प्रवचनें मंदिरासी। होऊं लागलीं हराच्या ॥ ६ ॥ तें मध्यार्जुनाचें मंदिर। असतें

झालें अति थोर । तेंहि भरे चिक्कार । श्रीस्वामींच्या प्रवचनें ॥ ७ ॥ नाना पंथांचे लोक येती । आचार्यवाणी श्रवण करिती । चित्ताठायीं साशंक होती । अद्वैत मत ऐकूनिया ॥८॥ आम्ही वाद करण्यातें । प्रत्यहीं पाहा येतों येथें । ऐकत असतां वाटतें । आचार्यांचें मत खरें ॥ ९ ॥ मग तें खरोखरी अद्वैत । आहे कां वेदसम्मत । किंवा हें प्रस्थापित । थोतांड मग करितो हा ॥ १० ॥ हें कांहींच कळेना । यांच्या ऐकून प्रवचना । अद्वैत प्रत्येकाच्या मना । खरें वाटूं लागलें ॥ ११ ॥ हा बालसंन्यासी कांहीं दिवस । राहिला आपुल्या क्षेत्रास । पंथ अवघे नामशेष । होतील अद्वैतावांचुनी ॥ १२ ॥ हा विद्वत्तेच्या जोरावरी । अवघे पंथ खोटे करी । मृत्तिका टाकितां हिऱ्यावरी । त्याचें तेज लोपतसे ॥ १३ ॥ आहे प्रकार हाहि । यांत कांहीं विशेष नाहीं । याचें प्रवचन मृत्तिका होई । इतर पंथ झांकावया ॥ १४ ॥ अफाट शब्दसाहित्य । याचेपाशीं मूर्तिमंत । हा कवणासहि वादांत । जिंकिला जाणार नाहीं कीं ॥ १५ ॥ नाना मतांचे पंडित । करूनिया खलबत । येते झाले आपसांत । श्रीशंकराचार्यांपुढे ॥ १६ ॥ पंडित म्हणतो कर जोडून । स्वामी आपुलें प्रवचन । ऐकिलें, थोर विद्वान् । आपण आहां निःसंशय ॥ १७ ॥ अद्वैत श्रेष्ठ असल्याचें । कांहीं प्रत्यंतर दावा साचें । उगीच शब्दजालाचें । जाळें न पसरा निरर्थक ॥ १८ ॥ वारांगनेच्या नखऱ्यापरी । हें शब्दसाहित्य निर्धारीं । म्हणून आमुची विनंती खरी । कांहीं अपूर्व दाखवा ॥ १९ ॥ आचार्य वदती त्यावरी । अपूर्व काय दाखवूं तरी । हें तुम्हीच आपुल्या अंतरीं । विचार करूनि सांगा मज ॥ २० ॥ तुम्ही जें सांगाल कांहीं । तें करून दावीन ये ठायीं । काय करूं तें लवलाही । सांगा आतांच पंडित हो ! ॥ २१ ॥ मग म्हणाले पंडित । 'खरें कां खोटें अद्वैत । हें सांगावें आम्हांप्रत । श्रीशिवाच्या मूर्तीनें ॥ २२ ॥ म्हणजे आचार्या ! कशाचीहि । शंका ती उरली नाहीं । शब्दजालाची गरज काई । ये ठायीं असेना ॥२३॥ फार बरें म्हणून । आचार्य वदले गर्जून । अवघ्या श्रोत्यांकारण । पाहा म्हणती मूर्तीकडे ॥ २४ ॥ ऐसा इशारा लोकांस दिला । आणि आपण स्तव मांडिला । तें तेथें काय झाला । प्रकार तो ऐका आतां ॥ २५ ॥ हे पिनाकपाणि, भाललोचना ! । ॐकाररूपा, मदनदहना ! । पार्वतीशा, पतितपावना ! । नीलकंठा, विश्वेशा ! ॥ २६ ॥ आपण प्रकट होऊन

पिंडींत । सत्य किंवा आहे मिथ्य । हें देवा ! अद्वैत मत । याचा निवाडा येथें करा ।। २७ ।। तैसेंच वेदाकारण । द्वैत किंवा अद्वैत मान्य । हें आपुल्या मुखांतून । लोक ऐकण्या इच्छिती ।। २८ ।। ऐशी ऐकूनिया स्तुति । प्रकट झाला दक्षिणामूर्ति । पंचवदन अंबिकापति । लिंगाठायीं तेधवां ।। २९ ।। लिंग झालें विदारण । भगवान् प्रगटले आंतून । सहस्त्रसूर्यासमान । तेज ज्यांचें फांकलें ।। ३० ।। वरदहस्त उभारिला । प्रत्यक्ष भगवान बोलता झाला । मान्य आहे वेदाला । अद्वैत मत एकचि ।। ३१ ।। बाकीचीं तीं थोतांड मतें । सेवूं नका कोणी त्यांतें । अद्वैत हेंच पोहोंचवितें । कैवल्यपदीं जिवाला ।। ३२ ।। हें सेविल्या अद्वैत मत । जीवांत आणि ब्रह्मांत । फरक नाहीं यत्किंचित । याचा अनुभव येतसे ।। ३३ ।। ऐशी ईशवाणी ऐकतां । आनंद झाला समस्तां । प्रत्येक जण ठेवी माथा । प्रभूचिया चरणांवरी ।। ३४ ।। अद्वैत रहस्य सांगून । प्रभु पावला अंतर्धान । पिंडी झाली पहिल्यासमान । ईशलीला न कळे कोणा ।। ३५ ।। मग त्या मध्यार्जुन क्षेत्रांत । अवघ्यांनीं सेविलें अद्वैत । आचार्यांचे गुण गात । क्षेत्रस्थ राहते जाहले ।। ३६ ।। श्रीमत् आचार्य तेथुनी । आले रामेश्वरालागुनी । ज्या ठायीं वानरांनीं । सेतु मागें बांधिला ।। ३७ ।। आचार्य अवघे शिष्यांसहित । राहिले तेथें आनंदांत । रोज हराच्या मंदिरांत । अद्वैत चर्चा चालतसे ।। ३८ ।। त्यायोगें ऐसें झालें । लोक अद्वैत सेवूं लागले । तेणें धाबें दणाणलें । इतर पंथांच्या लोकांचें ।। ३९ ।। कांहीं शाक्त एके दिवशीं । येऊनिया मंदिरासी । पुसते झाले आचार्यांसी । स्पष्टपणें तें ऐका ।। ४० ।। तुम्ही टाकून अद्वैता । सेवा आमुच्या शाक्त मता । जेणें सौख्य येऊन भोगितां । अंतीं मोक्ष मिळतसे ।। ४१ ।। आमुच्या शाक्त मताचें । दैवत प्रकृति आहे साचें । सत्त्वरजतमांचें । स्थान नाहीं तिच्याठायीं ।। ४२ ।। त्या आद्य प्रकृतीपासून । जग हें झालें निर्माण । म्हणून तिचींच धारण । तुम्हीं चिन्हें करावीं ।।४३।। आचार्य म्हणती, "प्रकृतीप्रत । आद्यत्व ना प्राप्त होत । तुमचें हें शाक्त मत । उचित दारू प्यावया ।। ४४ ।। ही तुमची प्रकृति । ब्रह्माची आहे शक्ति । ती नव्हे मोक्षदात्री । तो अधिकार ब्रह्माचा ।।४५।। ब्रह्मविचारें ब्रह्म होतो । जीव-शिवपणा त्याचा जातो । प्रकृतीच्या चिंतनें होतो । भ्रम मात्र उत्पन्न ।। ४६ ।।

'तमेव विदित्वामृतत्वमानशुः।'

ऐशीं प्रमाणें शास्त्रांत। ठायीं ठायीं असती बहुत। तीं आणून ध्यानांत। तुमचा तुम्हीच शोध करा ॥ ४७ ॥ प्रकृति ही केव्हांहि। आद्य कारण होणें नाहीं। अफाट विश्वाचिया ठायीं। सच्चिदानंद भरला असे ॥ ४८ ॥ तुम्हीच हीं शाक्त चिन्हें। टाकूनिया सावध होणें। नुसतीं धारण करितां चिन्हें। मोक्ष मिळणें नाहीं पाहा" ॥ ४९ ॥ मतें अवघ्या शाक्तांचीं। आचार्यांनीं खोडून साचीं। बुद्धि वळवली तयांची। आपुल्या अद्वैत मताकडे ॥ ५० ॥ लक्ष्मीभक्त येऊन। म्हणती आचार्यांलागून। तुम्ही करावीं धारण। चिन्हें त्या लक्ष्मीचीं ॥ ५१ ॥ ती परम पुरुषाची प्रकृति। आहे लक्ष्मीच निश्चितीं। ऐशी सर्वदा सांगे श्रुति। आपुल्या अमोघ वाणीनें ॥ ५२ ॥ कमलचिन्हें बाहूठायीं। भालभागा कुंकुम पाही। कमलाक्षाविण नाहीं। माला दुसरी शुचिर्भूत ॥ ५३ ॥ ऐशा चिन्हें जो कां युक्त। मोक्ष तयाच्या हातांत। आहे हा खचित। म्हणून घ्या हो लक्ष्मीला ॥ ५४ ॥ त्या लक्ष्मीभक्तासी। आचार्य वदले प्रेमेंसी। शाक्तांच्या प्रकृतीसी। तुम्ही लक्ष्मी म्हणतसां ॥ ५५ ॥ मद्यमांसांविरहित। शाक्तांत आणि तुम्हांत। फरक नाहीं यत्किंचित। नामभेद नुसता असे ॥ ५६ ॥ प्रकृतीच्या पूजनें। शाश्वताची न प्राप्ति होणें। तयालागीं आहे जाणें। जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत ॥ ५७ ॥ म्हणून ब्रह्माची व्हाया प्राप्ति। उपासिलें पाहिजे ब्रह्माप्रति। मोक्ष प्रकृतीच्या नाहीं हातीं। हें सर्वदा ध्यानीं धरा ॥ ५८ ॥ 'अहं ब्रह्मास्मि' हा मंत्र। जपावा कीं अहोरात्र। तरीच सामावता येत। त्या अविनाश ब्रह्मामधें ॥ ५९ ॥ ऐसें आचार्यांचें भाषण। लक्ष्मीभक्तांनीं ऐकून। अद्वैत मतातें सेवून। शिष्य झाले आचार्यांचे ॥ ६० ॥ शाक्त लक्ष्मीभक्तांपरी। त्या क्षेत्र रामेश्वरीं। आचार्यांचे समोरी। शारदोपासक पातले ॥ ६१ ॥ शारदोपासक स्वामींप्रत। म्हणूं लागले जोडून हात। सरस्वती आणि वेदान्त। फरक मुळीं नसे कीं ॥ ६२ ॥ वेदरूपी सरस्वती। ती अवघ्यांत श्रेष्ठ निश्चितीं। म्हणून करणें तिची भक्ति। आहे मुमुक्षू जनांना ॥ ६३ ॥ वेद सरस्वतीप्रत। नित्यत्व आहे सत्य। याच्या सेवनें मुक्त। प्राणी झालाच पाहिजे ॥ ६४ ॥ हें ऐकून आचार्य म्हणती। तुमची नव्हे यथार्थ उक्ति। या वेदाची उत्पत्ति। श्वासापासून प्रभूच्या ॥ ६५ ॥ म्हणजे वेद आहे जन्य। त्याचा जनक

ब्रह्म पूर्ण । श्रुतीमाजीं एक वचन । ऐसें असे त्याविषयीं ।। ६६ ।।

'यस्य निःश्वसितं वेदाः ।'

या वचनाचा सर्वदा । विचार करणें, त्यास कदा । अंगीं वाहूनिया मदा । कानामागें टाकूं नका ।। ६७ ।। जन्म आहे ज्याप्रत । तें तें अवघें अनित्य । म्हणून मोक्षाप्रीत्यर्थ । उपासिणें भाग ब्रह्माला ।। ६८ ।। त्या शारदोपासकांनी । ऐशी आचार्यवाणी ऐकूनी । मत दिलें सोडूनी । आणि शिष्य झाले आचार्यांचे ।। ६९ ।। शक्ति, लक्ष्मी, शारदोपासक । हे आचार्यांनीं जिंकिले लोक । तें ऐकून पडला धाक । इतर मतांच्या पंडितां ।। ७० ।। विद्योपासक एके दिनीं । वाद करण्याच्या हेतूंनीं । आपुले ग्रंथ घेऊनी । आले आचार्य स्वामींकडे ।। ७१ ।। हे विद्योपासक पंडित । वाममार्गी सदा रत । त्यावरीच त्यांचा हेत । गुंतूनिया राहिला ।। ७२ ।। स्वामी तुमचें अद्वैत । आहे वंध्यापुत्रवत् । नाहीं नाहीं किमत । त्याला शब्दांपलीकडे ।। ७३ ।। मोक्षेच्छा असेल ज्यांसी । त्यांनीं या विद्यादेवीसी । भजणें आहे आदरेंसी । कैवल्य तें साधावया ।। ७४ ।। या विद्यादेवीप्रति भजतां । विधिनिषेधाची नसे उरता । कां कीं वासना त्याचे चित्ता । होणार नाहीं वाइटाची ।। ७५ ।। तो जें जें कर्म करी । तें चांगलेंच सर्वतोपरी । त्याच्यासारिखा अधिकारी । कोणीच नसे भूमीवर ।। ७६ ।। सुख, मोक्ष आणि चैन । विद्योपासक साधी पूर्ण । याच पंथाचें सेवन । बडे बडे करीत आले ।। ७७ ।। भृगु, अगस्ति दोघेजण । याच उपासनेंकरून । मिळविते झाले मोठेंपण । अवघ्या त्रिभुवनांमाझारीं ।। ७८ ।। हें आचार्यांनीं ऐकिलें । आणि तयांसी बोलते झाले । तुम्हीं जें विधान केलें । तें सर्व आहे चुकीचें कीं ।। ७९ ।। एक आत्मा परिपूर्ण । त्याविण दुसरें कोणीच न । नित्य शाश्वत आनंदघन । आत्मा हाच एक असे ।। ८० ।। त्या आत्म्याची व्हावया प्राप्ति । सदाचार आणि सन्नीति । हींच तत्त्वें प्रधान असतीं । तेंवि त्यांचें चिंतन ।। ८१ ।। नांवें भृगु-अगस्तींचीं । तुम्ही नका घेऊं साचीं । नाहीं येणार तयांची । तुम्हां केव्हांहि योग्यता ।। ८२ ।। ही विद्येची उपासना । तुमची मुळींच खरी ना । 'विद्' धातु आहे जाणा । विद्या शब्दामाझारीं ।। ८३ ।। विद् म्हणजे जाणणें । नाहीं अविधि कृत्य करणें । जाणण्यायोग्य ब्रह्माविणें । दुसरें कांहींच नाहीं कीं ।। ८४ ।। या क्षुद्र उपासना । मोक्ष कदापि देतीच ना ।

यांच्या उपासकांना । सिद्धि थोड्याशा प्राप्त होती ।। ८५ ।। जी उपासना सिद्धीतें । प्राप्त करूनिया देते । तीच पाहा पुढें नेते । उपासका नरकाप्रती ।। ८६ ।। म्हणून ब्रह्माची उपासना । करणें योग्य अवघ्यांना । खरा खरा मोठेपणा । ब्रह्म जाणल्या प्राप्त होतो ।। ८७ ।। मांसभक्षण तुम्हीं केलें । यथेच्छ मद्य प्राशिलें । या अविधिसेवनें नष्ट झालें । तुमचें पाहा ब्राह्मणपण ।। ८८ ।। म्हणून प्रायश्चित्त घ्यावें । या अविधि मार्गा सोडावें । वेदांप्रति न लावावे । दोष, जन्मून ब्रह्मकुलीं ।। ८९ ।। ऐसें ऐकतां भाषण । ते विद्योपासक अवघे जन । प्रायश्चित्त घेऊन । शिष्य झाले आचार्यांचे ।। ९० ।। आचार्य म्हणती समस्तांना । कोणतीहि असो उपासना । या उपासनें ब्रह्मभावना । असली पाहिजे जागृत ।। ९१ ।। नाम आणि आकार । हे उपासनेसी आधार । या दोहोंच्या जोरावर । उपासना सिद्ध होते ।। ९२ ।। आकारासी तें पूजन । नामासी तें भजन । पुढें राहिलें चिंतन । ते करावें ब्रह्माचें ।। ९३ ।। म्हणजे नाम आकारें बोधित झाला । तो सच्चिदानंद भला । आणि त्या ब्रह्मापासून वेगळा । मीहि नाहीं मुळींच ।। ९४ ।। ऐसी उपासना घडेल । तरीच कार्य होईल । अद्वेष्टेपणा राहील । सारखाच सर्वांचा ।। ९५ ।। शिव, प्रकृति, नारायण । गणपति, रवि, नारायण । हीं एकाच तत्त्वापासून । नामें आहेत दिलेलीं ।। ९६ ।। शर्करा, साखर, शक्कर । सुवर्ण, हेम, भांगार । हे नामभेदाचे प्रकार । जरी उत्थान पावले ।। ९७ ।। तरी या नामभेदें पाही । तत्त्वांत फरक होणें नाहीं । हाच न्याय सर्वांठायीं । लावा म्हणजे ब्रह्म कळे ।। ९८ ।। मात्र उपासनेंत । निंद्य विधि नसावेत । अविधि मार्गाप्रत । वाव मुळींच देऊं नये ।। ९९ ।। एवंच ते ठायीं भली । पंचायतनपूजा सुरू झाली । श्रीशंकराचार्य माउली । वाटाडे झाले सर्वांना ।। १०० ।। ऐशीं अघटित कृत्यें करोनी । आचार्य निघाले तेथूनी । कांची शहरालागुनी । येते झाले शिष्यांसहित ।। १०१ ।। इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ।। १०२ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

# अध्याय अठ्ठाविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जय जय भक्तमानसमराळा ! । जय जय गरुडध्वजा विश्वपाळा ! । जय जय कमलनयन गोपाळा ! । गोरक्षका गोविंदा ॥ १ ॥ तुझें लाघव कवणासी । न कळे हे हृषीकेशी ! । गेलास बळीच्या घराशीं । बटु वामन होऊन ॥ २ ॥ तै एक्या क्षणांत । विराट रूप धरिलें सत्य । व्यापिलें अवघ्या महीप्रत । एकाच कीं पाउलानें ॥ ३ ॥ तूं लहानांत लहान अससी । आणि मोठ्यांत मोठा होसी । नाहीं नाहीं अशक्यशी । कोणतीहि गोष्ट तुला ॥ ४ ॥ पाय बलीच्या ठेवून शिरीं । वंद्य केला जो जगभरीं । भक्तीस्तव त्याच्या द्वारीं । द्वारपाल तूं झालास ॥५॥ हे सर्वसत्ताधीश वामना ! । हे सच्चिदानंदा नारायणा ! । दासगणूच्या सर्व यातना । निवाराव्या दीनबंधो ! ॥ ६ ॥ बुद्धि करावी सन्मार्गरत । कुवासना ती यत्किंचित् । नच उपजावी मनांत । हेंचि मागे दास तुला ॥ ७ ॥ मागितलें तें तें द्यावें । आचार्यचरिता साह्य करावें । वरदकरासी ठेवावें । दासगणूच्या मस्तकीं ॥ ८ ॥ असो त्या शिवकांची नगरीं । जगद्गुरूंची आली स्वारी । गर्दी होऊं लागली भारी । श्रींच्या व्याख्यानश्रवणाला ॥ ९ ॥ तों तया नगरांत । विश्वरूपाचे कांहीं भक्त । होते ज्यांनीं शिवचिन्हांप्रत । धारण केलें बाहूवरी ॥ १० ॥ त्या अवघ्या जंगमांप्रत । आचार्यांचें अद्वैत मत । नाहीं पडलें पसंत । वाद करण्या आले ते ॥ ११ ॥ जंगम म्हणाले आचार्यांना । तुम्ही या खोट्या मताला । कां फैलावितां जगतीतला । हें कांहीं बरें नव्हे ॥ १२ ॥ आचार्या ! अवघ्या देवांत । विरूपाक्ष श्रेष्ठ अत्यंत । ऐसें वेद पुराणांत । कथिलें पूर्वाचार्यांनीं ॥ १३ ॥ त्या विरूपाक्ष सदाशिवाची । भक्ति मानवें करणें साची । आणि चिन्हेंहि शैव भक्तीचीं । धारण करणें देहावर ॥ १४ ॥ शिवचिन्हें जो धारण करी । मोक्ष येतो त्याच्या करीं । ऐसें मोठमोठाले अधिकारी । सांगून गेले पुराणांत ॥ १५ ॥ आचार्य म्हणती त्यावर । हा तुमचा सामान्य विचार । यांत तत्त्वतः नाहीं विचार । सगुणभक्तिसाधन पहिलें ॥ १६ ॥ नुसता एक अंक शिकल्यानें । नाहीं त्याला गणित येणें । तेवि-सगुणभक्तीनें । मोक्ष मिळणें नाहीं कदा ॥ १७ ॥ विरूपाक्ष देवता सगुण । तेणें न होय आत्मज्ञान । त्यासाठीं औपासन । झालें

पाहिजे आत्म्याचें ॥ १८ ॥ देहाच्या अवयवांवरी । सत्ता आहे सर्वतोपरी । अन्य अन्य देवतांची खरी । याला आधार श्रुतींचा ॥ १९ ॥ हें अरुणकेतूला । ब्रह्मदेव सांगता झाला । म्हणून या विशेष चिन्हांना । धारण कोणीं करूं नये ॥ २० ॥ चिन्हें धारण केल्यावरती । त्या त्या देवता रुष्ट होती । आणि देहास सोडून जाती । हें मुळीं विसरूं नका ॥ २१ ॥ देवता गेल्या निघून । देह होतो पतित जाण । म्हणून देहाचें मोठेंपण । कायम ठेविलें पाहिजे । २२ ॥ देह भाजून मुळीं न घ्यावा । तो जशाच्या तसा रक्षावा । तो ज्याच्यामुळें अविर्भावा । आला तो आत्मा ओळखणें ॥ २३ ॥ आणि तोच आत्मा ओळखाया । देवें दिली नरकाया । ती जाऊं न द्यावी उगी वांयां । ब्रह्मज्ञान करून घ्यावें ॥ २४ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । जंगम चित्तीं संतोषले । अद्वैत मतासी ग्रहण केलें । आचार्यांसी वंदून ॥ २५ ॥ त्या कांची गांवांत । शिवोपासकांचा भरणा बहुत । ते शिवोपासक पंडित । आले वादण्या स्वामींस स्वयें ॥ २६ ॥ गर्वें स्वामींस म्हणाले । येथें हें तूं काय मांडिलें । हे शब्दजालांचे चाळे । या कांचींत करूं नको ॥ २७ ॥ तुझा देव निर्गुण । नाहीं त्या ठावठिकाण । नाम नाहीं म्हणून । भजन त्याचें होणें नसे ॥ २८ ॥ आमुचा देव तसा नाहीं । वेदें ज्या वर्णिलें पाही । त्या रुद्राध्यायाचे ठायीं । तो तूं आवश्य पाहावा ॥ २९ ॥ अवघें जें ब्रह्मांडांत । तेंच आहे मूर्तिमंत । नमकचमकांचा पाहा अर्थ । म्हणजे कळून येईल कीं ॥ ३० ॥ देव हाच ईशान । सांगता झाला नारायण । श्रीनारदालागून । तें पुराण पाहा तुम्ही ॥ ३१ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । आचार्य बोलते झाले । तुम्हीं न मर्म शोधिलें । म्हणून ऐसें बोलतसां ॥ ३२ ॥ जितक्या आहेत उपासना । तितक्या आरंभींचे धडे जाणा । क का तो शिकल्याविना । शब्द तो जोडितां न ये कीं ॥ ३३ ॥ आधीं मूल काढी । क ख बाराखडी । मग शब्द जोडी । झालिया तें ज्ञान ॥ ३४ ॥ कर्म-उपासना ही बाराखडी । ज्ञानमार्गाची रोकडी । उगीच वेडींवांकुडीं । विधानें तीं करूं नका ॥ ३५ ॥ हें कर्मउपासनेचें । प्राथमिक शिक्षण घेतां साचें । पाळणें विधिनिषेधांचें । महत्त्व आहे ते ठायां ॥ ३६ ॥ तो विधिनिषेधांचा पसारा । श्रुतिमान्य पाहिजे खरा । हें पूर्णपणें ध्यानीं धरा । म्हणजे उपासना सिद्ध होई ॥ ३७ ॥ उगीच तनू पोळवून । अग्नीनें न

घ्यावी जाण। ती तापविली पाहिजे पूर्ण। कृच्छ्र चांद्रायण क्रियेनें ॥ ३८ ॥ कृच्छ्र चांद्रायण न करिती कोणी। आणि तनू घेती पोळवूनी। या वेदबाह्य वर्तनानीं। पतित व्हावें लागतें ॥ ३९ ॥ भस्म-रुद्राक्ष धारण करावें। सदाशिवाप्रती ध्यावें। परि अवधान अवघें असावें। सच्चिदानंदाचिये ठायीं ॥ ४० ॥ ऐसा आचार्यांचा उपदेश। ऐकून अवघ्या शैवांस। चित्ताठायीं संतोष। झाला असे तयांच्या ॥ ४१ ॥ ते अद्वैतमतानुयायी झाले। आचार्यांसी गुरु केले। आपुलेंहि न सोडिलें। योग्य सशास्त्र होतें जें ॥ ४२ ॥ कांची नगराहून पुढें। आचार्य निघाले उत्तरेकडे। थोडें घेऊन वांकडें। आले अनंतशयनाप्रती ॥४३॥ हें अनंत-शयन नामें नगर। त्रावणकोर प्रांतीं थोर। यालाच म्हणती साचार। त्रिवेंद्रम् ऐसें प्रचारीं ॥ ४४ ॥ ही त्रावणकोरची राजधानी। संपन्न अवघ्या बाजूंनीं। येथेंच आहे शय्यासनीं। स्थित मूर्ति हरीची ॥ ४५ ॥ येथें हरीचें दर्शन। घ्यावें तीन खणांतून। म्हणून झालें नामाभिधान। त्रिवेंद्रम् तें प्राप्त याला ॥ ४६ ॥ हें राज्य त्रावणकोरचें। अवघेंच आहे भगवंताचें। फक्त अधिकारी वहिवाटीचे। राजे तेथील आहेत ॥ ४७ ॥ त्या त्रिवेंद्रम् शहरांत। एक महिनापर्यंत। राहिले असती आनंदांत। श्रीजगद्गुरु शंकराचार्य ॥ ४८ ॥ येथें वैष्णवांचें प्राबल्य। इतर पंथांचें न चाले बळ। म्हणून उडाली खळबळ। आचार्यांच्या अद्वैत मतें ॥ ४९ ॥ वैष्णव सहा प्रकारचे। नांदत होते तेथ साचे। ते पंथ कोणते। ते आतां अवधारा ॥ ५० ॥

भक्ता, भागवताश्चैव, वैष्णवाः, पांचरात्रिणः।
वैखानसाः, कर्महीनाः षड्विधा वैष्णवा मताः ॥

या सहा प्रकारच्या वैष्णवांनीं। आचार्यांकडे येऊनी। आपुल्या मतांची मांडणी। केली असे वादास्तव ॥ ५१ ॥ वैष्णव म्हणती कर जोडून। आमुच्या पंथाचें हें लक्षण। ज्यांनीं धरिले रामकृष्ण। अवतार असा जो श्रीहरि ॥ ५२ ॥ त्याची उपासना करावी। सलोकता मुक्ति साधावी। ऐशी आज्ञा आहे बरवी। कौंडिन्य ऋषींची वैष्णवांतें ॥ ५३ ॥ वैष्ण-वांच्या आचारीं। दोन प्रकार निर्धारीं। एकाचा भर आहे भारी। नुसती क्रिया करण्याकडे ॥ ५४ ॥ ब्रह्मगुप्त यांना म्हणती। नुसती क्रिया जे करिती। ज्ञानमार्गी ज्यांची मति। त्या ते ज्ञानी भक्त हरीचे ॥५५॥

त्या वैष्णवी ज्ञानमार्गांतला । मी एक आहें भला । विष्णुशर्मा म्हणती मला । आमुचा जमाव मोठा येथें ॥ ५६ ॥ आचार्य तें ऐकून । त्यासवें करिती भाषण । तुमच्या क्रियाज्ञानालागून । आधार नसे श्रुतीचा ॥ ५७ ॥ वेदबाह्य कांहीं तरी । क्रिया करितां निर्धारीं । वैष्णवी ज्ञान त्याचपरी । आहे हें कळलें आतां ॥ ५८ ॥ जीं कर्में कथिलीं वेदानें । तींच करावीं आदरानें । खरें ज्ञान आहे होणें । त्याच कर्माच्या बळावर ॥ ५९ ॥

'जन्मना जायते शूद्रः कर्मणा जायते द्विजः ।'

म्हणजे ज्या वेळीं ब्राह्मणांत । मूल येतें जन्माप्रत । त्या वेळीं तें शूद्रवत् । समजलें पाहिजे ॥६०॥ त्या बाळासी संस्कार होतां । द्विजत्व ये त्याचे हातां । तोच पुढें ब्रह्मवेत्ता । ज्ञानसेवनें होतो कीं ॥ ६१ ॥ मग ब्राह्मण झाल्यावर । त्यास कर्माचा येतो अधिकार । याचा पडला आहे विसर । तुमच्या ठायीं सर्वस्वीं ॥ ६२ ॥ कर्माधिकार होतां प्राप्त । द्विजानें घ्यावें अग्निहोत्र । त्यालाच सुख प्राप्त होत । ऐसा सिद्धान्त श्रुतीचा ॥ ६३ ॥

प्रतिरादिषु कालेषु अग्निहोत्रादिकं बुधः ।
कुर्वन्वै ब्राह्मणो विद्वान्सकलं भद्रमश्नुते ॥

म्हणून तुम्हीं अवघ्यांनीं । अशास्त्र विधि टाकोनी । श्रुतिसम्मत मार्गांनीं । जावें हेंच उत्तम ॥६४॥ कोणतेंहि असो उपास्य । तें ब्रह्माचा आहे अंश । ऐसें समजून अभ्यास । करणें आत्मचिंतनाचा ॥ ६५ ॥ श्रुतिसम्मत कर्मासी । जो न आचरी तयासी । नरकयातना भोगण्यासी । जाणें आहे यमलोकीं ॥ ६६ ॥ हें आचार्यवाक्य ऐकून । विष्णुशर्मादि वैष्णव जन । कर्मलोपाकारण । प्रायश्चित्त घेते जाहले ॥ ६७ ॥ स्मार्ताचार आदरिला । पंचायतन पूजेला । येथून पुढें आरंभ झाला । तीं पंचायतनें पांच असतीं ॥ ६८ ॥ शिव, विष्णु, गजानन । देवि सूर्यनारायण । ऐसें पांच प्रकारचें औपासन । समाजांत सुरू झालें ॥ ६९ ॥ असो विष्णुशर्म्यापरी भला । ब्रह्मगुप्तहि शरण आला । श्रीमत् जगद्गुरु आचार्यांना । त्या त्रिवेंद्रम् शहरामधें ॥ ७० ॥ शिव आणि विष्णूतें । जीं भेद मानणारीं होतीं मतें । तीं सप्रमाण झालीं खोडिते । आधार श्रुतीचे देऊनिया ॥ ७१ ॥ हिरण्यगर्भाचे उपासक । तेथें होते कांहीं

लोक । ते एकामागून एक । आले वादण्या स्वामींसवें ॥ ७२ ॥ त्यांनीं ऐसें केलें भाषण । ब्रह्मदेव जो चतुरानन । तोच आहे मूळ पूर्ण । या अवघ्या ब्रह्मांडाचें ॥ ७३ ॥ त्या विधात्यावांचून । दुसरा देव नसे आन । याहि मताचें खंडन । तेथ केलें आचार्यांनीं ॥ ७४ ॥ तेंवि उपासक अग्नीचे । आणि तैसे सूर्याचे । हेहि हतदर्प केले साचे । आचार्यांनीं विबुध हो ! ॥ ७५ ॥ एक महिनापर्यंत । आचार्य त्रिवेंद्रम् शहरांत । राहते झाले आनंदांत । उपदेश करीत लोकांना ॥७६॥ अखेर शेषशायी अनंतासी । वंदन करून पुण्यराशि । आले गणवर नगरासी । आपुल्या त्या शिष्यांसह ॥ ७७ ॥ त्या गणवर गांवाप्रति । ग्रामदैवत गणपति । गाणपत्य बहुतेक असती । लोक गणवर ग्रामींचे ॥ ७८ ॥ सहा प्रकारचे गाणपत्य । तेथें होते अस्तित्वांत । फरक थोडा थोडा विधींत । होता एकमेकांच्या ॥ ७९ ॥ साध्य जो कां गणपति । तो सारखा अवघ्यांप्रति । उपास एक चतुर्थी । भाला भूषण सिंदुराचें ॥८०॥ ते अवघे गाणपत्य । येऊन बोलले स्वामींप्रत । तुमचें हें अद्वैत । निव्वळ थोतांड आहे कीं ॥ ८१ ॥ जगत्कारण गणपति । गौरिपुत्र प्रतापज्योति । अवघ्या विद्यांचा निश्चितीं । दाता एक गजानन ॥८२॥ आचार्य म्हणाले तयातें । येथेंच तुमची चूक होते । जगत्कारण गणपतीतें । नाहीं येत ठरवितां ॥ ८३ ॥ शिवउमांचा तो पुत्र । हें प्रसिद्ध आहे सर्वत्र । ब्रह्म हेंच जगताप्रत । आद्य कारण आहे पाहा ॥ ८४ ॥ प्रकृति जी पुरुषाधिष्ठित । तिनें निर्मिलें तत्त्व महत् । तत्त्वापासून तें सत्य । अहंकार तो झाला असे ॥ ८५ ॥ अहंकारापासून । रज, तम, सत्त्व निर्माण । त्या त्रिगुणांच्या ह्या तीन । देवता विधिहरिहर ॥ ८६ ॥ पुढें शिवापासून । भैरवकुमार गजानन । हे झाले आहेत निर्माण । आद्यकारण यांसी न म्हणा ॥८७॥ जगाचें आद्य कारण । आहे एक ब्रह्म पूर्ण । तें बुद्धीसी आकलन । होणें आहे कठिण अति ॥ ८८ ॥ तें आकलन व्हावया । सांगतों तुम्हां सदुपाया । इच्छेप्रमाणें कल्पूनिया । सगुण देव कोणी तरी ॥ ८९ ॥ आणि त्याची उपासना करावी । अनन्य भावें करून बरवी । उपास्याची लेखावी । मूर्ति व्यापक ब्रह्मांडा ॥ ९० ॥ हें ऐसें ठाम मत । साधकाचें होईपर्यंत । आचार विचार कडकडीत । ठेविला पाहिजे सोंवळा ॥९१॥ ऐशी तयारी झाल्यावरी । ती उपासनाच सांगेल खरी । निर्गुण ब्रह्माची

ती थोरी । मुमुक्षु ते निःसंशय ॥ ९२ ॥ मग तें ब्रह्म ठसावतां । ब्रह्मामाजी तत्त्वतां । दुर्घट जो कां तोच हातां । आला मोक्ष तयाच्या ॥९३॥ ऐसें अवघ्यांसी सांगून । पंचायतनाचें पूजन । करावयासी लावून । अद्वैतमार्गी वळविलें ॥९४॥ एवंच नाना मताचे । लोक गणवर गांवींचे आचार्यांनीं वळविले साचे । बोधामृत तें पाजूनिया ॥ ९५ ॥ धन्य धन्य हा वैदिक पंथ । आत्मा ज्यांचा अद्वैत । कर्म उपासनात्मक द्वैत । अवयव त्या पंथाचे ॥ ९६ ॥ त्या अद्वैत आत्म्याचा विसर । जेव्हां पडता झाला भूमीवर । त्याचाच कराया उद्धार । अवतार झाला जगद्गुरूंचा ॥९७॥ खरें तत्त्व बोधिलें । लोक बहुतेक शहाणे केले । परि अलिप्तचि राहिले । अवघ्या कृत्यांपासून ॥ ९८ ॥ असो पुढें फिरत फिरत । जगद्गुरु शिष्यांसहित । येते झाले बुध हो ! सत्य । एका पवित्र स्थलासी ॥ ९९ ॥ ऐसें क्षेत्र म्हणाल कोण ? । तरी सांगतों द्या अवधान । जेथें अंबरेश उमारमण । आनंदेंसी राहिला ॥ १०० ॥ तें कांचीनामें नगर । द्रविडांमाजीं प्रसिद्ध फार । वेदपठण घरोघर । ज्या नगरींत होत असे ॥ १०१ ॥ त्या कांची नगराला । जगद्गुरूंचा मुक्काम झाला । एक महिन्यापर्यंत भला । जन लावण्या सुवाटे ॥ १०२ ॥ त्या कांची नगरांत । मोठें मंदिर बांधून त्यांत । स्थापन केला पार्वतीकांत । श्रीशंकराचार्यांनीं ॥ १०३ ॥ त्या शहरा नांव दिलें । शिवकांची ऐसें भलें । दुसरें आणिक वसविलें । एक नवें नगर त्यांनीं ॥ १०४ ॥ तेथें विष्णूची स्थापना । आचार्यांनीं केली जाणा । त्या शहरास नामाभिधाना । विष्णुकांची ऐसें दिलें ॥ १०५ ॥ शिवकांचींत दक्षिणामूर्ति । विष्णुकांचींत रमापति । स्थापिते झाले विमलकीर्ति । श्रीजगद्गुरु महाराज ॥ १०६ ॥ त्या दोन्ही ठिकाणची । सोय पूजाअर्चेची । लावून टाकिली कायमची । अत्युत्तमशी स्वामींनीं ॥ १०७ ॥ तो ताम्रपर्णातीरवासी । भेद मान्य आहे ज्यासी । ऐसे कांहीं लोक स्वामींसी । आले वाद करावया ॥ १०८ ॥ हे स्वामिन् ! ब्रह्मांडांत । भेद असून मूर्तिमंत । तुम्ही हें नुसतें अद्वैत । स्थापिलें तरी कोठुनी ? ॥ १०९ ॥ भेद प्रत्ययापरी येतो । असल्याचीही साक्ष देतो । उपासनेनुरूप जातो । त्या त्या लोकाप्रति प्राणी ॥ ११० ॥ विष्णुभक्ति करणारांतें । वैकुंठ तें प्राप्त होतें । श्रीशंकराला उपासिती ते । जाती कैलास लोकाप्रत ॥ १११ ॥ विधात्याची करतां भक्ति ।

ब्रह्मलोकाची होय प्राप्ति । जे पितरांतें उपासिती । ते जाती पितृलोका ॥ ११२ ॥ हें भेदवाद्यांचें भाषण । आचार्यांनीं ऐकून । त्यांच्या द्वैत मताचें खंडण । केलें श्रुतीच्याच वाक्यांनीं ॥ ११३ ॥ हा जगताचा द्वैत-पणा । केवळ आभास आहे जाणा । पापपुण्याच्या कल्पना । तितक्याच-पुरत्या सत्य असती ॥ ११४ ॥ ते नाना प्रकारचे लोक । आहेत अवघे क्षणैक । तात्पुरतेंच त्यांचें सुख । आहे दुपारच्या छायेपरी ॥ ११५ ॥ ' एकोहं बहु स्याम् ' । या वाक्याचें काय वर्म । पुरुष जो पुरुषोत्तम । तो सांगा कोण असे ? ॥ ११६ ॥ आदि, मध्य आणि अंत । हें मुळीं न ज्या तत्त्वाप्रत । जें नामरूपविरहित । असे तें ब्रह्म पाहा ॥ ११७ ॥ त्या ब्रह्माची उपासना । केल्या मोक्ष मिळे जाणा । जन्ममरण यातना । त्याला न लागती भोगाव्या ॥ ११८ ॥ शिवलोक, वैकुंठलोक । ब्रह्मलोक, पितृलोक । या लोकांची प्राप्ति देख । पुण्यसंचय केल्या होते ॥ ११९ ॥ तें पुण्य संपल्यावरी । जीव येतो माघारीं । पुन्हां या भूमीवरी । हा क्रम ध्यानीं धरा ॥ १२० ॥ म्हणून जीव-शिवांचा । तेविं नाना देवतांचा । भेदभाव टाकून साचा । मुख्य ब्रह्म तें उपासणें ॥ १२१ ॥ एवंच ब्रह्मा-विण कांहीं । त्रिभुवनांत उरलें नाहीं । पाणी पडो कोठेंहि । तें जातें सागराला ॥ १२२ ॥ ऐसें आचार्य म्हणाले । तें सर्वांनीं ऐकिलें । अद्वैत मतीं होऊन बैसले । लोक तया प्रांतींचे ॥ १२३ ॥ आंध्र देशांतील लोकां । हाच उपदेश केला देखा । वक्ता आचार्यांसारिखा । होणार नाहीं पुनरपि ॥ १२४ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्य-चरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १२५ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय एकूणतिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय लक्ष्मीपते व्यंकटेशा ! । हे शेषाते चल-निवासा ! । जयजय आदि अनादि पुराणपुरुषा ! । सगुणस्वरूपा विश्वपते ! ॥ १ ॥ देवा ! तुम्ही सगुण भक्ति । जे जे कोणी आचरती । त्यांना त्यांना विस्मृति । ब्रह्माविषयीं पडतसे ॥ २ ॥ हीं नाना मतें म्हणून । भूतलीं

होतीं अवतीर्ण । आणि तींच मतें कारण । होतीं पुढें कलहाला ।। ३ ।। या तुझ्या कृतीचें । गूढ कोणा न उमगे साचें । शोधन करितां वेदाचें । कळतें तूं निर्गुण ।। ४ ।। ती ब्रह्माची उपासना । सगुणाविना घडेचिना । जैसा येण्या तरुणपणा । बालपण हें अवश्य असे ।। ५ ।। म्हणजे अवघें तूंच करिसी । आणि अवघ्यातें संरक्षिसी । विरुद्धाविरुद्ध दाविसी । लीला जगतीं नारायणा ! ।। ६ ।। मी न तें कांहीं जाणत । धरितों तुझ्या चरणांप्रत । ज्यायोगें माझा हेत । पूर्ण होईल गरुडध्वजा ! ।। ७ ।। असो, जगद्‌गुरूची स्वारी । त्या ताम्रपर्णा नदीतीरीं । अद्वैताचा भूमीवरी । प्रसार करून निघाले ।। ८ ।। गणवर कांची रामेश्वर । तेथें नाना पंडितांबरोबर । वाद करून साचार । विविध मार्ग खंडित केले ।। ९ ।। तीं मतें साधारण तुम्हांप्रत । सांगतों मी ऐका येथ । शैव शिवदेशिक मत । मत वैष्णव भागवताचें ।। १० ।। पांचरात्र वैखानस मत । हिरण्यगर्भ सौर मत । अग्निउपासक शाक्त मत । लक्ष्मीमत वाग्देवता ।। ११ ।। हरिद्रा गणपतिमत । उच्छिष्ट गणपतिमत । नवनीत गणपतिमत । संतान गणपति त्याचपरी ।। १२ ।। कापालिक वामाचार । ऐसीं मतें अपार । खंडित केले आधार । देऊन निव्वळ श्रुतीचे ।। १३ ।। मतमतांचा गलबला । जेव्हां माजतो जगतीतला । परस्परांच्या द्वेषाला । ऊत येतो ते काळीं ।। १४ ।। आणि तो ऊत आल्यावर । बळावतो मत्सर । शकलें होतीं अपार । एकाच त्या समाजाचीं ।। १५ ।। मग कोणी कोणास पुसेना । जो तो म्हणे मीच शहाणा । राष्ट्र नाना यातना । भोगूं लागतें ते काळीं ।। १६ ।। हें महत् विघ्न टाळावया । आले अवतार घेऊनिया । श्रीमत् जगद्‌गुरु महीठायां । जे प्रत्यक्ष शंकर ।। १७ ।। यांनीं अमोल युक्ति करून । अवघ्या मतांचें खंडण । करूनिया केलें स्थापन । अद्वैतमत जें सुखदायी ।। १८ ।। या अद्वैत मतामाझारीं । कोणी कोणाचा न होय वैरी । सुख भोगून भूमीवरी । अंतीं पावतो कैवल्या ।। १९ ।। श्रोते ! अद्वैत मत । वेदाचेंच आहे सत्य । धन्य धन्य हा वेदान्त । अवघ्या बाजूंनीं सेव्य असे ।। २० ।। असो आचार्य फिरत फिरत । येते झाले शिष्यांसहित । क्षेत्र जें कां महापवित्र । व्यंकटाचल नांव ज्याचें ।। २१ ।। जे ठायीं गिरिवरी । उभा राहिला पूतनारि । श्यामसुंदर साजिरी । मूर्ति विश्वोद्धाराची ।। २२ ।। त्याचें घेतलें दर्शन । स्तोत्र रचूनिया नूतन ।

जगद्‌गुरूचा सन्मान । केला तेथील राजांनीं ।। २३ ।। कित्येक मतें तेथेंहि । आचार्यांनीं खंडिलीं पाही । पुढें कर्नाटक देशाठायीं । आचार्य जाया निघाले ।। २४ ।। तैं व्यंकटगिरीचा भूपति । बोलला जगद्‌गुरूंप्रति । तुम्ही कर्नाटक प्रांताप्रति । न जावें हेंच बरें ।। २५ ।। कां कीं कर्नाटक प्रांतांत । क्षुद्र देवतांचे भक्त । आहेत कीं असंख्यात । तुमच्या मताचे द्वेष्टे जे ।। २६ ।। कांहीं उच्च दर्जाचे । लोक कर्नाटक प्रांतींचे । आहेत द्वैत मताचे । निंदणारे परपंथा ।। २७ ।। त्या उच्च दर्जाच्या लोकांप्रत । तुमचें ना पटेल अद्वैत मत । ते आड राहूनिया बहुत । त्रास देतील तुम्हांला ।। २८ ।। ते क्षुद्र मताचे लोकांसी । चिथवूनिया निश्चयेंसी । त्रास द्याया आपणांसी । करतील कीं तयार ।। २९ ।। त्या क्षुद्र देवतांच्या भक्तां । नीति नाठवे सर्वथा । विवेकबुद्धि त्यांचे चित्ता । नाहीं कधीं उपजणार ।। ३० ।। कोणी भक्त वेताळाचे । कोणी ते भैरवाचे । कोणी भुतांखेतांचे । कुणी आसरांतें मानिती ।। ३१ ।। जारण, मारण, उच्चाटण । ह्या त्रयींस जेथें प्राधान्य । सर्वत्र अनाचाराविण । गोष्ट न ये ऐकावया ।। ३२ ।। म्हणून कर्नाटकालागून । तुम्ही नका करूं गमन । जाणून बुजून जाई कोण । घ्याया परीक्षा विषाची ? ।। ३३ ।। आचार्य म्हणती त्यावर । अरे ! दुष्ट मताचा प्रतिकार । करण्या मी आलों भूमीवर । त्यांना भिणें बरें नव्हे ।। ३४ ।। त्यांच्या भ्रामक मतांसी । निवटिणें आहे पाहा मशीं । श्रुतिसम्मत मार्गासी । ते आहेत विसरलेले ।। ३५ ।। ते आपुले आहेत स्वजन । म्हणून चुकलेल्या मार्गावरून । त्यांस आणणें आहे वळवून । या श्रुतिज राजरस्त्याला ।। ३६ ।। ऐसें बोलून निघाले । आचार्य कर्नाटकीं आले । आपुल्या शिष्यांसहित भले । ते अविधि मार्ग बुडवावया ।। ३७ ।। जगद्‌गुरूंच्या शिष्यांत । सुधन्वा नामें नृपनाथ । होता तोहि सैन्यासहित । निघाला श्रींचें सहाय्य करण्या ।। ३८ ।। हा सुधन्वा नामें महीधर । लहानसा होता साचार । त्याच्या सहाय्याची जरूर । मुळींच नव्हती आचार्यांना ।। ३९ ।। परि सुधन्व्याची भक्ति । आचार्य चरणीं अत्यंत होती । तोहि श्रींची अगाध शक्ति । जाणत होता मनांत ।। ४० ।। परि लुंगेसुंगे देतील त्रास । कर्नाटकीं आचार्यांस । त्या हलकटांचा करण्या नाश । सुधन्वा निघाला स्वमींसवें ।। ४१ ।। आचार्यांनीं शिष्यांहातें । जिंकिलें भैरवभक्तांतें । बंदोबस्त ठेविला तेथें ।

सुधन्व्यानें अत्युत्तम ॥४२॥ म्हणजे जो कोणी वादासी। इच्छील करण्या आचार्यांसी। त्यानें प्रथमतः सुधन्व्यासी। भेटलें पाहिजे येऊन ॥ ४३ ॥ वादापुरतें शहाणपण। त्याच्या ठायीं असल्या जाण। नृप देई गांठ घालून। त्याचीं आचार्यशिष्यांसवें ॥ ४४ ॥ आचार्यशिष्यांनीं त्याचें मत। खंडून टाकावें क्षणांत। सुधन्वा अविद्वानांप्रत। प्रवेश होऊं देईना ॥४५॥ ह्या भैरव कापालिकांचा। राजा उज्जनींत होता साचा। क्रकच ह्या नांवाचा। ख्यात जो या भूमंडळीं ॥ ४६ ॥ जिंकण्या तया क्रकचासी। आचार्य आले उज्जनीसी। आपल्या त्या परिवारेंसी। ते समजते झाले क्रकचाला ॥ ४७ ॥ महंकाल रमला जेथ। ती उज्जयनी माळव्यांत। क्षिप्रेचिया कांठीं सत्य। गादी विक्रमादित्याची ॥ ४८ ॥ ज्या पुरीच्या वैभवाला। कालिदास वर्णिता झाला। इतर कवींनींहि गौरव केला। आहे जया पुरीचा ॥ ४९ ॥ ही उज्जनी क्रकचाची। आहे कर्नाटक प्रांताची। जेथे कापालिक लोकांची। बहुत वस्ती विबुध हो ! ॥ ५० ॥ या उज्जनीची देवता। भैरव होय तत्त्वता। व्यावहारिक अवघी सत्ता। क्रकचाच्या हातीं असे ॥ ५१ ॥ कापालिकानें क्रकचाला। वृत्तान्त अवघा कथन केला। म्हणती स्वामिन् ! एक आला। संन्यासी आपुल्या प्रांतांत ॥ ५२ ॥ तो संन्यासी तरणा ज्वान। तेज त्याचें सूर्यासमान। त्यानें कर्नाटकीं येऊन। धुमाकूळ मांडिला ॥ ५३ ॥ शाक्त, शैव, गाणपत्य। अग्निउपासक भैरवभक्त। त्यानें जिंकिले असती बहुत। करूनिया वाद त्याच्यासवें ॥ ५४ ॥ तो तुम्हांस जिंकावया। आला आहे ये ठायां। कापालिक पंथास या। त्राता कोण तुम्हांविण ? ॥ ५५ ॥ तुम्ही आमुचे नृपनाथ। भैरवाचे परम भक्त। त्या संन्याशाचें थोतांड मत। तुम्हीं वाद करून खंडावें ॥ ५६ ॥ ऐसें तुम्ही न कराल जरी। तरी कापालिक पंथ भूमीवरी। टिकणार नाहीं निर्धारीं। याचा विचार कांहीं करा ॥ ५७ ॥ तो संन्यासी दिसण्यांत। आहे राजा अति शांत। कोणतेंहि असो मत। तो तत्काळ खंडीतसे ॥ ५८ ॥ शिष्य त्याचे त्याच्याचपरी। आहेत मोठे अधिकारी। त्यांनीं कर्नाटक देशाभीतरीं। बहुत कापालिका जिंकिलें ॥ ५९ ॥ म्हणून त्याचा निःपात। तुम्ही करा स्वामी ! येथ। हें विघ्नचि साक्षात्। आहे कापालिक पंथाला ॥ ६० ॥ ऐशा ऐकून त्याच्या बोला। क्रकच मनीं संतापला। शूलकपाल घेऊन भला। निघाला स्वामींस

भेटण्यासी ॥ ६१ ॥ चिताभस्म अंगीं लाविलें । केस मोकळे सोडिले । आपुल्या पाठीवरी भले । लोहकंकण मनगटांत ॥ ६२ ॥ नरकपाल एक्या हातीं । भव्य शूल एक्या हातीं । ककचाची धिप्पाड मूर्ति । येती झाली स्वामींकडे ॥ ६३ ॥ तों जगद्गुरु शिष्यांसहित । बसले चर्चा करीत । तों हा येऊन नाचत नाचत । ककच राहिला पुढें उभा ॥६४॥ आणि म्हणाला स्वामींसी । तूं कां हें ढोंग माजविसी । भस्म लावून भालासी । हें कांहीं बरें नव्हे ॥ ६५ ॥ ज्यांनीं भस्म लावावें । त्यांनीं नरकपाल हातीं घ्यावें । वरच्यावरी पीत जावें । मद्य स्मरून भैरवाला ॥ ६६ ॥ एका भैरवावांचूनी । श्रेष्ठ देव नाहीं कोणी । या तुझ्या अद्वैतांनीं । भैरव संतुष्ट होणें नसे ॥ ६७ ॥ भैरव प्रसन्न होण्यास । सेविलें पाहिजे मद्यास । या भगव्या लक्तरास । तो वश होणें नाहीं कधीं ॥ ६८ ॥ सुधन्वा तें ऐकून । बोलला ककचालागून । हें वेडेवांकडें भाषण । तूं येथें करूं नको ॥ ६९ ॥ वाद निज मताचा । जरी करणें असेल साचा । तरी आपुल्या शास्त्राचा । आधार देऊन बोलावें ॥ ७० ॥ उगीच बोलणें वाह्यात । तूं न करी कदापि येथ । तुझ्यासारख्या मूर्खाप्रत । स्वामी न इच्छिती बोलावया ॥ ७१ ॥ ऐसें बोलून ककचातें । सुधन्व्यानें हांकून दिलें । हा अपमान तयातें । असह्य झाला अतिशय ॥ ७२ ॥ हांकून देतां सुधन्व्यानें । आरक्त नेत्र केले त्यानें । अतिशय क्रोधानें । दांत करकरां खाऊन ॥ ७३ ॥ ककच म्हणे सुधन्व्यासी । तूं न माझ्या बलासी । जाणिलें आपुल्या मानसीं । म्हणून हें बोलतोस ॥ ७४ ॥ मी कापालिकांचा सम्राट् । अवघ्यांमाजीं आहें श्रेष्ठ । त्यांतून भक्त वरिष्ठ । आहें मी भैरवाचा ॥ ७५ ॥ या शस्त्रेकरून । तुमचीं मुंडकीं तोडीन । आणि तीं नेऊन वाहीन । शिरकमलें भैरवाला ॥ ७६ ॥ तुमचें सरलें आयुष्य । म्हणून मला अवमानण्यास । बुद्धि झाली तुम्हांस । हें आतां कळून आलें ॥ ७७ ॥ जवळी ज्याचें आलें मरण । तो कुपथ्य करी आवर्जून । बुडतियाचे पाहा चरण । खोलाकडेच धांव घेती ॥ ७८ ॥ एका घटकेंत फडशा तुमचा । मी करीन येथे साचा । अग्नीचिया शक्तीचा । दुरून अनुभव येणें नसे ॥ ७९ ॥ ऐसें सुधन्व्यासी बोलून । ककच गेला निघून । कापालिक मंडळींस जमवून । त्यांस सांगूं लागला ॥ ८० ॥ हे कापालिक हो ! ऐका मात । तुम्ही भैरवाचे असाल भक्त । आणि माझे

प्रिय छात्र । असाल जरी ऐसें करा ।। ८१ ।। त्या संन्याशाच्या शिष्यानें । म्हणजे सुधन्व्या राजानें । अवमानिलें मजकारणें । आहे त्याचा घ्या सूड ।। ८२ ।। संन्याशासहित सुधन्वा । ठार करून टाकावा । एकहि न जाऊं द्यावा । मनुष्य त्याचा येथून ।। ८३ ।। ऐसें क्रकचवचन ऐकिलें । कापालिक सिद्ध झाले । शूल, बरच्या, ढाली, भाले । आपुल्या करीं घेऊनिया ।। ८४ ।। तनु आपुली प्रत्येकानीं । भूषविली चिताभस्मानीं । मद्य प्राशन करोनी । लढावयासी निघाले ।।८५।। सुधन्व्याच्या सैन्याची । आणि कापालिक लोकांची । लढाई झाली थोर साची । त्या उज्जनीचे जंगलांत ।। ८६ ।। सुधन्वा राजा सैन्यासहित । कापालिकांशीं आहे लढत । हें पाहून धांवत । कापालिक तेथ आले ।। ८७ ।। ते आचार्यांच्या शिष्यांवर । जेव्हां करूं लागले प्रहार । निज शूलाचे साचार । तें अवघे शिष्य भ्याले ।। ८८ ।। त्यांनीं श्रीमत् शंकराचार्यांना । वृत्तान्त अवघा कथन केला । म्हणती स्वामी ! बहुत दिला । कापालिकांनीं आम्हांस त्रास ।। ८९ ।। हे शिस्न धरूनिया हातीं । नग्न थयथया नाचती । मद्य पिऊन ओकिती । समर्था ! आमच्या अंगांवर ।। ९० ।। शूलाचे करिती प्रहार । स्वामी ! आमच्या अंगांवर । या दुःखाचा परिहार । तुम्हां-वांचून कोण करी ? ।। ९१ ।। आचार्य म्हणती शिष्यांप्रत । भिऊं नका रे ! यत्किंचित् । पाहून कोल्हेकुईप्रत । सिंहगजांनीं पळूं नये ।। ९२ ।। एक्याच हुंकारें जगद्गुरूंनीं । कापालिक टाकिले मारूनी । तें क्रकचानें पाहूनी । आपटूं लागला पाय पाहा ।। ९३ ।। कांहीं लढाईंत मेले । कांहीं हुंकारानें भस्म झाले । बाकीचे जे होते उरले । ते दडून बसले सदनांतून ।। ९४ ।। वनीं कोल्ह्यांच्या गर्जना । तोंवरीच होती जाणा । जोंवरी त्या पंचानना । त्यांनीं नाहीं पाहिलें ।। ९५ ।। कापालिक मेले बहुत । हें क्रक-चासी झालें श्रुत । रणांगणींचीं पाहिलीं प्रेतं । जेव्हां त्यानें निज डोळां ।। ९६ ।। कांहीं स्वामींच्या हुंकारें । भस्म झाले असती खरे । तेणें झालें बावरें । चित्त त्या क्रकचाचें ।। ९७ ।। तनु क्रोधें तप्त झाली । स्फुरण पावूं लागली । आरक्तता वरिती झाली । तयाचिया नेत्रद्वया ।। ९८ ।। उष्ण श्वास चाले फार । क्रोधानें स्फुरती अधर । अवघें रूप भयंकर । होतें त्या क्रकचाचें ।। ९९ ।। तो मद्यानें पूरित । नरकपाल हातांत । घेऊनिया आला धांवत । श्रीमत् शंकराचार्यांपुढें ।। १०० ।। आणि मुखानें

गर्जना केली । हे संन्याशा ! तुझीं भरलीं । शंभर वर्षे आज भलीं । सावध राहा आतां तूं ॥ १०१ ॥ तुझा प्रत्यक्ष भैरवाला । बलि आज देतों भला । भोग केलेल्या कर्माला । निमूटपणें आतां तूं ॥ १०२ ॥ ऐसें स्वामींसी बोलून । त्या नरकपालामधून । अर्धे मद्य आपण । पीता झाला ते ठायीं ॥ १०३ ॥ नरकपालीं अर्धे ठेविलें । भैरवाचें स्तवन केलें । तें करतांच प्रकटले । भैरव प्रत्यक्ष ते ठायीं ॥ १०४ ॥ कुळकुळीत काळा वर्ण । होता काजळासमान । अक्राळविक्राळ मुख पूर्ण । होतें त्या भैरवाचें ॥ १०५ ॥ नेत्र खदिरांगारापरी । जीभ लळलळे हृदयावरी । खट्ट खट्ट वरच्यावरी । आवाज होई दाढांचा ॥ १०६ ॥ कटीं करगोटा वासुकीचा । वर्ण पिवळा धमक ज्याचा । हार तो नरमुंडांचा । विराजे भैरवकंठांत ॥ १०७ ॥ कर्णी कुंडलें वासुकीचीं । भैरवाच्या होतीं साचीं । अलंकृत तनु त्याची । होती शुभ्र विभूतीनें ॥ १०८ ॥ भालभागीं सिंदूर । दंडीं मनगटीं विखार । सुशोभित होता कर । शूल शस्त्रें भैरवाच्या ॥ १०९ ॥ पायीं खडावा शोभती । प्रगटली ऐशी भैरवमूर्ति । त्या पाहून पायांवरती । क्रकचें शिर ठेविलें ॥ ११० ॥ आणि म्हणाला देवदेवा ! । हे माझ्या भैरवा ! । या संन्याशाचा घ्यावा । पूर्णपणें तूं समाचार ॥ १११ ॥ यांनीं कापालिक मारिले । सुधन्व्याच्या हस्तें भले । कांहीं येथेंच ठार केले । नुसत्या आपुल्या श्वासानें ॥ ११२ ॥ पंथ तुझा कापालिक । यानें फोल ठरविला देख । झाला आहे अजिंक्य । हा संन्याशी अवघ्या पंथां ॥ ११३ ॥ आमुचा होऊन कैवारी । ठार देवा ! याला करी । ऐशी क्रकचाची वैखरी । ऐकून बोलला भैरव ॥ ११४ ॥ हे क्रकचा ! मूढमते । तूं न जाणिलें संन्याशातें । त्याचा वध माझ्या हातें । नाहीं कदापि होणार ॥ ११५ ॥ हा संन्याशी शंकर । प्रत्यक्ष भगवान् पार्वतीवर । जो व्यापून चराचर । या जगासी राहिला ॥ ११६ ॥ तुझ्या कापालिक पंथांत । आहे मला किंमत । त्या श्रेष्ठ कैलासलोकांत । आम्हांला न कोणी पुसे ॥ ११७ ॥ आम्ही भैरव शिवाचे । आहोंत कीं गण साचे । हे जगद्‌गुरु आमुचे । मालक प्रत्यक्ष असती कीं ॥ ११८ ॥ त्याच आमुच्या मालकासी । तूं द्रोह केलासी । म्हणून प्रायश्चित्त तुसी । देणें आहे भाग मला ॥ ११९ ॥ कोपाग्नि भैरवाचा । भडकला अनावर साचा । त्यानें क्षणांत क्रकचाचा । शिरच्छेद केला असे

॥ १२० ॥ धडापून वेगळें शिर । केलें क्रकचाचें साचार । वाहूं लागलें रुधिर । त्या क्रकचाचे देहांतूनी ॥ १२१ ॥ स्वामी म्हणाले भैरवा !। हा क्रकच तुमचा भक्त बरवा । यांनीं संकटसमयीं तुमचा धांवा । केला हा का अपराध ? ॥ १२२ ॥ तुमच्या हातें मृत्यु आला । या क्रकच भक्ताला । येणेंच तो मुक्त झाला । आतां न येई जन्मास हा ॥१२३॥ भैरव म्हणे स्वामींसी । या कापालिकांनीं मजसी । जपून अघोर मंत्रासी । मंत्रबद्ध केलें असे ॥ १२४ ॥ यांचा आचारविचार । मला न पटे साचार । तें प्रत्यक्ष नरकद्वार । आहे हें मी समजतों ॥ १२५ ॥ आतां इतुकीच विनंती । स्वामी ! माझी तुम्हांप्रती । जे कांहीं राहिले असती। कापालिक तें येथून ॥ १२६ ॥ वितंडवादी वाममार्गी । कापालिक जे जागजागीं । आहेत त्यांना द्यावें वेगीं । प्रायश्चित्त तें गुरुराया ॥१२७॥ त्यांसी प्रायश्चित्त देऊन । शुद्ध घ्यावें करून । द्विजाचारसंपन्न। करूनिया ठेवावें ॥ १२८ ॥ हे शब्द भैरवाचे । कापालिकांनीं ऐकिले साचे । धाबें दणाणलें तयांचें । आचार्ययोग्यता कळली त्यां ॥ १२९ ॥ भैरव पावला अंतर्धान। कापालिक ते आले शरण । दांतीं तृण धरून । श्रीमत् शंकराचार्यांना ॥ १३० ॥ दयाळा ! आजपासून । हा वामाचार दिला सोडून । खरेंखोटें कळलें पूर्ण । वधानें या क्रकचाच्या ॥ १३१ ॥ आतां पूर्ण पस्तावलों । तुमच्या पदां शरण आलों । अवघे आम्ही कृतार्थ झालों । स्वामी तुमच्या दर्शनानें ॥ १३२ ॥ पुढें शंकराचार्यांनीं । पद्म-पादाच्या हस्तांनीं । घेतले शुद्ध करोनी । अवघे ते कापालिक ॥ १३३ ॥ दीक्षा अद्वैतमताची । दिली त्या अवघी साची । तोंच आली नास्तिकांची । टोळी एक ते ठायां ॥ १३४ ॥ शिरोमणि नास्तिकांचा । एक चार्वाक होता साचा । द्वेष्टा वेदविद्येचा । स्वैराचारसंपन्न ॥ १३५ ॥ तो म्हणाला आचार्यांसी । तुम्ही प्रमाण मानितां वेदांसी । लोक नादीं लावण्यासी । हें कांहीं बरें नव्हे ॥ १३६ ॥ वेदाचें तें लिखाण । आहे कादंबरीसमान । त्याचें महत्त्व माजवून । तुम्ही लोकांस फसवूं नका ॥ १३७ ॥ तत्त्वज्ञान वेदांतलें । कल्पनेनें कल्पित भलें । त्याचें तुम्हां वाटलें । श्रेष्ठत्व कां हें कळेना ॥ १३८ ॥ देह आणि आत्म्याचा। भेद आहे चुकीचा । लय जो देहाचा । तोच मोक्ष निःसंशय ॥ १३९ ॥ निराळा मोक्ष जे जे म्हणती । ते ते अवघे मूढमति । एकदां मृत्यु आल्यावरती । जन्म त्यातें नाहीं

पुन्हां ॥ १४० ॥ पाहा सरितेचें तें वारि । मिसळून गेल्या सागरीं । तें न येतें माघारीं । तैसाच हाहि प्रकार ॥ १४१ ॥ देहाचा होणें अंत । हाच मोक्ष साक्षात् । कर्मकांडाचीं खोटीं मतं । नका नका हो ! फैलावूं ॥ १४२ ॥ पाहा कल्पना श्राद्धाची । किती खोटी परमावधीची । काय म्हणे पितरांची । तृप्ति होते श्राद्ध केल्या ॥ १४३ ॥ संकल्पानें अन्न बरवें । जरी पितरांस पोचावें । तरी तळमजल्याचें कां न यावें । संकल्पें अन्न माडीवरी ॥ १४४ ॥ अहो ! स्वर्गमृत्यूंची । कल्पनाच खोटी तुमची । प्रत्यक्ष प्रचीति नाहीं त्यांची । ते हिशोबीं धरूं नका ॥ १४५ ॥ मोक्ष हेंच आहे मरण । आणि सुख हेंच स्वर्ग जाण । नरक हें दुखांलागून । नाम क्रमें प्राप्त झालें ॥ १४६ ॥ स्वर्ग नरक जे कांहीं । तें आहे येच ठायीं । जो मेला तो न येई । पुन्हां कधीं जन्माला ॥ १४७ ॥ म्हणून तुमचीं तीं वेदाचीं । मतें फैलावूं नका साचीं । गोधडी शब्दजलाची । जनतेवर घालूं नका ॥ १४८ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । आचार्य त्यासी बोलते झाले । म्हणती तुझ्याच आहे पडलें । भ्रमपटल बुद्धीवर ॥ १४९ ॥ देह आत्मा एक नाहीं । तो सर्वदा वेगळा पाही । तो मुक्त सर्वदाहि । त्या न लेप कशाचा ॥ १५० ॥ तुझें सारें भाषण । वेदबाह्य म्हणून । त्याचें नुरलें कारण । विचार तो करण्याचा ॥ १५१ ॥ असें जे का श्रुतिसम्मत । त्याचेंच नांव मत । प्रलाप जे कां उन्मत्त । त्याला मत म्हणूं नये ॥ १५२ ॥ मुक्ति मिळे आत्मज्ञानें । हें श्रुति सांगे स्पष्टपणें । तुझें जें का बोलणें । झालें त्यांना आधार ॥ १५३ ॥

'ज्ञानाग्निदग्धकर्माणो यांति ब्रह्म सनातनं ।'

तूं म्हणसी देहान्त । हाच मोक्ष साक्षात । आहे परि अत्यंत । चुकीचे, त्याचा विचार करी ॥ १५४ ॥ स्थूल देह पडला जरी । तरी लिंग-देहाभीतरीं । आत्मा राहून निर्धारीं । स्वर्ग-नरका जातसे ॥ १५५ ॥ केलें असेल जरी पुण्य । तरी जाई स्वर्गाकारण । मिळे पातक्यालागून । नरक तो भोगावया ॥ १५६ ॥ ज्योतिष्टोमादिक वाक्यांचा । तूं पूर्ण विचार करी साचा । आणि जलूका कीटक गतीचा । क्रम आण ध्याना-मध्यें ॥ १५७ ॥ तैसें देहाचें स्थित्यंतर । होत राही वरचेवर । कर्म-मार्गाचें हेंच सार । आहे जाण येणेंपरी ॥ १५८ ॥ प्रेतत्व या मृताचें । नाहींसें व्हावया साचें । कारण आहे श्राद्धाचें । त्याच्या टवाळचा

करूं नको ॥ १५९ ॥ मृताचें प्रेतत्व निरसणें। आणि उत्तम लोकाप्रती जाणें। हें एक श्राद्ध केल्यानें। घडून येतें पाहा कीं ॥ १६० ॥ पितर व्हावया मुक्त। पिंड द्यावा गयेंत। मृताच्या नांवें सत्य। त्या मृताच्या वारसांनीं ॥ १६१ ॥ या आचार्यबोधेंकरून। तो नास्तिक गेला गर्हिवरून। मंतूची क्षमा मागून। श्रींच्या चरणीं लागला ॥ १६२ ॥ चार्वाक मत सोडिलें। अद्वैत मत ग्रहण केलें। ऐसे शिष्य बहुत झाले। आचार्यांचे त्या देशीं ॥१६३॥ क्षपण, जैन, बुद्ध, सौगत। आचार्यांसी वदतां तेथ। होऊन गेले दर्पहत। अद्वैत सिद्धान्त खोडवेना ॥ १६४ ॥ या मतवाद्यांनीं आपुलीं। पूर्वींचीं मतें सोडिलीं। अद्वैत दीक्षा ग्रहण केली। शिष्य होऊन आचार्यांचे ॥ १६५ ॥ कर्नाटक प्रांताला। आचार्यांचा विजय झाला। बावनकसी सुवर्णाला। पितळ कोण म्हणूं शकेल ?॥ १६६ ॥ या क्रकचवधाच्या अध्यायासी। कोणीं वाचिल्या प्रति दिवशीं। भानामतीची भावना त्यासी। नाहीं कधीं होणार ॥ १६७ ॥ त्रास भानामतीचा। भैरव त्याचा हरील साचा। आनंद दुणावेल गृहींचा। भैरवाच्या कृपेनें ॥ १६८ ॥ इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १६९ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय तिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे सर्वाद्या सर्वशक्ति ! । हे विमलकीर्ते प्रतापज्योति ! । तुझ्या कृपेनें सफल होती। मनकामना भक्तांचिया ॥ १ ॥ ऐसें देवा ! आजवर। सांगत आले थोर थोर। या अजाण गणूवर। कृपावर्षाव करावा ॥ २ ॥ असो आचार्य फिरत फिरत। येते झाले शिष्यांसहित। अनुमल्लनामें नगरांत। तों ऐसें घडून आलें ॥ ३ ॥ त्या अनुमल्लनामें पुरींत। मल्लारींचे भक्त बहुत। ज्यांचें ऐसें होतें मत। कीं अवघ्यांत श्रेष्ठ मल्लारि ॥ ४ ॥ ते मल्लारीचे होते भक्त। पोशाख जयांचा होता पीत। भालीं भंडार घवघवीत। कंठीं गेठा पडदळी ॥ ५ ॥ जोडघंटा वाजवती। कोटंबा तो सव्य हातीं। मुखानें ते भजन करिती।

म्हाळसापति शिवाचें ॥ ६ ॥ ते म्हणाले स्वामींना । तुम्ही सांडून मल्लारीला । कां भजतां ब्रह्माला ? । ब्रह्म हा देव नाहीं ॥ ७ ॥ देव एक मल्लारि । जो राहिला जेजुरीं । किंवा कडेपठारीं । वा या अनुमल्लपुरींत ॥ ८ ॥ खंडा कोटंबा मल्लार । हीं चिन्हें निरंतर । धारण करून देहावर । खंडोबाचें भजन करणें ॥ ९ ॥ तें करण्याचें धारण । तुम्हीं दिलेंत सोडून । आणि बसलां लावून । भस्म तें हो ! भालभागा ॥ १० ॥ मल्लारीच्या प्राप्तीस । घेणें नको संन्यास । नका घालवूं आयुष्यास । मल्लारीचे भक्त व्हा हो ! ॥ ११ ॥ हेंच तुम्हां सांगावया । आम्ही आलों ये ठायां । संन्यासमार्गी आपुली काया । उगीच न शिणवावी ॥ १२ ॥ ऐसें त्यांचें भाषण । आचार्यांनीं ऐकून । किंचित् केलें हास्यवदन । पाहून त्यांच्या अज्ञाना ॥ १३ ॥ अहो ! तुमचा मल्लारि । आहे पुरुष अवतारी । त्याची भक्ति केल्या खरी । मोक्ष तो न मिळणार ॥ १४ ॥ वेषभूषणें हीं तुमचीं । वेदबाह्य आहेत साचीं । आज्ञा नाहीं श्रुतीची । कोठेंच हीं सेवावया ॥ १५ ॥ हा तुमचा मल्लारि । आला कोठून सांगा तरी ? । तो आहे साकारी । नाश त्याला निःसंशय ॥ १६ ॥ श्रीसच्चिदानंदाकारण । आकार ना विकार जाण । तो विश्वाचें मूळ पूर्ण । विश्व हा विलास जयाचा ॥ १७ ॥ तत्त्व जें कां अविनाशी । तेंच देव निश्चयेंसी । भजन ज्याचें करण्यासी । वेदऋचा निर्मिल्या ॥ १८ ॥ त्या वेदऋचांकरून । तुम्ही करा त्याचें भजन । शिखासूत्र सांभाळून । अवघ्यांनींच असावें ॥ १९ ॥ वेदमार्गाप्रती फांटा । मिळेल ऐशा न हुडका वाटा । त्या हुडकिल्या तुमचाच तोटा । होणार आहे सर्वस्वीं ॥ २० ॥ सगुण देव अवघे सारे । ब्रह्माचे ते अंश बारे ! । जगा व्यापून जें कां उरे । तोच होय परमात्मा ॥ २१ ॥ अविनाश परमात्म्याची । तुम्ही करा भक्ति साची । साधनें घेऊन सगुणाचीं । निर्गुणातें शोधणें ॥ २२ ॥ मग त्या मल्लारिभक्तांनीं । आचार्यांच्या बोधांनीं । सेविलें अद्वैतालागुनी । गुरु मानून आचार्यां ॥ २३ ॥ पुढे अनुमल्लपुरीच्या पश्चिमेस । मरुंधनामें ग्राम विशेष । होतें, तया ग्रामास । श्रीमत् आचार्य आले कीं ॥ २४ ॥ त्या मरुंधपुरींत । खंडिलें विश्वक्सेनमत । श्रुतिप्रमाणें देऊन सत्य । वैदिकधर्मी वळविले ॥ २५ ॥ त्याच मरुंधग्रामातें । कांहीं मन्मथ भक्त होते । ते म्हणाले आचार्यांतें । मन्मथ

हाच देव खरा ॥ २६ ॥ जो या जगदुत्पत्तीसी । कारण आहे सर्वांशीं । प्रेम जें कां त्याविशीं । तें याच्याचमुळें वाटतसे ॥ २७ ॥ कोणत्याहि सुखा पाहे । मदत हाच कारण आहे । सेव्य याच्यापरी नोहे । देव कोणताहि मानवा ॥ २८ ॥ जगद्गुरूंनीं तें ऐकून । केलें आपुलें हास्य-वदन । सखेदाश्चर्य मुद्रा करून । बोलते झाले मदनभक्तां ॥ २९ ॥ अहो! तुमचा मन्मथशर । षड्रिपूंतील नृपवर । हाच करी बेजार । मोठमोठ्या तापश्यांना ॥ ३० ॥ षड्रिपु न देव होती । ते रिपूच राहती । वेड्या-वांकुड्या पंथीं । नाचवताती मानवांना ॥ ३१ ॥ शिवाय तुमचा मदन । शंकरांनीं केला दहन । अनंग त्यासी करून । ठेविलें जगदुत्पत्तीस्तव ॥ ३२ ॥ जो दुसऱ्याच्यानें जाळिला जातो । तो का सांगा देव होतो ? । जो द्वारीं पहारा करतो । त्यास राजा म्हणतां तुम्ही ॥ ३३ ॥ ऐसें आचार्य बोलतां । अवघ्या त्या मदनभक्तां । अनुताप होऊनि चित्ता । खरें काय तें समजलें ॥ ३४ ॥ त्यांनीं अद्वैत मताची । दीक्षा तत्काळ घेतली साची । शहाण्यापुढें मूर्खाची । किंमत टिकावी कोठवर ? ॥३५॥ पुढें श्रीमत् शंकराचार्यांनीं । उत्तर दिशा लक्षूनी । गमन केलें आदरानीं । आपुल्या त्या शिष्यांसह ॥ ३६ ॥ आले मागधपुरांत । तेथे खंडिलें कुबेर-मत । इंद्रमताची तीच गत । लाविली जगद्गुरूंनीं ॥ ३७ ॥ या दोन्ही मतांच्या लोकां भली । अद्वैत दीक्षा दिधली । धन्य आचार्यमाउली । सुजन सत्पथ संरक्षिते ॥ ३८ ॥ यमप्रस्थालागून । याम्य मताचें खंडन । करून स्वामी दयाघन । प्रयाग क्षेत्रीं पातले ॥ ३९ ॥ श्रोते ! या प्रया-गाचा । अगाध महिमा आहे साचा । येथे वेणीदानाचा । विधि प्रशस्त मानिला असे ॥ ४० ॥ गंगा, यमुना, सरस्वती । जेथें एक होऊनि जाती । ऐशा पवित्र स्थलाप्रती । प्रयाग क्षेत्र म्हणतात ॥ ४१ ॥ या प्रयाग-क्षेत्राला । कांहीं दिवस मुक्काम झाला । श्रीमत् जगद्गुरूंचा भला । मतें खंडण करण्यास ॥ ४२ ॥ येथें अरुणमत, वराहमत । सांख्यमत, कपिल-मत । लोकसंघमत, गुणमत । ऐशा सहा मतांतें ॥ ४३ ॥ श्रुतीचीं देऊनि प्रमाणें । खंडिलें परम चातुर्यानें । या सहा मतांकारणें । अद्वैत दीक्षा देऊनिया ॥ ४४ ॥ पुढें क्षेत्र जें कां वाराणशी । जी पवित्र भारतवर्षी । विश्वेश्वररूपें व्योमकेशी । राहिला जया क्षेत्रांत ॥ ४५ ॥ या क्षेत्र वारा-णशीला । तीन महिने मुक्काम झाला । नाना मतांचा घेतला । येथें

श्रींनीं समाचार ॥ ४६ ॥ कर्ममार्गी लोकांचें । अज्ञान येथेंच हरिलें साचें । कर्म हें साधन मोक्षाचें । नाहीं नाहीं हें ध्यानीं धरा ॥ ४७ ॥ कर्ममार्गें-करून । शुद्ध होतें पाहा मन । यापेक्षां चांगुलपण । मुळीं न राहिलें कर्माला ॥ ४८ ॥ ग्रहदेवतेचे भक्त । याच रीतीं केलें कुंठित । जगद्-गुरूंनीं काशींत । भागीरथीच्या तटातें ॥ ४९ ॥ ग्रह-पितर-देवतांचे । जे जे भक्त होते साचे । खंडण केलें तयांचें । खालील आधार देऊनिया ॥ ५० ॥ 'सूर्यस्तपति यद्भयात्'। ऐसें वाक्य आहे वेदांत । त्याचें रहस्य आणा ध्यानांत । म्हणजे खरें कळेल कीं ॥ ५१ ॥ म्हणून एका ब्रह्माविना । न ये कोणास मोठेपणा । त्याच ब्रह्माची उपासना । मोक्षार्थ केली पाहिजे ॥ ५२ ॥ ऐसें सांगून अवघ्यांप्रत । दीक्षा दिधली अद्वैत । त्या अवघ्यांस आपुले छात्र । करते झाले जगद्गुरु ॥ ५३ ॥ पुढें आचार्य सोडून काशीप्रत । येते झाले गोकर्णांत । मध्यंतरीं मार्गांत । वादले त्यां जिंकूनिया ॥ ५४ ॥ सशिष्य गोकर्णाभीतरीं । आचार्यांची राहिली स्वारी । पार्वतीपतीच्या मंदिरीं । परमानंदेंकरूनिया ॥ ५५ ॥ तेथें हरदत्त म्हणून । एक होता ब्राह्मण । त्याला आचार्यांचें मोठेपण । टोंचूं लागलें कांटच्यासम ॥ ५६ ॥ श्रोते ! जे जे दुष्ट असती । ते ते परोत्कर्षे जळ-फळती । ते सदैव टपले असती । अपमान करण्या श्रेष्ठांचा ॥ ५७ ॥ त्याच न्यायें हरदत्त । जाऊन आपल्या गुरूप्रत । सांगता झाला अवघी मात । शंकराचार्य आल्याची ॥ ५८ ॥ अहो ! श्रीनीलकंठ गुरुवरा ! । तुम्ही ऐका माझी गिरा । संन्याशांचा तांडा खरा । एक आला शिवालयीं ॥ ५९ ॥ गुरुजी ! त्या संन्याशांत । एक बोलका आहे बहुत । जयालागी म्हणतात । श्रीशंकराचार्य म्हणून ॥ ६० ॥ मला वाटते तो तुम्हांसी । आला आहे जिंकण्यासी । वाद विषय हाच त्यासी । मनापासून आवडतसे ॥ ६१ ॥ तुम्ही त्या संन्याशाला । जिंका करून वादाला । गोकर्ण क्षेत्रींच्या लौकिकाला । पाहिजे गुरुवरा ! सांभाळिलें ॥ ६२ ॥ त्या संन्याशानें आजवरी । मंडणासारिखे अधिकारी । जिंकून आपुल्या बरोबरी । दास करून ठेविले ! ॥ ६३ ॥ खंडण हजारों मतांचें । त्यांनीं केलें आहे साचें । म्हणून गुरुवरा ! तयांचें । तुम्ही करा पारिपत्य ॥ ६४ ॥ हा नीलकंठ पंडित । विद्वान होता अत्यंत । यानें पूर्वमीमांसेप्रत । भाष्य केलें होतें कीं ॥ ६५ ॥ नीलकंठ हरदत्ता म्हणे । तूं न मानसीं ऐसें भिणें । तो संन्यासी

आहे शुणें । मजसारिख्या वाघापुढें ॥ ६६ ॥ हे शिष्यवरा ! हरदत्ता ! । तुला माझी योग्यता । ठाउकी असूनी कां रे ! वृथा । ऐसा भितोस मानसीं ? ॥ ६७ ॥ त्या शंकर संन्याशानीं । जरी हजारों टाकिले शोषोनी । समुद्र आपुल्या बलानीं । परि न मला जिंकील तो ॥ ६८ ॥ वा आकाशांतील रवीसी । जरी आणविलें महीसी । तरी न तो जिंकील मशीं । शंकर संन्यासी जाण पां ॥ ६९ ॥ एक वेळ आकाशाला । घालील तो गवसणीला । परि या नीलकंठाला । पाहुनि तो टेकील हात ॥ ७० ॥ अरे ! काजव्याच्या अवघ्या ज्योती । तोंवरीच चमकती । जोंवरी दिनपति । नाहीं प्राचीस उगवला ॥ ७१ ॥ चल त्याच्याकडे जाऊं । आतांच त्याची ताकद पाहूं । त्यासी वाद करून घेऊं । पूर्ण त्याचा समाचार ॥ ७२ ॥ मग त्या नीलकंठ पंडितांनीं । अंगास भस्म लावूनी । रुद्राक्ष धारण करोनी । येणें केलें स्वामींकडे ॥ ७३ ॥ सवें शिष्य हरदत्त । पोथ्या जयाच्या हातांत । आधार दावण्याप्रीत्यर्थ । घेतल्या होत्या बहुसाळ ॥ ७४ ॥ पथामाजीं एक ब्राह्मण । भेटला नीलकंठालागून । म्हणे शिवालयाकारण । तुम्ही आज जाऊं नका ॥ ७५ ॥ तुम्ही शिवाचे आहां भक्त । तो संन्यासी साक्षात् । शिवचि आहे मूर्तिमंत । त्यांसी न झगडावें हेंच बरें ॥ ७६ ॥ अवघ्या विद्या, अवघीं तत्त्वें । ठाउकी त्या संन्याशातें । तो एका क्षणातें । जिंकूनिया टाकील ॥७७॥ हात दावून अवलक्षण । आपुलें न घ्यावें करून । झांकल्या मुठीकारण । किंमत सव्वा लक्षाची ! ॥७८॥ म्हणून मूठ उघडूं नका । महत्त्व आपुलें घालवूं नका । दीप सहजची पडेल फिका । सूर्यासमोर गेल्यावरी ॥७९॥ शिवाय शिवाच्या भक्तानें । शिवासी न वादणें । अनन्य भावें लीन होणें । भक्तानें त्या शिवपदीं ॥ ८० ॥ परी हे नीलकंठ पंडित । मानीना हो यत्किंचित । जवळ ज्याचा मृत्यु येत । त्याला न पटे दिव्य औषधी ॥ ८१ ॥ नीलकंठ आपुल्या शिष्यांसहित । येता झाला मंदिरांत । श्रीशंकराचार्यांप्रत । नाहीं त्यांनीं वंदिलें ॥ ८२ ॥ नीलकंठ आचार्यांसमोरी । बैसला सभेमाझारीं । आणि गर्जना केली खरी । येणें रीतीं तें ऐका ॥ ८३ ॥ मीं पूर्वमीमांसेवरी । भाष्य केलें अतिकुसरीं । या भाष्यामाझारीं । वेदार्थ अवघा कथन केला ॥ ८४ ॥ ' अथातो धर्म-जिज्ञासा ' । याचा ऊहापोह केला खासा । सर्वलोकां समजेलसा ।

श्रीशिवाच्या कृपेनें ॥ ८५ ॥ तें सुरेश्वरांनीं ऐकून । केलें तयासी भाषण। पूर्वपक्ष आपण । करा येथें माझ्यासवें ॥ ८६ ॥ नीलकंठ म्हणे तयांसी । तुमची विद्वत्ता ठाऊक मशीं। जिंकिलें आहे तुम्हांसी । वादांत या संन्याशानें ॥ ८७ ॥ म्हणून आचार्यांबरोबर । मी आहें वाद करणार । तुम्हीं आपल्या आसनीं स्थिर । बसावें कीं हेंच बरें ॥ ८८ ॥ नीलकंठाचें भाषण । आचार्यांनीं ऐकून । येते झाले सहसाहून । त्यासीं वाद करावया ॥ ८९ ॥ नीलकंठ वदे गर्वेसी । उपनिषद् वाक्य जें 'तत्त्वमसि'। याचा अर्थ करावयासी । वाटतें तुम्ही चुकलांत ॥ ९० ॥ जीवेश्वरांचें ऐक्य । पुढें करून हें वाक्य । तुम्ही मानितां नि:शंक । हें सपशेल चुकीचें ॥ ९१ ॥ जीव ईश्वर एक असती । ते पृथक् पृथक् पाहा असती । दिवस आणि रात्र ती । होणें नाहीं एक कदा ॥ ९२ ॥ भिन्न गुणधर्म ईशाचे । तैसेच भिन्न जीवाचे । हे कदा न व्हावयाचे । एके ठिकाणीं स्वामिराया ! ॥ ९३ ॥ आचार्य म्हणाले त्यावर । हें 'तत्त्वमसि' वाक्य थोर । कळलें न तुम्हां साचार । म्हणून ऐसें बोलतसां ॥ ९४ ॥ त्याचा अर्थ सांगतों ऐका । वृथाभिमान धरूं नका । भ्रमामाजीं फसूं नका । निरर्थक विद्यामदानें ॥ ९५ ॥ कार्योपाधि आहे जीव । आणि कारणोपाधि आहे शिव । चिदंशन्यायें एक ठाव । आहे पाहा दोघांचा ॥ ९६ ॥ म्हणजे भागलक्षणें करून । दोघांचें आहे ऐक्य पूर्ण । भेद मानण्याचें प्रयोजन । मुळींच नाहीं ये ठायां ॥ ९७ ॥ जीवशिवांच्या ऐक्याविशीं । जीं जीं प्रमाणें श्रुतीसी । तीं तीं देऊन नीलकंठासी । आचार्यांनीं जिंकिलें ॥ ९८ ॥ तों नीलकंठपंडित । क्षणांत झाला दर्पहत । डोमकावळा न नाचूं शकत । मयूरापुढें केव्हांहि ॥ ९९ ॥ एवंच शंकराचार्यांशीं । शरण आला आदरेंसी । त्या गोकर्णक्षेत्रासी । शिष्यांसहित नीलकंठ ॥ १०० ॥ आपुलें मत सोडिलें । आचार्यांचें ग्रहण केलें । गोकर्ण क्षेत्र अवघें बनलें । अद्वैत मताचे अनुयायी ॥ १०१ ॥ असो अद्वैत प्रचार करण्याप्रती । आचार्य देशोदेशीं फिरती । येते झाले सहजगतीं । सौराष्ट्रदेशीं द्वारकेंत ॥ १०२ ॥ जें का द्वारकापट्टण । वसविता झाला गोपालकृष्ण । जें पश्चिमेचें म्हणून । धाम प्रसिद्ध आहे कीं ॥ १०३ ॥ तेथें पांच प्रकारचे । भेद मानणारे वैष्णव साचे । होते त्यांच्या मताचें । खंडण केलें आचार्यांनीं ॥ १०४ ॥ अभेद

जीवेश्वरांचा । सिद्ध करूनिया साचा । आपुल्या अद्वैत मताचा । फैलाव केला द्वारकेंत ॥ १०५ ॥ वैष्णव, शैव, शाक्त, सौर । या मतांचा समाचार । द्वारकेमाजीं साचार । घेतला जगद्गुरूंनीं ॥ १०६ ॥ म्हणजे चारी मतें खंडित केलीं । श्रुतीचे आधार देऊन भली । जनता सुवाटें लाविली । आचार्यांनीं द्वारकेची ॥ १०७ ॥ तेथून पुढें फिरत फिरत । आचार्य आले उज्जनींत । जेथें महंकाल कालातीत । रमला क्षिप्रातटातें ॥१०८॥ महंकालाचें दर्शन । घेतलें स्तोत्र रचून । आणि सभामंडपीं येऊन । स्वामी बैसले शिष्यांसह ॥ १०९ ॥ आणि म्हणाले पद्मपादा । हा गांव नाहीं साधा । येथें द्वैत मताच्या मकरंदा । भट्टभास्करें लाविलें कीं ॥ ११० ॥ तो लागेल वाढीस । ऊत येईल द्वैतास । आणि उपनिषदाच्या रहस्यास । जनता बाप्पा ! मुकेल कीं ॥ १११ ॥ शिवाय ही उज्जयनी । महंकालाची राजधानी । येथें अद्वैतावांचुनी । दुसरें मत असूं नये ॥ ११२ ॥ म्हणून तूं गांवांत जावें । भट्टभास्करा भेटावें । आणि त्याला ऐसें म्हणावें । कीं सोडी आपुलें कुत्सित मत ॥ ११३ ॥ तें नाहीं कुत्सित मत । ऐसा तुझा सिद्धान्त । असल्यास येई वादाप्रत । आपुला पक्ष मांडावया ॥ ११४ ॥ तुझ्या माझ्या वादांत । सत्य ठरल्या द्वैत मत । मी आपुला अद्वैत पंथ । सोडून द्वैती होईन कीं ॥ ११५ ॥ व अद्वैत खरें ठरल्यावरी । तुला वागणें त्याचपरी । येईल कीं भूमीवरी । सोडून आपुलें द्वैत मत ॥ ११६ ॥ फार बरें म्हणून । पद्मपाद गेला निघून । भट्टभास्कराकडे येऊन । सांगता झाला येणें रीतीं ॥ ११७ ॥ तुम्हीं आपुलें कुत्सित मत । सोडून द्यावें त्वरित । ना तरी या वादाप्रत । खरें खोटें पाहावया ॥ ११८ ॥ अद्वैत मताचे संस्थापिते । बैसले येऊन मंदिरातें । या उज्जयिनी क्षेत्रातें । महंकाल प्रभूच्या ॥ ११९ ॥ तुम्हीं कुत्सित मत सोडावें । ना तरी वादा चलावें । गाफिल कदा न बसावें । खरें खोटें न जाणतां ॥ १२० ॥ भट्टभास्कर म्हणे त्यासी । उगीच ऐशा वल्गनेसी । करूं नको उज्जयिनीसी । हा गांव विद्वानांचा ॥ १२१ ॥ अरे ! माझ्या मतास । खोडील ऐसा नाहीं पुरुष । सांग त्या जाऊन संन्याशास । या नादांत पडूं नको ॥ १२२ ॥ तुझ्याच्यानें माझें मत । होईल न खंडित । उगीच छीःथू गांवांत । करून आपुली घेऊं नको ॥ १२३ ॥ मीं असंख्य पंडित । जिंकिले या उज्जयिनींत । शास्त्रें अवघीं भरतात । माझ्या घरीं पाणी

पाहा ! ॥ १२४ ॥ पद्मपाद म्हणे भास्करा । कांहीं मनीं विचार करा । ऐसा गर्व नाहीं बरा । अति विद्वान् लोकांतें ॥ १२५ ॥ अहो ! दगड फोडण्यांत । एखादा मनुष्य निष्णात । होईल म्हणून, हिऱ्याप्रत । न ये त्याला फोडितां ॥ १२६ ॥ ऐसें भास्करा सांगून । पद्मपाद आला निघून । तों मंदिरीं आले मागाहून । भट्टभास्कर वादासी ॥ १२७ ॥ जीवेश्वरांचा भेद । जो भट्टभास्करें केला सिद्ध । तो छेदिला करून वाद । जगद्‌गुरूंनीं त्याच्यासवें ॥ १२८ ॥ सिद्धान्त भट्टभास्कराचे । आचार्यांनीं खोडिले साचे । आपुल्या अद्वैत मताचें । ग्रहण करविलें तयाला ॥ १२९ ॥ भट्ट-भास्कर शिष्य झाला । सेवून अद्वैत मताला । उज्जयिनींत नाहीं उरला । भेदवादी कोणीहि ॥१३०॥ पुढें आचार्य शिष्यांसहित । निघाले बाल्हीक-देशाप्रत । तेथें अर्हत संज्ञक जैनांप्रत । वाद करून जिंकले ॥ १३१ ॥ भाष्याचा खंडण कर्ता । जो श्रीहर्ष नामें तत्त्वतां । वारद देशांत राहत होता । त्यासी जिंकिलें आचार्यांनीं ॥ १३२ ॥ जे जे वाद करण्या आले । ते ते आचार्यांनीं जिंकिले । तमाचे न चालती चाळे । सूर्यापुढें येतुलेहि ॥ १३३ ॥ असो कामरूप देशांत । आचार्य आले फिरत फिरत । आपुल्या त्या शिष्यांसहित । अद्वैत मत स्थापावया ॥ १३४ ॥ प्रकार जो कां घडला तेथ । तो पुढिलाध्यायीं होईल विदित । श्रेष्ठ विभूति अत्यंत । आचार्य हेच भूमीवरी ॥ १३५ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकरा-चार्यचरित । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १३६ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय एकतिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय पांडुरंगा पांडवप्रिया ! । पंढरीशा परम सदया ! । पुरुषोत्तमा ! तापत्रया । दासगणूच्या निवारी ॥ १ ॥ तूं केशव कलिमलांतक । तूं कंसकेशिकविध्वंसक । कारुण्यसिंधु सुखदायक । तूं सर्वदा निजभक्तां ॥ २ ॥ हे राघवा रामा मुकुंदा ! । हे राधाधरमधुमिलिंदा ! । हे रावणारे गोविंदा ! नको उपेक्षूं गणूसी ॥ ३ ॥ असो त्या कामरूपदेशांत । भानामतीचें प्रस्थ बहुत । जारण-

मारण-उच्चाटणांत । प्राविण्य ज्या देशाचें ॥ ४ ॥ त्या कामरूप देशासी । आचार्य आले पुण्यराशी । दिवाभीताच्या सभेसी । यावा जैसा राजहंस ॥ ५ ॥ तेथें अभिनवगुप्त म्हणून । होता शाक्त एक विद्वान् । ज्यासी होता अभिमान । आपुल्या क्षुद्र विद्येचा ॥ ६ ॥ तो शाक्तमती होता पूर्ण । मांसमद्यांचें सेवन । हीन ज्याचें आचरण । त्याच्या मनांत ऐसें आलें ॥ ७ ॥ अद्वैत मत स्थापण्यासी । हा शंकराचार्य संन्यासी । आला आहे आपुल्या देशीं । त्यास वादांत जिकावें ॥ ८ ॥ ऐसें मानसीं बोलून । शाक्तमताचीं सारीं चिन्हं । देहावरी धारण करून । आला स्वामींकडे ॥९॥ तो अभिनवगुप्त येतां क्षणीं । जिंकिलें त्यास आचार्यांनीं । कोल्हा माजला म्हणूनी । तो कां जड होय सिंहातें ? ॥ १० ॥ श्रोते ! हा अभिनवगुप्त । दीर्घद्वेषी अत्यंत । कपटविद्येंत निष्णात । तो स्वमनीं ऐसें म्हणाला ॥ ११ ॥ अरे ! या संन्याशांनीं । वादांत जिंकिलें मजलागुनी । त्याचा सूड म्हणोनी । घेतलाच पाहिजे येधवां ॥ १२ ॥ तो शंकरा-चार्यांकडे येऊन । करता झाला साष्टांग नमन । म्हणे स्वामी मजलागन । वादांत आपण जिंकिलें ॥ १३ ॥ त्या अर्थी आपुला । हा देह असे झाला । मी निज शाक्त मताला । पूर्ण फांटा दिला असे ॥ १४ ॥ त्या शाक्त मता भलें । जें मीं होतें भाष्य केलें । तें मीं नदींत बुडविलें । आज दिनीं दयाळा ! ॥ १५ ॥ पूर्ण अनुताप मशीं झाला । आपुल्या सोडून पायांना । मी न इच्छीत जायाला । याचना करतों आश्रयाची ॥ १६ ॥ तें आचार्यांनीं ऐकिलें । परि न कांहीं उत्तर दिलें । नुसतें हास्यवदन केलें । पाहून अभिनवगुप्ताला ॥ १७ ॥ पुनःपुनः अभिनवगुप्त । प्रार्थना करी स्वामींप्रत । मला आपुल्या सेवेंत । इतरांपरी राहूं द्यावें ॥ १८ ॥ मग आचार्य वदले तयासी । तूं आपुल्या क्षुद्र मतासी । सोडिलें असल्यास राहण्यासी । येथें न कांहीं हरकत ॥ १९ ॥ अरे ! उपरति झाल्यावरी । एक बाहेरी एक अंतरीं । ऐशी न वदावी वैखरी । तो महादोष असे ॥ २० ॥ सर्व दोष टाकावे । तेव्हांच आम्हांपाशीं राहावें । अद्वैताला मुळीं न भावे । कपटजाल केव्हांहि ॥ २१ ॥ तें पाहून अभिनवगुप्त । चपापलासे मनांत । म्हणे यांनीं माझा हेत । जाणला कीं काय ॥ २२ ॥ किंवा हें सहज गतीनें । झालें यांचें बोलणें । काकतालीय न्यायानें । हें खरें ठरतें जरी ॥ २३ ॥ परी अवसान आणून । 'करता झाला भाषण ।

श्रीशंकराचार्यांलागून । अभिनवगुप्त येणें रीतीं ॥ २४ ॥ आतां आचार्या ! माझ्या ठायीं । दोष कोणताहि उरला नाहीं । गंगेंत मिळाल्या राहत नाहीं । ओहोळजलासी ओहोळपणा ॥ २५ ॥ सूर्यकिरणें पडती जेथ । तमाचा न टिकाव तेथ । आपुल्या पवित्र वातावरणांत । जाईल मनाचा मलिन-पणा ॥ २६ ॥ म्हणून आपल्या सान्निध्याची । दास इच्छा करतो साची । ऐसें बोलून स्वामींची । मिळविली त्यानें अनुज्ञा ॥ २७ ॥ आचार्यांच्या शिष्यांत । राहता झाला अभिनवगुप्त । परी न विसरला यत्किंचित् । आपुल्या त्या दुष्ट स्वभावा ॥ २८ ॥ मंत्रविद्येमाझारीं । अभिनवगुप्त निष्णात भारी । रोज स्मशानाभीतरीं । साधन कराया जातसे ॥ २९ ॥ लिंबें, उडीद, कापूर । काळे काकडे, तीळ, शेंदूर । म्हैसाक्ष, खापर । ऐसें सामान घेऊनिया ॥३०॥ दुष्ट विद्येचें साधन करी । बसून स्मशानीं रात्रभरी । उषःकाल होतां स्नान करी । आचार्यशिष्यांबरोबर ॥ ३१ ॥ मग लावी भस्म भालां । धारण करी रुद्राक्षमाला । पुढें भाष्याच्या पोथीला । ठेवी मात्र नांवासाठीं ॥ ३२ ॥ हें अभिनवगुप्ताचें । ढोंग इतरां न कळलें साचें । पूर्ण झालें तयाचें । आरंभिलेलें अनुष्ठान ॥३३॥ अनुष्ठान पूर्ण होतां । आचार्यांस झाली व्यथा । भगंदर रोगाची तत्त्वता। झालें शरीर त्रस्त तेणें ॥ ३४ ॥ जेथें असे गुदद्वार । तेथेंच हा भगंदर । रोग होतो साचार । असह्य याच्या यातना ॥ ३५ ॥ बसतां न येई क्षणभर । आचार्य एका कुशीवर । निजून राहिले निरंतर । त्या भगंदर रोगामुळें ॥ ३६ ॥ भगंदराची यातना । सोसावयासी असह्य जाणा । परि तो आचार्य योगिराणा । मुळीं न त्या जुमानी ॥ ३७ ॥ आचार्यांच्या व्याधीमुळें । शिष्य चिंताक्रांत सगळे । जखम धुवूं लागले । तोटकाचार्य वरचेवरी ॥ ३८ ॥ आचार्यांची पाहून व्याधि । संतोषला परमावधि । अभिनवगुप्त मनामधीं । त्याच्या आनंदा जोड नसे ॥ ३९ ॥ उगीच इतरांबरोबर । डोळ्यांना तो लावी पदर । परि त्याच्या मुखावर । छटा नसे चिंतेची ॥ ४० ॥ पद्मपाद, हस्तामलक । चित्सुकाचार्य, तोटक । ऐसे शिष्य भाविक । विनविते झाले आचार्यां ॥ ४१ ॥ स्वामिराया ! आपणांला । हा भगंदर रोग झाला । त्याची चिकित्सा करण्याला । वाटे आणवावा वैद्य कोणी ॥ ४२ ॥ आचार्य म्हणती त्यावर । शरीर रोगाचें भांडार । हा रोग जो भगंदर । झाला तो शरीराला ॥ ४३ ॥ हे भोग

शरीराचे । फळ पापपुण्यांचे । त्याच्या मागील जन्माचे । तें न विसरा कदापि ।। ४४ ।। याविषयीं शास्त्रांत । एक वाक्य ऐसें सत्य । तें सांगतों ऐक येथ । 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' ।। ४५ ।। कर्म जेव्हां होईल क्षीण । तेव्हां व्याधि निमेल जाण । तें सरलें नसल्या होईल शीण । मुलांनो ! वैद्य आणल्यास ।। ४६ ।। ऐसें भाषण ऐकिलें । शिष्य एकमेकीं बोलले । हें व्यवहाराचें आणिलें । सोंग सांप्रत आचार्यांनीं ।।४७।। हा रोग पूर्वजन्मींचा । जरी दोष म्हणावा साचा । तरी साक्षात शंकराचा । अवतार असती आचार्य ।। ४८ ।। म्हणून संचित, क्रियमाण। हें कांहीं न यांलागून । बाल्य, तारुण्य, वृद्धपण । हें का ब्रह्मास संभवे ।। ४९ ।। हमेश जो बसून राहत । त्याला भगंदर रोग होत । ऐसें वैद्यशास्त्रांत । लिहिलें म्हणती आहे कोणी ।। ५० ।। बाधा अशी बसण्याची। स्वामीस न व्हावयाची । कां कीं अंगें योगाचीं । ज्ञात असती आचार्यांना ।। ५१ ।। वा देहआत्म्यांचा भिन्नपणा । कैसा आहे हें आपणां । शिकवावयासी जाणा । यांनीं उदाहरण घातिलें ।। ५२ ।। ऐसा आपापसांत । विचार त्यांनीं केला बहुत । परि कशाचा कशाप्रत । मेळ मुळींच पडेना ।। ५३ ।। करून विचार अखेर । बोलते झाले जोडून कर । व्याधीस करण्या उपचार । वाटतें वैद्य आणावा ।। ५४ ।। गुरुराया ! आपणां । जरी न होती यातना । तरी व्याधि पाहून आमुचे मना । धक्के बसती अनावर ।। ५५ ।। चित्त होतें अस्वस्थ । उत्साह न टिके यत्किंचित् । म्हणून आणविण्या वैद्याप्रत । आम्हांस आज्ञा असावी ।। ५६ ।। आग्रह शिष्यांचा पाहुनी । आचार्य बोलले मधुर वचनीं । बरें, आणा वैद्य कोणी। तुम्ही आपुल्या इच्छेस्तव ।। ५७ ।। भोग सरला असेल । तरी गुण येईल । मला नाहीं तळमळ । मुळींच त्या व्याधीची ।। ५८ ।। ऐशी आज्ञा होतां क्षणीं । वैद्य आणविला शिष्यांनीं । नामांकित जो त्रिभुवनीं । प्राणाचार्य हुद्दा जया ।। ५९ ।। तो राजवैद्य नामांकित । राहिला तेथ औषध देत । परि न पडला यत्किंचित् । मागें पाऊल व्याधीचा ।। ६० ।। मग आचार्य म्हणती वैद्यासी । तुम्ही उपाय केले बहुवसी । परि रोजच्यारोज व्याधीसी । येऊं लागला फार जोर ।। ६१ ।। तुमचा उपाय चालेना । व्याधि मागें हटेना । म्हणून वाटतें माझ्या मना । बंद करावी औषधी ।। ६२ ।। मग शिष्याच्या हस्तें जाणा । वैद्याची केली

संभावना । जावयासी निज स्थाना । आज्ञा दिली तयासी ।। ६३ ।। एवंच हजारों त्या स्थानीं । वैद्य गेले येऊनी । आयुर्वेदविशारद कोणी । कोणी वैद्यपंचानन ।। ६४ ।। आयुर्वेदाचार्य कोणी । प्राणाचार्य कोणी कोणी । त्यांची गणति करावी कोणी । कोणी धन्वंतरी दुजा ।। ६५ ।। एके दिनीं अवघे शिष्य । बोलते झाले स्वामींस । आपण आणिल्या मनास । रोग बरा होईल हा ।।६६।। कां कीं गोष्ट कोणतीहि । अशक्यशी आपणां नाहीं । प्राण गेलेला पुन्हां देहीं । तुम्हीं आहे आणविलेला ।। ६७ ।। आपण मनीं आणाल जरी । तरी हा रोग होईल दुरी । कोणाचीहि नाहीं खरी । तुम्हांपुढें प्रतिष्ठा ।।६८।। आपुली व्याधि पाहून । येतें आम्हां गहिं-वरून । कसें करीत असांल सहन । आपण या व्याधीसी ।। ६९ ।। म्हणून स्वामी ! आम्हांकरितां । व्याधि न्या विलया आतां । आम्ही आपणां जोडितों हातां । आमुची विनंती मान्य व्हावी ।।७०।। शिष्यांची काढण्या समजूत । ऐसें करिते झाले तेथ । जे भुवनत्रयाचे सद्गुरुनाथ । तें आतां परियेसा ।। ७१ ।। नवे श्लोक रचून । आळविला पार्वतीरमण । भव-भयांतक मदनदहन । कैलासपति परमात्मा ।। ७२ ।। त्या प्रभूंनीं ऐसें केलें । अश्विनीकुमारा पाठविलें । भगंदराचें करण्या भलें । निदान, जगद्गुरूच्या ।। ७३ ।। ब्राह्मणाच्या वेषें भलें । अश्विनीकुमार तेथें आले । रोग पाहून ऐसें केलें । त्यांनीं त्याचें निदान ।। ७४ ।। शिष्यांस म्हणतो अश्विनीकुमार । हा रोग जो भगंदर । स्वामींस झाला साचार । त्याचें कारण ऐसें असे ।। ७५ ।। जन्मांतरींच्या दोषेंकरून । हें न झालें उत्पन्न । वा कुपथ्यापासून । हें भगंदर झालें नसे ।। ७६ ।। हा एका दुष्टानीं । अभिचार कर्म करोनी । यतिदेहाच्या ठिकाणीं । केला आहे उत्पन्न ।। ७७ ।। तोहि प्रयोग यांच्या देहीं । झाला नसतां अंशेंहि । सदा-चारता जे जे ठायीं । तेथें न जादू चालतसे ।। ७८ ।। स्वामींनीं निज-जननीला । अग्निसंस्कार आहे केला । हा अविधि-दोष घडला । किंचित् त्यांच्या हस्तानें ।। ७९ ।। तोहि दोष स्वामींना । असतां कीं हो ! टाळितां आला । यांची आहे अगाध लीला । हें तुम्हांसी विदित असे ।। ८० ।। या रोगाचें निरसन । न होय औषधीपासून । मंत्रसामर्थ्येंकरून । उलट प्रयोग केल्यावरी ।। ८१ ।। व्याधि अवघी होईल बरी । ती करणाऱ्याच्या शरीरीं । प्रकट होऊनिया खरी । अंत त्याचा करील ।।८२।। ऐसें अवघ्यांस

सांगुनी । जाते झाले तेथुनी । अश्विनीकुमार निज स्थानीं । जे का वैद्य देवांचे ॥ ८३ ॥ अश्विनीकुमार गेल्यावर । शिष्य करती विचार । हे करणारा दुष्ट नर । कोण असावा आपणांमध्यें ? ॥ ८४ ॥ कांहीं तर्क चालेना । मनुष्य उमगून येईना । पद्मपादाचिया मना । तळमळ विशेष लागली ॥ ८५ ॥ तो मंत्रविद्येंत । प्रवीण होता अत्यंत । महामंत्र जो ॐकार सत्य । त्याचा जप आरंभिला ॥ ८६ ॥ तें आचार्य वदले तयासी । हे पद्मपाद ! ज्ञानराशि ! । ऐक माझ्या वचनासी । शुद्ध मानसेंकरून ॥८७॥ कोणी करोत जादूटोणे । त्यांचें उसनें कदा न घेणें । काय दुष्टा-कारणें । साखर बैसे होऊन कडू ? ॥८८॥ उलट वत्सा ! दुष्टावरी । दया करावी सर्वतोपरी । ही पुरुषांची नीति खरी । हिसी फांटा देऊं नको ॥८९॥ ऐसें आचार्यांचें बोलणें । ऐकून पद्मपादानें । कर अति आदरानें । जोडिता झाला आचार्यां ॥९०॥ आणि ऐसें म्हणाला । हें योग्य आहे आपणांला । दुष्टाच्या दुष्टत्वाला । तोंड पाहिजे आम्हीं दिलें ॥ ९१ ॥ स्वामी थोतांड मतापरी । या दुष्ट विद्या भूमिवरी । बुडविल्या पाहिजेत निर्धारीं । कल्याणास्तव जगाच्या ॥ ९२ ॥ तें मी आहें करणार । आपुल्या कृपेनें निरंतर । महामंत्र जो ॐकार । त्याचें अनुष्ठान मांडिलें ॥ ९३ ॥ पद्म-पाद तपा बैसला । अभिनवगुप्त पळून गेला । सोडून शंकराचार्यांना । श्रोते ! आपुल्या गेहातें ॥ ९४ ॥ पद्मपादाचें झालें पूर्ण । आरंभिलेलें अनुष्ठान । त्या जपाचें परि अवसान । येणें रीतीं जाहलें ॥ ९५ ॥ रोग अभिनवगुप्ताला । भगंदर नामें होता झाला । आचार्यदेहीं नाहीं उरला । लेश त्याचा अंशेंहि ॥ ९६ ॥ अभिनवगुप्त बेजार । गेला होऊन असे फार । फाटून गेलें गुदद्वार । त्या भगंदर रोगामुळें ॥ ९७ ॥ त्याच रोगा-माझारीं । अभिनवगुप्ताची अखेरी । झाली असे त्याच्या घरीं । खितपत होता दोन वर्षे ॥ ९८ ॥ क्षणांत आचार्यांचें भलें । भगंदर नाहींसें झालें । ॐकाराचें कळून आलें । महत्त्व साऱ्या लोकांना ॥ ९९ ॥ श्रोते ! हा ॐकार । वेदान्तासी आधार । हा राजराजेश्वर । अवघ्या मंत्रविद्येचा ॥ १०० ॥ आचार्य पूर्ण बरे झाले । दिग्विजय करीत निघाले । गौडदेशीं जिंकिलें । त्यांनीं मुरारमिश्राला ॥ १०१ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ १०२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय बत्तिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे भुवनत्रयसुंदरा ! । हे ॐकाररूपा उदारा ! । देवा ! अभयपाणि धरा । या दासाच्या मस्तकीं ॥ १ ॥ म्हणजे मनींचे मनोरथ । पूर्ण होतील अवघे सत्य । रवि सांठविल्या सदनांत । अंधारास भिणें नको ॥ २ ॥ श्रीमत् शंकराचार्य जगद्गुरु । हे अध्यात्मविद्येचे मेरु । ये भवसागरीं प्रत्यक्ष तारू । दीना तरून जावयास ॥ ३ ॥ ते शिष्यांसहित जान्हवीतीरीं । बसले आनंदाभीतरीं । मंद मंद वाहे खरी । झुळूक वाऱ्याची ते ठायां ॥ ४ ॥ शांत अवघें जान्हवीतीर । नुकता उदेला भास्कर । तैं काय घडला प्रकार । तो ऐका सावचित्तें ॥ ५ ॥ एक वृद्ध ब्राह्मण । रुद्राक्षमाला घेऊन । राहिला पुढें येऊन । श्रीमत् शंकराचार्यांच्या ॥ ६ ॥ नासाग्रदृष्टि मुद्रा शांत । नामस्मरणें अलंकृत । मुख होतें ज्यांचें सत्य । आजानुबाहु जो असे ॥ ७ ॥ तो पुरुष पाहतांक्षणीं । आचार्य आले लोटांगणीं । माथा ठेवून त्यांच्या चरणीं । स्तव अपार मांडिला ॥ ८ ॥ ब्राह्मण वदे आचार्यांसी । ओळखिलें तूं बाप्पा ! मशीं । नाम माझ्या देहासी । गौडपाद ऐसें असे ॥ ९ ॥ तुझ्या गोविंदगुरूंनीं । केली फार वाखाणणी । माझ्यापाशीं येऊनि । तुझ्या वत्स भाष्याची ॥ १० ॥ तें भाष्य पाहण्या भलें । येथवरी मीं येणें केलें । हरकत नसल्या आपुलें । भाष्य दावणें मजप्रती ॥ ११ ॥ ऐसें वचन ऐकतां । आचार्य तोषले आपुल्या चित्ता । अर्भकानें आपुली माता । बहुत दिसांनीं पाहावी जशी ॥ १२ ॥ तैसा आनंद आचार्यांसी । पाहून गौडपादांसी । झाला असे निश्चयेंसी । ज्या आनंदा जोड नसे ॥ १३ ॥ मग वत्स भाष्यासहित । गौडपादां दाविलीं तेथ । भाष्यें आपुलीं समस्त । कांहीं न मागें ठेविलें ॥ १४ ॥ पुढें मांडूक्य उपनिषद् देखा । तैशा गौडपादीय कारिका । त्यांवरील भाष्य जें का । तेंहि आदरें दाविलें ॥१५॥ अवघीं भाष्यें पाहून । गौडपादें तुकविली मान । भाषा तुझी प्रसादपूर्ण । स्तुतीस योग्य आहे कीं ॥ १६ ॥ गोविंदपादें जें कथिलें । तें अक्षरशः खरें ठरलें । वेदविद्येचें निवटिलें । काठिण्य बाप्पा ! तूंच जगीं ॥ १७ ॥ आचार्य वदले त्यावरी । ही आपुली कृपा आहे खरी । ती होईल ज्याच्या-वरी । तो सहज होतो समर्थ ॥ १८ ॥ आपुल्या कृपेचें महिमान । आगळें

आहे सर्वांहून । मुकाहि देईल व्याख्यान । पांगळा लंघी पर्वतातें ।। १९ ।। महापापी होईल पूत । शतमूर्खहि पंडित । आपुला लाधतां वरद हस्त । अजिक्य जो भुवनत्रया ।। २० ।। आपुली कृपा होती झाली । म्हणून हीं मीं भाष्यें लिहिलीं । मीं आहें लेखणी वहिली । गोविंदगुरूंच्या करांतील ।। २१ ।। मग गौडपाद म्हणाले त्यासी । आतां काय इच्छा मानसीं । आहे ती सांग मशीं ? । ती मी साच पुरवीन ।। २२ ।। आचार्य म्हणाले त्यावर । जोडून आपुले दोन्ही कर । ब्रह्मचिंतन निरंतर । मज घडावें स्वामिया ? ।। २३ ।। याविण कशाचीहि । आस माझ्या मनीं नाहीं ' ती पूर्ण होवो लवलाही । सत्कृपेनें आपुल्या ।। २४ ।। तथास्तु ऐसें बोलून । गौडपाद गेले निघून । शिरीं हस्त ठेवून । श्रीशंकराचार्यांच्या ।। २५ ।। असो श्रोते ! ऐके दिवशीं । आचार्य आपुल्या शिष्यांसी । पाठ जान्हवीच्या तटासी । नियमाप्रमाणें देत होते ।। २६ ।। तों तेथें कांहीं लोक । पाठ ऐकण्या आले देख । तों एकापेक्षां एक । पढीक विद्वान होते कीं ।। २७ ।। ते म्हणाले आचार्यांना । तुम्ही काश्मीर देशाला । जाऊन सर्वज्ञ पीठाला । आरोहण करावें ।।२८।। तेथें तुमच्या विद्वत्तेची । खरी परीक्षा होईल साची । ज्या सर्वज्ञ पीठाची । योग्यता मोठी भुवनत्रयीं ।। २९ ।। तुम्ही आचार्य ! आजवर । शब्दसत्तेच्या जोरावर । खंडण केलें साचार । नानाविध पंथांसी ।। ३० ।। हें अवघें शब्दसाहित्य । मुलाम्याचें द्रव्य सत्य । चांदीसमान पितळेप्रत । कांहीं काळ कथिल करी ।। ३१ ।। आजपर्यंत जगतीं भले । जे जे कोणी सर्वज्ञ झाले । ते ते आहेत बसून आले । त्या सर्वज्ञ पीठावरी ।। ३२ ।। तेथें तुमच्या विद्वत्तेस । खरा खरा लागेल कस । कोणालाहि संशयास । जागा न पुढें राहील ।। ३३ ।। ऐसें भाषण ऐकिलें । आचार्य स्तब्धचि झाले । कांहीं न त्यांसी बोलले । किंचित् केलें हास्य मात्र ।। ३४ ।। ते आलेले अवघे जन । नाना पंथांचे होते धुरीण । त्या सर्वांचेंहि मन । शुद्ध नव्हतें आचार्यांविषयीं ।। ३५ ।। त्यांच्या मनीं ऐसें होतें । जाऊन काश्मीर देशातें । आचार्य सर्वज्ञपीठातें । आरोहण करण्या भीतील ।। ३६ ।। म्हणून त्या अवघ्यांनीं । वारणाशीस येऊनी । ही केली विनवणी । काश्मीर देशा जाण्याची ।। ३७ ।। मौन धरिलें आचार्यांनीं । हें त्या पाहून अवघ्यांनीं । थोडा आनंद मानुनी । पुन्हां झाले विचारिते ।। ३८ ।। काय हो आचार्य ! तयारी । आहे का

तुमची खरी । त्या सर्वज्ञ पीठावरी । बसावयाची तें सांगा ॥ ३९ ॥ मग आचार्य वदले त्यावर । तुमच्या सर्वज्ञ पीठावर । बसावयासी मी तयार । आहें, त्याची भीति न मला ॥ ४० ॥ सर्वज्ञपीठा माझें बसणें । न रुचेल तुम्हांकारणें । कां कीं तुमचीं कलुषित मतें । झालीं आहेत मत्सरांनीं ॥ ४१ ॥ मागें मेदिनीपुरांत । सुधन्व्याच्या सभेंत । कुमारिल-भट्टाप्रत । ऐसाच प्रसंग येता झाला ॥ ४२ ॥ जैनबौद्ध पंडितांना । करून शास्त्रवादाला । भट्टपाद जिंकिता झाला । आपुल्या शब्दसामर्थ्यें ॥ ४३ ॥ तें जैनबुद्धां नाहीं पटलें । त्यांनीं भट्टपादा सांगितलें । कांहीं अपूर्व पाहिजे केलें । वेदप्रामाण्य दावावया ॥ ४४ ॥ जाऊन पर्वत कड्यावरी । तुम्हीं उडी घ्यावी खरी । त्या उडीची शरीरीं । तुमच्या न बाधा झाल्यास ॥ ४५ ॥ तुमच्या चारी वेदांचें । श्रेष्ठत्व आम्ही मानूं साचें । हें बोलणें तयांचें । भट्टपादें मान्य केलें ॥ ४६ ॥ उडी घेतली कड्यावरून । हें बौद्धजैनांनीं पाहून । ऐसें केलें भाषण । हा खेळ गारुड्याचा ॥ ४७ ॥ मी सर्वज्ञपीठावर । बसण्यास आहें तयार । परी तें कृत्य झाल्यावर । तुम्हीच ऐसें म्हणाल कीं ॥४८॥ अहो ! सर्वज्ञपीठाप्रत । मक्षिका त्याहि बसतात । तुम्ही बसलां म्हणून त्यांत । विशेष न कांहीं झालें ॥ ४९ ॥ नुसतें शब्दपांडित्य । जे ठायीं वास करीत । तेथें तयां सांपडतात । पळावया त्या पळवाटा ॥ ५० ॥ तुम्ही आम्हांसवें यावें । काय होतें तें पाहावें । कुतर्क कदा न काढावे । उगीच द्वेष वाढविण्या ॥ ५१ ॥ अहो ! हें अद्वैत । खास वेदाचें आहे मत । हें न कोणा शिकवीत । हेवादावा करावया ॥ ५२ ॥ ऐसें ऐकून लोक म्हणती । तुम्ही सर्वज्ञपीठावरती । बैसूनिया आल्यावरती । हें म्हणणें योग्य दिसे ॥ ५३ ॥ असो आचार्य शिष्यांसहित । निघाले काश्मीर देशाप्रत । सर्वज्ञ-पीठावरी खचित । आरोहण करावया ॥ ५४ ॥ ही खबर दूरवर । पोहोंचती झाली साचार । निघते झाले थोर थोर । विद्वान् काश्मिराकारणें ॥ ५५ ॥ श्रोते ! हा काश्मीर । सौंदर्याचें आगर । कोणाच्यानें न होणार । ज्या देशाची बरोबरी ॥ ५६ ॥ आचार्य काश्मिरासी आले । लोकां पुसूं लागले । कोठें आहे सांगा वहिलें । तें सर्वज्ञ शारदापीठ ?॥ ५७ ॥ लोक म्हणती आचार्यांसी । शहराच्या मध्यभागासी । एक्या भव्य इमारतीसी । सर्वज्ञपीठ आहे तें ॥ ५८ ॥ त्या पीठाच्या मंदिरासी । आचार्य आले

अतिहर्षी । शिष्यांसहित पुण्यराशि । शिवावतार प्रत्यक्ष जे ॥ ५९ ॥ हें सर्वज्ञपीठाचें मंदिर । होतें अति सुंदर । प्रत्येक दिशेसी एकेक दार । होतें आंत जाण्याचें ॥ ६० ॥ पूर्वपश्चिमउत्तरेचीं । द्वारें होतीं मोकळीं साचीं । बंद होती दक्षिणेची । वाट मात्र ते ठायां ॥ ६१ ॥ श्रोते ! या दक्षिणद्वारा । द्वारपालाचा होता पहारा । त्यांनीं विरोध केला खरा । द्वार उघडण्या स्वामींसी ॥ ६२ ॥ ते म्हणाले जोडून कर । यतिवर्या ! हें दक्षिण द्वार । उघडण्याचा अधिकार । आहे त्याच पुरुषाला ॥ ६३ ॥ कीं ज्याच्या अंगीं सर्वज्ञता । बाणली आहे सर्वथा । तोच आहे उघडण्याकरितां । योग्य हें द्वार दक्षिणेचें ॥ ६४ ॥ सर्वज्ञतेवांचूनी । येथें येऊं नये कोणी । ऐसें भाषण ऐकूनी । आचार्य त्यांसी बोलले ॥ ६५ ॥ सर्वज्ञपीठाची योग्यता । येते पाहा या सेविता । वेदमान्यशा अद्वैत मता । अज्ञात त्याला कांहीं नसे ॥ ६६ ॥ हें सर्वज्ञपीठाचें दक्षिण द्वार । उघडावयातें साचार । मी आलों आहें येथवर । तुम्ही आम्हां अडवूं नका ॥ ६७ ॥ मग बोलला पहारेकरी । तुम्ही विद्वानांसमोरी । सर्वज्ञपणाची ती खरी । द्यावी आपली परीक्षा ॥ ६८ ॥ वर्तमान तुम्ही आल्याचें । आम्ही कळवूं अवघ्यां साचें । परीक्षा ती घेण्याचें । काम त्यांचें असे कीं ॥६९॥ पंधरा दिवसपर्यंत । तुम्ही राहा स्वामी ! येथ । जमतील तितक्या अवधींत । सारे विद्वान ये ठायीं ॥ ७० ॥ फार बरें म्हणूनिया । आचार्य राहिले ते ठायां । पत्रिका अवघ्यांस लिहूनिया । धाडिल्या द्वारपालानें ॥ ७१ ॥ नेमलेल्या दिवशीं । विद्वान मिळाले बहुवसी । या दक्षिण द्वारापाशीं । काय होतें तें पाहावया ॥ ७२ ॥ कणाद मतवाद्यांनीं आचार्यांना । ऐशा रीतीं प्रश्न केला । तूं सर्वज्ञ आपणांला । जरी म्हणवीत असलासी ॥ ७३ ॥ तरी दोन अणूंपासून । जें द्व्यणुक होतें उत्पन्न । तें होण्याचें कारण । आमुच्या मतें काय आहे ॥ ७४ ॥ तें आम्हांस सांगावें । ना तरी सर्वज्ञपण सोडावें । आणि आपुल्या घरां जावें । निमूटपणें येथूनी ॥ ७५ ॥ ऐसा प्रश्न ऐकिला । आचार्य देती उत्तर त्याला । परमाणुद्वयाच्या द्वित्वाला । द्वित्व संख्या नाम असे ॥ ७६ ॥ म्हणजे द्वयपरमाणूंपासून । जें द्व्यणुक होतें जाण । त्या अणूचें कारण । दोन ही संख्या असे ॥७७॥ ऐसें उत्तर ऐकून । तो कणादमतवादी विद्वान । बैसला निरुत्तर होऊन । खालीं मान घालूनिया ॥ ७८ ॥ पुढें गौतमपक्षी नैयायिक । आचार्यांस

पुसती देख। कणाद गौतमपक्षी फरक। मुक्तिसंबंधीं काय आहे ?॥७९॥ ऐसा प्रश्न ऐकून। आचार्य करिती भाषण। पूर्ण द्यावें अवधान। या माझ्या बोलाकडे ॥ ८० ॥ सर्व गुणांचा होऊन नाश। जैसें कां तें आकाश। ऐशा त्या अवस्थेस। कणाद मुक्ति मानिती ॥ ८१ ॥ गौतम नैयायिकाप्रती। ही कणाद मताची मुक्ति। सर्वांशीं न पटे निश्चितीं। त्यांचें मत ऐसें असे ॥ ८२ ॥ जड धोंड्याचिये ठायीं। गुणांचा प्रभाव आहे पाही। म्हणून म्हणतां येत नाहीं। मुक्त तया धोंड्याचा ॥ ८३ ॥ त्या धोंड्याच्या स्थितीपरी। कणादमताची मुक्ति खरी। आतां नैया-यिकामाझारीं। काय आहे तें ऐका ॥ ८४ ॥ कणाद मतासमान। सर्व गुणांचें नाशन। होऊनिया संविद् जें ज्ञान। तें आनंदासह पाहिजे ॥८५॥ ऐशी जेव्हां होय स्थिति। तेव्हाच त्या स्थितीप्रती। म्हणतां येईल साच मुक्ति। हा नैयायिकांचा सिद्धान्त ॥ ८६ ॥ कणादमता प्राधान्य। आहे सप्तपदार्थांपासून। ऐसें मानिती विद्वान्। त्या कणादमताचे ॥ ८७ ॥ गौतमवाद्यांप्रति। षोडश पदार्थ मान्य असती। निमित्तकारण जगाप्रति। ईश हें मान्य दोघांना ॥ ८८ ॥ या वचनें नैयायिक। निरुत्तर झाला देख। स्वमनीं म्हणे अलौकिक। पुरुष हा खास असे ॥ ८९ ॥ पुढें सांख्य मतानुयायी। आचार्यांस बोलले पाही। जगाकारण प्रकृति ही। स्वतंत्र-रीत्या आहे का ? ॥ ९० ॥ किंवा चैतन्याधिष्ठित। प्रकृति, हें जगत्। उत्पन्न व्हावया सत्य। कारण आहे तें सांगा ॥ ९१ ॥ आचार्य देती उत्तर। त्रिगुणात्मक प्रकृति साचार। हा जगाचा बाजार। भरविती झाली स्वतंत्रपणें ॥ ९२ ॥ ऐसें आहे सांख्यमत। परि वेदान्त्याचा सिद्धान्त। प्रकृति ही अधीन खचित। आहे त्या चैतन्याच्या ॥ ९३ ॥ चैतन्याच्या बलानें। या कर्तृत्ववान् प्रकृतीनें। या जगताकारणें। निर्माण केलें असे कीं ॥ ९४ ॥ वेदबाह्य बौद्धपंडित। पुसती जगद्‌गुरूंप्रत। या दोन प्रकारच्या बाह्यार्थांत। फरक काय तो सांगावा? ॥ ९५ ॥ तैसेंच विज्ञान आणि वेदान्तमतीं। फरक आहे कवण्या रीतीं। तोहि फरक आम्हांप्रति। विशद करून सांगावा ॥ ९६ ॥ मग आचार्य बोलले। सौत्रांतिकांनीं मानिलें। अनुमानगम्य ऐसें भले। बाह्य सर्व पदार्थांना ॥ ९७ ॥ त्यालाच वैभा-षिकमतीं। प्रत्यक्षगम्य मानिती। एवढाच आहे निश्चितीं। फरक त्या दोघांमध्यें ॥ ९८ ॥ बाकी बाह्य पदार्थ सकल। क्षणिक आणि दुःखमूल।

एवढ्यापुरता एक मेळ। आहे त्या दोघांचा ॥ ९९ ॥ विज्ञानवादी ज्ञाना-लागुनी। क्षणिक आहे ऐसें मानी। त्यालाच वेदान्तमतांनीं। अत्यंत स्थिर मानिलें ॥ १०० ॥ हाच मोठा फरक आहे। त्या दोहों मतांमाजीं पाहे!। योगाचार मताचें आहे। म्हणणें तें येणें रीतीं ॥ १०१ ॥ ज्ञानें अनेक आहेत। परि तीं क्षणिक आणि नाशिवंत। हें योगाचार विज्ञानमत। स्पष्टपणें असे कीं ॥१०२॥ वेदान्तमतीं तैसें नाहीं। अनेकत्व येतुलेंहि। त्या ज्ञानास येणें नाहीं। तें आहे एकचि ॥ १०३ ॥ शिवाय तें नाश-रहित। अत्यंत आहे स्थिर सत्य। हाच मोठा फरक येथ। पडतो हें ध्यानीं धरा ॥ १०४ ॥ हें आचार्योत्तर ऐकिलें। योगाचार मति स्तब्ध झाले। माध्यमिक गर्भगळित झाले। तो प्रकार पाहूनिया ॥ १०५ ॥ पुढें जैन आले सरसावून। पुसण्या आचार्यांलागून। ज्याच्या शेवटा-लागून। 'काय' हा शब्द आहे ॥ १०६ ॥ ऐशीं आमुच्या जैन मतीं। तत्त्वें आहेत कोणतीं?। तीं सांगा सत्वरगति। तुम्ही सर्वज्ञ असल्यास ॥ १०७ ॥ मग आचार्य वदले वाचें। ऐका! तुमच्या प्रश्नाचें। उत्तर मी देतों साचें। शांत मनें ये ठायां ॥१०८॥ जिवास्तिकाय, पुद्गलास्ति-काय। धर्मास्तिकाय, अधर्मास्तिकाय। तैसा आकाशास्तिकाय। आहे पाहा पांचवा ॥ १०९ ॥ ऐशी ऐकून आचार्यवाणी। निरुत्तर बैसले होऊनी। जैनपंडित त्या ठिकाणीं। त्यांनीं दुजा प्रश्न केला ॥ ११० ॥ जैमिनीमती पूर्वमीमांसक। जे तेथें होते विद्वान् लोक। ते पुसूं लागले असती देख। श्रीमत् आचार्यांकारणें ॥ १११ ॥ आमुच्या मताभीतरीं। कथिलें कोणत्या प्रकारीं। शब्दस्वरूप निर्धारीं। तें आतां सांगावें ॥ ११२ ॥ म्हणजे शब्दस्वरूप आहे नित्य। किंवा आहे अनित्य। व्यापक वा परिच्छिन्न सत्य। द्रव्य वा गुण सांगावें ॥ ११३ ॥ ऐसें प्रश्न ऐकुनी। आचार्य वदले आपुल्या वदनीं। वर्ण नित्य असूनी। आहेत पाहा व्यापक ॥ ११४ ॥ वर्ण नित्य, शब्द नित्य। व ते जाणतां येतात। श्रोत्रेंद्रियें-करून सत्य। पाहा जगीं प्रत्येका ॥ ११५ ॥ ऐसें उत्तर ऐकिलें। मीमां-सक ते गप्प बसले। कित्येक मतवादी झाले। जागच्या जागीं स्तब्ध पाहा ॥ ११६ ॥ रविप्रकाशाचे पुढती। काजव्याची जी का गति। तीच येती झाली स्थिति। अवघ्या विद्वानांकारणें ॥ ११७ ॥ श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य। प्रत्यक्ष ज्ञानसविता होय। त्यांच्या पुढतीं पाड काय?।

विविध मतांचा श्रोते हो ! ॥ ११८ ॥ ज्या ज्या मताचें खंडण । आचार्यांनीं केलें जाण । त्या त्या मताचे पंडित जन । काश्मीरदेशीं आले होते ॥ ११९ ॥ हेतु त्या सर्वांचा । हाच होता बुध हो ! साचा । मान सर्वज्ञपणाचा । आचार्यांसी मिळूं न द्यावा ॥ १२० ॥ परी तेथें उलट झालें । आचार्यांसी यश आलें । अवघे मतवादी पावले । सोळा आणे फजीत ॥ १२१ ॥ ज्या ज्या मतालागुनी । खंडण केलें आचार्यांनीं । कांहीं सांगतों त्यांतुनी । तुम्हांलागीं ये ठायां ॥ १२२ ॥ शैव, शिवमतैकदेशिक मत । भागवतमत, वैष्णवमत । पंचरात्रमत, वैखानसमत । सौरमत, अग्निवादी ॥ १२३ ॥ कर्महीन वैष्णवमत । कापालिक, हैरण्यमत । महागणपति, शाक्तमत । नवनीत, उच्छिष्ट, हरिद्रा ॥ १२४ ॥ महालक्ष्मीमत, वाग्देवतामत । वामाचारमत, वराहमत । मल्लारिमत, विश्वक्सेनमत । सौगत, जैन, बुद्धादि ॥ १२५ ॥ भैरवमत, भूतवेतालमत । गरुडमत, कर्ममत । ऐशीं मतें असंख्यात । तीं कोठवरी सांगावीं ? ॥ १२६ ॥ या अवघ्या मतांसी खंडिलें । वैदिकमता प्रस्थापिलें । अद्वैतमतानुयायी केलें । बहुतेकांस आचार्यांनीं ॥१२७॥ सर्वज्ञता आचार्यांची । मान्य झाली सर्वां साची । जो तो मनुष्य आचार्यांची । कीर्ति गाऊं लागला ॥ १२८ ॥ ही सभा भरविणारे । काश्मिरी पंडित सारे । गर्जूं लागले जयजयकारें । आचार्यांच्या नांवांनीं ॥ १२९ ॥ हें दक्षिणेकडील द्वार । बंद होतें आजवर । तें जगद्‌गुरूंनीं केलें सर । नांव राखिलें दक्षिणेचें ॥ १३० ॥ व्योमीं विमानें दाटलीं । दिवौकसानें आदरें केली । बुध हो ! पुष्पवृष्टि भली । श्रीमत् शंकराचार्यांवर ॥ १३१ ॥ काश्मिरी पंडितांनीं भले । दक्षिणद्वार मोकळें केलें । जगद्‌गुरु आंत शिरले । अवघ्या देऊन विद्वानां ॥ १३२ ॥ सर्वज्ञपीठासमोर । आले आचार्य गुरुवर । पद्मपादाचा धरून कर । वरती चढूं लागले ॥ १३३ ॥ तों झाली आकाशवाणी । ऐशी तया ठिकाणीं । या सर्वज्ञ पीठालागुनी । चढावयासी ऐसें पाहिजे ॥ १३४ ॥ अंगीं असावी सर्वज्ञता । तैसा सदाचार तत्त्वतां । एखाद्याची कमतरता । येथें असतां कामा नये ॥ १३५ ॥ तुम्ही शिवावतार साक्षात् । सर्वशास्त्रपारंगत । सर्वज्ञतेचा मूर्तिमंत । तूं पुतळा या जगीं ॥ १३६ ॥ तुम्हीं मंडणा जिंकिलें । सर्व मतांचें खंडण केलें । वेदमान्य अद्वैत भलें । स्थापन केलें भूमीवरी ॥ १३७ ॥ तुमच्या सर्वज्ञ-

पणाची । शंका न उरली कोणा साची । कुरकुर कांहीं विद्वानांची । तुमच्याविशीं ऐशी असे ॥ १३८ ॥ सरस्वतीच्या प्रश्नाला । तुम्हीं उत्तर देण्याला । आहे कीं हो ! साज केला । परकायाप्रवेश तो ॥ १३९ ॥ यतिधर्माविरुद्ध तेथे । वर्तन घडलें तुमच्या हातें । म्हणून सर्वज्ञपीठातें । चढण्या तुम्ही योग्य कां ? ॥ १४० ॥ ऐसें विद्वान् कुजबुजती । आपापसांत बोलती । या शंकेची निवृत्ति । सशास्त्र तुम्ही करून ॥ १४१ ॥ मग सर्वज्ञपीठावरी । जाऊन बसावें अत्यादरीं । शंका न उरूं द्यावी खरी । कोणाजीहि ज्ञात्यानें ॥ १४२ ॥ ऐशी आकाशवाणी ऐकून । चकित झाले अवघे जन । आचार्यद्वेष्ट्यांसी समाधान । झालें थोडेसें यायोगें ॥ १४३ ॥ आचार्य वदले त्यावरी । अविधि कृत्यें आजवरी । या यतिदेहानें न केलीं खरीं । तो अत्यंत सोंवळा असे ॥ १४४ ॥ जे का विषय सेविले । अमरुकाच्या देहें भले । दोन्ही देह वेगळे । एकाचा संबंध एका नसे ॥ १४५ ॥

" नास्मिञ्छरीरे कृतकिल्बिषोहं ।
जन्मप्रभृत्यंब ! न संदिहेहम् ॥
विधायि देहान्तरसंश्रयाद्य–।
न तेन लिप्येत हि कर्मणान्यः ॥ "

यतिधर्माविरुद्ध कांहीं । या देहानें केलेंच नाहीं । देहांतराचे ठायीं । जें कांहीं झालें असेल ॥ १४६ ॥ त्या त्या देहा दोष त्याचा । तेथें न संबंध अन्याचा । या शास्त्रसम्मत तत्त्वाचा । विचार करणें विद्वानांनीं ॥ १४७ ॥ भागवतनामे ग्रंथांत । कथिलें, भगवन् गोकुलांत । गाई वांसरें झाला सत्य । गर्व हरण्या विधात्याचा ॥ १४८ ॥ तेथें त्या पशुदेहाचा । संबंध कांहीं न उरला साचा । देह भगवान् कृष्णाचा । निराळाच होता कीं ॥ १४९ ॥ जो पशूच्या कुडींत । तोच कृष्णदेहीं स्थित । देहधर्म न बाधत । धारणकर्त्या तत्त्वाला ॥ १५० ॥ कृष्णदेहामाजीं कर्ता । झाला मनुष्याश्रमीं वागता । पशुदेहामाजीं शिरता । तोच हुंबराया लागतसे ॥ १५१ ॥ म्हणजे हंबरणें वा बोलणें । हीं न कर्त्याचीं लक्षणें । तो कदा देहधर्मीं । दूषित होणें नाहीं कीं ॥ १५२ ॥ भगवान् झाला नरहरि । आयाळ धरिली मानेवरी । म्हणून वामन अवतारीं । काय गुरगुराया लागला ॥ १५३ ॥ त्याचपरी हेंहि आहे । येथें मुळीं फरक नोहे । देहाची

शुद्धता आहे । बसण्या सर्वज्ञ सिंहासनीं ।। १५४ ।। ऐसें ऐकतां उत्तर । लोक आनंदले फार । करूं लागले जयजयकार । आचार्यांच्या नांवानें ।। १५५ ।। पर्जन्यकालीं जलधारा । जैसा वर्षाव करिती खरा । तैशी पुष्पवृष्टि एकसरां । होऊं लागली स्वामींवरी ।। १५६ ।। देव दुंदुभी वाजविती । अप्सरा त्या नृत्य करिती । यक्ष-गंधर्व गायन करिती । आचार्यांच्या सद्‌गुणांचें ।। १५७ ।। पद्मपादाचा धरून कर । त्या सर्वज्ञ-पीठावर । आरूढ झाले गुरुवर । श्रीशंकराचार्य जगद्‌गुरु ।। १५८ ।। तेथें जमलेल्या विद्वानांनीं । पूजिला तो ज्ञानतरणि । सर्वज्ञपीठालागुनी । आचार्यांनीं भूषविलें ।। १५९ ।। सर्वज्ञतेनें याज्ञवल्क्य । पूर्वीं जैसे शोभले देख । तेंच झालें कौतुक । याहि वेळीं विबुध हो ! ।। १६० ।। सर्वज्ञपीठीं बैसून । आचार्य करिती भाषण । अहो ! तुम्ही विद्वद्‌जन । परिसा माझी विनंती ।।१६१।। आपुल्या आर्यावर्ताची । घडी न विस्कळूं द्यावी साची । पायमल्ली वेदाज्ञेची । आपुल्या देशीं होऊं नये ।। १६२ ।। चहूं वेदांसी सम्मत । ऐसें जें कां अद्वैत मत । अवघ्या मतांचें जनक सत्य । हें न विसरा कल्पान्तीं ।। १६३ ।। जैसें सांठवण जगास । आहे एक आकाश । तैसें प्रत्येक मतास । अद्वैत हें सांठवण असे ।। १६४ ।। जैसें एक्या वृक्षा-प्रति । नाना प्रकारें शाखा फुटती । आणि त्याला दिलीं जातीं । नांवें दिशानुरोधानें ।।१६५।। पूर्व, पश्चिम, दक्षिणोत्तर । ऐशा शाखा अपार । झाल्या, तरी आधार । सर्वांस एका मुळाचा ।। १६६ ।। दक्षिणोत्तर भेद पाही । मुळाठायीं मुळींच नाहीं । तैशीच आहे नवलाई । या अद्वैत मताची ।। १६७ ।। त्या अन्य अन्य फांद्यांचा । पोषक रस एकचि साचा । तेविं अवघ्या मतांचा । पोषक रस हा वेद असे ।।१६८।। कोणतेंहि निघो मत । तें आहे वेदांत । वेदोच्छिष्ट अवघें जगत् । येविषयीं शंका नसे ।।१६९।। पात्राचे नाना प्रकार । तैसे निरनिराळे आकार । भिन्न भिन्न साचार । नांवें तीं असलीं जरी ।। १७० ।। तरी त्या पात्राची । मूळ कारण मृत्तिका साची । आकार-नाम-विकारांची । बाधा नसे मृत्तिकेला ।। १७१ ।। मृत्तिकेच्या वांचून । पात्रास न येई पात्रपण । तैसेंच आहे लक्षण । विचार करतां पंथाचें ।। १७२ ।। वेदावांचून कोणतें । नवें न कांहीं काढतां येतें । वारनांव बदलत राहतें । परी सूर्य जशाच्या तसा ।।१७३।। तैशी वैदिक तत्त्वज्ञानाची । स्थिति सूर्यासम साची । नाना पंथ हीं

त्याचीं । आहेत पाहा अपत्यें ।। १७४ ।। हे नवीन पंथ निघालेले । जरी असतील तुम्हां पटले। त्याचें पाहिजे केलें। खोल बुद्धीनें संशोधन ।।१७५।। म्हणजे तुमचेंच तुम्हांप्रत। कळून येईल अवघें सत्य। येथें नाहीं यत्किंचित्। आग्रहाचें काम पाहा ।। १७६ ।। अद्वैतातें सेवावें। निजपंथास रक्षावें। तारतम्यानें आचरावें। विधि ज्याचे त्यांनीं पाहा ।। १७७ ।। परी तें विधीचें पालन। परास नसावें घातक जाण। ही खबरदारी ठेवून। ज्यांनीं त्यांनीं वागावें ।। १७८ ।। आतां ज्या ज्या पंथांत। अविधि अनाचाराप्रत। प्रामुख्यानें असल्या सत्य। स्थान, तो पंथ त्यजावा ।। १७९ ।। सजीव प्राण्याचें बलिदान। मद्यमांसांचें सेवन। जीवात्म्याचा जेणेंकरून। घात होईल ऐशीं कृत्यें ।। १८० ।। असतील ज्या ज्या पंथांत तो तो पंथ टाका त्वरित। जो अनाचार करण्या शिकवीत। तो मुळींच धर्म नसे ।। १८१ ।। देव मानणें भूताखेता। हेंहि अविधि कृत्य तत्त्वतां। जो करण्या शिकवी घातपाता। त्याला धर्म मानूं नये ।। १८२ ।। ऐसें ज्ञान सांगितलें। लोक अवघे आनंदले। सर्वत्रांनीं ठेंगणें केलें। मस्तक आपुलें स्वामीपदीं ।। १८३ ।। कांहीं दिवस काश्मिरांत। आचार्य राहिले आनंदांत। जगालागीं उपदेश करीत। आपुल्या अद्वैत मताचा ।। १८४ ।। तेथून पुढें शृंगेरीसी। येण्या निघाले पुण्यराशि। घेऊन आपुल्या शिष्यांसी। समागमें श्रोते हो ! ।। १८५ ।। इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकरचार्य-चरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ।। १८६ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

## अध्याय तेहतिसावा

।। श्रीगणेशाय नमः ।। हे सर्वाद्या सनातना !। चित्स्वरूपा नारायणा !। कृपासमुद्रा आनंदघना ! । मज पावा रुक्मिणीपते ।। १ ।। तुझ्याविण मोठा कोणी। नाहीं नाहीं या त्रिभुवनीं। तूंच अवघ्यातें कैवल्यदानी। मूळ अससी दयानिधे ! ।। २ ।। जे जे तुला शरण आले। ते त्रिभुवनासी अजिंक्य झाले। दुःखशोकांचें न लागलें। वारें तयाला येतुलेंहि ।। ३ ।। ऐसें तुझें ब्रीद गाजतें। तें सत्य करा हो रुक्मिणीपते ! । दासगण हा

शरण तूंतें। आहे अनन्य भावेंसी ॥ ४ ॥ माझें जें जें दुबळेंपण। तें तुलाचि दूषण। दासगणूला तुजवांचून। नाहीं आधार कोठेंहि ॥ ५ ॥ अद्वैत मताचें खरेंपण। दावण्यासी आरोहण। त्या सर्वज्ञपीठाप्रति जाण। करिते झाले जगद्‌गुरु ॥ ६ ॥ आपुल्या मोठेपणाची। हांव त्यांना नव्हती साची। आचार्य केवळ वैराग्याची। मूर्तीच होते प्रत्यक्ष ॥७॥ काशिमरासी सोडूनिया। दक्षिण दिशा लक्षूनिया। आचार्य निघाले यावया। शृंगेरीमठाकारणें ॥८॥ अयोध्या, मथुरा, वृंदावन। गया, प्रयाग, आनंदवन। ओंकार, उज्जनी, प्रभासपट्टण। सप्तशृंग पंचवटी ॥ ९ ॥ दक्षिणकाशी कोल्हापूर। जें इंदिरापीठ साचार। पंचगंगेचें होय तीर। सर्व सौभाग्यदायक ॥ १० ॥ श्रीशैल्य मल्लिकार्जुन। जें महाक्षेत्र पुरातन। जेथें भगवान् मदनदहन। आनंदें राहिला पर्वतशिरीं ॥ ११ ॥ ऐशीं तीर्थें करीत करीत। तुंगभद्रेच्या तटाप्रत। श्रीमत् जगद्‌गुरु शिष्यांसहित। श्रीशंकाराचार्य आले कीं ॥ १२ ॥ या शृंगेरीपीठास। स्थापिलें सुरेश्वराचार्यास। या मठाचा महिमा विशेष। आहे आचार्यसंप्रदायीं ॥ १३ ॥ एके दिवशीं आचार्यांनीं। शिष्य आपुले जमवुनी। करते झाले मधुरवचनीं। कळकळीचा उपदेश ॥ १४ ॥ हें पीठ शृंगेरी। कशासाठीं भूमीवरी। स्थापिलें याचा अंतरीं। पोक्त विचार करावा ॥ १५ ॥ सर्वमान्य जो वैदिक पंथ। तो सर्वदा चालावा सुरळीत। हाच अंतर्गत आहे हेत। हें पीठ स्थापण्याचा ॥१६॥ वेद पवित्र मानणें। वेदाज्ञा त्या पाळणें। अद्वैतातें सेवणें। जें वेदाचें हृद्‌गत ॥ १७ ॥ तत्त्व अद्वैत मानावें। परी स्वैर वर्तन नसावें। सर्वां समचि लेखावें। ढळूं न देतां तारतम्या ॥ १८॥ व्याख्या समानत्वाची। धूर्तपणें करणें साची। उगीच बालिशपणाची। कल्पना तेथें करूं नये ॥ १९ ॥ मानवा आणि पशूला। समान मानणें हा सिद्धान्त झाला। म्हणून कां त्या दोघांना। खाया गवत घालावें ? ॥ २० ॥ जें ज्या योग्य तें त्या द्यावें। निर्वैर सदा असावें। आपल्यावरून ओळखावें। इतरांतें सर्वदा ॥ २१ ॥ वैदिक मतांत पाखांड। वाढूं न द्यावें यत्किंचित्। वरच्यावरी बोधामृत। आपुल्या समाजा पाजावें ॥ २२ ॥ ज्या बोधें समाजाची। एकी राहील सर्वदा साची। आहे मृत्युलोकाची। एकी, हेंच भूषण ॥ २३ ॥ व्याकरणाच्या सहाय्यानीं। याच वेदांपासुनी। करतां येईल उभारणी। वाटेल त्या

मताची ॥ २४ ॥ म्हणून अवघ्या विद्वानांनीं । व्याकरणाच्या सहाय्यानीं । शब्दछळ करोनी । अद्वैताला तुडवूं नका ॥ २५ ॥ वेदापासून द्वैत मत । व्याकरणाच्या सहाय्यें सत्य । स्थापन केल्या होईल घात । हें केव्हांहि विसरूं नका ॥ २६ ॥ द्वैत निर्माण झालिया । एकी जाईल अवघी लया । परस्परांचा करावया । घात लोक पाहतील कीं ॥ २७ ॥ दुफळी झाल्या समाजांत । अवघेंच व्हाल निर्माल्यवत् । दास्यत्वाची कंठांत । माला तुमच्या पडेल कीं ॥२८॥ अन्य अन्य जातींचें । आहे जें भिन्नपण साचें । तें असावें उपवनाचें । सुगंधित पुष्पापरी ॥ २९ ॥ उगीच जातीचा भिन्नपणा । कलहासी कारण करा ना । तो करतां दैन्यपणा । दोघांनाहि येईल ॥३०॥ एकी राहण्या समाजाची । वेदें अद्वैत मताची । केली आहे योजना साची । तें अद्वैत सेवन करा ॥ ३१ ॥ जरी कांहीं लोकांप्रत । मान्य असल्या पाहा द्वैत । परि अद्वैतमत्यांनी त्याप्रत । हीन कधीं मानूं नये ॥३२॥ जगरहाटी द्वैताविना । आविर्भावास येईना । परि तो जगाचा द्वैतपणा । दांपत्यासम पाहिजे ॥ ३३ ॥ पुरुष आणि प्रकृति । हीं प्रत्येकास मूळ असती । नाना शास्त्रांची उत्पत्ति । झाली याच दोघांमुळे ॥ ३४ ॥ जगदुत्पत्तीचें कारण । वेद गेला सांगून । तें खोडण्यालागून । तुम्ही प्रवृत्त होऊं नका ॥ २५ ॥ मूळ ब्रह्म एक होतें । त्यांनीं निर्मिलें प्रकृतीतें । प्रकृतीनें पंचभूतें । निर्माण केलीं असतीं कीं ॥ ३६ ॥ त्या पंचभूतांपासून । जग हें झालें निर्माण । पंचभूतांचें एकीकरण । तेंच स्वरूप विश्वाचें ॥ ३७ ॥ त्याच पंचभूतांठायीं । जग हें अखेर लीन होई । यांत मुळीं संदेह नाहीं । वेदवाक्य खरें माना ॥ ३८ ॥ जग चालण्या सुरळीत । सन्नीति पाहिजे जागृत । स्वैरवृत्ति वाढतां होत । नाश सान्या सुखाचा ॥ ३९ ॥ ती सन्नीति टिकवण्यास । ज्या ज्या घातिले निर्बंधांस । त्या त्या नियमांच्या समूहास । शास्त्र ऐसें नांव असे ॥ ४० ॥ जग हें एकाच तत्त्वापासून । झालें आहे निर्माण । मग तेथें भिन्नपण । कां असावें जातीचें ? ॥ ४१ ॥ तत्त्वतां भेद नाहीं । तो व्यावहारिक आहे पाहीं । जेंवि उपवनाचें ठायीं । पुष्पतरूंचे प्रकार ॥४२॥ अन्य अन्य फुलांचा । रंग गुण निराळा साचा । परि उत्पत्तीच्या द्रव्याचा । विचार करतां तें एकचि ॥ ४३ ॥ जमीन, हवा आणि पाणी । हें सर्वां समान असूनी । होती यांजपासुनी । विविध धर्माचीं विविध फुलें ॥४४॥

बीजाप्रमाणें फुटे मोड । मोडाप्रमाणें वाढे झाड । फलपुष्पांची होई वाढ । योग्य पोषण झाल्यावरी ॥४५॥ तोच प्रकार जातीचा । वैदिकधर्माठायीं साचा । व्यावहारिक भिन्नतेचा । विचार फारसा करूं नका ॥ ४६ ॥ पाहा बिलोरी कांचेंतून । सूर्याचें तें पडतसे ऊन । रंगीबेरंगी म्हणून । तो का भेद उन्हाचा ॥ ४७ ॥ रंगीबेरंगी जे दिसत । तो कांचेचा धर्म सत्य । मूळाच्या शुद्ध उन्हाप्रत । त्या रंगाचा लेप नसे ॥ ४८ ॥ तैसा जातीचा प्रकार । आहे, याचा न पडो विसर । जातीजातींमध्यें वैर । वाढविणें बरें नव्हे ॥ ४९ ॥ जमीन, पाणी, हवामान । जरी अवघ्यांसी समान । परि वाढ व्हायालागून । प्रकार खताचे निरनिराळे ॥ ५० ॥ विधि जातीजातींचे । जे कां वेदें कथिले साचे । ते प्रकार खताचे । हें केव्हांहि विसरूं नका ॥ ५१ ॥ म्हणजे उंसाचें तें खत । जाईजुईसी घालितां सत्य । वाढीऐवजीं होईल अंत । त्या उभय वेलींचा ॥ ५२ ॥ वर्णाश्रम जें जें म्हणून । या वेदानें केलें कथन । त्या धर्माचें पालन । करणें त्या त्या जातींनीं ॥ ५३ ॥ फांद्यारूप नाना जाती । या धर्मरूप वृक्षाप्रति । या शाखांची शोभा ती । आहे जेवीं वृक्षामुळें ॥ ५४ ॥ म्हणून धर्मरूप खोडाला । अवघे सांभाळून चला । तो सांभाळण्यासाठीं भला । पंथ अद्वैत निर्मिला असे ॥ ५५ ॥ म्हणून या वैदिक पंथांत । कोठें उगवल्या थोतांड मत । तें जाऊन खंडण्याप्रत । आहे मठाची योजना ॥ ५६ ॥ उगीच लोळण्या गादीवरी । हा मठ नाहीं शृंगेरी । वैदिक पंथाची जबाबदारी । या पीठाच्या माथीं असे ॥ ५७ ॥ जैसा भांगोरा भांगेंत । शहाणा माळी वाढूं न देत । त्या भांगोऱ्यासम थोतांड मत । तुम्हीं न वाढूं द्यावें कीं ॥ ५८ ॥ हे वैदिकधर्माचे चार वर्ण । ब्रह्मदेवाच्या मुखासमान । किंवा चारी प्रकारचे पुरुषार्थ म्हणून । जे कथिले तेच हे ॥ ५९ ॥ वा वैदिक आर्यावर्ताप्रति । हे चारी वर्ण धाम असती । हे चारी वर्ण नांदती । जेथे गुण्यागोविंदानें ॥ ६० ॥ बल, कीर्ति आणि धन, । तैसें सुख आणि शहाणपण । चहूं वर्णांची एकी पूर्ण । असल्या येते मुक्कामा ॥ ६१ ॥ या चहूं वर्णांना । एकेक गुण विशेष दिला । आहे, तो मीं तुम्हांला । सांगून ठेवितों थोडक्यांत ॥ ६२ ॥ एक्या जातीस शहाणपण । एक्या जातीस शौर्य जाण । योग्य वस्तूंचें संपादन । एक्या वर्णा नुसतें बळ ॥ ६३ ॥ खरेंखुरें शहाणपण । टिके न वैराग्यावांचून ।

शहाणपणाची वैरी चैन। ती जेथें तेथें न तें ।। ६४ ।। सात्त्विक वृत्तीचें आचरण। असल्या टिके शहाणपण। नाना प्रकारचें संशोधन। होईल त्याच्या हस्तानें ।। ६५ ।। शौर्य तें टिकविण्याप्रत। शक्ति पाहिजे अंगांत। नुसत्या शक्तीनें न भागत। तेथें स्वाभिमान पाहिजे ।। ६६ ।। तो अभिमान आपुल्यापुरता। त्याचा नसावा सर्वथा। समाजसंरक्षणाची चिंता। जागृत पाहिजे त्याच्या मनीं ।। ६७ ।। तैसें संग्रहाचें लक्षण। असावें अवघ्यांकारण। जेवीं तळ्याचें जीवन। अन्य अन्य शेतांसाठीं ।।६८।। संग्रह जलाचा तळ्याठायीं। परि त्याचा त्याला उपयोग नाहीं। नाना पिकांचा बहर पाही। त्या तळ्याच्या जीवावर ।। ६९ ।। तैसें समाजांत असावें। व्यक्तिसामर्थ्या न हपापावें। समाजस्वातंत्र्य टिकवावें। हरतऱ्हेनें आपुलें ।। ७० ।। बल हें ज्या वर्णास दिलें। त्यावरी ओझें लादलें। तिन्ही वर्णांचें तें भलें। याचा विचार पोक्त करा ।। ७१ ।। त्याचा धर्म महीपरी। समजला पाहिजे निर्धारीं। ऐसें चारी वर्ण वागल्यावरी। कल्याण होय सर्वांचें ।। ७२ ।। ज्या वर्णास दिलें ज्ञान। त्याच्या पदरीं दुबळेंपण। बांधिलें हरीनें योजून। याचा विचार पोक्त करा ।। ७३ ।। शौर्य ज्याच्या वांट्यास आलें। तेथें मुक्कामा राहिलें। बुद्धीचें तें मंदत्व भलें। कांहीं अंशीं विबुध हो ! ।। ७४ ।। संग्रह ज्याच्या वांट्यासी। आला आहे त्याच्याच पाशीं। भ्याडपणा तो कांहीं अंशीं। एक्या विशेष कारणास्तव ।। ७५ ।। तनूचें सामर्थ्य। दिलें जया बलासहित। त्याला अपेक्षा सदोदित। राहे पराच्या आश्रयाची ।। ७६ ।। चारी गुणांच्या बरोबर। हे जे ठेविले दोष चार। ते एकमेकांचे कर। एकमेकां हातीं घालावया ।। ७७ ।। ती चारी वर्णांची सांखळी। पाहिजे सर्वांनीं टिकविली। ती होतां वेगळी। अनर्थ होय रोकडा ।। ७८ ।। वेदांनीं पुरुषसूक्तीं भलें। समाजपुरुषाचें वर्णन केलें। तें सदैव पाहिजे आणिलें। प्रत्येकानें ध्यानामध्यें ।। ७९ ।। म्हणजे चारी वर्ण मिळून। एक होय व्यक्ति जाण। ते अवयव मानिल्या भिन्न। नाश पुरुषस्वरूपाचा ।। ८०।। पुरुषसूक्तातें पाहून। वेदद्वेष्टे विद्वान्। ऐसा देतील ठोकून। सिद्धान्त द्वेष वाढवावया ।। ८१ ।। चारी वर्ण स्वरूपा आले। तेव्हां हें स्तोत्र निर्मिलें। ब्राह्मण वर्गानें आपुलें। महत्त्व स्थापन करावया ।। ८२ ।। हा मुद्दा पुढें करून। वेदाचें अपौरुषेयपण। मानावयालागून। संशयित केलें विद्वानां

॥ ८३ ॥ म्हणून या कुकल्पनेनें । कोणी न वेदा पाहणें । तो शब्दब्रह्म मानणें । अपौरुषेय अनादि ॥ ८४ ॥ या शब्दब्रह्मांत । शक्ति आहे पाहा सत्य । तें अनादि अविनाश दावण्याप्रत । ब्रह्म साधकाकारणें ॥ ८५ ॥ त्या मूळ शब्दब्रह्मास दावून । हें शब्दब्रह्म संपे जाण । जैसा राजातें दावून । चोपदार तो स्तब्ध होई ॥८६॥ त्या अविनाश ब्रह्माची । व्हावया ओळख साची । आहे अद्वैत पंथाची । आवश्यकता अत्यंत ॥८७॥ अद्वैताची उपासना । उच्च दर्जाच्या ज्ञानाविना । कोणासहि साधेना । ती अत्यंत कठीण असे ॥ ८८ ॥ ज्यासी कळलें अद्वैत । तो ब्रह्मचि झाला साक्षात् । ईश्वरांत आणि त्यांच्यांत । अणुमात्र न फरक राही ॥ ८९ ॥ अद्वैताचे ठायीं । विधि अविधि दोन्हीं नाहीं । पाप आणि पुण्य तेंहि । मुळीं उत्थान पावेना ॥ ९० ॥ द्वैत निर्मित उपासना । जरी आहेत पाहा नाना । तरी त्या अवघ्यांना । अद्वैत दोन्यांत गोंवावें ॥ ९१ ॥ म्हणजे उपासनेचें भिन्नपण । सर्वांशीं कायम राहून । अद्वैताचें मोठेंपण । तेंच ठायीं टिकणार आहे ॥ ९२ ॥ प्रतीक उपासनेचें । धातूचें वा पाषाणाचें । असतें अन्य अन्य आकाराचें । तशींच नांवें भिन्न भिन्न ॥ ९३ ॥ तो आकार नांवाचा भिन्नपणा । साच ऐसा मानिल्या जाणा । ऊत येईल अभिमाना । द्वेष वाढेल समाजांत ॥ ९४ ॥ एक प्रतीक शिवाचें । एक प्रतीक विष्णूचे । निरनिराळ्या आकार-नांवांचें । केलें जातें विबुध हो ! ॥९५॥ येथें हीच खबरदारी । ठेविली पाहिजे बुध हो ! खरी । आकार, नांव, विकारी । यांत चित्त ठेवूं नये ॥ ९६ ॥ प्रतीक ज्या वस्तूचें । झालें असेल बुध हो ! साचें । म्हणून त्या वस्तूचें । मनन करून नामा पाहा ॥ ९७ ॥ म्हणजे तांब्याचा गजानन । आणि तांब्याचा उमारमण । आणि तांब्याचाच नारायण । जगदंबा, मल्लारि तांब्याचे ॥९८॥ येथें फरक नाहीं तांब्यांत । आहे नामा आणि आकारांत । ऐसा ठाम झाल्या सिद्धान्त । पुढें विचार ऐसा करा ॥ ९९ ॥ जें तांबें झालें शिव । तेंच तांबें केशव । तांब्यानेंच धरिलें नांव । त्या दोन देवांचें ॥ १०० ॥ देवांचा भिन्नपणा । तांब्यास मुळीं शिवला ना । नाम आणि आकारांना । तांबें मुळीं जाणत नसे ॥ १०१ ॥ तैसेंच ब्रह्म निरंजन । सर्व कांहीं आपण । होऊन त्याचें भिन्नपण । शिवूं न देई आपणां ॥ १०२ ॥ भिन्नभिन्न नांवें जरी । प्रतीकासी असलीं तरी । स्तुतिस्तोत्रांची वैखरी । विधि एक्याच प्रकारचे

॥ १०३ ॥ म्हणजे विशिष्ट नांवावांचून। अवघ्यांचा दर्जा समान। पाहा जगन्नाथ हें विशेषण। लागे शिवविष्णूना ॥ १०४ ॥ हें विशेषणाचें वर्म। ध्यानीं धरून सोडा भ्रम। ब्रह्म हाच पुरुषोत्तम। सर्व उपासना तोच कीं ॥ १०५ ॥ म्हणजे विविध उपासना। ब्रह्म हेंच नटलें जाणा। ऐसें वाटून साच मना। अद्वैत सिद्धान्त टिकेल कीं ॥ १०६ ॥ याचा न केल्या विचार। शकलें होतील भराभर। तत्त्व जाऊन वाढेल जोर। उगीच तेथल्या उपाधींचा ॥ १०७ ॥ पाहा शैववैष्णवांमाझारीं। फूट पडून परस्परीं। एकमेकांचे व्हाया वैरी। कारण झाले तें पाहा ॥ १०८ ॥ दगड काळे पांढरे। वादास कारण झाले खरे। तैसेंच पाहा दुसरे। राख आणि कोळसा ॥ १०९ ॥ काळा तरी दगड। पांढरा तरी दगड। रंगभेदामुळें बंड। केवढें माजलें महीठायां ॥ ११० ॥ भस्म आणि कोळशाची। स्थिति याच्याच परी साची। हीं स्थित्यंतरें लांकडाचीं। मुळांत कांहींच भेद नसे ॥ १११ ॥ म्हणून विचार अद्वैताचा। प्रत्येक ठिकाणीं करणें साचा। हाच दंडक वेदाचा। तो केव्हांहि न अवमानणें ॥ ११२ ॥ कोणतेंहि औपासन। सेविल्या अद्वैतावांचून। तोच कलहासी कारण। होईल पुढल्या पिढीतें ॥ ११३ ॥ जो तो आपुली उपासना। सर्वमान्य ठरविण्या जाणा। नाना ग्रंथांच्या त्या रचना। कर्ता पुरुष करील ॥ ११४ ॥ आणि आपुल्या मतासीं सम्मत। ऐशा कथा घालील त्यांत। कांहीं स्वकपोलकल्पित। हें ध्यानांत असूं द्या ॥ ११५ ॥ उपासना ऐशा रीतीं। ज्या ज्या निर्माण केल्या जाती। त्या त्या उपासनेचे निश्चितीं। ग्रंथहि होतील अपार ॥ ११६ ॥ त्या उपासनात्मक ग्रंथांचें। ध्येय हेंच ठरवावयाचें। उणें तेवढें परपंथाचें। सांगणें आपुल्या ग्रंथांत ॥ ११७ ॥ या ऐशा पुराणेंकरून सत्य। भाव वाढेल थोडाबहुत। परी नुकसान अतोनात। होणार आहे समाजाचें ॥ ११८ ॥ महत्त्व ज्या ज्या उपासनेचें। पुराणाच्या आधारानें। ठरविलें जाईल साचें। ती वेदबाह्य समजावी ॥ ११९ ॥ व्यावहारिक नीतिपुरती। माना पुराणांची महती। वा मागल्याची कळण्या कृति। पाहिलें पाहिजे पुराणांत ॥ १२० ॥ या श्रुतिसिद्धान्तांप्रत। ज्या पुराणांच्या कथांत। बाध नसेल यत्किंचित्। त्याहि तारतम्यें मानाव्या ॥ १२१ ॥ प्रामाण्य दावण्या वेदाचें। उदाहरण तें पुराणाचें। केव्हांहि न द्यावें साचें। खऱ्या खऱ्या विद्वानांनीं

॥ १२२ ॥ या पुराणपद्धतीला । वेळींच नाहीं घातला । आळा, तरी घात झाला । समजा शेवटीं समाजाचा ॥ १२३ ॥ करणें असल्या संरक्षण । फळ पिकाचें काननामधून । तरी गांविच्या पोळालागून । बांधून ठेवा दोरीनें ॥ १२४ ॥ पोळा न लाविल्या दोरी । तो पिकें नाशील खरीं । तैशींच पुराणें भूमीवरी । तत्त्वपिका नासतील ॥१२५॥ म्हणून प्रत्येक विद्वानाचें । काम आहे हेंच साचें । वेदबाह्य पंथाचें । प्रसरण होऊं देऊं नका ॥ १२६ ॥ हें करण्याची जबाबदारी । आहे आचार्यपीठावरी । त्यांनीं फिरून जगभरी । शोध याचा करावा ॥१२७॥ भरमसाट पुराणें । ऐशीं न कोठें होऊं देणें । त्यांची वाढ झाल्यानें । श्रुतीस येईल कमीपणा ॥ १२८ ॥ महत्त्व वाढेल पुराणांचें । तुकडे पडतील समाजाचे । लोक एकाच जातीचे । वैरी होतील एकमेकां ॥ १२९ ॥ समाज झाल्या दुर्बल । परकीयांसी फावेल । हे सर्वांचाच करतील । पाटावरवंटा* ध्यानीं धरा ॥ १३० ॥ आतां उपासनेचा । एक फायदा आहे साचा । जेथें मानवी बुद्धीचा । कांहीं न होईल उपयोग ॥ १३१ ॥ ऐशा संकटांपासून । उपासनेनें संरक्षण । घेतां येईल करून । कैशा रीतीं तें ऐका ॥ १३२ ॥ पाहा प्रल्हाद भक्तासी । मानवी यत्न मारण्यासी । तयार झाले सर्वांशीं । अवघेच फिरले त्याच्यावर ॥१३३॥ कयाधू जी प्रत्यक्ष जननी । तिनें पतीच्या आज्ञेनीं । पोटच्या मुलालागुनी । प्राणघातक विष दिलें ॥ १३४ ॥ हिरण्यकश्यपू प्रत्यक्ष पिता । तोच झाला लोटितां । त्या वैष्णवाग्रणि प्रल्हादभक्ता । पर्वताच्या कड्यावरून ॥ १३५ ॥ तेथें त्याचें संरक्षण । उपासनेनें झालें जाण । प्रकट झाले नारायण । दारुकामय स्तंभांतुनी ॥ १३६ ॥ या कथेचें पाहतां सार । हेंच आहे साचार । उपासनेचा कैसा जोर । तो स्वानुभवें कळून आला ॥ १३७ ॥ आणि ईश्वराची व्याप्ति । जगीं आहे कवण्या रीतीं । हेंहि दाविलें निश्चितीं । याच कथेनें सर्वदा ॥ १३८ ॥ उपासक म्हणेल जेथ जेथ । भगवंत प्रकटेल तेथ तेथ । पाहा दारुकामय स्तंभांत । लक्ष्मीकान्त प्रकटला ॥ १३९ ॥ हें जें प्रल्हादास्तव झालें । तें उपासनेनें आहे केलें । येथें आधींच होतें मानिलें । प्रल्हादानें अद्वैता ॥ १४० ॥ तो हिरण्यकश्यपूस म्हणाला । बाबा ! माझा भगवंत भरला । या अखिल ब्रह्मांडाला ।

* ह्याचा उपयोग म्हणीसारखा येथें केला आहे. (पाटावरवंटा म्हणजे वाटोळे)

तुमच्या माझ्यांत तोच असे ॥१४१॥ म्हणून माझें संरक्षण । सर्व ठिकाणीं झालें जाण । कां कीं माझ्या देवाहून । अन्य पदार्थच कांहीं नसे ॥१४२॥ ऐशा प्रकारें अद्वैतभक्ति । पूर्ण ठसेल ज्याचे चित्तीं । त्याच्याच ऐशा गोष्टी होती । तो न अधिकार इतरांचा ॥१४३॥ या सगुण उपासनेंत । एक वर्म आहे सत्य । तें करितों विशद येथ । थोडक्यामधें तें ऐका ॥१४४॥ उपासनेची पूर्तता । जोंवरी न झाली तत्त्वतां । विधिनिषेधातें मानितां । उपासक पाहिजे तोंवरी ॥ १४५ ॥ जेव्हां तें उपास्य आपुलें । जगत्रयीं या भरून उरलें । तें स्वानुभवानें समजलें । पाहिजे कीं त्याच्या चित्तीं ॥ १४६ ॥ हें ज्या दिवशीं कळून आलें । तेथून त्या नाहीं उरलें । विधिनिषेधाचें काम भलें । तें तत्त्व विसरूं नका ॥ १४७ ॥ उपासनेचा भिन्नपणा । हा व्यावहारिक आहे जाणा । तो खरा मानून कमीपणा । आणूं नका तत्त्वातें ॥ १४८ ॥ पाहा एक्या गल्लींत । घरें असती असंख्यात । त्या सर्वांच्या सामानांत । फरक नसे येतुलाहि ॥ १४९ ॥ दगड, लांकूड, चुना, माती । हीं सर्व ठिकाणीं दृष्टीं पडती । परी आकाराची तऱ्हा ती । सर्वांठायीं भिन्नभिन्न ॥ १५० ॥ घरांचे भिन्न आकार । तेंवि वागणुकीचे प्रकार । भिन्नभिन्नचि राहणार । मर्जीनुरूप मालकाच्या ॥ १५१ ॥ तेथें एक-मेकांच्या शेजारीं । एकमेकांनीं बनल्या वैरी । वेडींवांकुडीं कांहीं तरी । विधानें तीं पुढें करून ॥ १५२ ॥ एक म्हणे एकाला । तुम्ही माझ्या शेजाराला । असून कां हो ! आम्हांला । येऊं न देतां तुमच्या घरीं ॥ १५३ ॥ आपण एका गल्लीचे । राहणार आहोंत साचें । म्हणून अजा-दुजाचे । प्रकार नसावे आपणांतें ॥ १५४ ॥ तुम्ही भस्म लावितां । स्नान करून बोडकें येतां । ही तुमची अशुभता । आम्हांसी जाचक होईल ॥ १५५ ॥ म्हणून तें सोडावें । आमुच्या सारखें वागावें । तुमच्या गृहांत येऊं द्यावें । सर्व गल्लीच्या माणसां ॥१५६॥ ऐसा गल्लीच्या लोकांनीं । अभिमान तो धरल्या मनीं । एकोपा जाईल निघूनी । रिवाजाच्या भिन्न-तेनें ॥ १५७ ॥ ती रिवाजाची भिन्नता । या गल्लीमाजीं बळावतां । एकमेकांच्या करण्या घाता । एकमेक टपतील ॥ १५८ ॥ ऐशा स्थितींत सावधपणें । वागावें कीं प्रत्येकानें । गल्लीकडे लक्ष देणें । हित साधण्या अवघ्यांचें ॥ १५९ ॥ तेथें ऐसा विचार । करावा कीं निरंतर । एका गल्लीचीं अवघीं घरं । परि आकार निराळे ॥ १६० ॥ आकारानुरूप

विधिरिवाज । निरनिराळे झाले सहज । जेवीं कोल्हापुरी साज । भिन्न आकारें बनला असे ॥ १६१ ॥ तेविं गल्लीची आहे स्थिति । विषमता ती घरापुरती । योग्य ठरेल निश्चितीं । त्या गल्लीतें भूषवावया ॥१६२॥ घरापुरती भिन्नता । क्षम्य आहे सर्वथा । व्यक्तिस्वातंत्र्य टिकवण्या-करितां । त्या त्या घरवाल्याचें ॥ १६३ ॥ रिवाज, आकारें कमीपणा । गल्लीप्रति येईना । गल्लीचा तो मोठेपणा । आहे व्यापक दृष्टींत ॥१६४॥ तैसें या अद्वैत गल्लींत । घरें हीं नानापंथ । गल्लीप्रति न बाधूं शकत । मतभिन्नता पंथाची ॥ १६५ ॥ जमीन एक, आकाश एक । सर्व गृहाचें साहित्य एक । थोडाबहुत आहे फरक । गृहाच्या रचनेमधें ॥ १६६ ॥ आकाराकडे पाहूं नका । मदत करून एकमेकां । गल्लीचा तो सदैव राखा। मोठेपणा तो विबुध हो ! ॥ १६७ ॥ व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे घर । समा-जस्वातंत्र्याचा भर । आहे त्या गल्लीवर । हें केव्हांहि विसरूं नका ॥ १६८ ॥ कोणी कोणाच्या घरांत । शिरून त्याचे इच्छेप्रत । विरोध न करा खचित। तेथें वागा त्याच्या परी ॥१६९॥ परि सार्वजनिक ठिकाणीं। सर्वां सारख्या हक्कांनीं । वागतां यावें म्हणूनी । घरचा विचार तेथें नको ॥ १७० ॥ रस्ता, पर्वत, सरिता, रान । हें सर्वांशीं समसमान। तेथें न करा अधिक न्यून । भ्रामक कल्पना काढुनी ॥ १७१ ॥ वेदाज्ञेचें उल्लंघन । कोणीहि न करावें जाण । वर्णाश्रमालागून । उणेपणा आणूं नका ॥ १७२ ॥ वर्णांत संकर केल्या खरा । होईल अवघ्यांचा मातेरा । या वर्णाचा विचार करा । बाराखडीच्या समान ॥ १७३ ॥ व्यंजनें आणि स्वर । हे अद्वैताच्या तत्त्वावर । काढिले असती साचार । आपुल्या पूर्वा-चार्यांनीं ॥ १७४ ॥ अक्षर घ्या कोणतेंहि । तें रेघेवांचून होणें नाहीं । पाहतां रेघेस या ठायीं । मूळचा भेद कांहीं नसे ॥१७५॥ रेघरूपी जना-र्दन । अवघ्यां अक्षरांकारण । रेघ आकारापासून । आहे मूळचि अलिप्त ॥ १७६ ॥ रेघ आकारा बनविते । परि आकारीं न सामील होते । पाहा क ख या अक्षरांतें । म्हणजे येईल कळून ॥ १७७ ॥ अक्षरांचे आकार । आणि त्यांचे उच्चार । त्यांचे विविध प्रकार । आहेत हें ख्यात जगीं ॥ १७८ ॥ आकार दावी अक्षर । आणि स्थान दावी त्याचे स्वर । येथें हा जो भिन्न प्रकार । तें भाषेचें मूळ पाहा ॥ १७९ ॥ भिन्न भिन्न आकारांचीं । भिन्न भिन्न उच्चारांचीं । हीं अक्षरें आहेत साचीं ।

म्हणून बोलतां येत असे ॥ १८० ॥ बोलतां येण्यासाठीं भला । हा अक्षरभेद निर्मिला । या जाणून तत्त्वाला । पाहा वर्णाश्रमाकडे ॥ १८१ ॥ समजा क, र, चे भांडण । गेलें सुरू होऊन । र म्हणे मी तुझ्यासमान । होऊन बसेन तुझ्याजवळीं ॥ १८२ ॥ तरी कर या शब्दाची । सिद्धि न कधीं व्हावयाची । र ने भूमिका क चीं । घेतल्या विबुध ! ते ठायां ॥ १८३ ॥ अथवा र, साठीं आपुला । क, ने आकार बदलला । आणि त्याच्यासम राहिला । होऊन र, च्या शेजारीं ॥ १८४ ॥ तरी न झाला उपयोग कांहीं । शब्दाची न सिद्धि होई । भिन्नत्व आहे शब्दांठायीं । हेंच योग्य ठरेल कीं ॥ १८५ ॥ एवंच व्यवहारामाझारीं । द्वैत प्रधान निर्धारीं । द्वैताविण न चाले खरी । जगत्रयाची राहाटी पाहा ॥१८६॥ द्वैत हें कलेवर । अद्वैतसिद्धान्त प्राण थोर । हे पृथक् झाल्या साचार । एकमेकांपासुनी ॥ १८७ ॥ दोघांनाहि किंमत । व्यवहारीं न यत्किंचित् । देह जो कां असूंरहित । तें प्रेत होय साच कीं ॥ १८८ ॥ तेंवि देहावांचून । न कळे प्राणाचें मोठेंपण । एवंच जड आणि चेतन । यांचा संगम तेंच जग ॥ १८९ ॥ जेव्हां मंत्रशास्त्रापासून । कांहीं साधणें असेल जाण । तेव्हां आहे प्रयोजन । या सोंवळ्याओंवळ्यांचें ॥ १९० ॥ स्पृशास्पृश्य सोंवळें ओंवळें । हें विशिष्ट हेतूस्तव आहे झालें । म्हणून तें मानिलें । पाहिजे कीं प्रत्येकानीं ॥१९१॥ सोंवळें ओंवळें स्पृशास्पृश्य । याचा समूळ केल्या नाश । डोकें मंत्रशास्त्रास । काढतां न येई पुढें पाहा ॥ १९२ ॥ ईश्वरें प्रत्येक गोष्टीस । एक गुण एक दोष । ठेविला आहे खास । याचा विचार पोक्त करा ॥ १९३ ॥ पदार्थांचे गुण घ्यावे । दोष अवघे वगळावे । अद्वैतमतीं असावें । स्थिर प्रत्येक जणानें ॥ १९४ ॥ आकाशाचिये ठायीं । अवघें सामावती पाही । आकाशाला मात्र नाहीं । जागा कोठेंच सामावण्या ॥१९५॥ आकाशासम अद्वैत । तत्त्व आहे मलरहित । अवघे पंथ ह्याच एकांत । सामावले जाती पाहा ॥ १९६ ॥ म्हणून या अद्वैत मता । सेवणें तुम्ही सर्वथा । आणि तेंच करण्याकरितां । आहे मठाची योजना ॥ १९७ ॥ श्रीशारदा अंबेचें पूजन । म्हणजे अवघ्या ग्रंथांचें अध्ययन । केलें पाहिजे आवर्जून । सर्वज्ञता संपादण्या ॥ १९८ ॥ ग्रंथ कोणत्याहि मताचे । असोत ते शारदेचे । पुत्र तुम्ही माना साचे । त्यांचें अध्ययन

करावया ॥ १९९ ॥ द्वैतशास्त्राचे सिद्धान्त । प्रथम विरोधी भासतात । तेच पुढे होतात । विचारानें अद्वैती ॥ २०० ॥ म्हणून अवध्या मतांसी । बाध न आणितां अद्वैतासी । सेवणें कीं अहर्निशीं । विचारवंत पुरुषानें ॥ २०१ ॥ या आचार्यपीठास । प्रथम घेऊन संन्यास । करण्या धर्मरक्षणास । आरोहण करावें ॥ २०२ ॥ संन्यासानें निस्पृहता । तुमची टिकेल सर्वथा । समाजास पाहिजे नेता । निरिच्छ आणि विद्वान् ॥ २०३ ॥ विधि आचार्य पीठाचे । अवघ्यांलागी सांगेन साचे । अवांतर मठ स्थापनेचे । कार्य घेतलें त्यांनीं हातीं ॥ २०४ ॥ त्या चारी मठांची हकीकत । पुढील्याध्यायीं होईल विदित । श्रीशंकराचार्य साक्षात् । अवतार प्रत्यक्ष शिवाचे ॥ २०५ ॥ इति श्रीदासगुणविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ २०६ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय चौतिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय भक्तवरदा पंढरिराया ! । हे संतसज्जनविसाविया ! । जयजयाजी करुणालया ! । रुक्मिणीपते ! पाहि मां ॥ १ ॥ जग सुखी करावयासी । आपण आलांत पंढरीसी । याचा विसर मानसीं । पडला वाटे अलीकडे ॥ २ ॥ तुम्ही डोळे मिटून बसलां । कानांत घालून तुळशीला । हें करणें आपुल्या शीला । नाहीं शोभत दीनबंधो ! ॥ ३ ॥ तुम्ही ऐसें बसल्यावरी । आमुचा कोण कैवारी । होईल या भूमीवरी । सांग सांग जगदात्मया ! ॥ ४ ॥ तुम्हीं डोळे झांकिले । म्हणून अनीतीस फावलें । तिनें अवघें व्यापिलें । या पुनीत क्षेत्राला ॥ ५ ॥ खरा धर्म अस्ता गेला । दंभाचारा ऊत आला । ज्ञानेश्वरीच्या रहस्याला । कोणीहि न जाणती ॥ ६ ॥ देवा! बहुतेक मठांत । दुही माजली सांप्रत । एकमेकांचें नाहीं जित्त । शुद्ध एकमेकांविशीं ॥ ७ ॥ म्हणून तुम्हीं जागें व्हावें । या पंढरीस सुधारावें । द्वेषमत्सरा पिटाळावें । पार बाहेर क्षेत्राचिया ॥ ८ ॥ हें केवल्यावांचून । तरणोपाय नाहीं जाण । मठमठींचें प्रयोजन । आहे नीति शिकवावया ॥ ९ ॥ तेंच देवा! अवघे मठ । अनीतीचे झाल्या

पीठ । मोक्षाचि न गवसे वाट । केव्हांहि साधकाकारणें ।। १० ।। म्हणून मठ हे सुधारी । मठाधिप करी सदाचारी । ज्यायोगें होईल दुरीं । दैन्य या महाराष्ट्राचें ।। ११ ।। असो श्रीमत् शंकराचार्यांनीं । शृंगेरी मठ स्थापोनी । मंडणमिश्रालागुनी । केलें अधिपति तेथला ।। १२ ।। याच मंडणमिश्राचें । नांव सुरेश्वराचार्य साचें । कोठें कोठें तयाचें । नांव पृथ्वीधराचार्य असे ।। १३ ।। हा मठ शृंगेरी । दक्षिणाम्नाय तुंगातीरीं । सरस्वती, भारती आणि पुरी । ऐशीं नांवें स्वामींचीं ।। १४ ।। संप्रदाय भूरीवार । रामक्षेत्र साचार । देवता वराह थोर । वेद कृष्ण-यजु असे ।। १५ ।। महावाक्य या मठाचें । 'अहं ब्रह्मास्मि' हें साचें । महत्त्व ब्रह्मचर्याचें । विशेष शृंगेरीमठांत ।। १६ ।। या शृंगेरीमठाची शक्ति । शारदा अंबा सरस्वती । या मठाचें निश्चितीं । तीर्थ तुंगभद्रा असे ।। १७ ।। ऐशी व्यवस्था करून । आचार्य निघाले तेथून । निवडक शिष्य घेऊन । आपल्या त्या समागमें ।। १८ ।। तीर्थयात्रा करीत करीत । जगन्नाथ क्षेत्राप्रत । आचार्य आले शिष्यांसहित । मठ स्थापन करावया ।। १९ ।। गोवर्धन मठाची स्थापना । या क्षेत्रांत केली जाणा । श्रीपद्म-पाद स्वामींना । केलें तेथील अधिकारी ।।२०।। हा गोवर्धन मठ पुरीचा । पूर्वाम्नाय होय साचा । वेद ऋग्वेद याचा । संप्रदाय भोगवार ।। २१ ।। क्षेत्र याचें पुरुषोत्तम । महोदधि तीर्थनाम । सज्जनांचा विश्राम । जगन्नाथ देव याचा ।। २२ ।। विमलादेवी या मठाची । वन, अरण्य उप-पदें साचीं । आहेत कीं लागावयाचीं । मठाधिपाच्या नांवांपुढें ।। २३ ।। या मठाचें महावाक्य । 'प्रज्ञानं ब्रह्म' होय देख । आचार्ययोजना सुरेख । तिचें वर्णन कोण करी ? ।। २४ ।। या गोवर्धन मठावरी । करून ठेविले अधिकारी । पद्मपादाचार्य निर्धारीं । जे पट्टशिष्य आचार्यांचें ।। २५ ।। आणिक बजाविलें तयां । हे पद्मपादा शिष्यराया ! । करणें आहे मही-ठायां । वैदिक धर्माचें रक्षण तुम्हां ।। २६ ।। उगीच वैभव भोगण्यासी । निर्मिलें न या मठासी । येथील मठाच्या शक्तीसी । विमला हें नांव असे ।। २७ ।। हें ध्यानांत ठेवावें । वैदिक पंथा रक्षावें । समाजा न फुटूं द्यावें । बोधामृत पाजूनिया ।। २८ ।। तें बोधामृत पाजण्यासी । संन्यास दिला तुम्हांसी । त्या भगव्या वस्त्रासी । कमीपणा आणूं नका ।। २९ ।। अज्ञानाचें खंडण । करणें चातुर्यंकरून । प्रतिस्पर्ध्याचें मन । दुखवूं नका

वाणीनें ॥ ३० ॥ या अद्वैत पंथासी । प्रतिस्पर्धी कवणासी । होतां न ये निश्चयेंसी । ऐसें तत्त्व सुंदर हें ॥ ३१ ॥ ऐशापरीचें बहुत ज्ञान । पद्म-पादासी सांगून । उत्तरदिशा लक्षून । आचार्य निघाले तेथूनिया ॥ ३२ ॥ गया, प्रयाग, वाराणशी । करून आले पुण्यराशि । हिमालय पर्वताशी । श्रीशंकराचार्य जगद्‌गुरु ॥ ३३ ॥ या हिमालयामाजीं भला । ज्योतिर्मठ स्थापिला । उत्तराम्नाय नाम ज्याला । मिळालें क्रमानुरोधानें ॥ ३४ ॥ संप्रदाय आनंदवार । उपपदें तीं साचार । गिरि, पर्वत आणि सागर । या मठाकारणें ॥ ३५ ॥ बद्रिकाश्रम क्षेत्र जाण । देव मठाचा नारायण । शक्तीलागीं नामाभिधान । देवी पुन्नगिरी असे ॥३६॥ अलक-नंदा नामें तीर्थ । आथर्वण तो वेद येथ । 'अयमात्मा' हेंच खचित । महावाक्य या मठाचें ॥ ३७ ॥ स्वामी तोटकाचार्यांना । अधिकार तेथला सोंपविला । आचार्यांसम नाहीं झाला । अद्वितीय पुरुष या देशीं ॥ ३८ ॥ तोटकाचार्यांहि करून उपदेश । आचार्य आले द्वारकेस । बरोबर कांहीं शिष्यांस । आपुल्या त्या घेऊनिया ॥ ३९ ॥ जें द्वारका-पट्टण । निर्मिता झाला रुक्मिणीरमण । जें पश्चिम धाम म्हणून । ख्यात आहे भूमंडळीं ॥ ४० ॥ जी यादवांची राजधानी । जिचा दरारा त्रिभु-वनीं । ऐशा त्या पवित्र पट्टणीं । श्रीजगद्‌गुरु प्राप्त झाले ॥ ४१ ॥ तेथें धर्मसंरक्षणाकारण । केला असे मठ स्थापन । पश्चिमाम्नाय म्हणून । नांव मठाचें शारदा ॥ ४२ ॥ संप्रदाय कीटवार । देवता ती सिद्धेश्वर । तीर्थ गोमती मनोहर । आश्रम, तीर्थ हीं उपपदें ॥ ४३ ॥ क्षेत्र होय द्वारका । भद्रकाली शक्ति देखा । येथलें आधिपत्य हस्तामलका । देते झाले आचार्य ॥ ४४ ॥ महत्त्व सामवेदासी । विशेष या मठासी । महा-वाक्य 'तत्त्वमसि' । आहे येथलें विबुध हो ! ॥ ४५ ॥ या हस्तामलका-कारण । नांव आढळतें टोपण । विश्वरूपाचार्य म्हणून । कांहीं कांहीं ग्रथांमध्यें ॥ ४६ ॥ ऐसे चारी दिशांना मुख्य चार । मठ स्थापिले साचार । योग्यता पाहून अधिकार । दिला शिष्यांस आचार्यांनीं ॥ ४७ ॥ आंध्र, द्रविड, कर्नाटक । चौथा तो केरळ देश । याचें धर्मसंरक्षक । पीठ मुख्य शृंगेरी ॥ ४८ ॥ बर्बर, उत्कल, मगध, वंग । तैसें अंग आणि कलिंग । या देशीं अधिकार चांग । गोवर्धन मठानें चालवणें ॥ ४९ ॥ कुरु, कांबोज, काश्मीर । चौथा पांचाल साचार । या देशींचा अधिकार ।

आहे ज्योतिर्मठाकडे ॥ ५० ॥ सिंधु, सौवीर, सौराष्ट्र । चौथा तेविं महाराष्ट्र । यांच्या वांट्यास द्वारकामठ । येता झाला सहजची ॥ ५१ ॥ ऐशी स्थापना चारी मठांची । आचार्यांनीं केली साची । जेंवि बळकटी किल्ल्याची । राहते बुरूज बांधल्या ॥ ५२ ॥ तेवींच हे मठ चार । धर्म किल्ल्याचे बुरूज थोर । बांधिले याचा विचार । करावा मुमुक्षु जनांनीं ॥ ५३ ॥ गादीवरी बसवितांना । जो उपदेश शिष्यांना । केला जगद्-गुरूंनीं जाणा । तो होता येणें रीतीं ॥ ५४ ॥

'योऽन्यां देवतां उपास्ते स पशुः ।'

ब्रह्माविण अन्य देवता । जो का उपासी तत्त्वतां । तो पशु होय सर्वथा । मनुज त्यासी मानूं नये ॥ ५५ ॥

'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ।'

तिन्ही कालीं अबाधित । जें कांहीं असे खचित । त्यालाच म्हणावें पाहा सत्य । इतर असत्य सहजचि ॥ ५६ ॥ अनंत शब्देंकरून । ऐसा अर्थ घेणें जाण । देशकाल वस्तूहून । जें अतीत तें अनंत ॥ ५७ ॥

'सदेव सौम्येदमग्र आसीत् ।'

ऐसें जें का अनंतत्व । तेंच होय पाहा सत् । तेंच होतें अस्तित्वात । सृष्टीचिया पूर्वी पाहा ॥ ५८ ॥

'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ।'

अथवा सत्स्वरूप आत्मा भला । तोच सृष्टिपूर्वी असतां झाला । ऐसा श्रुतीचा गलबला । आहे तो ध्यानीं धरा ॥ ५९ ॥

'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' 'सर्वं खल्विदं ब्रह्म' 'नेह नानास्ति किञ्चन'

ब्रह्म हें एकटें जाणी । त्या प्रतिस्पर्धी नाहीं कोणी । हे अद्वितीय शब्दांनीं । येत आहे कळूनिया ॥ ६० ॥ ज्या अर्थी दुसऱ्याविण । ब्रह्म एकटें नांदे पूर्ण । त्या अर्थी व्यापून । तेंच सर्वां राहिलें ॥ ६१ ॥ एक दोन हे शब्द तेहि । ब्रह्माठायीं टिकणें नाहीं । ऐशी आहे नवलाई । या अद्वितीय ब्रह्माची ॥ ६२ ॥ म्हणजे एक ब्रह्मावांचून । कोठें कांहींच नसे जाण । विविधतेलागून । ब्रह्माठायीं जागा नसे ॥ ६३ ॥

'ज्ञानादेव तु कैवल्यं' 'ब्रह्मविदाप्नोति परम्'

ऐशा ब्रह्मालागून । जाणावया कारण । साधन हेंच आहे ज्ञान । ज्या ज्ञानें तें जोडे ॥ ६४ ॥ आणि मोक्षाची ती प्राप्ति । ज्ञान्यालाच होते

निश्चितीं । ऐशी आहे पाहा महती । या ब्रह्मज्ञानाची ॥ ६५ ॥

'यदाह्येवैष एतस्मिन्नुदरमंतरं कुरुते अथ तस्य भयं भवति।'

येथें पाहा जो जो कोणी । ब्रह्म आत्म्यांत भेद मानी । तो दुर्धर भयापासुनी । न सुटेल केव्हांहि ॥ ६६ ॥ भय जे कां दुर्धर । तीच अधोगति साचार । हें भयशब्दाचें आहे सार । तें विचारें ध्यानीं आणा ॥ ६७ ॥ आत्मा आणि ब्रह्मांत । जो कां भेद मानीत । नाहीं नाहीं तयाप्रत । मोक्ष तो मिळणारा ॥ ६८ ॥

'असन्नेव स भवति असद्ब्रह्मेति वेद चेत्।'

'अस्ति ब्रह्मेतिचेद्वेदसंतमेनं ततो विदुः।'

जो ब्रह्मासि मानी असत् । तो स्वतःच नष्ट होत । जो ब्रह्मासी मानी सत् । तो ब्रह्मरूप होतसे ॥ ६९ ॥

'यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् सोऽश्नुते सर्वान्कामान् सह।'

पंचकोशात्मक शरीराठायीं । जें आत्मतत्त्व आहे पाहीं । त्याला जाणें तोच होई । सुखी सर्व बाजूंनीं ॥ ७० ॥

'तत्त्वमसि' 'अहं ब्रह्मास्मि' 'प्रज्ञानं ब्रह्म' 'अयमात्मा ब्रह्म'

ऐसे आचार्यांचे सिद्धान्त । कथन केले थोडक्यांत । हे बाणले ज्याचे चित्तांत । तोच मोक्षदाता गुरु ॥ ७१ ॥ ऐसा गुरु भेटतां । शिष्यानें ब्रह्म विचारतां । गुरु होय सांगता । तूंच बाप्पा! ब्रह्म तें ॥ ७२ ॥ हें तत्त्वमसि करून। ज्ञानी पुरुष सांगे जाण । शिष्य असल्या प्रज्ञावान् । अहं ब्रह्मास्मि तो म्हणे ॥७३॥ ज्ञानस्वरूप ब्रह्म आहे । त्या 'प्रज्ञानं ब्रह्म' म्हणती पाहे । अयमात्मा याचा आहे । अर्थ पाहा येणें रीतीं ॥ ७४ ॥ आत्मा हाच ब्रह्म साक्षात् । ऐसे अद्वैताचे सिद्धान्त । जगद्‌गुरूंनीं केले निश्चित । श्रुतिवाक्यांच्या आधारें ॥ ७५ ॥ हें करण्याचें प्रयोजन । जगाचें व्हावें तारण । आतां शंकराचार्यांसमान । आचार्य होणेंच नाहीं कीं ॥ ७६ ॥ ऐसा उपदेश सर्वांसी । करिते झाले ज्ञानराशि । त्या जगद्‌गुरूसी । वानूं किती एक्या मुखें ?॥ ७७ ॥ जे शंकराचे अवतार । अवघ्या विद्येचें माहेरघर । अमोघ ज्ञानाचे सागर। मेरु क्षमा-दयेचे ॥ ७८ ॥ जगत् कल्याणासाठीं । केल्या अनंत खटपटी । अद्वैत मार्ग शेवटीं । त्यांनीं स्थापन केला असे ॥ ७९ ॥ जो हा अद्वैत पंथ । श्रेष्ठ आहे सर्वांत । तोच आणिला प्रचारांत । श्रीमत् शंकराचार्यांनी ॥८०॥ या अद्वैताची थोरी । मुखें वानावी

कोठवरी ? । श्वापदांमाजीं केसरी । वा हिऱ्यांमाजीं कोहिनूर ॥ ८१ ॥ कल्पतरु पादपांत । अथवा चिंतामणि मण्यांत । धेनुवर्गाच्या समूहांत । कामधेनु गाय जैशी ॥ ८२ ॥ दिवौकसांत पुरंदर । पंचभूतांत वैश्वानर । अथवा देवांमाजीं शंकर । अथवा भृगु ऋषींमध्यें ॥ ८३ ॥ रसामाजीं अमृत । सुवर्ण अवघ्या धातूंत । तेंवि अवघ्या शास्त्रांत । अद्वैत हें श्रेष्ठ असे ॥ ८४ ॥ ऐसें तें अद्वैत भलें । ज्यांनीं आत्मसात केलें । ते प्रति होऊनि राहिले । ईश्वर या जगामध्यें ॥ ८५ ॥ भगीरथानें भागीरथी । अति प्रयत्नें भूवरती । आणिली कीं निश्चितीं । पापें समूळ हरावया ॥ ८६ ॥ तेंवि गंगा ही अद्वैत । आचार्यांनीं आणिली खचित । श्रुतिपर्वतापासून सत्य । जगकल्याण करावया ॥ ८७ ॥ या पुनीत भरतवर्षात । जेव्हां झालें विपरीत । चार्वाक, न्याय, सांख्यमत । बौद्ध, जैन बळावले ॥ ८८ ॥ या प्रत्येकांनीं आपुला । सिद्धान्त नवा काढिला । सत्यत्व दावून जगताला । आपुली प्रौढी मिरवली ॥ ८९ ॥ ती प्रौढी मिरवण्याला । गलबला तो बहुत केला । ओढिते झाले दुर्बलाला । आपुलीया जाळ्यामध्यें ॥ ९० ॥ हीं नाना मतें हींच कोल्हीं । जेव्हां ओरडूं लागलीं । भरतवर्षामाजीं भलीं । न भूतो न भविष्यति ॥ ९१ ॥ ती कोल्हेकुई मिटविण्याला । जगद्‌गुरूंनीं आणिला । अद्वैत सिंह भला । या भरतवर्षामधें ॥ ९२ ॥ त्या अद्वैत सिंहाची गर्जना । ऐकतां क्षणीं आपुल्या माना । खालीं घालून बसले जाणा । वृकासम सांख्य, न्याय ॥ ९३ ॥ जैन-बुद्धांची कोल्हेकुई । कोठेंहि न ऐकूं येई । रवि उदय झाल्या पाहीं । टिकणें नाहीं तम जैसा ॥ ९४ ॥ त्या अद्वैताच्या संरक्षणा । स्थापन केले मठ जाणा । भ्रमापासून अज्ञ जनां । आचार्यांनीं सोडविलें ॥ ९५ ॥ असो आपुले सिद्धान्त । जगाकारणें सांगून सत्य । फल कोणतें त्याप्रत । येईल तेंहि सांगितलें ॥ ९६ ॥ आचार्य म्हणती ऐका ! ऐका ! । भ्रमामाजीं पडूं नका । या अद्वैतासारिखा । मार्ग नाहीं सुखदायी ॥ ९७ ॥ हे अद्वैताचे सिद्धान्त । सकृद्दर्शनीं वाटतात । घोटाळ्याचे पाहा बहुत । येविषयीं शंका नसे ॥ ९८ ॥ नित्यत्व तें जगताचें । आणि ब्रह्मासी ऐक्य जीवाचें । आहे कोणत्या तऱ्हेचें । तें विचारीं कळल्यावर ॥ ९९ ॥ अवघा भ्रम तो होतो दूर । मोक्षा पावतो अखेर । म्हणून करावा आदर । सर्वदाहि अध्यात्माचा ॥ १०० ॥ ऐसा कळकळीचा उपदेश ।

करून अवघ्या भाविकांस । निघते झाले हिमालयास । आचार्य आपुल्या शिष्यांसह ॥ १०१ ॥ बद्रिकाश्रमामाझारीं । आचार्यांची राहिली स्वारी । येथेंच उपनिषदांवरी । भाष्य त्यांनीं लिहिलें होतें ॥ १०२ ॥ तेथेंच पुन्हां स्वामी आले । अखेरचें राहण्या भलें । मृत्युलोकींचें आपुलें । कार्य त्यांनीं संपवुनिया ॥ १०३ ॥ आचार्यवाणी लोकोत्तर । भाष्य ब्रह्मसूत्रावर । केलें असे अति थोर । अज्ञानधुरळा नासावया ॥ १०४ ॥ ईश, कठ, केन । मुंडक, मांडूक्य, प्रश्न । तैत्तिरीय, ऐतरेय, बृहदारण्य । छांदोग्य तें दहावें ॥ १०५ ॥ ऐशा दशोपनिषदांसी । भाष्य केलें अति हर्षी । ज्या भाष्यें लोकांसी । हृद्गत त्यांचें कळावें ॥ १०६ ॥ भाष्य गायत्रीमंत्रावरी । भगवद्गीतेस त्याचपरी । भाष्य लिहिलें अतिकुसरी । आपुल्या प्रसादवाणीनें ॥ १०७ ॥ भाष्य विष्णुसहस्रनामाचें । आचार्यांनीं केलें साचें । अपरोक्षानुभूतीचे । कर्ते हेच आचार्य कीं ॥ १०८ ॥ वेदान्त मुक्तावली आत्मबोध । सिद्धान्तसिंधु प्रसिद्ध । चर्पटपंजरी तत्त्वबोध । ऐसे ग्रंथ अनंत ॥ १०९ ॥ आचार्यांनीं असती केले । त्यांतून कांहीं सांगितले । मोजवती कां कोणा भले । चांदण्या, ग्रह आकाशींचे ॥ ११० ॥ आतां बद्रिकाश्रमांत । जें कांहीं घडलें सत्य । तें तुम्हां होईल विदित । पुढिलाध्यायाचिया ठायीं ॥ १११ ॥ इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ ११२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय पस्तिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय परमात्मन् परेशा ! । जयजयाजी अविनाशा ! । सच्चिदानंदा महेशा ! । विविध रूपा विश्वपते ॥ १ ॥ तूं अनादि आणि अनंत । कांहीं न तुझ्याविरहित । तूं प्रत्येक पदार्थांत । विचार करितां गवसशी ॥ २ ॥ जें जें कांहीं म्हणावें । तें तें तुला साजतें बरवें । जिकडे जिकडे पाहावें । तिकडे तिकडे तुझी व्याप्ति ॥ ३ ॥ ऐसा तूं व्यापक जरी । तरी सगुण स्वरूपाची हांव भारी । आहे तुझ्या अंतरीं । हें तुझेच चरित्र सांगतसे ॥ ४ ॥ नानाविध भक्तांसाठीं ।

तूं सगुण होऊन जगजेठी !। विराट रूप शेवटीं। आपुलें दाविसी तयाला। ।। ५ ।। ऐसें चरित्र अर्जुनाचें। सांगतें अवघ्यांस साचें। पुरविसी मनोरथ भक्तांचे। तूं आपुल्या जगदात्मया ।। ६ ।। तुझा भक्त म्हणवून घेण्या। योग्य मी न पंढरिराया ! । परि दयाळा करणें दया। या दुर्बल गणूवरी ।। ७ ।। तुझ्या कृपेंकरून भलें। आचार्यचरित्र कळसा आलें। आतां थोडें राहिलें। तेंहि पूर्ण करी तूं ।। ८ ।। तुझ्या कृपेवांचून कांहीं। खरें खोटें कळणार नाहीं। खरें तेंच माझे आई ! । वदवी माझ्या मुखानें ।। ९ ।। असो आचार्य शिष्यांसहित। आले बद्रिकाश्रमांत। हें तुम्हीं ऐकिलें खचित। गताध्यायाचिया ठायीं ।। १० ।। या बद्रिकाश्रमांत। बैसले होते कंदरींत। हठयोगातें आचरीत। साधनें कांहीं योगीजन ।। ११ ।। ते पातंजल मतानुयायी। अवघे योगी होते पाही। ते आले लवलाही। आचार्यांसी भेटावया ।। १२ ।। आणि म्हणाले त्यांप्रत। तुम्ही या बद्रिकाश्रमांत। जे का आलां शिष्यांसहित। तें का योग शिकावया ? ।। १३ ।। योग शिकणें असल्यासी। चला आमुच्या गुहेसी। नमून पतंजल मुनीसी। आरंभ करा शिकावया ।। १४ ।। कां कीं योगशास्त्रावांचुनी। मोक्षासी न पावला कोणी। हें आहे ख्यात जनीं। तें तुम्हीहि जाणतसां ।। १५ ।। कर्मउपासनेंकरून। ज्याचें न होई शुद्ध मन। त्यानें आहे अवलंबन। करणें या योगशास्त्राचें ।। १६ ।। कर्मउपासनेहून साचा। थोर अधिकार योगाचा। नाहीं कधींच व्हावयाचा। साधकाचा घात यानें ।। १७ ।। ऐक्य जीवेश्वरांचें। योग हाच करी साचें। कोणीहि न यावयाचे। या योगाच्या समत्वा ।।१८।। ऐसें भाषण ऐकिलें। आचार्य गालांत हंसते झाले। आणि तयांसी बोलले। मधुर शब्दें येणें रीतीं ।। १९ ।। अहो ! कर्मउपासनेपरी। योग हा एक मार्ग निर्धारीं। ज्ञानावांचून प्राप्ति खरी। कैवल्याची न होय कोणा ।। २० ।। म्हणून महत्त्व योगाचें। वानूं नका उगी वाचें। उपनिषद् भागाचें। विचारें करा अवलोकन ।। २१ ।। जैसें कर्ममार्गांत। दर्भसमिधांचें महत्त्व। वा उपासनामार्गांत। नानाविध प्रतिमा ह्या ।। २२ ।। तेंवि प्राणायाम, आसनें। हीं योगाचीं साधनें। हीं नुसतीं आल्यानें। कैवल्य-प्राप्ति होणें नसे ।। २३ ।। एखाद्यास लिहितां आलें। शब्दाचे अर्थ कळले। तें म्हणावें सफल झालें। वाक्य जुळवितां आल्यावरी ।। २४ ।।

कर्मउपासनयोगांहून । मोक्षप्राप्तीचें साधन । एक आहे अपरोक्ष ज्ञान । तेंच झालें पाहिजे ॥२५॥ तुम्हीच या गुहेंतून । कालवंचना करून । बसलां समाधि लावून । या हठयोगाच्या बळें ॥ २६ ॥ हठयोग साधल्यावरती । अशक्य गोष्टी करतां येती । नाना सिद्धींची होते प्राप्ति । या योगातें सेविल्या ॥ २७ ॥ ती प्राप्ति झाल्यावर । चित्तीं वाढे अहंकार । तो वाढल्या होते दूर । तत्त्व तयापासुनी ॥ २८ ॥ विचार वेदवाक्यांचा । विवेकानें करणें साचा । तेथेंच उदय वैराग्याचा । होणें आहे विबुध हो! ॥ २९ ॥ वैराग्य आणि विवेक । हें अभ्यासें झाल्या एक । ज्ञान उपजे निष्कलंक । त्याच साधकाच्या ठायीं ॥ ३० ॥ तुम्ही योगखटपटी केल्या । त्या ज्ञानावांचून वांयां गेल्या । ह्या ज्या चुका पूर्वी झाल्या । त्या दुरुस्त आतां करा ॥ ३१ ॥ योगें आयुष्य वाढेल । अग्नि शांत करवेल । वायु सांठवितां येईल । मुठीमाजीं योग्यातें ॥ ३२ ॥ अंतराळीं येईल चालतां । तांब्याचें येईल सोनें करतां । इच्छित ठिकाणीं धआणवितां । प्रवाह येईल सरितेचा ॥ ३३ ॥ मोठमोठाले पर्वत रतां येतील मंडपवत् । सागराला क्षणांत । कोरडें करतां येईल । कीं ॥ ३४ ॥ परि शुद्ध आत्मज्ञान । प्राप्त न होय योगापासून । म्हणून योगाकारण । फारसें महत्त्व देऊं नका ॥ ३५ ॥ फुलझाडें उपवनांत । फुलांसाठीं लावितात । अंतिम साध्य आहे तेथ । फळें आणविणें वृक्षाला ॥ ३६ ॥ तीं फळें नाहीं आलीं । झाडें वांझ राहिलीं । ऐसें होतां वांयां गेली । खटपट वृक्ष लावण्याची ॥ ३७ ॥ मग त्या वांझ झाडाचें । लोक करिती सरपण साचे । तैसेंच तुमच्या योगाचें । व्हावयाचें आहे ज्ञानाविण ॥ ३८ ॥ नुसता योग केव्हांहि । मान्यता पावणार नाहीं । असुं नसल्या कोण देई । किंमत या देहातें ॥ ३९ ॥ योगसाधनें शरीर । ज्ञान हा आत्मा साचार । हे दोन्ही एक झाल्यावर । वाटेल तें घडवितां ये ॥ ४० ॥ कर्मयोगउपासना । यांतून कोणत्याहि साधना । सशास्त्र आचरल्या जाणा । ऐहिक यात्रा सुखद होते ॥ ४१ ॥ परी मोक्ष तयाप्रत । कधींच नाहीं होणें प्राप्त । जन्ममरणांच्या फेऱ्यांत । फिरावें त्या लागेल कीं ॥ ४२ ॥ मोक्ष मानवा देण्याचा । अधिकार एक ज्ञानाचा । ज्ञान हें अवघ्या सुखाचा । सम्राट् आहे निःसंशय ॥ ४३ ॥ म्हणून तुम्ही या अद्वैता । ग्रहण करा हो ! तत्त्वतां । निजकल्याण होण्याकरितां । याविण

दुसरा उपाय नसे ॥ ४४ ॥ ऐसा पातंजल मतानुयायांसी । उपदेश करून बहुवसी । अद्वैत दीक्षा तयांसी । आचार्य देते जाहले ॥ ४५ ॥ नारायणासी वंदून । स्वशिष्यांसी घेऊन । अचार्यांनीं केलें गमन । सरस्वतीतीरातें ॥ ४६ ॥ हें बद्रिकाश्रम विशेषण । लागे दोन्ही क्षेत्रांलागून । केदार आणि नारायण । हें आहे ख्यात जगा ॥ ४७ ॥ हीं महाक्षेत्रें दोन्ही । हिमालयाच्या ठिकाणीं । अवघें पावित्र्य येऊनी । येथें नांदूं लागलीं ॥४८॥ आचार्य म्हणती निज शिष्यांस । याच सरस्वतीतीरास । दशोपनिषदें ब्रह्मसूत्रास । म्यां भाष्य केलें कीं ॥ ४९ ॥ त्या ह्या सरस्वतीचे कांठीं। भाष्यें गेलीं शेवटीं । ही जागा यशद मोठी । झाली भाष्यें लिहिण्यास ॥ ५० ॥ चला तया जागेवर । बसून ऐका एकवार । अवघ्या भाष्यांचें तें सार । सांगतों तुम्हांकारणें ॥ ५१ ॥ त्या सरस्वतीचे तीरावरी । आचार्यांची आली स्वारी । जो साक्षात् मन्मथारि । भगवान् पिनाकी नीलकंठ ॥ ५२ ॥ श्रोते ! हें सरस्वतीचें स्थान । नारायणाचे सन्निध जाण । जेथून वसुधारेचें दर्शन । सहज होतें मानवां ॥ ५३ ॥ ही सरस्वती नामे सरिता। अलकनंदेसी तत्त्वता। संगम पावली, तेथें आतां। नामा नामें ग्राम एक ॥५४॥ हें भाष्यांचें जननस्थान। जो कां येत पाहून। त्यास लाधतें पाहा पुण्य। अवघ्या भाष्यश्रवणाचें॥ ५५ ॥ असो आचार्य तया ठायां । आनंदानें बसूनिया। लागले भाष्य सांगावया । आपुल्या सर्व शिष्यांतें ॥ ५६ ॥ परि श्रोते ! हिमालयांत । शीताचें प्राबल्य बहुत । हिम पडे अतोनात । त्याचें वर्णन कोण करी ? ॥ ५७ ॥ शिष्य अवघे बेजार । हुडहुडीनें व्याप्त शरीर । सवेंच मागून भरे ज्वर । चवी न उरे तोंडाला ॥ ५८ ॥ आचार्य स्नाना चला म्हणती । परि न उठवे कवणाप्रति । ती शोचनीय पाहून स्थिति । आचार्य मनीं द्रवले कीं ॥ ५९ ॥ शीताचा करण्या परिहार । आचार्यांनीं जोडिले कर । जो सच्चिदानंद सर्वेश्वर । त्या श्रीशंकराकारणें ॥ ६० ॥ मुखें केली प्रार्थना । हे भगवान् ! मदनदहना ! । नीलकंठा पार्वतीरमणा ! । अजअजित विश्वपते ! ॥६१॥ समुद्रमंथनाचे वेळां । तुम्हीं प्राशिले हालाहला । रक्षण्या अवघ्या जगताला । त्या भयद विषापासुनी ॥ ६२ ॥ तो विषदाह शमविण्यासी । गंगा धरली मस्तकासी । शीतदेवता जो का शशी । तोहि आपण धरिला असे ॥ ६३ ॥ करावयासी विहार । हा हिमालय नामें गिरिवर । पसंत

केला साचार । प्रकृतीच्या स्वास्थ्यास्तव ॥ ६४ ॥ जें आपणांसी मानवतें । तें न इतरां सुखद होतें । नागाचिया शय्येतें । निजण्या शक्ति हरीची ॥ ६५ ॥ माझे शिष्य शीतामुळें । हैराण पाहा ! झाले सगळे । त्यांच्या संरक्षणासाठीं भले । देवा ! पाहिजे उष्णोदक ॥ ६६ ॥ कितीहि प्रयत्न केला जरी । तप्त न होय येथ वारि । म्हणून हे मन्मथारि ! । उष्णोदकातें उत्पन्न करा ॥ ६७ ॥ जें न होतें कवणाच्यानें । तें आपण सहज लीलेनें । करीतसां ऐसें शास्त्र म्हणे । कां कीं सर्वशक्ति तूंच एक ॥ ६८ ॥ शीतोष्णांचा जनिता । तूंच कीं रे पार्वतिकांता ! । माझ्या दुर्बल शिष्यांकरितां । निर्माण करा झरा उष्ण ॥ ६९ ॥ म्हणजे स्नानसंध्यादि कर्मे सारीं । त्यांचीं सांग होतील खरीं । या पुनीतशा क्षेत्र बदरीं । हे भूताधिपते शंकरा ! ॥ ७० ॥ ऐसें आचार्य करतां स्तवन । ओळंगला नागभूषण । तत्काळ केला निर्माण । झरा उष्णोदकाचा ॥ ७१ ॥ अधणाच्या पाण्यापरी । ज्या झऱ्यांतील असे वारि । उकळ्या फुटती वरच्यावरी । हा दैवीच चमत्कार ! ॥ ७२ ॥ झऱ्याप्रति पाहून । आचार्यांचें तोषलें मन । बोलले स्वशिष्यांलागून । आतां शीतास भिऊं नका ॥ ७३ ॥ तुम्हां स्नान करण्यासाठीं । निर्मिता झाला धूर्जटि । उष्णोदकाचा शेवटीं । झरा तुम्हांतें सुखवावया ॥ ७४ ॥ त्याच उष्णोदकांत । झाले करिते आनंदांत । स्नान स्वामींचे शिष्य समस्त । अति उल्हास वृत्तीनें ॥ ७५ ॥ बुध हो ! स्नान करतांक्षणीं । शीत गेलें मावळोनी । दिसूं लागली शिष्यवदनीं । मलरहित प्रसन्नता ॥ ७६ ॥ थोरांचा आश्रय लागतां । करणें न लगे मुळींच चिंता । अमृताचा घट हातां । असल्या मृत्यूस भिणें नको ॥ ७७ ॥ कांहीं कालपर्यंत । आचार्य राहिले तेथ । स्वशिष्यांसी बोधामृत । पाजीत अति उल्हासें ॥ ७८ ॥ हे उष्णोदकाचे झरे । अलकनंदेंत असती सारे । जे निर्माण केले शंकरें । बद्रिकाश्रमीं शिष्यांस्तव ॥ ७९ ॥ असो आचार्यांच्या वयास । वर्षे झालीं बत्तीस । हें जाणून दिवौकस । केदार क्षेत्रीं पातले ॥ ८० ॥ श्रोते ! क्षेत्र केदारीं । अंतरिक्षामाझारीं । विमानांची गर्दी खरी । झाली असे अतोनात ॥ ८१ ॥ खुरासी लागला खूर । झांकून गेला दिनकर । निरभ्र झालें अभ्यंतर । कांहीं काल तेथिंचें ॥ ८२ ॥ सौगंध तो सुटला भारी । देवमंडळी आली सारी । त्यांचीं नांवें कुठवरी ।

सांगूं तुम्हांकारणें ? ॥ ८३ ॥ पूषा, वरुण, पुरंदर । आर्यमा, वायु, वैश्वानर । यक्ष, देव, किन्नर । ब्रह्मदेव, बृहस्पति ॥ ८४ ॥ वैकुंठवासी नारायण । दत्त अत्रीचे नंदन । यांनीं दिलें आलिंगन । कडकडून आचार्यां ॥ ८५ ॥ शृंगी, भृंगी, कुमार । वीरभद्र, नंदिकेश्वर । भैरवादि इतर । गण पातले शिवाचे ॥ ८६ ॥ ऐसे देव मिळाले । आचार्यांसी वंदन केलें । हात जोडून बोलते झाले । येणें रीतीं तें ऐका ! ॥ ८७ ॥ हे संतसज्जनविश्रामा ! । हे सच्चिदानंदा शांतिधामा ! । महाभीमा पुरुषोत्तमा ! । त्रिपुरांतका विश्वपते ! ॥८८॥ हे सर्वशक्ति सर्वाद्या ! । हे विश्वरूपा अभेद्या ! । नीलकंठा ! स्वसंवेद्या । मदनदहना ! उमापते ! ॥ ८९ ॥ रक्षावया वैदिक पंथ । आपण मृत्युलोकांत । अवतार घेऊनिया सत्य । भूषविलें भारताला ॥ ९० ॥ अवैदिक मतांचें खंडण । केलें करून परिभ्रमण । कर्मउपासनेलागून । पाणी घालून जीवविलें ॥ ९१ ॥ अखेर वेदोपनिषदांचें महत्त्व । जें का विमल तत्त्व अद्वैत । तेंहि केलें प्रस्थापित । तारावयासी जीवांतें ॥ ९२ ॥ ब्रह्मसूत्रास भाष्य केलें । तेंवि उपनिषदावरी भलें । श्रुतीचें काठिण्य मोडिलें । आपुल्या अद्वितीय सामर्थ्यें ॥ ९३ ॥ केली नाना ग्रंथांची रचना । आपण कीं हो मदनदहना ! । चला आतां स्वस्थाना । कैलास लोकाकारणें ॥ ९४ ॥ जीं जीं कामें योजिलीं । तीं तीं सर्व पूर्ण झालीं । आतां कांहीं न राहिलीं । कृत्यें होण्याचीं तुमच्या करें ॥ ९५ ॥ परंपरा ती चालवण्यास । मठ चारी दिशांस । स्थापन केले महीस । योग्य शिष्य नेमूनिया ॥ ९६ ॥ आतां परत चला कैलासीं । हे भगवान् व्योमकेशी ! । सुखविण्या अवघ्या देवांसी । हीच अमुची विनंती असे ॥ ९७ ॥ ऐसें देव बोलले । आचार्य परम संतोषले । स्वशिष्यांस बोलते झाले । तेधवां हो येणें रीतीं ॥ ९८ ॥ हे सत्शिष्य हो ! तुम्ही आतां । वंदूनिया केदारनाथा । खंती न मानितां चित्ता । स्वदेशगमन करावें ॥ ९९ ॥ हे कैलासीं मला न्याया । देव आलेत ये ठायां । शिवाय आतां येथें राहाया । कामहि कांहीं उरलें नसे ॥ १०० ॥ दुःख माझ्या विरहाचें । मानूं नका तुम्ही साचें । खूळ हें जन्ममृत्यूंचें । समुद्राच्या लाटांपरी ॥ १०१ ॥ आत्मा सच्चिदानंद पूर्ण । .त्यास नाहीं जन्ममरण । याच तत्त्वाचें चिंतन । निरपेक्षबुद्धीनें करा जा ! ॥ १०२ ॥ म्हणजे ब्रह्म तुम्हीच हें कळेल ।

भ्रांतीचा मल निवटेल । मोक्षसुखातें अनुभवाल । हीच माझी भाक तुम्हां ॥ १०३ ॥ गुरु शिष्य हें व्यवहारीं । नातें आहे सर्वतोपरी । तें राखून अंतरीं । ब्रह्मविचार करावा ॥ १०४ ॥ ज्या ज्या वेळीं आठवण । माझी होय तुम्हांकारण । त्या त्या वेळीं मी भेटेन । तुम्हांस याच वेषानें ॥ १०५ ॥ ब्रह्मचर्चा ज्या ठायीं । तेथें मी सर्वदा येईं । संवाद ऐकण्याप्रति पाही । तेथिंचा, गुप्त वेषानें ॥ १०६ ॥ जो पवनाचा नंदन । रामरायाचा मुख्य प्राण । ज्यांनीं साधिलें उड्डाण । करीं घेऊन द्रोणागिरि ॥१०७॥ ऐसा तो अंजनीनंदन । रामायणाचें करण्या श्रवण । येतसे आद-रानं । ऐसा रामप्रेमा तया ॥१०८॥ त्या मारुतीचे परी । मी येईन निर्धारीं । अध्यात्मचर्चा ऐकण्या खरी । भाविक जेथें करतील ती ॥ १०९ ॥ जो अध्यात्माची करी निंदा । तो भोगीत राहील आपदा । तो न जाई मोक्षा कदा । हें ध्यानांत असावें ॥ ११० ॥ तुम्ही स्वदेशीं जाऊन । भाविकांचें अज्ञान । समूळ टाका निरसून । बोधामृतानें आपुल्या ॥ १११ ॥ ऐसें आचार्य बोलले । शिष्य गोरेमोरे झाले । कांहीं रडूं लागले । गुरुविरह-भयानें ॥ ११२ ॥ ऐसें आचार्यांनीं पाहून । बोलते झाले गर्जून । अरे ! तुमचें अज्ञान । अजून नाहीं गेलें कीं ॥ ११३ ॥ म्हणून तुम्ही करतां शोक । हें आहे अज्ञानमूलक । हाच होईल बाधक । तुम्हां, त्याचा विचार करा ॥ ११४॥ मी अविनाश आनंदघन । सर्व ठायीं परिपूर्ण । जेव्हां जेव्हां कराल स्मरण । तेव्हां तेव्हां भेटेन मी ॥ ११५ ॥ जा, उगीच शोक करूं नका । नयनीं नीर ढाळूं नका । निरर्थक मोहा पडूं नका । बळी तुम्ही वेड्यांनो ! ॥ ११६ ॥ ऐसें आचार्य बोलले । तें सर्वांनीं ऐकिलें । बद्रिकाश्रमीं पूजिलें । त्यांनीं शेवटचें निजगुरूंना ॥ ११७ ॥ शिष्यांच्या पूजा झाल्यावरी । देव आले सामोरी । त्यांनींहि आरंभिली खरी । समंत्रक आचार्यपूजा ॥ ११८ ॥ सर्व देवांच्या पूजा झाल्या । अप्सरा नाचूं लागल्या । गंधर्वांनीं मारिल्या । ललकाऱ्या भैरवरागांत ॥ ११९ ॥ नगारे वाजूं लागले । नादें अंबर कोंदाटलें । देव अवघे गर्जिन्नले । त्रिवार नांवें आचार्यांच्या ॥१२०॥ ब्रह्मदेवांनीं आचार्यांप्रत । उठावयासी दिला हात । तें पाहून धांवत । नंदिकेश्वर तेथ आला ॥ १२१ ॥ भोवतालीं ते शिवगण । शंखशिंगांचे काढिती स्वन । देवां-सह बंदीजन । यश गाऊं लागले ॥ १२२ ॥ पुढें आलेल्या नंदीवरी ।

आचार्य बैसले सत्वरीं। समागमें होती सारी। देवमंडळी तयांच्या ॥ १२३ ॥ शतद्रु, सिंधु ओलांडून। तीर्थापुरी क्षेत्रावरून। आचार्य कैलासालागून। गमन करिते जाहले ॥ १२४ ॥ वर्षे कलियुगाचीं। तीन हजार ऐंशी साचीं। गत झालीं आचार्यांची। मूर्ति गेली कैलासा ॥ १२५ ॥ सौम्यनामें संवत्सर। मास वैशाख साचार। प्रदोष वेळा सुंदर। तिथि शुद्ध त्रयोदशी ॥ १२६ ॥ ऐशा त्या प्रदोष समयाला। आचार्य गेले कैलासाला। आनंद अवघ्या देवांना। झाला असे श्रोते हो ॥ १२७ ॥ असो त्या शतद्रूनदीप्रत। सतलज म्हणती सांप्रत। भस्मासुराचा भस्मीभूत। तीर्थापुरीसी देह झाला ॥ १२८ ॥ त्याच्या रक्षेचा डोंगर। अजूनहि होतो दृग्गोचर। ज्याचें पुण्य बलवत्तर। तोच जाई मानसा ॥ १२९ ॥ हें क्षेत्र तीर्थापुरी। सिंधू नदीच्या आहे तीरीं। या तीर्थाचे पुढारी। मानसाची हद्द लागे ॥ १३० ॥ त्याच्या पुढें कैलास। आहे, त्याच स्थलास। संगें घेऊन दिवौकस। आचार्यांनीं गमन केलें ॥ १३१ ॥ अमरांविण कैलासभुवनीं। श्रोते! जाऊं शके न कोणी। याचें दर्शन लांबूनी। घेतां मात्र येतसे ॥ १३२ ॥ मानससरोवराचें पान। घडेल श्रोते! ज्यालागून। त्याचे कसलेहि दोष दारुण। असल्या दग्ध होतील कीं ॥ १३३ ॥ ही हिमालयाची यात्रा। शक्य नोहे सर्वत्रा। जो प्रभूचा असेल आवडता। तोच त्या पाहूं शकेल ॥ १३४ ॥ एक पुण्याचा ब्राह्मण। जो दाते कुलोत्पन्न। सखारामाचा नंदन। शंकर नांव जयाचें ॥ १३५ ॥ तो कांहीं मंडळींसमावेत। गेला होता हिमालयांत। या अडचणीच्या काळांत। हें ध्यानांत असूं द्या ॥ १३६ ॥ मानवानें एकदां तरी। शरीरस्वास्थ्य जोंवरी। आहे बुध हो! तोंवरीं। जावें हिमालययात्रेला ॥ १३७ ॥ ज्यांसी सामर्थ्य नसेल। त्यांनीं हा अध्याय एक वेळ। वाचिल्या त्यांसी मिळेल फळ। कैलासमानसदर्शनाचें ॥ १३८ ॥ श्रीविष्णूच्या अवतारीं। पूर्ण अवतार पूतनारि। जो झाला मथुरापुरीं। वसुदेवदेवकींपासुनी ॥ १३९ ॥ कृष्णावतारींच्या कथा। विचारानें पाहूं जातां। शक्य-अशक्यांची कथा। डोळ्यांपुढें राही उभी ॥ १४० ॥ उपजतांच चतुर्भुज। तोच गोकुळामाजीं द्विभुज। पूतना मारिली सहज। खेळत असतां पाळण्यामध्यें ॥ १४१ ॥ बारा गांव अग्नि गिळिला। नखाग्रासी पर्वत धरिला। विषारी कालिया तुडविला। यमुनेमाजीं

जलामध्यें ॥ १४२ ॥ रासक्रीडेप्रीत्यर्थ । सहा महिन्यांची केली रात । रूपें धरून अनंत । विधात्याला लाजविलें ॥ १४३ ॥ तैशी तंतोतंत स्थिति । या आचार्यचरितामृतीं । बुध हो ! पाहा दिसून येती । बारकाईनें शोध केल्या ॥ १४४ ॥ आचार्य येतां जन्माला । सूतिकागृहीं प्रकाश पडला । देवऋषी भेटण्याला । आले अल्प वयांत ॥ १४५ ॥ वामनाच्या समान । अवघ्या शास्त्रांचें अध्ययन । करतां झाला नंदन । शिवगुरु पंडिताचा ॥ १४६ ॥ लक्ष्मीसी आणवून । दरिद्री द्विजाचें सदन । सुवर्णाच्या आंवळ्यांकरून । भरवूनि या टाकिलें ॥ १४७ ॥ पूर्णा नदी फिरविली । निज सदनाच्या सन्निध नेली । एक सुसर उत्पन्न केली । आपुल्या कीं मायेनें ॥ १४८ ॥ गोविंदपाद गुरु केला । नर्मदेचा सांठविला । पूर कमंडलूमाजीं भला । ओंकारेश्वर क्षेत्रामध्यें ॥ १४९ ॥ भाष्य ब्रह्मसूत्रावर । केलें अति सुंदर । ज्यांना भेटला परमेश्वर । काशीक्षेत्रीं पथामध्यें ॥ १५० ॥: एवंच कृष्णचरित्राचें । साम्य या चरितीं जुळतें साचें । पूर्ण अवतार शंकराचे । आचार्य असती निःसंशय ॥ १५१ ॥ जगद्‌गुरूंच्या पदांप्रती । आचार्यचि योग्य असती । अजून भाविकां भेटती । अहेतुक भक्ति केल्यास ॥ १५२ ॥ गमन करतां कैलासीं । आचार्यांनीं या कथेसी । वर दिला अति हर्षी । तोच मी येथें सांगतों ॥ १५३ ॥ हें कैलासगमनाचें आख्यान । जो जो प्रत्यहीं करील पठण । त्याचे अवघेच होतील दहन । महादोष असले जरी ॥ १५४ ॥ पूर्ण होतील मनीषा । निमेल अवघी दैन्यदशा । वाढ होईल आयुष्या । गंडांतर-मृत्यु टळेल ॥ १५५ ॥ श्रीमत् जगद्‌गुरु शंकराचार्य । भुवनत्रयाचे गुरुराय । मुमुक्षूंनीं त्यांचे पाय । आठवणें भाग सर्वदा ॥ १५६ ॥ श्रोते ! या पुरुषाची । योग्यता अवघ्यांत मोठी साची । ऐसी पुन्हां न व्हावयाची । व्यक्ति भूतलीं निर्माण ॥ १५७ ॥ आचार्यांचें मोठेपण । आहे अवघ्यांशींच मान्य । परी केल्या अधिकन्यून । विद्वानांनीं ते ठायां ॥ १५८ ॥ विद्वत्तेच्या बरोबर । चित्तीं वाढे अहंकार । त्यामुळें हे विविध प्रकार । सहज उत्पन्न होतात ॥ १५९ ॥ निजांगींची विद्वत्ता । लोकांप्रती दावण्याकरितां । या श्रीजगद्‌गुरूच्या चरिता । ढवळाढवळ केली बहु ॥ १६० ॥ या पुण्यश्लोक पुरुषाची । म्हणजे जगद्‌गुरु आचार्यांचीं । चरित्रें नाना प्रकारचीं । लिहिलीं विद्वान् पंडितांनीं ॥ १६१ ॥

यांतून कांहीं विद्वानांचीं । नांवें येथें देतों साचीं । आहेत दहा प्रकारचीं । आचार्यचरित्रें संस्कृतांत ॥ १६२ ॥ चित्सुकाचार्य, आनंदगिरि । गोविंद-नाथ, अनंतानंदगिरि । विद्याशंकर त्याचपरी । दीक्षितराज चूडामणि ॥ १६३ ॥ वन्हिसहाय, सदानंद । चिद्विलासस्वामी, विद्यारण्य प्रसिद्ध । आचार्यचरित्र जो मकरंद । तो या सेविला भ्रमरांनीं ॥ १६४ ॥ परि कथेची केली रचना । पटेलशी आपुल्या मना । तेणें संकट भाविकांना । पडलें खरें शोधण्यास ॥ १६५ ॥ जन्म, जन्मस्थान, निर्माण । या तिन्ही गोष्टींमाजीं जाण । आपुल्या कल्पना विद्वान् । चालविते जाहले ॥ १६६ ॥ श्रोते ! या दहांतुनी । एक दोन वगळिल्या जाणी । ठेविली आहे सांगुनी । कथा एकसारखी ॥ १६७ ॥ कोठें कोठें स्वार्थासाठीं । फरक केला चरित्रापोटीं । हीच गोष्ट कठीण मोठी । झाली खरें निवडण्यास ॥ १६८ ॥ जो तो आपुल्या मठाची । वाखाणणी करूं लागला साची । हीच गादी मूळची । आचार्यांची दावावया ॥ १६९ ॥ यासाठीं ग्रंथ केले । एकाविरुद्ध एक लिहिलें । ते थोडक्यांत सांगतों भलें । इकडे अवधान द्यावें तुम्हीं ॥ १७० ॥ आनंदगिरि नांवाचा । चरित्रलेखक आचार्यांचा । एक पंडित होता साचा । कांची मठावर अधिपति ॥ १७१ ॥ त्यांनीं स्वकृत शांकरविजयांत । ऐशापरी केलें ग्रथित । आद्य शंकराचार्य जन्माप्रत । आले चिदंबर क्षेत्रामधें ॥ १७२ ॥ विश्वजित नामें पिता । आद्य आचार्यांचा होता । कामाक्षीची दुहिता । अंबिका माता आचार्यांची ॥ १७३ ॥ आचार्यांचें देहावसान । झालें कांची क्षेत्रालागून । ऐसें ठेविलें लिहून । आनंदगिरि पंडितानें ॥ १७४ ॥ हा पंडित आनंदगिरि । कांची मठाच्या गादीवरी । या मठाची यादवी खरी । आहे शृंगेरीमठासवें ॥ १७५ ॥ म्हणून त्यानें कदाचित् । केलें असेल असें ग्रथित । शृंगेरी मठाचें महत्त्व । कांहीं अंशें कमी करण्या । ॥ १७६ ॥ या एकाविण इतर । आचार्यांचें चिदंबर । जन्मस्थान हें साचार । कोणीच न सांगती ॥ १७७ ॥ केरल देशांत पूर्णातटीं । ग्राम जें कां कालडी । तेथें शिवगुरूच्या पोटीं । आचार्य जन्म पावले ॥ १७८ ॥ अखेर हिमालयाला । जाऊन गेले कैलासाला । ह्याच इतर लेखकांना । गोष्टी मान्य असती कीं ॥ १७९ ॥ यांत मुख्य विद्यारण्य । जे पूर्वींचे प्रधान । माधवाचार्य म्हणून । बुक्कराजाचे होते कीं ॥ १८० ॥ या

माधवाचार्यांचा । थोर अधिकार होता साचा । हा राजराजेश्वर पंडिताचा । होऊन गेला ते कालीं ।। १८१ ।। विद्यारण्य नांव याचें । पडलें संन्यासानंतरचें । हे गादीवरी शृंगेरीचे । आचार्य म्हणून होते कीं ।। १८२ ।। पंचदशी नामें ग्रंथ । यांनींच केला गीर्वाणांत । तैशींच प्रकरणें अगणित । विद्वत्ताप्रचुर लिहिलीं कीं ।। १८३ ।। श्रीशांकरदिग्विजय नांवाचा । ग्रंथ यांनींच केला साचा । त्या विद्यारण्य स्वामींचा । प्रभाव वानूं कोठवर ? ।। १८४ ।। त्याच ग्रंथाच्या आधारें । हें प्राकृत चरित्र लिहिलें खरें । इतर मतमतांतरें । जमेस मीं न धरलीं कीं ।। १८५ ।। त्या मतमतांतरींचें कथन । थोडक्यांत तुम्हांलागून । करतों तिकडे अवधान । द्यावें तुम्हीं आपुलें ।।१८६।। कोणी शंकराचार्यांप्रत । झाले इसवी सनांत । ऐशापरी मानितात । कांहीं आधार देऊनिया ।।१८७।। केरलोत्पत्तीय ग्रंथांत । ऐशापरी आहे ग्रथित । पेरुमल्ल नामें नृपनाथ । होता केरल देशींचा ।।१८८।। हा चेरमान पेरुमल्ल नांवाचा । राजा समकालीन साचा । होता तोच पुढें साचा । झाला असे मुसलमान ।।१८९।। अबदुल रहिमान आपुलें । नांव त्यांनीं धारण केलें । अरबस्तानामाजीं केलें । जफारगांवीं वास्तव्य ।। १९० ।। याच जफार गांवांत । हा पेरुमल्लनामें नृपनाथ । पावता झाला पंचत्व । हिजरी दोनशें सोळामधें ।। १९१ ।। येथें त्याच्या थडग्यावरी । ऐशीं अक्षरें आहेत खरीं । म्हणून इसवीसनामाझारीं । आचार्य झाले असावे ।। १९२ ।। परि समकालीन आचार्यांचे । होता केरल देशाचे । जो गादीवरी नांव त्याचें । चंद्रशेखर होतें कीं ।। १९३ ।। हा चंद्रशेखर भूपति । कवि होता निश्चितीं । यानें स्वकपोलकल्पित रचिलीं होतीं । गीर्वाणीं तीन नाटकें ।। १९४ ।। म्हणून इसवी सनांत । नाहीं आले जन्माप्रत । आचार्य जगद्गुरु सत्य । ख्रिस्तापूर्वी जन्म त्यांचा ।। १९५ ।। हा सर्वमान्य अलौकिक पुरुष । झाला जरी भारतात । तरी त्याच्या निंदेस । कांहीं करीत होतेच कीं ।। १९६ ।। जिनविजयीं मणिमंजरीं । मध्वविजय त्याच परी । या ग्रंथांमाझारीं । आचार्यांची निंदा असे ।। १९७ ।। हे विरोधी ग्रंथ तीन । झाले जरी निर्माण । तरी आचार्यांचें मोठेपण । आलें न झांकितां तयांना ।। १९८ ।। निराधार निंदा केली । ती काल्पनिक कथेनें रंगविली । जैशी दिवाभीतें थुंकलीं । तोंडावरी रवीच्या ।। १९९ ।। मध्वविजय ग्रंथांत । जगद्गुरु

आचार्यांप्रत । ठरविलें आहे पाहा दैत्य । मणिमान नांवाचा ।। २०० ।। पुढें वायुदेवांनीं । मध्वाचा अवतार घेऊनी । वादांत टाकिले जिकुनी । श्रीमत् शंकराचार्यांना ।। २०१ ।। ऐशीं नाना मतें त्यांनीं । ठेविलीं आहेत लिहूनी । नको करणें या ठिकाणीं । छाननी त्यांची विबुध हो! ।।२०२।। आचार्यांचें निर्याण । कार्तिक पौर्णिमेस झालें जाण । युधिष्ठिर शकालागून । दोन हजार सहाशेंत्रेसष्टीं ।।२०३।। ऐसेंहि आहे कोणीं लिहिलें । कोणीं निर्याण सांगितलें । मार्गशीर्षमासीं भलें । सोमप्रदोषीं सायंकाळीं ।। २०४ ।। ऐशीं नाना मतें सांगूं जातां । पार न येईल सर्वथा । चिकित्सकांच्या शोधितां मतां । वैशाख शुद्ध त्रयोदशी ।। २०५ ।। हीच आहे खरी तिथि । संशय नका धरूं चित्तीं । काय पाहिजे तें बकती । द्वेषी विद्वान् ग्रंथांतून ।। २०६ ।। या निर्याण-जन्मांचे तिथींत । जो कां फरक आहे पडत । त्याचें मशीं वाटत । कारण ऐसें असावें ।। २०७ ।। या जन्ममरणांच्या तिथि । कोणाच्या तरी असूं शकती । शंकराचार्यांच्या निश्चितीं । ये विषयीं शंका नसे ।। २०८ ।। का कीं जगद्गुरूंचे । मठ अद्वैत मताचे । बहुत झाले असती साचे । या भरतवर्षांत ।। २०९ ।। त्या कोण्यातरी मठाधिपतीची । ती ती तिथि असेल साची । तिलाच आद्य आचार्यांची । तिथि मानली असेल पुढें ।। २१० ।। कां कीं सर्व आचार्यांप्रत । शंकराचार्य हें लागत । विशेषण पाहा सत्य । तेथें व्यक्तीचा विचार नसे '।। २११ ।। वल्लिसहाय, सदानंद । चिद्विलास कवि प्रसिद्ध । या तिघांनींहि अनुवाद । विद्यारण्यांचा केला असे ।।२१२।। म्हणजे या चारी ग्रंथांत । जन्म, काल आणि कथेंत । फरक नाहीं यत्किंचित् । तेंच प्रमाण धरिलें म्यां ।। २१३ ।। आणि त्यांच्याच आधारें हा ग्रंथ । श्रीशंकराचार्यचरितामृत । लिहिला मीं प्राकृतांत । महाराष्ट्र भाषेमधें ।।२१४।। आतां या मठाच्या कथेसी । सांगेन पुढीलाध्यायासी । सादर बसा श्रवणासी । तुम्ही उदार श्रोते हो ! ।। २१५ ।। इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ।। २१६ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

# अध्याय छत्तिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे शिवविरंचिविष्णुरूपा ! । पांडुरंगा मायबापा ! । देवाधिदेवा ! करा कृपा । या दासगणूवरी ॥ १ ॥ मुख्य मठ आचार्यांचे । पांच स्थापित झाले साचे । त्यांपैकीं चहूंचें । वर्णन झालें गताध्यायीं ॥ २ ॥ हा मठ कांचीचा । पांचवा होय साचा । कामकोटि नांवाचा । संप्रदाय मिथ्यावार ॥ ३ ॥ मौलाम्नाय क्षेत्र कांची । देवता एकाग्रनाथ यांची । कामकोटि शक्ति साची । तीर्थ कम्पासर असे ॥४॥ संन्यासनाम इंद्रसरस्वती । वेद ऋग्वेद यांप्रती । ॐतत्सत् या रीतीं । महावाक्य या मठाचें ॥ ५ ॥ या मठाचे आधारभूत । दोन ग्रंथ आहेत । महत्त्व त्यांतलें त्यांत । पुण्यश्लोक मंजरीला ॥ ६ ॥ ब्रह्मेंद्रसरस्वतीकृत । गुरुरत्नमालिका ग्रंथ । आहे या दोहोंत । या मठाचें वर्णन असें ॥ ७ ॥ या कांची आणि शृंगेरीमठीं । कटकट माजती झाली मोठी । या दोघांनीं खटपटी । केल्या निज श्रेष्ठत्व दावावया ॥ ८ ॥ या कांची मठावर । आडुसष्ट स्वामी आजवर । झाले, हल्लीं गादीवर । चंद्रशेखरेंद्रसरस्वती ॥ ९ ॥ कांची ऊर्फ कुंभकोण । मठ पांचवा असे जाण । यापरीच उरले तीन । कुडलगी, करवीर, मुलबागल ॥ १० ॥ या कांची मठाचें स्थलांतर । होत गेलें वरचेवर । मूळचें स्थान दृग्गोचर । होत नाहीं अजूनिया ॥ ११ ॥ चहूंचे झाले आठ । हे शंकराचार्य मठ । अवघ्यांमाजीं अति श्रेष्ठ । मठ जो तो शृंगेरी ॥ १२ ॥ कस्तुरी अष्टगंधांत । वा कांचन अष्टधातूंत । तैसा अवघ्या मठांत । शृंगेरीमठ हा श्रेष्ठ असे ॥ १३ ॥ या शृंगेरी मठाची बरोबरी । कोणालाहि न येईल खरी । आद्य आचार्यांची स्वारी । येथें होती बहुत दिवस ॥ १४ ॥ विद्यारण्याच्या कालीं भले । कांहीं शाखा मठ उदया आले । कर्त्या पुरुषांनीं स्थापिलेले । हंपी, पुष्पगिरि, शिवगंगा ॥ १५ ॥ ऐशा रीतीनें नानापरी । मठ स्थापिले भूमीवरी । श्रीआचार्यांच्या नांवावरी । ते मीं बहुतेक सांगितले ॥ १६ ॥ आचार्यांच्या शिष्यांत । मंडणमिश्र अत्यंत । मोठा आणि प्रज्ञावंत । श्रीशारदेचा लाडका ॥ १७ ॥ सुरेश्वराचार्य ज्यांचें । संन्यास नाम होतें साचें । हेच प्रथम शृंगेरीचे । गादीवर बसले कीं ॥ १८ ॥ या सर्व

आचार्यमठांत। गुरुपरंपरा जी म्हटली जात। तीच मी बुध हो! देतसें येथ। तिकडे अवधान असूं द्या ॥ १९ ॥

शिवं ज्ञानोपदेष्टारं विष्णुं धर्मोपदेशकम्।
विधिं वेदप्रवक्तारं गुरुमूर्तित्रयं भजे ॥ १ ॥
वसिष्ठं ब्रह्मविच्छ्रेष्ठं शक्तिं योगविदां परम्।
पराशरं पुराणज्ञं प्रणतोऽस्मि मुनित्रयम् ॥ २ ॥
व्यासं वेदान्तसूत्राणां वक्तारं बादरायणम्।
श्रीशुकं सूत्रकारं च भजे वेदान्तदेशिकौ ॥ ३ ॥
श्रीमद्गौडपदाचार्यमद्वैतार्थप्रबोधकम्।
गोविंद भगवत्पादमद्वैताचार्यमाश्रये ॥ ४ ॥
अद्वैतस्थापनाचार्यं शंकरं लोकसद्गुरुम्।
प्रस्थानत्रयभाष्यादिग्रन्थकारं नमाम्यहम् ॥ ५ ॥

शिव, विष्णु, सावित्रीवर। वसिष्ठ, शक्ति, पराशर। व्यास, शुकाचार्य थोर। गौडपाद, गोविंदयति ॥ २० ॥ या दहा नांवांचिया पुढती। आद्य आचार्यांचें नांव देती। तेच अकरावे निश्चितीं। योग्य प्रातःस्मरणातें ॥ २१ ॥ थोडच्याबहुत फरकेंकरून। हींच अवघ्या मठांतून। नांवें ऐकूं येतीं जाण। प्रत्येक कार्याच्या आरंभीं ॥ २२ ॥ आतां शृंगेरीची परंपरा। सांगतों ती ध्यानीं धरा। पहिला मान सुरेश्वरा। मिळता झाला ये मठीं ॥ २३ ॥ हे सुरेश्वराचार्य सन्मति। बहुत वर्षें गादीवरती। होते, कोणी ऐसें म्हणती। आठशें वर्षें जगले हे ॥ २४ ॥ योगशास्त्र असल्या येत। या सुरेश्वराचार्यांप्रत। आठशें वर्षांची न किंमत। हजारों वर्षें जगे योगी ॥ २५ ॥ तापीचिया तीराला। चांगदेव नामें योगी झाला। तो चौदाशें वर्षें वांचला। अंगिच्या योगसामर्थ्यें ॥ २६ ॥ तेंवि आचार्य सुरेश्वर। वांचले असतील साचार। या योगबळें भूमीवर। बाटोळें त्यांचें हल्लीं झालें ॥ २७ ॥ या योगसामर्थ्याच्या कथा। काल्पनिक वाटूं लागल्या चित्ता। योग गप्पेचा नाहीं गाथा। अनुभवून त्या पाहावें ॥ २८ ॥ सुरेश्वराचे मागून। स्वामी नित्य बोधघन। चौथे असती ज्ञानघन। ज्ञानोत्तम शिवाचार्य पांचवे ॥ २९ ॥ स्वामी सहावे ज्ञानगिरि। सातवे ते सिंहगिरि। ईश्वरतीर्थ यानंतरी। नववे नरसिंहतीर्थ पाहा ॥ ३० ॥ विद्यातीर्थ ऊर्फ विद्याशंकर। हे दहावे स्वामी गादीवर। ते होते गुरुवर।

प्रख्यात सायणाचार्यांचे ।। ३१ ।। भारतीकृष्ण अकरावे । विद्यारण्य ते बारावे । हे पूर्वाश्रमीं दिवाण बरवे । होते विजयानगर राजाचे ।। ३२ ।। तेरा चंद्रशेखरभारती । पुढें नर्रासहभारती । पंधरा पुरुषोत्तमभारती । शंकरानंद सोळावे ।। ३३ ।। सतरा भारती चंद्रशेखर । नर्रासहभारती नंतर । एकुणविसावे पुरुष थोर । पुरुषोत्तमभारती नांव यांचें ।। ३४ ।। रामचंद्रभारती विसावे । नर्रासहभारती पांचवे । नर्रासहभारती सहावे । चोवीसावा पुरुष हा ।। ३५ ।। स्वामी गादीस तेविसावे । नर्रासहभारती पांचवे । नर्रासहभारती सहावे । चोवीसावा पुरुष हा ।। ३६ ।। पुढें सच्चिदानंदभारती । मागून नर्रासहभारती । पुन्हा सच्चिदानंदभारती । सत्ताविसावा पुरुष हा ।। ३७ ।। अभिनव सच्चिदानंदभारती । हे अठ्ठाविसावे पुरुष निश्चितीं । अभिनव नर्रासहभारती । सच्चिदानंद तिसावा ।। ३८ ।। अभिनव सच्चिदानंदभारती । बत्तिसाव्या स्वामींप्रती । आठवे नर्रासहभारती । ऐशापरी नांव असे ।। ३९ ।। इसवी सन अठ्ठ्याहत्तरीं । यांची समाधि झाली खरी । हे शृंगेरीच्या गादीवरी । एकसष्ट वर्षें होते कीं ।। ४० ।। सच्चिदानंद शिवाभिनव । नर्रासहभारती ऐसें नांव । या स्वामींचा गुणगौरव । करावा तितका होय थोडा ।। ४१ ।। यांनीं जीर्णोद्धार कालडीचा । केला उत्तम प्रकारचा । कित्ता उचलावा सदैव यांचा । इतर मठांच्या स्वामींनीं ।। ४२ ।। हे इसवी सन एकोणीसशें बारांत । झाले असती समाधिस्थ । यांनीं चौतीस वर्षेपर्यंत । आचार्यपद भोगिलें ।। ४३ ।। चंद्रशेखरभारती । हल्लीं आहेत गादीवरती । हे चौतिसावे पुरुष निश्चितीं । विद्वान्, रसिक, सर्वज्ञ ।। ४४ ।। मठ जो कां गोवर्धन । जगन्नाथक्षेत्रीं जाण । तेथील गादीस आरोहण । पहिलें पद्मपादाचें ।।४५।। या गोवर्धन मठास । स्वामी एकशें बेचाळीस । हल्लींचिया स्वामींस । नांव मधुसूदनतीर्थ असे ।। ४६ ।। द्वारावतीचे मठावर । स्वामी बसले सत्याहत्तर । श्रीस्वरूपानंद साचार । नाम हल्लींच्या स्वामींना ।। ४७ ।। उत्तर बद्रीमठासी । तोटकाचार्य पुण्यराशि । बसले आचार्यपीठासी । त्यानंतरीं कोणी नसे ।। ४८ ।। त्या उत्तर बद्रीमठांत । संन्याशी बहुत राहतात । परि पटाधिकार कोणाप्रत । नाहीं दिला गेला कीं ।। ४९ ।। आतां संकेश्वर मठाचें । कथन ऐका ! तुम्ही साचें । शंकरभारती नांवाचे । एक शृंगेरीचे मठाधिपति ।। ५० ।। हे स्वामी हिमालयांत ।

गोविंदगुरूची पाहण्याप्रत। गुहा, गेले वैभवासहित। शके चौदाशें बेचाळिसीं ॥ ५१ ॥ लवाजमा बरोबरीचा। पायथ्यासी ठेविला साचा। त्या हिमालयपर्वताच्या। आपण एकटे वर गेले ॥ ५२ ॥ वरतीं जातां कारभाऱ्यासी। बोलते झाले पुण्यराशि। मी गोविंदगुरूच्या गुहेसी। जातों आहें पाहावया ॥ ५३ ॥ गोविंदगुरूच्या गुहा दोन। एक नर्मदा-तटीं जाण। ती मी आलों पाहून। आतां राहिली येथचि ॥ ५४ ॥ ती मी जातों पाहावया। तुम्हां येथें सोडूनिया। कां कीं हिमालयाच्या ठायां। तुम्हां न धीर निघेल कीं ॥ ५५ ॥ वाट आहे अति कठीण। हिमाचा ताप दारुण। उंच उंच एकाहून। एक शिखरें पर्वताचीं ॥ ५६ ॥ मानस सरोवर सान्निध्यासी। आहे कैलास पर्वतासी। गोविंदगुरूची गुहा खाशी। ती पाहण्या जातों मी ॥ ५७ ॥ तुम्ही दोन महिनेपर्यंत। वाट माझी पाहा येथ। मीं दिलेल्या मुदतींत। माझें येणें न झालें जरी ॥ ५८ ॥ तुम्ही लवाजम्यासह परत जावें। योग्य शिष्यास निवडावें। आणि मठाधिपति करावें। सशास्त्र दीक्षा देऊनिया ॥ ५९ ॥ ऐशी आज्ञा करून। स्वामी गेले निघून। कैलास मानसाकारण। चित्तीं आतुर होऊनिया ॥ ६० ॥ दोन महिने निघून गेले। स्वामी नाहीं परत आले। म्हणून कारभारी परत फिरले। लवाजम्यासह शृंगेरीसी ॥६१॥ योग्य शिष्या बसविला। शृंगेरीच्या पीठाला। इकडे वृत्तान्त कैसा झाला। तो आतां सांगतां ॥ ६२ ॥ श्रीशंकरभारती पाहा। संपवून तो खडतर महा। प्रवास, आले पाहून गुहा। श्रीगोविंदगुरूंची ॥ ६३ ॥ स्वामी कर्नाटक देशीं आले। कारभाऱ्या सांगून पाठविलें। आम्ही शृंगेरीस येतों वहिलें। पुढील तर्तूद सर्व ठेवा ॥ ६४ ॥ ऐसा निरोप ऐकल्यावरी। भेटण्या आला कारभारी। सोडून मठ शृंगेरी। श्रीशंकरभारतीला ॥ ६५ ॥ प्रथमतः करून वंदन। बोलता झाला कर जोडून। आपणां येण्याचें प्रयोजन। उरलें न आतां शृंगेरीसी ॥ ६६ ॥ आज्ञेनुरूप आपुल्या। आम्हीं सर्व गोष्टी केल्या। कांहीं न बाकी ठेविल्या। शिष्य बसविला गादीवरी ॥ ६७ ॥ आतां शृंगेरीं येण्याचें। कांहीं प्रयोजन नुरलें तुमचें। एकाच वेळीं न व्हावयाचे। दोन अधिकारी गादीला ॥ ६८ ॥ जेंवि एक्या म्यानांत। दोन तलवारी न राहतात। म्हणून आतां तुम्हांप्रत। येतां न येईल शृंगेरीला ॥ ६९ ॥ इकडेच आतां

कोठेंतरी । राहा जाऊन गंगातीरीं । नाहीं राहिला शृंगेरीं । स्वामी आपुला मठ आतां ।।७०।। ऐसें वचन ऐकिलें । स्वामी थोडे खिन्न झाले । कुडलगींत राहिले । कांहीं काळपर्यंत ।। ७१ ।। या कुडलगी ग्रामीं भली । नवी गादी स्थापिली । जहागीर मिळवून ठेविली । निजामाकडून मठातें ।। ७२ ।। आचार्यपरंपरेंत । वरचेवर येतात । सारखीं नांवें पाहा बहुत । तींच तीं पुन्हां पुन्हां ।। ७३ ।। म्हणून इतिहासाचा । घोटाळा तो होतो साचा । तो सोडून कथेचा । भाग ध्यानीं धरणें असे ।। ७४ ।। असो कुडलगी मठाची । स्थापना ती करून साची । स्वारी शंकर-भारतीची । महायात्रेस निघाली ।। ७५ ।। स्वामी यात्रा करीत करीत । आले वल्लभगडाप्रत । तेथे देवता जागती ज्योत । हरिद्रानामें देवी असे ।। ७६ ।। वल्लभगड उत्तरेसी । संकेश्वराच्या निश्चयेंसी । तेथें शंकर-भारतीसी । दृष्टान्त ऐसा जाहला ।। ७७ ।। तुम्हांस यात्रेचें प्रयोजन । आतां मुळींच राहिलें न । तुम्ही दक्षिणदिशा लक्षून । जावें संकेश्वराला ।। ७८ ।। स्वामी तया संकेश्वरीं । तुम्ही पूजित राहा मन्मथारि । जग सुनीतिपथावरी । आणूनिया सोडणें ।। ७९ ।। या दृष्टान्तेंकरून । स्वामी संकेश्वरालागून । येते झाले, केलें स्नान । हिरण्यकेशी सरितेचें ।। ८० ।। या हिरण्यकेशी नदींत । तीर्थ आहे महापुनीत । जयालागीं प्रचारांत । शुक्लतीर्थ बोलती ।। ८१ ।। शुक्लतीर्थी त्रिकालस्नान । श्रीशंकराचें पूजन । अस्तमानीं प्रवचन । होई वैदिक धर्मावरी ।। ८२ ।। ऐसा क्रम तेथें चालला । तों एक वृत्तान्त ऐसा झाला । रणदुल्लाखान आला । सरदार विजापुरकरांचा ।। ८३ ।। हा रणदुल्लाखान सरदार । वेदान्ताचा भोक्ता फार । तो श्रवणा बैसला सादर । एके दिनीं स्वामींच्या ।।८४।। स्वामीप्रवचन ऐकिलें । चित्त त्याचें मुदित झालें । त्यांनीं मुद्दाम वाढ-विलें । मुक्काम प्रवचन ऐकावया ।। ८५ ।। मधूचा सुवास लाभतां देखा । मुदित होते मधुमक्षिका । वा पाहावयासी मृगांका । चकोर जैसा हर्षतो ।। ८६ ।। स्वामीवदनकमल सत्य । व्याख्यान हाच मधु तेथ । तो मधु सेवण्याप्रत । खान हाच भ्रमर आला ।। ८७ ।। त्यांनीं कांहीं स्वामींसी । इनाम दिलें अति हर्षी । आतांचे राजवटीसी । ऐसें घडणें अशक्य ।।८८।। हल्लींचिया राज्यांत । पदव्यांची मात्र खैरात । ज्या पदवीचा मुळीं न होत । उपयोग उदर भरावया ।।८९।। उलट पोकळ पदवी सांभाळण्यासी ।

कर्ज होतें बहुवसी । पानसुपाऱ्या वरिष्ठांसी । कराव्या लागती वरचेवर ॥९०॥ ऐसा काल तेव्हांचा । श्रोते ! नव्हता मुळींच साचा । अम्मल जरी यवनांचा । झाला होता या देशीं ॥ ९१ ॥ त्याहि यवन अमदानींत । जहागीर वैदिक धर्माप्रत । मिळाली हें ध्यानांत । ठेविलें पाहिजे सर्वांनीं ॥९२॥ रणदुल्ला निघून गेला । स्वामी संकेश्वराला । राहिले, तेथें स्थापिला । कुडलगीपरी नवीन मठ ॥ ९३ ॥ याच संकेश्वर मठाप्रती । कोल्हापुरचे छत्रपति । खर्चासाठीं निश्चितीं । देते झाले जहागीर ॥ ९४ ॥ म्हणून करवीर संकेश्वर ऐसें भलें । जोडनांव त्या प्राप्त झालें । या पीठावर बसलेले । स्वामी आतां सांगतों ॥९५॥ प्रथम देवगोसावी शंकरभारती । दुसरा नरसिंहभारती । तैलंग स्वामी यांनाच म्हणती । तिसरे विद्याशंकर लाठीचे ॥ ९६ ॥ पुढें विद्यानरसिंह काशीकर । विद्याशंकर अष्टीकर । विद्याशंकर नूलकर । रामशास्त्री नांव ज्यांचें ॥ ९७ ॥ शंकरभारती मुतनालकर । आठवा शंकरभारती नांदेडकर । नववे बाबदेव लाटकर । शंकरभारती नांव ज्यांचें ॥ ९८ ॥ नरसिंहभारती यज्ञेश्वर । हे पुण्याचे होते राहणार । अकरावे ते साचार । शंकरभारती लाठीचे ॥ ९९ ॥ बारावे नरसिंहभारती । वाडीकर रामशास्त्री । द्रवीडस्वामी यांना म्हणती । अथवा तैलंगस्वामी विबुध हो ! ॥ १०० ॥ भैरव दीक्षित कऱ्हाडकर । हे तेरावे भारतीशंकर । चौदावे अप्पा साचार । कऱ्हाडचे नरसिंहभारती ॥ १०१ ॥ पंधरावे जोशी गंगाधर । जे भिलवडीचे राहणार । यांचें आश्रमनांव साचार । होतें शंकरभारती ॥ १०२ ॥ रघुनाथ जोशी भिलवडीचे । हे सोळावे स्वामी साचे । नरसिंहभारती नांवाचे । संकेश्वर मठावरी ॥ १०३ ॥ हनुमंत शंकरभारती । व्यंकटशास्त्री नरसिंहभारती । एकूणविसावे स्वामी निश्चितीं । वासुदेवभारतीशंकर ॥ १०४ ॥ नरसिंहभारती अथणीशंकर । शंकरभारती वाईकर । नरसिंहभारती शिरोळकर । हल्लीं संकेश्वर मठावरी ॥ १०५ ॥ या संकेश्वर मठाभीतरीं । तींच तीं नांवें वरच्यावरी । एकामागून एक खरीं । येत असती विबुध हो ! ॥ १०६ ॥ शंकरभारती, नरसिंहभारती । त्यांचा क्रम येणें रीतीं । कांहीं दिवस होती वस्ती । मुख्य स्वामींची करवीरा ॥ १०७ ॥ संकेश्वरीं उत्पन्न झाला । करवीरीं वाढीस लागला । तोच पुन्हां जातां झाला । पहिल्या ठिकाणीं सांप्रत ॥ १०८ ॥ शंकरभारती

मुतनालकर । हे असतां गादीवर । करवीर मठाच्या साचार । ऐशी गोष्ट घडली कीं ।। १०९ ।। शके सोळाशें पंचाणवांत । करवीर मठ जाळिला सत्य । कर्मे होतीं अनन्वित । स्वार्थबुद्धि बळावल्या ।। ११० ।। पटवर्धन नामे कोन्हेर । होता पेशव्यांचा सरदार । त्यांनीं आपुली तलवार । मठावरी चालविली ।। १११ ।। म्हणजे द्रव्यलोभेंकरून । मठ टाकिला जाळून । कोणी म्हणती शत्रूलागून । मठीं लपविलें स्वामींनीं ।। ११२ ।। म्हणून कोन्हेररावाला । मठ जाळण्याचा प्रसंग आला । खरें खोटें ईश्वराला । माहीत, तें न इतरां कळे ।।११३।। याच वेळीं साचार । सातारा, पुणें, कोल्हापुर । यांमधें होती वाढली फार । दुही कांहीं कारणामुळें ।। ११४ ।। सातारकराच्या बाजूस बरवे । होते मुख्य प्रधान पेशवे । म्हणून त्यांच्या मागें जावे । सरदार हा न्यायचि ।। ११५ ।। मूळ सातारा आणि कोल्हापुरीं । भाऊबंदकी माजली पुरी । सातारकरांची बाजू खरी । धरणें आलें पेशव्यांना ।। ११६ ।। या भाऊबंदकीच्या वादांत । मठ झाला भस्मीभूत । अभिमान वाढल्या नाहीं टिकत । सद्विचार सन्नीति ।।११७।। मठ जळाला म्हणून । स्वामी गेले संतापून । त्यांनीं जीभ आपुली ओढून । सिद्धेश्वरीं प्राण दिला ।। ११८ ।। हें सिद्धेश्वर स्थान । वाळव्याच्या सन्निध जाण । तेथे भरते अजून । यात्रा मोठी दरवर्षी ।। ११९ ।। कोन्हेरें लुटला मठांत । गादी जाळून केला वीट । हें पाप झालें अचाट । तें भंवलें तिघांना ।।१२०।। स्वामिशापेंकरून । हतवीर्य झाले पटवर्धन । पेशवाईस लागलें ग्रहण । राज्य बुडालें सातारचें ।। १२१ ।। संन्याशाची मालमत्ता । ही सार्वजनिक हिताकरितां । नाहीं स्वामींस लोळण्याकरितां । मखमलीच्या गादीवरी ! ।।१२२।। स्वार्थपरायण राजे झाले । धर्माधर्म न त्यांना कळले । गुरु मुळींच च्युत झाले । गुरुपणापासून ।। १२३ ।। सद्गुरु तें संरक्षण । त्यांचें तेच करिती जाण । पाहा ऋकच पावला मरण । नुसत्या स्वामींच्या दृष्टिपातें ।। १२४ ।। त्या जगद्गुरु आचार्यांप्रत । सामर्थ्य होतें जागृत । सामर्थ्याचे विरहित । जें गुरुपण तें बेगडी ।। १२५ ।। पुढें वासुदेवशास्त्री भिलवडीचे । जेव्हां या संकेश्वरमठाचे । शंकरभारती नांवाचे । होते झाले मठाधिप ।। १२६ ।। त्या वेळीं करवीरांत । दुही ब्राह्मण-मराठ्यांत । निरर्थक वाढली बहुत । अशुभ करण्या दोघांचें ।। १२७ ।। वेदोक्ताचा नाग भला । छत्रपतीनें उत्पन्न

केला । तो ब्राह्मण-मराठ्यांना । सारखाच डसता झाला कीं ।। १२८ ।। मराठ्यांनीं आपुला । क्षात्रगुरु उत्पन्न केला । अधिकाराविण लाधला । गुरुपणा त्या बिचाऱ्यासी ।। १२९ ।। श्रोते ! या वेळचा । हट्ट ब्राह्मण वर्गाचा । निरर्थक होता साचा । ज्या हट्टांत हंशील नसे ।। १३० ।। इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी । या परकीय देशांतुनी । तद्देशीय भाषांमधुनी । झालीं वेदांचीं भाषांतरें ।। १३१ ।। वेद परक्यांनीं घोकिला । अर्थ त्यांचा धुंडाळिला । आणि लिहूनहि ठेविला । तो पटला ब्राह्मणांसी ।। १३२ ।। आणि या ठिकाणीं । वेद म्हणतां मराठ्यांनीं । कां जावें संतापुनी । ब्राह्मणांनीं त्या वेळच्या ? ।। १३३ ।। आजपर्यंतच्या मराठ्यांना । हा ढंग नव्हता सुचला । त्यांनीं अवघ्या ब्राह्मणांना । आपले गुरु मानिलें ।। १३४ ।। वाक्य ब्राह्मणमुखींचें । वेदतुल्य मानिलें साचें । रक्षण सदाचारतेचें । केलें होतें ब्राह्मणांनीं ।। १३५ ।। कां कीं सदाचाराविना । वेदवाक्य तें फळेना । शक्तीवांचून येईना । तलवार धरण्या जोर कधीं ।। १३६ ।। असो चूक झाली दोघांची । ती दोघांना भंवली साची । ज्योत ब्रह्मद्वेषाची । भंवली कोल्हापुरकराला ।। १३७ ।। हल्लीं करवीर पीठ नाहीं उरलें । फक्त संकेश्वर राहिलें । तेथें अधिकारी सांप्रत भले । नरसिंहभारती शिरोळकर ।।१३८।। हे शिरोळकर नरसिंहभारती । उत्तम प्रकारचे वैदिक असती । यांनीं स्थापिला पुण्याप्रती । मठ एक अलीकडे ।। १३९ ।। आचार्यमूर्तीची स्थापना । या मठांत केली जाणा । पर्वणी पुणेंकरांना । स्वामींनीं ही आणून दिली ।। १४० ।। आतां हंपी-विरूपाक्ष मठाची । कथा मी सांगतों साची । ही एक शृंगेरीची । शाखा आहे विबुध हो ! ।। १४१ ।। सुमारें शके बाराशें तिसांत । श्रोते ! कर्नाटक देशांत । संगम पुरोहित वंशांत । महापुरुष जन्मला ।। १४२ ।। माधवाचार्य नांव यांचें । माहेर अवघ्या विद्वत्तेचें । जे शृंगेरीच्या गादीचे । झाले पुढें अधिकारी ।। १४३ ।। या माधवाचार्यांचा पिता । मायनदेव तत्त्वतां । लक्ष्मीनामें होय माता । सायणाचार्य कनिष्ठ बंधु ।। १४४ ।। यादव कुलींचा संगमनृपति । होता, जहागिरदाराप्रती । पांच पन्नास खेड्यांवरती । अम्मल याचा चालतसे ।। १४५ ।। या संगमनामें नृपातें । पांच पुत्र झाले होते । नांव थोरल्या पुत्रातें । हरिहर ऐसें होतें हो ! ।। १४६ ।। हीं भावंडें आचार्यांपाशीं । शिकत होतीं अहर्निशीं । जेंवि

सांदीपनीचे सदनासी । रामकृष्ण शिकत होते ।। १४७ ।। या वेळीं कर्नाटकाला । मलिककाफूर होता आला । त्यानें धुमाकूळ मांडिला । न भूतो न भविष्यति ।। १४८ ।। त्यानें यादव काकतीय व होयसळ । ही राज्यें जीं महासबळ । तीं बुडविलीं तत्काळ । आपुल्या बाहुबलानें ।। १४९ ।। दक्षिणेकडे या वेळीं । झाली होती दुफळी । हिंदूसमाजीं न राहिली मुळीं । एकी कोठेंहि विबुध हो ।। १५० ।। आचार्यांचें अद्वैत । जें एकी तत्त्वास मूलभूत । तें राहिलें शब्दांत । म्हणून ऐसें जाहलें ।। १५१ ।। नाना मतें उत्पन्न झालीं । भरमसाट भूमंडळीं । तेणें एकी रुसून गेली । हिंदूसमाजा सोडूनिया ।। १५२ ।। म्हणून मलिककाफुराला । दक्षिणदेश जिंकितां आला । सिंह वनामाजीं कोल्हा । नांदूं लागला निर्भय ।।१५३।। त्यांनीं रामेश्वर क्षेत्रांतरीं । येऊन मशीद बांधली खरी । कोणी न उरला कैवारी । तया काळीं हिंदूंना ।। १५४ ।। मंदिरें केलीं जमीनदोस्त । मूर्ति फोडिल्या अगणित । दीन दुबळ्या हिंदूंप्रत । यवन बाटवूं लागले ।।१५५।। ही परिस्थिति पाहून । माधवाचार्यांचें कोमल मन । होतें झालें पाहा खिन्न । कांहीं एक सुचेना ।। १५६ ।। ऐशी त्यांची पाहून स्थिति । हरिहर म्हणाला गुरुमूर्ति ! । अलीकडे आपुली वृत्ति । ऐशी उद्विग्न कां हो असे ? ।। १५७ ।। तुम्ही आमुचे पुरोहित । आहांत गुरु साक्षात् । अहां कोणत्या अडचणींत । तें आम्हां निवेदावें ।। १५८ ।। आम्ही आपली इच्छा पुरवूं । मनिच्यामनीं नका ठेवूं । उद्विग्न ऐसें नका राहूं । आम्ही तत्पर सेवेला ।। १५९ ।। आपण जें जें सांगाल । तें तें आम्ही मानूं सकल । यांत ना अंतर होईल । वाहतों शपथ पायांची ।। १६० ।। ऐसें हरिहर बोलतां । संतोष झाला आचार्यचित्ता । ते म्हणाले ऐक आतां । उद्विग्नतेचें कारण ।। १६१ ।। मुलांनो ! आपुल्या कर्नाटका । यवनांनीं तुडविलें देखा । धनमान अवघ्या सुखा । मुकण्याची वेळ आली ।।१६२।। झाल्या न यवनांचा प्रतिकार । आपण होऊं बेजार । कित्येक करून धर्मांतर । गुलाम होतील यवनांचे ।। १६३ ।। जकणाचार्यांची शिल्पकला । आतां जाईल रसातळा । भाव येईल मशिदीला । मंदिरें होतील नामशेष ।। १६४ ।। कर्नाटक हिंदूंचा । असून होईल यवनांचा । अपमान वेदविद्येचा । होऊं लागेल चहूंकडे ।। १६५ ।। क्षेत्रें भ्रष्ट होतील । धेनु असंख्य मरतील । दुष्ट कुटिल चढतील । यवनशाहींत लौकिका ।।१६६।।

द्राविड, कानडी, गीर्वाण ।' जाऊन, आरबी, पर्शियन । बोलूं लागतील अवघे जन । भाव येईल 'अलिफाला' ।। १६७ ।। हरिहर म्हणाला त्यावरी । चिंता न करावी अंतरीं । आपुला वरदकर माझ्या शिरीं । ठेवा म्हणजे काम झालें ।। १६८।। आपुल्या कृपेकरून । नामशेष करीन अवघे यवन । कर्नाटकाचें संरक्षण । करून धर्म रक्षीन मी ।। १६९ ।। स्वदेश रक्षण्यासाठीं । करीन अनंत खटपटी । अमोल प्राणहि शेवटीं । मी वेंचीन देशास्तव ।। १७० ।। ते हरिहराचें बोलणें । आचार्यांनीं शांतपणें । ऐकूनिया कौतुकानें । आपुली मान तुकविली ।। १७१ ।। वाहावा वत्सा ! हरिहरा ! । याच कायम ठेवी विचारा । हे क्षत्रियाच्या पोरा ! । वीरवृत्ति न ढळूं दे ।।१७२।। स्वाभिमान वीरवृत्ति । तेंवि अलोट धर्मप्रीति । हींच भूषणें क्षत्रियांप्रती । तींच तूं धारण करी रे ! ।। १७३ ।। स्वराज्य स्थापन करण्याचें । काम सोपें नाहीं साचें । अलोट धैर्य नेत्याचें । ठायीं पाहिजे जागृत ।।१७४।। सैनिकबळ पाहिजे थोर । दूरदृष्टीचे सल्लागार । प्रेममय भूमीवर । आगळे पाहिजे प्राणाहुनी ।। १७५ ।। आशीर्वाद ईश्वराचा । नेत्यास पाहिजे साचा । तरीच आहे व्हावयाचा । अलभ्य लाभ हरिहरा ! ।।१७६।। बेकी हिंदुसमाजांत । वाढली आहे सांप्रत । आचार्यांचें अद्वैत । शब्दांमाजीं उरलें असे ।। १७७ ।। द्रव्यसहाय कोणीहि । एकमेकां करणार नाहीं । कां कीं एकमेकांविषयीं । द्वेष आहे जागृत ।। १७८ ।। हिंदूंत एकी वाढल्याविना । स्वराज्य स्थापन होईना । गो देव द्विजांचें हटेना । दैन्य तें येतुलेंहि ।। १७९ ।। गो या शब्देंकरून । गाय अथवा गरीब जन । जे उपयोगाकारण । समाजाच्या येतील ते ।। १८० ।। देव या शब्देंकरूनी । धार्मिक विधि घेणें जाणी । द्विज या शब्दापासुनी । अर्थ ऐसा निघतसे ।। १८१ ।। द्विज म्हणजे ब्राह्मण । वा अवघे विद्वज्जन । नाना शक्तींचें संशोधन । करणारे जे असतील ते ।। १८२ ।। या तिघांचें कल्याण । स्वराज्य स्थापन झाल्याविण । नाहीं होणार म्हणून । स्वराज्य स्थापन करा रे ! ।। १८३ ।। स्वराज्य स्थापन करण्याप्रती । जरी सध्यांची परिस्थिति । नाहीं अनुकूल निश्चितीं । व्यावहारिक दृष्टीप्रमाणें ।। १८४ ।। तरी हताश व्हावयाचें कारण । नाहीं आपणांलागून । ईश्वराचे धरितां चरण । हें अवघेंच घडून ये ।। १८५ ।। त्या ईश्वरप्राप्तीसी । मी बसतों तपासी । साह्य झाल्या

व्योमकेशी । पुढचा विचार पुढें करूं ॥ १८६ ॥ माधवाचार्य तपा बैसले । हंपी क्षेत्रामाजीं भले । पुरश्चरण आरंभिलें । स्नान करून तुंगातीरीं ॥ १८७ ॥ पूर्ण झालें पुरश्चरण । परि देवता प्रसन्न । नाहीं झाली म्हणून । माधव चित्तीं चिंतावले ॥ १८८ ॥ देवता प्रसन्न होईना । अनुष्ठानप्रेमा सुटेना । मात्र सुस्वप्नें आचार्यांना । पुढचीं पडूं लागलीं ॥ १८९ ॥ कंटाळुनी एके दिवशीं । आचार्य बोलले मानसीं । आतां घेऊन संन्यासासी । मुक्त व्हावें यांतून ॥ १९० ॥ देवता प्रसन्न होत नाहीं । माझें दुर्दैव असेल कांहीं । म्हणून लावतां येत नाहीं । दोष अनुष्ठानाकारणें ॥१९१॥ कांहीं असो संन्यास घ्यावा । मोक्षमार्ग साधावा । उगीच अपव्यय न करावा । आयुष्याचा येथून पुढें ॥ १९२ ॥ संन्यासाचा संकल्प । करून करीं घेतलें आप । पाणी सोडितां भगवत् स्वरूप । साकार पुढें राहिलें उभें ॥ १९३ ॥ प्रभू म्हणाले माधवास । कशाची तुला आहे आस । हें सांग, मी वरास । देण्यासाठीं प्रगटलों ॥ १९४ ॥ आचार्य म्हणाले आतां कांहीं । देवा ! तुला मागणें नाहीं । वेळ निघून गेली पाही । वर तो तुला मागण्याची ॥१९५॥ एक घटकेचिया आधीं । आला असतास कृपानिधि ! । तरीं झाली असती सुधी । गोष्ट ती जगदात्मया ! ॥ १९६ ॥ देव म्हणाले त्यावर । तूं करून पोक्त विचार । पाहा पुन्हां एकवार । म्हणजे बरें होईल ॥ १९७ ॥ तूं संन्यास सुखें घ्यावा । आपुला हेतु तडीस न्यावा । हरिहरांच्या करें बरवा । हिंदूसाम्राज्य स्थापण्याचा ॥ १९८ ॥ तुला स्वराज्य स्थापनेच्या वरचें । काम आहे करणें साचें । गादीस जगद्गुरूंचें । बसणें शृंगेरीस आहे तुला ॥ १९९ ॥ तें तूं आतां करावें । हिंदूसाम्राज्य स्थापावें । हरिहरांच्या करें बरवें । खोड मोडण्या यवनांची ॥ २०० ॥ वृद्धा न भातुकली खेळते । ती मुलीस खेळाया लाविते । कौतुकानें पाहत बसते । खेळ खेळत्या मुलींचा ॥ २०१ ॥ तैसें तुंवा करावें । हिंदूसाम्राज्य स्थापावें । जगद्गुरु होऊन पाहावें । कौतुक संगमपुत्राचें ॥ २०२ ॥ ज्या कारणासाठीं भलें । तप होतें तुंवा आरंभिलें । त्या तपाचें मिळविलें । फल पाहिजे साच तूं ॥ २०३ ॥ भाविक सदाचारसंपन्न । असून केल्या अनुष्ठान । त्या अनुष्ठानासी वांझपण । येणार नाहीं कधींहि ॥ २०४ ॥ त्या गोष्टीचें प्रत्यंतर । जगा दावावें सत्वर । उपयुक्त ऐसा मागे वर ।

मजपासुनी तेधवां ॥२०५॥ ऐसें प्रभू बोलतां । मोद झाला आचार्यचित्ता । चरणीं ठेवूनिया माथा । वर ऐसा मागितला ॥ २०६ ॥ मी म्हणेन त्या दिवशीं । हरिहरांच्या जहागिरीसी । सुवर्णहोनांचा व्योमकेशी । पर्जन्य पडावा दोन घटका ॥ २०७ ॥ 'तथास्तु' बोलून भगवान् । पावता झाला अंतर्धान । हें वराचें वर्तमान । आचार्य कथिलें हरिहरा ॥२०८॥ नेमल्या दिवशीं पाऊस पडला । सुवर्ण होनांचा तो भला । संगमपुत्रास आनंद झाला । हरिहराकारणें ॥ २०९ ॥ श्रोते ! याच द्रव्यानें । सैनिक बल वाढविलें त्यानें । आचार्यांच्या सल्ल्यानें । स्थापना केली राज्याची ॥ २१० ॥ हंपीचिया शेजारीं । नवें नगर तुंगातीरीं । स्थापिलें बसला गादीवरी । हरिहर पुत्र संगमाचा ॥ २११ ॥ सायणाचार्यांलागून । त्याचा केलें प्रधान । ऐशीं कृत्यें करून । माधव गेले शृंगेरीला ॥ २१२ ॥ संन्यासदीक्षा घेऊन तेथ । गादीवरी बसले सत्य । धारण केलें देहाप्रत । विद्यारण्य नाम ऐसें ॥ २१३ ॥ हे आचार्य बारावे । शृंगेरीच्या पीठीं बरवे । यांनीं पंचदशीसम नवे नवे । उपयुक्त ग्रंथ केले कीं ॥ २१४ ॥ शके तेराशें दोहोंसी । श्रीशंकराचार्यांचे गादीसी । पुनीत शृंगेरी पीठासी । विद्यारण्य बैसले ॥२१५॥ यांनींच नवी गादी भली । हंपीमाजीं स्थापन केली । हिंदूंची ती राखिली । बूज त्यांनींच ते वेळां ॥ २१६ ॥ स्वधर्म-स्वराज्यसंरक्षण । यांनींच केलें म्हणून । शृंगेरी-पीठाकारण । नवें विशे-षण प्राप्त झालें ॥ २१७ ॥ तें विशेषण ऐसें होय । कर्नाटक सिंहासन स्थापनाचार्य । पाहा ! केवढें केलें कार्य । पडत्या काळांत स्वामींनीं ॥ २१८ ॥ याचेंच नांव जगद्गुरु । उगे नव्हते पोटभरू । ब्रह्मज्ञानाचे सागरू । श्रीविद्यारण्य स्वामिराज ॥ २१९ ॥ शके तेराशें आठांत । स्वामी झाले समाधिस्थ । तया माझा दंडवत । वारंवार असो हा । ॥ २२० ॥ हल्लीं हंपीमठाच्या गादीवरतीं । अभिनवशंकरभारती । स्वामी आहेत निश्चितीं । संप्रदाय चालवावया ॥ २२१ ॥ आतां शिव-गंगामठाचा । इतिहास तुम्ही ऐका ! साचा । गंगावधुतुरु नांवाचा । पहिला आचार्य येथला ॥ २२२ ॥ बंगलोरच्या ईशान्येस । आहे एक्या टेकडीस । पुंडरीक नामें गांव, ज्यास । हल्लीं म्हणती शिवगंगा ॥२२३॥ श्रोते या टेकडीसी । तीर्थें असती बहुवसी । हा म्हैसूर प्रांतासी । नांवा-जलेला गांव असे ॥ २२४ ॥ शके सोळाशें अठ्याहत्तरांत । म्हैसूरचे

वाडियर नृपनाथ । यांनीं शृंगेरीच्या स्वामींप्रत । ऐशी केली प्रार्थना ॥ २२५ ॥ शृंगेरीची एक शाखा । शिवगंगेंत असावी देखा । गादीस बसण्यासारिखा । एक योगी तेथें असे ॥ २२६ ॥तो योगयोगांगें जाणत । शास्त्र जें कां वेदान्त । तें आहे करतलामलकवत् । जया योगी पुरुषाला ॥ २२७ ॥ त्या गंगावधुतुरु योग्याला । देऊन संन्यासदीक्षेला । करून घ्यावें आपुला । शिष्य स्वामी आम्हांस्तव ॥ २२८ ॥ आणि त्याचीच स्थापना खरी । करा शिवगंगा मठावरी । याविण आस नाहीं दुसरी । ती आपण पूर्ण करा ॥ २२९ ॥ तें स्वामींनीं मानिलें । गंगावधुतुरूस शिष्य केलें । संन्यासनाम ठेविलें । तयाचें विद्याशंकर ॥ २३० ॥ हा विद्याशंकरभारती । शिवगंगेच्या मठाप्रती । होता छत्तीस वर्षे निश्चितीं । आचार्य पहिला तेथींचा ॥ २३१ ॥ या शिवगंगा मठावरी । चौदा पुरुष आजवरी । हल्लींचे जे अधिकारी । ते पंधरावे विबुध हो ! ॥ २३२ ॥ सुब्रह्मण्ण अभिनवभारती । ऐसें नांव या स्वामींप्रती । हे आले गादी-वरती । शके अठराशेंमधें ॥ २३३ ॥ या म्हैसूरच्या वाडियर राजानें । या शिवगंगा मठाकारणें । कांहीं जहागिर वेतनें । दिलीं आहेत विबुध हो ! ॥ २३४ ॥ आतां द्वारका मठाचा । पुढील इतिहास ऐका साचा । सुळ-सुळाट यवनांचा । झाला जेव्हां द्वारकेकडे ॥ २३५ ॥ बहुतेक काठेवाड प्रांत । गेला यवनांचे ताब्यांत । हिंदूंचा तो अतोनात । छळ होऊं लागला ॥ २३६ ॥ त्या छळास जोड नाहीं । होतीं अमानुष कृत्यें पाही । जुलमी राजसत्तेठायीं । न्याय अन्याय कांहीं नसे ॥ २३७ ॥ त्यांतल्या—त्यांत धर्मावरी । यवनांचा डोळा भारी । फोडिल्या शिरून मंदिरीं । मूर्ति हिंदु-देवतांच्या ॥ २३८ ॥ म्हणून स्वामी द्वारकेचे । आश्रया आले शृंगेरीचे । त्यांनीं मुलबागल नांवाचें । गांव राहण्या पसंत केलें ॥ २३९ ॥ तेथेंच मठ स्थापिला । संप्रदाय चालविला । ते स्वामी आपणांला । शारदा-पीठस्थ म्हणविती ॥ २४० ॥ द्वारका, मुलबागल आणि सुरत । हे शारदापीठाचे अंश सत्य । तीनशें वर्षेपर्यंत । द्वारका मठ बंद होता ॥ २४१ ॥ या द्वारकामठाचे कागदपत्र । नाहींसे झाले असती समस्त । हरिपंत फडके यांच्या स्वारींत । काठेवाड प्रांतींच्या ॥ २४२ ॥ म्हणून शारदापीठाचे । फाटे कसकसे झाले साचे । तें न उरलें सांगावयाचें । साधन कांहींच त्यामुळें ॥ २४३ ॥ याशिवाय भूमीवरी । हंपी, कुंभकोण,

पुष्पगिरी । मठ अस्तित्वांत आहेत परी । हे नसती मुख्य मठ ॥ २४४॥ इंग्रज-हैदर लढाईंत । कांची मठाचिया स्वामींप्रत । त्रास झाला असे बहुत । चंद्रशेखरेंद्रसरस्वतींना ॥ २४५ ॥ तयांनीं पाहा आपुली । गादी त्रिचनापल्लीस नेली । ही गोष्ट घडून आली । शके सोळाशें एक्कावनीं ॥ २४६ ॥ पुढें सवेंच त्रिचनापल्ली । सोडून तंजावरास गेली । आचार्यांची गादी भली । प्रतापसिंहाच्या आश्रयानें ॥ २४७ ॥ हे प्रतापसिंह नृपनाथ । छत्रपतींचे वंशज सत्य । महाराष्ट्रीय रक्ताप्रत । अभिमान मोठा धर्माचा ॥२४८॥ हीच पुढें तंजावराहुनी । गादी गेली कुंभकोणीं । छत्रपतींच्या सल्ल्यानीं । तेथें झाली स्थायिक ॥ २४९ ॥ असो बहुत कालपर्यंत । मठ शृंगेरी सुरक्षित । राहिला होता त्याप्रत । आश्रय म्हैसूर भूपांचा ॥ २५० ॥ परि शके तेराशें तेरांत । कुरुंदवाडचे रघुनाथ । जे पटवर्धनवंशांत । जन्म होते पावले ॥ २५१ ॥ त्यांच्या सैनिक पेंढारांनीं । शृंगेरी मठाची धूळधाणी । केली, नेली लुटोनी । मठामधील मालमत्ता ॥ २५२ ॥ कागदपत्र विध्वंसिले । धर्मपीठा अवमानलें । तेणें स्वामी रुष्ट झाले । शृंगेरीच्या पीठावरील ॥ २५३ ॥ या वेळीं सच्चिदानंदभारती । होते शृंगेरी पीठावरती । त्यांना संताप चढला अती । रघुनाथरावाच्या कृत्यांचा ॥ २५४ ॥ त्यांनीं उपास आरंभिले । मठ सोडून वनांत गेले । तें रघुनाथराव पटवर्धनास कळालें । लोकांकडून तेधवां ॥ २५५ ॥ रघुनाथांनीं स्वामींना । विनंतीवजा पाठविला । निरोप, आपण उपासाला । निरर्थक करूं नये ॥ २५६ ॥ आम्ही धर्मपीठाचा । अपमान केला नाहीं साचा । मठांत लपलेल्या शत्रूचा । केला मात्र पाठलाग ॥ २५७ ॥ तो पाठलाग करण्यांत । कांहीं कृत्यें अनन्वित । घडलीं असल्या मठांत । त्याची क्षमा करावी ॥ २५८ ॥ ऐशी निरोपवजा विनंती । रघुनाथें केली स्वामींप्रती । ती शत्रूच्या पडली हातीं । पटवर्धन मंडळींच्या ॥२५९॥ म्हणून स्वामींपर्यंत । तो न विनंती गेली सत्य । मग स्वामींनीं पुण्याप्रत । पाठविला आपुला कारभारी ॥२६०॥ या वेळीं पुणें दरबारीं । माजली होती दुफळी खरी । प्रत्येक जणाच्या अंतरीं । द्वेष होता दुसऱ्याचा ॥ २६१ ॥ पायपोस कुणाचा कोणाच्याहि । पायामध्यें नव्हता पाही । अशा स्थितींत कोण घेई । ध्यानीं स्वामींचें प्रकरण ॥ २६२ ॥ दाद मागतां मागतां भला । कारभारी तो कंटाळला । अखेर शृंगेरीस गेला ।

परत आपुल्या ठिकाणास ॥ २६३ ॥ पुण्याचें तें अवघें वृत्त । स्वामींप्रती केलें विदित । तें ऐकतां अत्यंत । स्वामींलागी कोप आला ॥ २६४ ॥ तळतळून हात आपटिले । शापवचन बोलले । ब्राह्मणसत्तेचें तें काळें । होईल या कृत्यें साच ॥ २६५ ॥ सद्धर्म व सन्नीतिप्रत । ज्या राजाच्या राज्यांत । पायतळीं तुडविलें जात । त्याचें वाटोळें शीघ्र होतें ॥२६६॥ एवंच द्वारकामठालागुनी । विध्वंसिलें हरिपंत फडक्यांनीं । मठ करवीराचा जाळोनी । टाकिला कोन्हेर पटवर्धनें ॥ २६७ ॥ परशरामभाऊ पटवर्धन । जो युद्धवनींचा पंचानन । वा कलियुगामाजीं द्रोण । दुजा काय अवतरला ॥ २६८ ॥ श्रोते ! याच्या सैन्यें भला । कुडलगी मठ लुटून नेला । रघुनाथानें शृंगेरीला । ऐसाच शह दिला असे ॥ २६९ ॥ हें जें कांहीं कृत्य झालें । तें सहजासहजीं घडून आलें । मुद्दाम नाहीं अवमानिलें । पटवर्धनानें धर्मपीठा ॥ २७० ॥ टिपूची खबर घेण्यासाठीं । जेव्हां मराठे आले तुंगाकाठीं । त्या गर्दींत या गोष्टी । सहजासहजीं घडून आल्या ॥ २७१ ॥ पेंढाऱ्यांनीं मठा लुटलें । नांव मालकाचें झालें । आवर्जून नाहीं केलें । हें कृत्य पटवर्धनांनीं ॥२७२॥ एवंच कोणत्याहि मठांत । या गडबडीच्या काळांत । नाहींसे झाले असती बहुत । अस्सल कागदपत्र पाहा ॥२७३॥ हेंच तुम्हां सांगण्यासाठीं । वर्णन केल्या ह्या कटकटी । यांतील खरें खोटें जगजेठी । एक आहे जाणता ॥ २७४ ॥ एकंदर कथेवरून । ऐसें येतें कळून । धर्मपीठाचा अपमान । केव्हांहि न करणें बरें ॥ २७५ ॥ पोरचेष्टा न धर्मपीठ । तें अत्यंत आहे श्रेष्ठ । त्याचें ठायीं एकनिष्ठ । प्रत्येकानें असावें ॥ २७६ ॥ धर्मपिठा अत्यादरें । रक्षण करा तुम्ही सारे । सोंवळींच राखा मंदिरें । तीं भ्रष्ट करूं नका ॥ २७७ ॥ धर्मपीठें अवमानिलीं । म्हणून पेशवाई शीघ्र गेली । महंमद गिझनीची काय झाली । गति सोमनाथ फोडल्यावर ॥ २७८ ॥ हाल महंमद गिझनीचे । परत जातां झाले साचे । फळ हें सोमनाथ फोडल्याचें । मिळतें झालें गिझनीला ॥ २७९ ॥ हाच कटु अनुभव भला । दिल्लीपतीस येता झाला । आलमगीर औरंगजेबाला । हिंदु मंदिरें पाडल्यानें ॥ २८० ॥ धर्म श्रोते ! ज्याचा त्यांनीं । पाळणें मनापासुनी । परि दुसऱ्याची हेटाळणी । निज कृत्यानें करूं नये ॥२८१॥ मठ हे शांकर सांप्रदायी । बहुतेक तुम्हां कथिले पाही । जी जी माहिती मला कांहीं । मिळाली तिच्या आधारें ॥ २८२ ॥

इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ २८३ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# अध्याय सत्ताविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे श्रीशंकराचार्यगुरुवरा ! । ज्ञाननभींच्या दिनकरा ! । हे अपरोक्ष ज्ञानभांडारा ! । शिवावतारा दयानिधे ! ॥१॥ आपण अवतार धरून । वेदाचें निवटिलें काठिण्य । अद्वैत मत स्थापून । जगा सुखी केलें तुम्हीं ॥ २ ॥ अद्वैत मता स्थापिलें । परि उपासनेसी न तुडविलें । हें एक आपणांशींच साधलें । थोर योग्यता आपुली ॥ ३ ॥ या अद्वैताचें सेवन । होणें आहे अति कठिण । जेंवि कां तें राजेपण । एखाद्याचेच वांट्याला ॥ ४ ॥ राजसत्तेचा कांहीं अंश । लाभतो प्रधान दिवाणास । परि वागावें लागतें त्यास । राजाचिया आज्ञेमध्ये ॥ ५ ॥ तेंवीं सम्राट् हें अद्वैत मत । इतर मतें तीं प्रधान सत्य । याही मतें होतो प्राप्त । मोक्ष ईश्वर सान्निध्याचा ॥ ६ ॥ अद्वैत सिद्धान्त मेघापरी । द्वैत सिद्धान्त प्रवाहापरी । तो सगुणरूप जो का गिरी । तेथून उत्पन्न होतसे ॥ ७ ॥ जेवीं पर्वत ते अपार । तेंवि सगुणोपासना साचार । मत हाच निर्झर । शैली उत्पन्न झालेला ॥ ८ ॥ तेवीं हीं नाना मतें । प्रवाहा-परी उदयातें । येतीं झालीं महीतें । तीं ज्यांनीं ज्यांनीं निर्मिलीं ॥ ९ ॥ त्या मतस्थापकांचें वर्णन । स्वामी ! तुमच्या कृपेंकरून । करतों त्या आशीर्वचन । आचार्य ! आपुलें असावें ॥ १० ॥ कां कीं जीं मतें निघालीं । तीं तुमच्या सत्तेंच उदया आलीं । हे श्रीशंकराचार्य गुरुमाउली ! । माझें नमन तुम्हां असो ॥ ११ ॥ बुध हो ! विशिष्टाद्वैत । जें का निर्माण झालें मत । या भरतखंडांत । या अद्वैताच्या नंतरी ॥ १२ ॥ या मताचे उत्पादिते । श्रीरामानुजाचार्य होते । जे येते झाले जन्मातें । त्रिचनापल्ली प्रांतांत ॥ १३ ॥ या त्रिचनापल्लीचे शेजारीं । ग्राम एक भूतपुरी । तेथें द्विज एक सदाचारी । केशवभट नामें होता ॥ १४ ॥ केशवभटाची कांता । कांतिमती नामें पतिव्रता । या साध्वीची योग्यता । काय मुखें

वर्णावी ! ॥ १५ ॥ श्रोते ! या कांतिमतीच्या उदरीं । अवतरला हा साक्षात्कारी । दहाशें एकुणपन्नासामाझारीं । शालिवाहन शकाच्या ॥ १६ ॥ नांव ठेविलें लक्ष्मण । बुद्धि याची असामान्य । होतां मौंजी-बंधन । गेला विद्या शिकावया ॥ १७ ॥ कांचीपुरीं मामा याचा । यादव प्रकाश नांवाचा । जाणता वेदवेदांगांचा । महाविद्वान् होता कीं ॥ १८ ॥ लक्ष्मण आला त्याचेजवळीं । विद्या शिकावया सगळी । अडचण कशाची नव्हती मुळीं । प्रत्यक्ष मामाच तो याचा ॥ १९ ॥ लक्ष्मणाची धारणा-शक्ति । लोकोत्तर होती अति । वाटे दुजा बृहस्पति । आला काय जन्मातें ॥ २० ॥ हा यादवप्रकाश मामा त्यांचा । म्हणजे रामानुजा-चार्यांचा । मंत्रविद्येंत पट्टीचा । होता कीं हो निष्णात ॥ २१ ॥ मांत्रिक म्हणून प्रख्याति । होती मामांची तया प्रांतीं । एका राजकन्येप्रती । झाली होती समंधबाधा ॥ २२ ॥ तो समंध काढण्याला । पाचारण यादवप्रकाशाला । आले होते एक वेळां । राजाकडून आग्रहाचें ॥ २३ ॥ म्हणून यादवप्रकाश शिष्यांसहित । गेले राजवाड्यांत । केला तेथें आदर बहुत । भूपतीनें तयांचा ॥ २४ ॥ मंत्रप्रयोग सुरू झाला । समंध कन्येच्या अंगांत आला । तो गर्जून बोलला । यादवप्रकाशास येणें रीतीं ॥ २५ ॥ तुझें तप जादूटोणा । मशीं काढाया समर्थ ना । तें कां हें आपुल्या मना । शोधूनिया पाहावें ॥ २६ ॥ तुझा भाचा लक्ष्मण । जो अवतारी पुरुष सुलक्षण । त्याचें तीर्थ मजलागून । जरी मिळेल प्यावया ॥ २७ ॥ तरी माझी मुक्तता । होऊन ही राजदुहिता । सुखी होईल सर्वथा । वचन प्रमाण माना हें ॥ २८ ॥ ऐसें भाषण ऐकिलें । यादव-प्रकाश संतोषले । भाच्याकडे पाहिलें । कुतूहल दृष्टीनें ॥ २९ ॥ हे वत्सा ! लक्ष्मणा ! । या पिशाचाच्या भाषणा । तूं ऐकिलें आहेस ना । या वेळीं काय वदले ते ॥ ३० ॥ तीर्थ तुझ्या पायांचें । जरी मिळेल तया साचें । तरी या पिशाच योनीचे । त्याच्या होईल निरसन ॥ ३१ ॥ लक्ष्मण म्हणे मामांसी । जें योग्य वाटेल आपणांसी । तेंच करा हो पुण्यराशि ! । मी सर्वस्वीं आपुला असें ॥ ३२ ॥ ऐसें लक्ष्मण वदतां-क्षणीं । त्याचें तीर्थ मामांनीं । सव्य पदाचें घेऊनी । राजकन्येस पाजिलें ॥ ३३ ॥ राजकन्या तीर्थ प्याली । चक्कर येऊन खालीं पडली । त्या-सरशीं मुक्तता झाली । अंगीं असलेल्या समंधाची ॥ ३४ ॥ यायोगें

अवघ्यांना । लक्ष्मणाचा अधिकार कळला । भूपतीनें गौरव केला । लक्ष्मणाचा श्रोते हो ! ॥ ३५ ॥ मग यादवप्रकाश लक्ष्मणा । घेऊन आले आपुल्या सदना । अवघ्या शिष्यांत हाच शहाणा । होता यादवप्रकाशाच्या ॥ ३६ ॥ हा लक्ष्मण एके दिवशीं । निज गुरूच्या मस्तकासी । मर्दन करतां तैलासी । ऐसा प्रकार घडला हो ! ॥ ३७ ॥ एक्या श्रुतिवाक्याच्या अर्थास । सांगत होते यादवप्रकाश । निज भाचा जो लक्ष्मण त्यास । ती श्रुति ऐशी असे ॥ ३८ ॥

'तस्य यथा कप्यासं पुण्डरीकमेवमक्षिणी'

अर्थ या श्रुतीचा । ऐशा रीतीं होता साचा । पृष्ठभाग माकडाचा । तसे डोळे भगवंताचे ॥ ३९ ॥ निज गुरूच्या मुखांनीं । हा अर्थ ऐकतां क्षणीं । बहु खेद झाला मनीं । त्या भावी लक्ष्मणाच्या ॥ ४० ॥ तो खेद इतका झाला । दुःखाश्रूंचा पूर आला । लक्ष्मणाच्या नेत्रद्वयाला । असूं अधणाच्या पाण्यापरी ॥ ४१ ॥ तें यादवप्रकाशांच्या अंगावर । पडतां पोळलें शरीर । असूं न तो वैश्वानर । यादवप्रकाशा वाटला ॥ ४२ ॥ तैं यादवप्रकाशें प्रश्न केला । आपुल्या लक्ष्मण भाचाला । अरे ! कशाचा शोक झाला । तुजला हा अनावर ॥ ४३ ॥ लक्ष्मण बोले जोडून हात । हा या श्रुतीचा ऐकून अर्थ । खेद वाटला मजप्रत । तिचा अर्थ ऐसा असे ॥ ४४ ॥ या कप्यास शब्दाचा । विग्रह ऐसा केल्या साचा । आहे गोड व्हावयाचा । अर्थ श्रुतीला शोभेलसा ॥ ४५ ॥

'कं पिबतीति कपिः तेनासत्ये विकसितं क्रियते इति कप्यासम्'

म्हणजे भगवंताचे नेत्र दोन्ही । कमलें सूर्यविकासिनी । ऐसा त्या शब्दांतुनी । अर्थ निघेल गुरुराया ! ॥ ४६ ॥ कां कीं हे चार वेद । भगवंताचे भाट प्रसिद्ध । ते ऐसा अपशब्द । भगवंताविषयीं न वदती कदा ॥ ४७ ॥ कां कीं अवघी सुंदरता । प्रभुठायींच सर्वथा । तेथें न आढळे कुरूपता । येतुलीहि गुरुराया ! ॥ ४८ ॥ जेवीं कस्तुरीचे ठायीं । कुवासाला जागा नाहीं । तैशी भगवंताचिये ठायीं । कुरूपता तो न राहे कदा ॥ ४९ ॥ ऐसें बोलणें ऐकून । यादवप्रकाश तोषले जाण । देते झाले आलिंगन । कडकडून भाचाला ॥ ५० ॥ याच लक्ष्मण भाच्याप्रती । रामानुजाचार्य म्हणती । याहि पुरुषाची योग्यता ती । असामान्य विबुध हो ! ॥ ५१ ॥ श्रीयामुनाचार्य म्हणून । एक महाविद्वान् । श्रीरंगपट्टणा-

लागून । राहात होते त्या प्रांतीं ॥ ५२ ॥ त्यांनीं रामानुजाचार्यांना । श्रीरंगपट्टणीं आणविण्याला । मुद्दाम शिष्य पाठविला । महापूर्ण नांवाचा ॥ ५३ ॥ त्या शिष्याच्या सवें भले । रामानुजाचार्य निघाले । श्रीरंग-पट्टणासी येते झाले । यामुनाचार्या भेटावया ॥ ५४ ॥ तों यामुनाचार्य तेथें । नुकतेच पंचत्व पावले होते । जें व्हावयाचें तेंच घडतें । लिखिता-प्रमाणें विधीच्या ॥ ५५ ॥ प्रेताचिया सभोंवार । शिष्य बसले अपार । एकचि उडाला हाहाःकार । त्या श्रीरंगपट्टणामध्यें ॥ ५६ ॥ यामुना-चार्याचें प्रेत । लक्ष्मणानें पाहिलें तेथ । मनीं झाले दुःखित । भेट न झाली म्हणूनिया ॥ ५७ ॥ तों तीन अंगुली कराच्या । आकुंचित झाल्या साच्या । त्या तसें होण्याच्या । कारण विचारिलें शिष्यांसी ॥ ५८ ॥ तै शिष्य म्हणती लक्ष्मणाप्रत । आम्हांसी ऐसें वाटत । आचार्यांच्या मनांत । घोंटाळत होत्या तीन गोष्टी ॥ ५९ ॥ व्याख्या ब्रह्मसूत्राची । बौधायन वृत्तीस धरून साची । हौस होती करावयाची । यामुनाचार्यांकारणें ॥ ६० ॥ विशिष्टाद्वैत मताचे । व्यास, पराशर हेच साचे । प्रवर्तक पूर्वींचे । म्हणून करावी प्रसिद्ध ॥ ६१ ॥ षट्कोपाचार्यांनीं प्रचलित । केलेल्या द्रविडोपनिषदाप्रत । व्याख्या करावी गीर्वाणांत । ऐसें आचार्य म्हणत होते ॥ ६२ ॥ या त्यांच्या गोष्टी तिन्ही । पूर्ण न झाल्या म्हणूनी । बसल्या आकुंचित होऊनी । तीन अंगुली कराच्या ॥ ६३ ॥ हा मनांतील आपुला हेतु । येथें आणून तुम्हांप्रत । सांगावयाचा होता खचित । म्हणून पाचारण धाडिलें ॥ ६४ ॥ तें श्रीरामानुजाचार्यांनीं । अवघें घेतलें ऐकुनी । आणि केली त्याच ठिकाणीं । ऐशा रीतीं प्रतिज्ञा ॥ ६५ ॥ त्या तिन्ही गोष्टींप्रीत्यर्थ । झाल्या असतील आकुंचित । जरी स्वामी ! आपुल्या खचित । या कराच्या करांगुली ॥ ६६ ॥ तरी त्या नीट होऊं द्या । आकुंचित ऐशा न राहूं द्या । मी आरंभ उद्यांच्या उद्यां । करीन व्याख्यान करण्यास ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां झालीं नीट । हस्ताचीं तीं तिन्ही बोटं । यामुनाचार्य विभूति श्रेष्ठ । कळून आलें अवघ्यांना ॥ ६८ ॥ प्रतिज्ञेप्रमाणें सर्व केलें । संन्यासदीक्षेस घेतलें । आणिक बहुत ग्रंथ केले । तें सांगावें कोठवरी ? ॥ ६९ ॥ हे भागवत धर्माचे चाहते । भगवंताचे भक्त होते । हे वांचले मृत्युलोकातें । एकशेंवीस वर्षें पाहा हो ! ॥ ७० ॥ हे दहाशें एकुणसाठांत । शालिवाहन शकाच्या सत्य ।

होते झाले समाधिस्थ । श्रीरंगम क्षेत्रामधें ॥ ७१ ॥ त्या रामानुजाचार्यांसी । नमन माझें आदरेंसी । कृपाकटाक्षें भारतासी । पाहा आतां दयानिधे ! ॥ ७२ ॥ रामानुजानंतर । आचार्य उदेले भूमीवर । गोदावरीचें पाहून तीर । वैडूर्यपट्टणासन्निध ॥ ७३ ॥ अरुणाश्रमामाझारीं । जयंतीदेवीच्या उदरीं । निम्बार्क जन्मले भूमीवरी । मार्गशीर्षी द्वादशीला ॥ ७४ ॥ इसवीसनाचें अकरावें । शतक बुध हो ! होतें बरवें । नक्की साल नसे ठावें । नांव पित्याचें जगन्नाथ ॥ ७५ ॥ हे आचार्य निम्बार्क । सूर्यावतार होते देख । हेच मूळ प्रवर्तक । द्वैताद्वैत मतांचे ॥ ७६ ॥ या आचार्य निम्बार्कातें । पूर्वीचें नांव होतें । नियमानंद अहो श्रोते ! । मायबापें ठेविलेलें ॥ ७७ ॥ निम्बार्क महाविद्वान् । वेदशास्त्रसंपन्न । साक्षात् होते भूषण । सरस्वतीच्या कंठाचें ॥ ७८ ॥ हे मथुरेसन्निध यमुनातीरीं । ध्रुव क्षेत्रामाझारीं । आपुल्या मठाभीतरीं । निम्बार्क बैसले असतां ॥ ७९ ॥ एक विरक्त ऐसा जैन जती । येता झाला मठाप्रती । वेदान्ताची चर्चा ती । निम्बार्कासवें करण्यास ॥ ८० ॥ वेदान्त चर्चा करतां भले । दोघेहि विस्मरण पावले । भान कांहीं न राहिलें । कशाचेंहि तयांना ॥ ८१ ॥ एक पाहूं जातां जैन । एक वैदिक अभिमानी पूर्ण । संप्रदायाचें तें चिन्ह । होतें दोघांचें निराळें ॥ ८२ ॥ असें असून तत्त्वातें । दोघे हुडकीत बसले होते । ज्याच्या त्याच्या पाहा मतें । चर्चा तेथें झाली सुरू ॥ ८३ ॥ निजपंथाच्या कांचांतून । पाहूं लागल्या सूर्यकिरण । तें कां दिसे भिन्नभिन्न । हें केव्हांहि घडणें नसे ॥ ८४ ॥ कांचा भिन्न असल्या तरी । सूर्यप्रकाश एकचि परी । हेंच तत्त्व अंतरीं । सर्वत्रांनीं धरावें ॥ ८५ ॥ वेदान्तचर्चेकरून । तन्मय गेलें होऊन । जती आणि आचार्य जाण । त्या यमुनातटाला ॥ ८६ ॥ चर्चेस प्रभातीं आरंभ झाला । तों सूर्य अस्ताचलासी टेकला । तहानभुकेचा विसर पडला । ऐसा वेदान्तप्रेमा तो ! ॥ ८७ ॥ अखेर निंबार्काचार्यांचा । एक शिष्य बोलला साचा । पाहा सूर्यास्त होण्याचा । वेळ आला सांप्रत ॥ ८८ ॥ ऐसें ऐकतां भाषण । देहावरी दोघेजण । येऊनिया अवलोकन । करूं लागले सूर्याला ॥ ८९ ॥ तों सूर्य अस्ताचलीं टेकला । घटका दीडघटका राहिला । नजर सूर्यमंडळाला । खुशाल पाहूं लागली ॥ ९० ॥ मग आचार्य म्हणाले जतीसी । चला उठा भोजनासी । येऊन आमच्या

मठासी । ऐसे उपाशी जाऊं नका ॥ ९१ ॥ आल्या अतिथीचें पूजन । अवश्य करणें आदरानं । अन्नोदकातें देऊन । ऐशी आज्ञा धर्माची ॥९२॥ जती म्हणाला आचार्या ! । सूर्य अस्तास गेलिया । आम्हां भोजन करावया । जैन शास्त्र सांगत नसे ॥ ९३ ॥ हीच मोठी अडचण । आहे करण्या भोजन । वृथा आग्रह म्हणून । तुम्हीं न आतां करावा ॥ ९४ ॥ ऐसें जतीवचन ऐकलें । निंबार्क थोडे खिन्न झाले । त्यांनीं तत्काळ जोडिले । हात मावळत्या सूर्याला ॥ ९५ ॥ हे भास्करा तेजोराशि ! । नका जाऊं अस्तासी । नका ठेवूं उपवासी । या जैन जतीस ये ठायां ॥ ९६ ॥ अतिथि आजपर्यंत । उपवासी न गेला येथ । आजदिनीं तें व्रत । मोडतें याचा विचार करा ॥ ९७ ॥ जयद्रथाच्या वेळेला । तुम्हीं थोडा दम धरिला । आज कां हो ! आतुर झालां । वेगें जावया अस्तास ॥ ९८ ॥ तीन घटका थांबावें । भोजन जतीचें होऊं द्यावें । त्याच्या विधीच्या मुळीं न यावें । तुम्ही आड नारायणा ! ॥ ९९ ॥ ऐसें वचन ऐकतां । सूर्य थोडा आला वरता । ही निंबार्काची योगसत्ता । पोरचेष्टा उग्या नव्हत ॥ १०० ॥ तें जतीनें पाहून । गेला थक्क होऊन । वागला सूर्यनारायण । आज्ञेत निंबार्कस्वामींच्या ॥ १०१ ॥ निंबतरूच्या सुमाराला । सूर्य तीन घटका थांबला । कोणी म्हणती कृष्ण आला । रूप घेऊन सूर्याचें ॥१०२॥ कांहीं असो, दोघांतून । कोणीतरी येऊन । दिवसाचें तें दिवसपण । तेथें रक्षिते जाहले ॥१०३॥ जैन जतीनें भोजन केलें । मताभिमाना सोडिलें । वैदिक वेदान्ता मान्य केलें । आपला उद्धार करून घ्याया ॥१०४॥ भोजन होतां क्षणीं । सूर्य गेला मावळोनी । तेणें निंबार्काचे मनीं । अति आनंद जाहला ॥१०५॥ निंबार्कानें अनंत । केले होते जरी ग्रंथ । तरी त्यांतल्या त्यांत । महत्त्व दोन ग्रंथांसी ॥१०६॥ वेदान्तपारिजातसौरभ एक । दुसरा वेदान्तसूत्रांचें भाष्य देख । यांचे शिष्यहि अनेक । झाले होते त्या काळीं ॥१०७॥ त्या अवघ्या शिष्यांतून । केशव हरि हे दास दोन । पावले प्रसिद्धीलागून । निजांगींच्या कर्तृत्वें ॥१०८॥ ऐशा करून बहुत लीला । निंबार्क गेले वैकुंठाला । नमन त्यांच्या पदांना । परमादरें करीत मी ॥१०९॥ निंबार्काचे मागून । आचार्य झाले अवतीर्ण । पाजक क्षेत्रालागून । श्रीमध्वाचार्य नांव यांचें ॥ ११० ॥ असो कर्नाटक देशास । उडपी नामे ग्रामविशेष । त्या ग्रामाच्या

सानिध्यास। पाजक नामें ग्राम एक ॥१११॥ हें पाजक नामें खेडें लहान। क्षेत्राचा पावलें मान। बसलें होऊन जन्मस्थान। श्रीमध्वाचार्य माउलीचें ॥ ११२ ॥ जेवीं कस्तुरीसंगें मृत्तिका। मोलाप्रती पावे देखा। वा कलंक पावे कौतुका। चंद्रमंडलाचिये ठायीं ॥११३॥ वा पुष्पासंगें शिरीं वास। सहज घडतो सूत्रास। तेवीं पाजक ग्रामास। महत्त्व येतें जाहलें ॥११४॥ या पाजक ग्रामाभीतरीं। मध्यगेह सदाचारी। वेदवती त्याची नारी। असती झाली विबुध हो ! ॥११५॥ हा मध्यगेह ब्राह्मण। ऋग्वेदी आश्वलायन। अवगत होतीं यासी पूर्ण। वेदवेदांगें विबुध हो ! ॥११६॥ वेदवती त्याची भार्या। दुजी प्रत्यक्ष अनसूया। अवघे सद्‌गुण सतीचे ठायां। राहिले असती येऊन ॥ ११७ ॥ या दंपत्याच्या उदरीं। पुत्र नव्हता निर्धारीं। प्रपंचाची शोभा सारी। बुध हो ! संततीच्या वरी असे ॥ ११८ ॥ तेणें मध्यगेहाचें मन। सतत राहे उदासीन। तो तप करायाकारण। पुत्रासाठीं उडपींत गेला ॥ ११९ ॥ श्रोते ! या उडपींत। स्थान शिवाचें कडकडीत। जयालागीं प्रचारांत। अनंतेश्वर म्हणत होते ॥ १२० ॥ त्या अनंतेश्वर लिंगापाशीं। मध्यगेह आला आदरेंसी। तेथें खडतर तपासी। त्यानें पाहा आरंभिलें ॥ १२१ ॥ प्रत्यहीं करी त्रिकाल स्नान। अनंतेश्वराचें पूजन। परम भक्तीनें करून। अल्प पयाचा आहार करी ॥१२२॥ ऐसे बहुत दिवस गेले। तप त्याचें फळा आलें। अनंतेश्वर प्रसन्न झाले। त्याच्या विमल भक्तीनें ॥१२३॥ भवभयांतक भवानीवर। अनंतेश्वर कर्पूरगौर। देता झाला अमोघ वर। श्रीमध्यगेहाकारणें ॥ १२४॥ भक्तिमार्ग वाढविण्यासाठीं। वायुदेव तुझ्या पोटीं। येईल, जो ज्ञानजेठी। द्वैत सिद्धान्त स्थापिता ॥ १२५ ॥ अवतार वायुदेवाचे। झाले आजवरी तीन साचे। प्रथम अवतारीं नांव याचें। हनुमंत ऐसें होतें कीं ॥१२६॥ द्वितीय अवतारीं भीमसेन। झाला कुंतीचा नंदन। तिसऱ्या वेळीं पावला जनन। हस्तामलक होउनी ॥१२७॥ तोच वायुदेव आतां। तुझ्या पोटीं तत्त्वतां। येतो आहे पुण्यवंता ! । जा आपुल्या गेहातें ॥ १२८ ॥ ऐसें स्वप्न पाहून। मध्यगेह आनंदला पूर्ण। कांतेलागीं वर्तमान। सदनीं येऊन सांगितलें ॥१२९॥ शके अकराशेंसाठांत। विलंबीनाम संवत्सरांत। आश्विन शुद्ध पक्षांत। विजयादशमीकारणें ॥ १३० ॥ वेदवती प्रसूत झाली। सुपुत्रातें प्रसवली। याच बालकाची ठेविली। नामाभिधा

वासुदेव ॥१३१॥ असो या अनंतेश्वरालागुनी। मध्वमताच्या विद्वानांनीं। एक पौराणिक कथा जोडुनी। विष्णु ऐसें ठरविलें ॥१३२॥ पाहूं जातां भूमीवर। विष्णुप्रतीक लिंगाकार। नाहीं कोठे साचार। हें आहे ख्यात जगीं ॥ १३३ ॥ त्यासी न आपुलें प्रयोजन। श्रीशिवाच्या कृपेंकरून। मध्यगेहालागून। जगदुद्धारक पुत्र झाला ॥ १३४ ॥ शुक्लपक्षीं एकेक कला। जैसा चंद्रमा वाढे भला। तेवीं पाजक क्षेत्राला। वासुदेव वाढूं लागले ॥१३५॥ व्रतबंधापर्यंत। अवघे संस्कार यथास्थित। झाले वासुदेवाप्रत। पित्याकडून श्रोते हो! ॥ १३६ ॥ असामान्य बुद्धीचा। हा वासुदेव होता साचा। वाटे बृहस्पतीचा। झाला दुजा अवतार ॥१३७॥ वासुदेवाच्या अंतरीं। पूर्ण ठसावला हरि। झालीं अघटित कृत्यें खरीं। त्याच्या करें भूमीवर ॥ १३८ ॥ यांनीं चिंचोक्याचे होन केले। पित्याचें कर्ज फेडिलें। अवतारी असल्याचें दाविलें। आपण जगासी प्रत्यंतर ॥ १३९ ॥ बाळपणापासून। संन्यास घ्याया इच्छी मन। परी मातापित्यांचें अनुमोदन। त्या गोष्टीस मिळेना ॥ १४० ॥ त्यांनीं आपल्या पित्यासी। समजाविलें बहुवसी। पुत्र दुसरा तुम्हांसी। होईल वंश चालवावया ॥१४१॥ संन्यास घेऊं द्या मला। भक्तिमार्ग वाढविण्याला। याच मार्गाची जगाला। हल्लीं जरुरी फार असे ॥१४२॥ पिता बोलला त्यावर। आम्हांस दुसरा कुमार। झाल्यास घेई साचार। संन्यास तो तूं वासुदेवा! ॥१४३॥ जैसे वासुदेव बोलले। तेंच पुढें घडून आलें। मध्यगेह संतोषले। पुत्र दुसरा पाहून ॥१४४॥ मग श्रीअच्युतप्रेक्षापासून। संन्यास तो केला ग्रहण। श्रीव्यासांचें दर्शन। झालें यांना हिमालयीं ॥ १४५ ॥ आनंदतीर्थ यांचें। आश्रमनाम होतें साचें। हेच मध्वमताचे। आद्य उत्पादक श्रोते हो! ॥१४६॥ यांनीं ब्रह्मसूत्रावर। भाष्य केलें सुंदर। आणीकहि ग्रंथ इतर। केले मध्वाचार्यांनीं ॥ १४७ ॥ यांनीं एकदां शिष्यांस। अंगठ्याचा पाडून प्रकाश। देते झाले पाठास। उपनिषद् भाष्याच्या ॥ १४८ ॥ यांनीं मायावाद खंडिला। द्वैतसिद्धान्त स्थापिला। हिमालयांत यांना दिला। शाळिग्रामाचा प्रसाद व्यासें ॥१४९॥ एकंदर ग्रंथ सदतीस। मध्वाचार्यांचे असती खास। पुढें टीकाचार्यांनीं तयांस। सुलभ टीका केली असे ॥ १५० ॥ श्रीकृष्णाची स्थापना। उडपींत यांनीं केली जाणा। त्या मूर्तीच्या पूजना। स्थापून केले आठ

मठ ॥ १५१ ॥ उत्तराधि हा मठ फिरतां । अवघ्यांत याची योग्यता । मोठी, मुद्रा देण्याकरितां । याच मठाला अधिकार ॥ १५२ ॥ आचार्यांच्या शिष्यांत । चार प्रमुख होते बहुत । शिष्य, त्यांच्या नांवांप्रत । ऐका येथें सांगतों ॥ १५३ ॥ पद्मनाभतीर्थ, नरहरितीर्थ । माधवतीर्थ, अक्षोभ्यतीर्थ । मूळ रामाच्या मूर्तीप्रत । मिळविले रामतीर्थानें ॥ १५४ ॥ या मूळ रामाचें पूजन । उत्तराधि मठीं होई जाण । उडपी मुख्य ठिकाण । आद्य मठ मध्वांचा ॥१५५॥ मध्वमतानुयायांनी । श्रींचें चरित्र गीर्वाणीं । ठेविलें आहे लिहूनी । केवळ मध्व लोकांस्तव ॥ १५६ ॥ त्यांत अनंतेश्वरातें । लक्ष्मीरमण ठरविलें । वगळिलें हस्तामलकातें । वायुअवतार असूनी ॥ १५७ ॥ ही जी धरसोड त्यांनीं केली । ती मताभिमानासाठीं भली । हीच गोष्ट सिद्ध झाली । विचारांतीं विबुध हो ! ॥ १५८ ॥ विष्णु आणि शंकर । हे नामाचे प्रकार । नामामुळें न होणार । तत्त्वामध्यें फरक कधीं ॥ १५९ ॥ उपासना प्रतीकाविण । न होय कीं सांग जाण । मताभिमानी जे जे जन । त्यांना महत्त्व नांवाचें ॥ १६० ॥ श्रीअनंतेश्वर व्योमकेशी । त्यालाच बनविलें हृषीकेशी । एक कथा देऊन खाशी । मध्वमतानुयायांनीं ॥ १६१ ॥ श्रीमत् मध्वाचार्यांनीं । द्वैत सिद्धान्त स्थापिला अवनीं । सेव्य सेवक भाव जनीं । जागृत ठेवण्याकारणें ॥१६२॥ जितके पंथसंस्थापक आचार्य झाले । तितक्यांनींहि आहे केलें । ब्रह्मसूत्रासी भाष्य भलें । आपुल्या पंथा साजेलसें ॥ १६३ ॥ जेवीं तलवारीचे हात । डावे उजवे शिकवितात । ते इतक्याचसाठीं, युद्धांत । यश यावें म्हणूनी ॥ १६४ ॥ तोच प्रकार भाष्याचा । तंतोतंत आहे साचा । ब्रह्मसूत्र या तलवारीचा । उपयोग केला अवघ्यांनीं ॥ १६५ ॥ तीन वर्षांपूर्वीं भलें । मीं "मध्वचरित्र" आहे लिहिलें । अकरा अध्यायांचें भलें । श्रीपंढरीक्षेत्रामाझारीं ॥ १६६ ॥ म्हणून येथें संक्षिप्तांत । श्रींचें चरित्र दिलें सत्य । फरक होता जेथें त्यांत । तो मात्र विशद केला ॥ १६७ ॥ मध्वाचार्यांचे उपकार । झाले बहुत आपणांवर । भक्तिमार्गाचा उद्धार । यांनींच केला प्रथमतः ॥ १६८ ॥ हे मध्वाचार्य पुण्यराशि । हिमालयीं बद्रिकाश्रमासी । माघ शुद्ध नवमीसी । पिंगल नाम संवत्सरीं ॥ १६९ ॥ शके बाराशें आडतिसांत । गेले वैकुंठलोकाप्रत । त्या मध्वाचार्या दंडवत । वारंवार असो हा ॥१७०॥ मध्वाचार्यांनंतरीं । वल्लभाचार्य साक्षात्कारी ।

झाले तैलंगण देशामाझारीं। परम भक्त हरीचे ।। १७१ ।। श्रोते! तैलंगण प्रांतांत । कांकरवाड नामें ग्रामांत । सोमयाजी म्हणून प्रख्यात । लक्ष्मणभट नामें द्विज होता ।। १७२ ।। या द्विजाच्या पूर्वजांनीं । सोमयाग केला म्हणूनी । आडनांव त्यांलागुनी । सोमयाजी मिळालें ।। १७३ ।। हा लक्ष्मणभट भार्येसहित । काशियात्रा करण्याप्रत । येता झाला मार्ग क्रमित । मध्यप्रांतीं विबुध हो ! ।। १७४ ।। तेथें रायपुराशेजारीं । चंपारण्य नामें नगरी । होती, तेथें झाली नारी । लक्ष्मणभटाची प्रसूत ।।१७५।। शालिवाहन शके चौदाशांत । वैशाख वद्य पक्षांत । पुत्र लक्ष्मण-भटाप्रत । झाला एकादशीला ।। १७६ ।। हाच वल्लभाचार्य म्हणून । पुढें प्रख्यातीस पावला जाण । वेदशास्त्राचें अध्ययन । यांनीं केलें काशी-मध्यें ।। १७७ ।। या वल्लभाचार्यांप्रती । कोणी अग्न्यवतार मानिती । कोणी कोणी ऐसें म्हणती । प्रत्यक्ष कृष्ण होता हा ।। १७८ ।। वल्लभा-चार्यांस बाळपणीं । पवित्र पर्वत गोवर्धनीं । भेटता झाला चक्रपाणि । भगवान् श्रीगोपालकृष्ण ।। १७९ ।। देव म्हणाले वल्लभाला । तूं माझ्या बाळलीला । नानापरीच्या काव्याला । रचून प्रकट कराव्यात ।। १८० ।। त्या लीलेचें सेवन । जो जो करील प्रेमें जाण । त्याचें त्याचें त्रिताप-दहन । होईल माझ्या कृपेनें ।।१८१।। अखेर मोक्षाचा अधिकारी । तोच होईल निर्धारीं । शुद्धाद्वैत भूमीवरी । मत तुवां स्थापावें ।। १८२ ।। ऐसें भगवंतें सांगितलें । तें वल्लभाचार्यें ऐकिलें । तपा येऊन बैसले । पंढरींत भीमातटीं ।। १८३ ।। एके दिवशीं रुक्मिणीकांत । बोलते झाले तयाप्रत । वल्लभा मीं जाणिला हेत । तुझा बापा ! मनींचा ।। १८४ ।। बाळलीला गाण्याची । तुला आज्ञा श्रीकृष्णाची । झाली गोवर्धनीं साची । ती आहे ना ध्यानांत ? ।। १८५ ।। म्हणूनी वल्लभा ! तुवां । संन्यास इतुक्यामध्यें न घ्यावा । हा बोल ऐकावा । शुद्ध मनें माझा तूं ।। १८६ ।। जा काशी-क्षेत्राप्रत । तुझी वधू आहे सत्य । नाम जिचें प्रचारांत । महालक्ष्मी ऐसें असे ।। १८७ ।। कां कीं गृहस्थाश्रमाप्रती । बाळलीला वर्णितां येती । स्वानुभवानें निश्चितीं । तें न साधे यतीला ।। १८८ ।। अवतारकृत्यें करून सारीं । संन्यास घ्यावा अखेरीं । वास जाऊन जान्हवीतीरीं । तुवां बाप्पा! करावा ।। १८९ ।। हें ईशवचन ऐकिलें । वल्लभाचार्य काशीस आले । तेथें त्यांचें लग्न झालें । महालक्ष्मी वधूसी ।। १९० ।। गोपिनाथ

विठ्ठलनाथ । ऐसे दोन झाले पुत्र । शुचि धार्मिक प्रज्ञावंत । श्रीवल्लभाचार्यांना ॥१९१॥ श्रीवल्लभाचार्यांनीं । सुंदर ग्रंथ करोनी । ठेविले आहेत त्यांतुनी । कांहीं तुम्हां सांगतों ॥ १९२ ॥ अणुभाष्य ब्रह्मसूत्रावरी । सुबोधिनी नामें टीका खरी । केली असे साजिरी । श्रीमद्भगवद्गीतेवर ॥१९३॥ पूर्वमीमांसा भाष्य । तत्त्वदीप सिद्धान्तरहस्य । आचार्यकारिका एकान्तरहस्य । तैसीच सिद्धान्तमुक्तावली ॥ १९४ ॥ ऐसे सर्वमान्य ग्रंथ केले । अखेर संन्यासा घेतलें । हनुमानघाटीं राहते झाले । आचार्य काशीक्षेत्रांत ॥ १९५ ॥ एके दिवशीं स्नानासी । गेले असतां जान्हवीसी । अग्निशिखा देहासी । झाली त्यांच्या उत्पन्न ॥ १९६ ॥ पाहत असतां अवघे जन । आकाशीं गेले सामावून । खालीं कांहींच राहिलें न । सदेह गेले वैकुंठा ॥ १९७ ॥ त्या हनुमंत घाटावर । हल्लीं त्यांचें मंदिर । त्या वल्लभाचार्यां नमस्कार । वारंवार असो ह्या ॥ १९८ ॥ या चारी आचार्यांनीं । परिस्थितीला पाहूनि । आपुलीं मतें स्थापूनि । उपासनेसी जीवविलें ॥ १९९ ॥ जगद्गुरूंनीं अध्यात्म कथिलें । यांनीं उपासनेला जीवविलें । एवंच पांचांनींहि केलें । वैदिक धर्माचें संरक्षण ॥ २०० ॥ हे पंचमुखी परमेश्वर । वा हे पांच पांडव साचार । या पांचीजणांना नमस्कार । करणें भाग प्रत्येका ॥ २०१ ॥ इति श्रीदासगणुविचरित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ॥ २०२ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय अठ्ठाविसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजय परम मंगला कृपार्णवा ! । जयजय सर्वशक्ति देवदेवा ! । तूं आश्रय आणि विसांवा । निजभक्तांचा असशी ॥ १ ॥ ऐसें आजपर्यंत । सांगत आले सिद्धमहंत । तूं आणिल्या मनांत । सर्व कांहीं साध्य होतें ॥ २ ॥ जें जें कांहीं घडतें सकळ । तें तें देवा ! तुझाचि खेळ । अवघ्यांचें शोधितां मूळ । तेथें तूंच गवसशी ॥३॥ म्हणून हे जगदात्मया ! । पांडुरंगा ! करा दया । अखिल दैन्यापासूनिया । भारतासी मुक्त करी ॥४॥ साधनें तुझ्या प्राप्तीचीं । आचार्यांनीं शोधिलीं

साचीं । अम्मलबजावणी तयांची । संतसज्जनें केली असे ॥५॥ हे व्यासा बादरायणा ! । हे शुकाचार्या दयाघना ! । गौडपादा महासज्जना ! । हे श्रेष्ठा गोविंदगुरो ! ॥ ६ ॥ हे श्रीजगद्गुरु शंकराचार्या ! । हे रामानुजा महासदया ! । हे निंबार्क- मध्वाचार्या ! । हे वल्लभाचार्या योगिवरा ! ॥ ७ ॥ हे मांत्रिका यादवप्रकाशा ! । हे आचार्यश्रीनिवासा ! । भारताची दैन्यदशा । कोठवरी पाहणार ? ॥८॥ षट्कोपाचार्य, भास्कराचार्य । रामानंद, रेणुकाचार्य । विद्यारण्य, केशवाचार्य । हे चैतन्य महाप्रभो ॥ ९ ॥ तुम्ही आतां अवघ्यांनीं । यावें अवतार घेऊनी । उरला न यावांचुनी । तरणोपाय दुसरा ॥ १० ॥ खरें खोटें तेव्हांच कळतें । जेव्हां त्याचें घुसळण होतें । आणि तें घुसळण करण्यातें । दोन फळ्या लागती ॥ ११ ॥ पाहतां फळ्यांलागून । तो एकाच वस्तूपासून । झाल्या असती निर्माण । घुसळण, कौतुक करावया ॥ १२ ॥ तैसें पूर्वकालीं झालें । चार्वाक, जैन, बुद्ध आले । वेदा आंबट ठरविण्या भले । भरमसाठ मतें रचून ॥ १३ ॥ म्हणून त्याच्या निरसना । येत झाला कैलासराणा । केरलदेशीं सरिता पूर्णा । तिचे कांठीं कालडींत ॥ १४ ॥ श्रीमत्शंकराचार्य जगद्गुरु । जे भाविकभक्तांचे कल्पतरु । जे अगाध ज्ञानाचे सागरु । योगयोगांग जाणते ॥१५॥ चार्वाक मतासी आळा । जैनबुद्धांनीं घातिला । या जैनबुद्धांच्या मताला । कुमारिलभट्टें जिंकिलें ॥ १६ ॥ वेद खरें असल्याचें । प्रत्यंतर दाविलें साचें । काठिण्य तें वेदाचें । निवटिलें श्रीशंकराचार्यांनीं ॥ १७ ॥ त्या श्रीशंकराचार्य मताचा । तुम्हीं अनुवाद केला साचा । निरनिराळ्या प्रकारचा । तत्त्व न ढळू देतां कीं ॥१८॥ जरी मतें भिन्न भिन्न । तुम्हीं केलीं निर्माण । कालमानातें पाहून । त्या त्या वेळेस सुगमशी ॥ १९ ॥ या तुमच्या कृत्यें भले । वैदिक पंथाचें रक्षण झालें । आणि बलवान् तेजस्वी बनविलें । तुम्हीं अवघ्या भारता ॥ २० ॥ तींच तुमचीं नाना मतें । आज कारण कलहातें । झालीं हेंच ध्यानातें । पूर्णपणें आणा हो ! ॥ २१ ॥ तुमच्या मताभिमानी लोकांनीं । कथा ठेविल्या लिहूनी । ज्या कथेच्या योगांनीं । समाजाचे तुकडे झाले ॥२२॥ कोणतेंहि असो मत । तें द्वेषानें होतां दूषित । तेंच होई विषवत् । जगालागीं मारावया ॥२३॥ तैसें पाहा आज झालें । अवघे पंथ द्वेषी बनले । ज्या त्या पंथाचा आचार्य बोले । श्रेष्ठांत श्रेष्ठ आमुचें मत ॥ २४ ॥ हें

सिद्ध करण्या देखा। खोटया नाटया लापाणिका। सांगून परम भाविकां। ओढिती आपुल्या जाळ्यांत ॥ २५ ॥ पाहा मध्वमताचें मोठेंपण। जगा दावण्याकारण। श्रीमत् शंकराचार्यांलागून। अवतार ठरविलें राक्षसाचा ॥२६॥ ऐशा गोष्टी कितीतरी। त्या सांगाव्या कोठवरी ?। म्हणून आतां भूमीवरी। व्हावें अवघ्यांनीं अवतीर्ण ॥ २७ ॥ तुमचा थोर अधिकार। तुमचें न द्वेषी अंतर। वैदिक धर्माचा उद्धार। तुम्हांवांचून कोण करी ? ॥२८॥ जो हा तुमचा भारत। श्रेष्ठ होता अत्यंत। तोच झाला निर्माल्यवत्। अवघे तुडविती जयाला ॥ २९ ॥ ज्या देशाची संस्कृति। उच्च दर्जाची ठरविली होती। तीच झाली हीन अति। ओंगळ, अशुभ, दुःखदायक ॥ ३० ॥ याचा विचार पूर्वकालां। तुम्हीं होता साच केला। एकामागून एक आला। धर्मदेशा रक्षण्यास ॥ ३१ ॥ कालमानातें पाहून। मतें केलीं स्थापन। वेदमार्गाला धरून। समाज सुखी ठेवावया ॥ ३२ ॥ जें कल्याणासाठीं तुम्हीं केलें। तेंच कृत्य विघ्न झालें। या मतामतांतरानें फाडिलें। अवघ्या हिंदू समाजाला ॥ ३३ ॥ मतप्राबल्य माजलें। आंतील तत्त्व पळालें। दंभाचारा महत्त्व आलें। खरें कोणीच पाहीना ॥ ३४ ॥ भस्म कोळसा द्वारावती। कुंकुम, शेंदूर, हळद ती। ऐशा विशेष चिन्हांप्रती। महत्त्व आलें पंथांच्या ॥ ३५ ॥ मग काय विचारतां ?। एकमेकांच्या करण्या घाता। टपून बसले सर्वथा। पंथाभिमानी पुढारी ॥ ३६ ॥ ऐशा त्या यादवीकालांत। म्हणजे संवत् चौदाशें चौपन्नांत। टोळधाड हिंदुस्थानांत। आली प्रचंड यवनांची ॥३७॥ पांचाल देशाकारण। नांव देऊन अफगाण। केलें अवघ्यांसी मुसलमान। तलवारीच्या जोरावर ॥ ३८ ॥ त्या वेळीं पांचाल देशांत। कोणी सदाचारी स्वानुभवी संत। नव्हता म्हणून विपरीत। प्रसंग तेथें ओढवला ॥ ३९ ॥ त्या अफगाण देशासमान। करावया हा हिंदुस्थान। आले बादशहा यवन। मोठें सैन्य घेऊनिया ॥ ४० ॥ त्या यवन क्रूर लीलेचें। काय वर्णन करूं वाचें ?। मऊपण निवडुंगाचें। कोणत्या रीतीं वर्णावें ? ॥ ४१ ॥ दुबळे हिंदू पाहून। जबरदस्तीनें मुसलमान। करावें कोणालागून। लालूच दावून पैशाची ॥ ४२ ॥ हिंदूंचीं घरें लुटावीं। लहान अर्भकें पळवून न्यावीं। भव्य मंदिरें पाडावीं। पथांत धेनु कापाव्या ॥ ४३ ॥ ग्रंथ असल्यास जाळावे। जबरदस्तीनें स्त्रियांस न्यावें। कळपांत

नेऊन बाटवावें । आपुल्या कीं विबुध हो ! ॥ ४४ ॥ या स्थितीच्या प्रतिकारातें । करण्या हिंदू समर्थ होते । परि एकमत मुळींच नव्हतें । कोणाचेंहि त्यांच्यांत ॥ ४५ ॥ समाजस्वातंत्र्याचा किल्ला । त्यांचा होता पोखरलेला । नाना मतांच्या घुशीनें भला । म्हणून फावलें यवनास ॥४६॥ तघलक बादशहा यवन । नांव ज्याचें ग्यासुद्दीन । त्यांनीं काशींत येऊन । लुटालूट आरंभिली ॥ ४७ ॥ तेव्हां वाराणशीतें । श्रीरामानंद साधू होते । त्यांनीं ग्यासुद्दीन तघलकातें । चमत्कार दाखविला ॥ ४८ ॥ शहानें घर लुटावें । तेंच स्वामींनीं भरावें । आपुल्या कृपेनें बरवें । पहिल्यापरी क्षणांत ॥ ४९ ॥ श्रीस्वामींस मारण्याला । ग्यासुद्दीन तघलक आला । तो स्वामीजींसी पाहतां भला । निर्वैर झाला कीं! ॥५०॥ या श्रीरामानंदांचें वर्णन । मौलाना रसीदुद्दीन । गेला आहे करून । मुक्त कंठानें एका ग्रंथीं ॥ ५१ ॥ नांव त्या पुस्तकाचें । तजकि-रतुल्ल-फुकरा साचें । ज्यांत यवनांच्या साधूचें । विशेष वर्णन केलें असे ॥ ५२ ॥ ना तरी हल्लींचे मौलाना । बादशहास विनविती जाणा । या समस्त हिंदू लोकांना । नेस्तनाबूद करावें ॥ ५३ ॥ तरीच अल्ला ईश्वराची । कृपा आहे व्हावयाची । ही कां शिकवण सन्नीतीची । तुम्हीच विचार करा हो ! ॥५४॥ साधू असो कोणताहि । द्वेष मोह त्याला नाहीं । तो त्रिकालाबाधित तत्त्वाठायीं । रममाण कीं होतसे ॥५५॥ श्रीशेखमहंमदांनीं अलमगिरा । वाटेवरी आणिला खरा । ज्यांना होता पसारा । योगशास्त्राचा अवगत ॥ ५६ ॥ दैविक आपत्ति जेव्हां येते । तैं साधू निवटिती तयातें । ही गोष्ट न करतां येते । संताविण कवणाला ॥ ५७ ॥ आणि सत्स्वरूपा जाणणारा । तोच साधू होतो खरा । शब्दसृष्टीचा पसारा । दावी, तो न होय साधू ॥ ५८ ॥ शाब्दिक ज्ञानें अहंकार । वर्धमान होतसे फार । गाढवाचा जयजयकार । उकिरड्यावरीच होतसे ॥ ५९ ॥ या हल्लींच्या काळांत । शब्दज्ञानी झाले बहुत । लोकां सांगती अहोरात्र । ब्रह्म सत्य न् जगत् मिथ्या ॥ ६० ॥ तो ज्ञान सांगणारा । दंभाचाराचा भोक्ता खरा । तो शास्त्राच्या अंतरा । कळत असून जाणत नसे ॥ ६१ ॥ प्रवचनासी ज्ञानेश्वरी । अभ्यासिली त्यांनीं खरी । तो पढीक पोपट निर्धारीं । अनुभवाचें ज्ञान नसे ॥ ६२ ॥ तैसेंच श्रोत्यांमाझारीं । अवघे असती अनधिकारी । तरणे ज्वान तरण्या पोरी । कांहीं गलित म्हातारे ॥ ६३ ॥

अनुतापाच्यावांचून । अध्यात्माचें न फळे श्रवण । उलट वाढेल स्वैरपण । याच अध्यात्माच्या बळें ॥ ६४ ॥ हें अध्यात्माचें झालें । आतां उपासनेचें राहिलें । तेंहि सांगतों थोडें वहिलें । तिकडे अवधान असूं द्या ॥ ६५ ॥ उपासनेचिया ठायीं । अद्वेष्टेपण मुळींच नाहीं । सदाचाराचें नांवहि । न ये कीं प्रत्यया ॥६६॥ पंढरीचा वारकरी । होऊन मठ भूमीवरी । भव्य बांधावें जिवावरी । आपुल्या शिष्यशाखेच्या ॥ ६७ ॥ कोणी ज्ञानेश्वरी सांगून । आपुली वाढवून घ्यावी चैन । तोंडसुख घ्यावें पूर्ण । वेदोपनिषदांवरी पाहा ॥ ६८ ॥ त्याचें एक उदाहरण । ठेवितों थेथें सांगून । भाऊ भाऊ दोघेजण । उपासनाक्षेत्रीं उतरले ॥ ६९ ॥ थोरलिया बंधूप्रत । ज्ञानेश्वरी थोडीबहुत । येत होती त्याला महंत । केलें धाकट्या भावांनीं ॥ ७० ॥ आरती लोकांदेखत । धाकटा बंधु असे करीत । म्हणे हा आहे साक्षात् । अवतार ज्ञानेश्वरांचा ॥७१॥ विठाई, ज्ञानाई, तुकाई । त्यांच्यापुढें हाच पाही । यांचेसम होणें नाहीं । पुरुष आतां यापुढें ॥ ७२ ॥ कधीं कधीं मजप्रत । दिसती यांना चार हात । तें ऐकून लोक बहुत । त्यांच्या नादीं लागले ॥ ७३ ॥ कोणी बसाया गाद्या केल्या । कोणी चाळी त्यास अर्पिल्या । याच गोष्टी कारण झाल्या । दोघा भावांच्या लढाईस ॥७४॥ बुध हो ! त्या भांडणीं भलें । अवघेंच कांहीं बाहेर आलें । कुटाळाचें तेणें झालें । मन पाहा आनंदित ॥ ७५ ॥ कोणी चारी धामांच्या । यात्रा त्या काढिल्या साच्या । पालखीमध्यें विठ्ठलाच्या । पादुका त्या ठेवून ॥ ७६ ॥ गांवोगांव पत्रिका । पुढें धाडून देती देखा । बरोबर पुरुषबायका । त्यांचा भव्य तांडा असे ॥ ७७ ॥ गांवांत कीर्तन मांडावें । उभे हात नाचवावे । आणि श्रोत्यांस ऐसें सांगावें । आम्ही निघालों यात्रेला ॥ ७८ ॥ तिकिटापुरते पैसे द्यावे । नाशिकापर्यंत पोहोंचवावें । आमुच्या पोटाचें तें बरवें । ओझें आहे विठ्ठलशिरीं ॥ ७९ ॥ उच्च वर्णांच्या निंदा । कीर्तनामाजीं करिती सदा । उपासना हा एक धंदा । झाला सध्यां दांभिकास ॥ ८० ॥ कोणी मठाची व्यवस्था ती । विश्वस्ताच्या देती हातीं । विश्वस्ताची पाहतां स्थिति । ते आप्त सोयरे बुवाचे ॥ ८१ ॥ वर्गणीच्या जोरावरी । मठ उभारिला निर्धारीं । त्याची व्यवस्था दिली करीं । आपुल्या आप्तस्वकीयांच्या ॥ ८२ ॥ तैशी कर्मपरंपरा साजिरी । रसातळास गेली खरी । होतीं

अविधि कृत्यें सारीं । ज्या योगें दोष घडे ॥ ८३ ॥ कोणी लोकांस ऐसें म्हणे । आम्हां आहे यज्ञ करणें । आम्ही बहुत अनुष्ठानें । करीत आलों आजवर ॥ ८४ ॥ कांहीं वर्गणी करून । आम्हां आणून द्यावें धन । त्याचें यज्ञनारायण । फल देईल तुम्हांतें ॥ ८५ ॥ यज्ञक्रिया पाहूं जातां । ती अविधि सर्वथा होता । द्रष्टा आणि उद्गाता । अनाचाराचे भोक्ते बहु ॥ ८६ ॥ ऐशा अविधि यज्ञापासून । उत्तम फल तें कोठून । यावें, सांगा हो ! सुज्ञ जन । निंब न प्रसवे अंजिरा ॥ ८७ ॥ व्रतवैकल्यें त्याचपरी । नासून गेलीं आहेत सारीं । सत्यनारायणाच्या नांवावरी । कोठें कांठें झाले मठ ॥८८॥ कोणी पांढऱ्या घोंगडीवरी । येऊन बसावें मंदिरीं । देवाचिया समोरीं । नसतें महत्त्व वाढवावया ॥ ८९ ॥ लोकांदेखत माळणीला । सांगावें हार घालण्याला । आधींच पैसा देऊन तिला । दुसऱ्या दिवसाच्या माळेचा ॥ ९० ॥ तैसेच पाहा अनाचारी । होऊन बसले भिक्षेकरी । भिक्षेचिया जीवावरी । उदर आपुलें भरावें ॥ ९१ ॥ आणि फिरावें गांजा पीत । वा दारूच्या अड्ड्यांत । वा जुगाराच्या मंडळींत । जुवा खेळण्याप्रति जावें ॥ ९२ ॥ देशभक्तीची तीच तऱ्हा । एकीचा झाला मातेरा । जो तो करूं लागला खरा । आपुल्या मताचा उदोउदो ॥ ९३ ॥ एकी होईल सर्वांची । ऐशी न कोणी हुडकी साची । युक्ति, उलट द्वेषाची । परंपरा वाढवितो ॥ ९४ ॥ तुरुंगांत गेल्याचें । वर्णन लोकां सांगे साचें । हें त्या राष्ट्रभक्ताचें । सोंग आणी निःसंशय ॥ ९५ ॥ राज्य गेलें परक्यांहातीं । विदेशीं गेली संपत्ति । धान्यसामग्री पोटापुरती । ती ही शेती पिकेना ॥ ९६ ॥ अवर्षणें तीं साचार । पडूं लागलीं वरच्यावर । शेतकरी झाले बेजार । हात लाविती दैवाला ॥ ९७ ॥ गुरें ढोरें सोडिती प्राण । आकाशाकडे पाहून । याचें शोधितां कारण । अनाचार हेंच कळे ॥ ९८ ॥ ब्राह्मण बहुतेक भ्रष्ट झाले । वेदा निंदूं लागले । कित्येकांना जड झालें । जानवें तें गळ्यांतील ! ॥ ९९ ॥ विधर्म्यांचें पेय पिती । अभक्ष्यातें भक्षण करिती । आणि उलट मिरविती । प्रतिष्ठा ती जगांत ॥ १०० ॥ आम्ही मांसाचें सेवन । करतों शक्ति येण्याकारण । कां कीं राष्ट्राचें दुबळेपण । त्याविण जाणें शक्य नसे ॥ १०१ ॥ मागें चहूं वर्णांत । ब्राह्मण श्रेष्ठ मानिले होते जात । त्यांच्या अंगींच्या सामर्थ्ये ॥ १०२ ॥ आतांच्या ब्राह्मणाकारण । नुसता पाहिजे

सन्मान । पाहूं जातां वर्तन । अश्लील, निंद्य, ओंगळ ॥ १०३ ॥ राजे पाहा हल्लींचे । गुलाम झाले परक्यांचे । नांव स्वाभिमानाचें । त्यांच्या ठायीं दिसेना ॥ १०४ ॥ बुद्धिबळांतील राज्यापरी । यांची स्थिति आहे खरी । त्यांची श्रद्धा धर्मावरी । अणुमात्रहि बसेना ॥१०५॥ धर्मभ्रष्ट सत्ताधीश । होती ज्या राष्ट्रास । तेथेंच अनाचारास । फावतें कीं नांदावया ॥१०६॥ तोंडपुजे ग्रंथकार । होऊन बैसले साचार । कवींनीं बांधिली कंबर । अश्लील वाङ्मय रचावया ॥१०७॥ सिनेमा रेसेस् बोकाळल्या । ज्या न होऊं त्या होऊं लागल्या । गोष्टी अनन्वित हो ! भल्या । त्यांची गणति कोण करी ? ॥१०८॥ मुसलमानांच्या काळांत । मंदिरें झालीं जमीनदोस्त । तींच हल्लींच्या काळांत । भ्रष्ट होऊं पाहती ॥ १०९ ॥ नीति कोणास आवडेना । ठार संभावितपणा । झाला, भारताची दैना । झाली सर्व बाजूंनीं ॥ ११० ॥ बंधु बंधु झाले वैरी । तेथे समाजा कोण विचारी ? । पावित्र्य तें झालें दुरी । गृहस्थाच्या घरांतून ॥ १११ ॥ भारत आजपर्यंत । नांदत होता सुखांत । कां कीं थोडेबहुत । संत अवतीर्ण होत होते ॥ ११२ ॥ ज्ञानेश, नामा, एकनाथ । सांवता, गोरा, दामाजिपंत । कान्हो, नरहरि, चोखा संत । महार नंदपन्या तो ॥ ११३ ॥ स्वामी समर्थ रामदास । श्रीतुकाराम पुण्यपुरुष । झाले देहूग्रामास । धामणगांवीं बोधला ॥११४॥ तैसेंच हिंदुस्थानांत साधुवर । नानक, तुलसी, कबीर । कर्नाटकीं विठ्ठल पुरंदर । गुजराथेंत नरसिंह मेहता ॥ ११५ ॥ या जगमान्य संतांनीं । आपुल्या अमृत वाणीनीं । जगा उपदेश करोनी । नीतिपंथा संरक्षिलें ॥ ११६ ॥ तोहि काल मागे पडला । आतां भयंकर पातला । देवदरबारीं वशीला । कोणी न सांप्रत उरला कीं ॥ ११७ ॥ वशीले देवदरबारीचे । संत हेच एक साचे । हल्लींचिया दांभिकांचें । तोंड न पाहूया इच्छी प्रभु ॥ ११८ ॥ बाहुबलाच्या जीवावर । राष्ट्राचा करावा उद्धार । तरी पाप्याचे ते पितर । क्षत्रिय झाले हल्लींचे ॥११९॥ वैश्य वर्ग हल्लींचा । अडत्या झाला परक्यांचा । परक्यांस लाभ लोण्याचा । यांचे वांट्यास ताक असे ॥ १२० ॥ शूद्र वर्गाचें तें बल । परक्यांसाठीं आहे सकळ । एवंच कशाचाहि एकमेळ । नाहीं मुळींच राहिला ॥ १२१ ॥ तरुण युवक प्रयत्न करती । शक्ति वाढवण्याप्रति । तेच निरखून पाहत बसती । नग्न स्त्रियांच्या चित्रांना ! ॥ १२२ ॥

जेथें वसिष्ठासम शुचिर्भूत । ब्राह्मण होते नांदत । मंत्रविद्येंत पारंगत । अशुभ दैन्य विध्वंसिते ॥ १२३ ॥ त्याच देशामाझारीं । ब्राह्मण झाले अनधिकारी । धर्मश्रद्धा अंतरीं । शंभरांतून दहांच्या ॥ १२४ ॥ तो ही श्रद्धा डळमळीत । ओढ्याचिया पूरवत । सन्नीति राहिली शब्दांत । अनाचारास खरा जोर ॥ १२५ ॥ अशक्य जे साक्षात्कार । घडून आले आजवर । त्या काल्पनिक कथा साचार । वाटूं लागल्या विद्वानां ॥१२६॥ साक्षात्कार तोच करतो । जो तत्त्वासी तादात्म्यता पावतो । अवघ्या जगाचा मित्र बनतो । सद्‌वर्तनानें आपुल्या ॥ १२७ ॥ मागें नवनाथांनीं साक्षात्कार दाविले करोनी । तीच सांप्रत झाली कहाणी । हाय हाय रे दुर्दैवा ! ॥ १२८ ॥ आतां कशाचे मच्छिंदर । आदिनाथ जालंदर । कानिफा, गहिनी योगेश्वर । श्रीगोरखनाथ ब्रह्मवेत्ता ॥ १२९ ॥ हे गोसावी विरक्त होते । आचार्यांपरी भारतातें । हेहि झाले रक्षिते । नाना संकटांच्या मधूनी ॥ १३० ॥ संकटें तीं निवटिलीं । योगशक्ति दाविली । विरक्तता न सोडिली । आपुल्या अंगींची अणुमात्र ॥१३१॥ पाहतां हल्लींची परिस्थिति । आशा उपजते चित्तीं । ही स्थापावया सन्नीति । योग्य पुरुष येतील ॥ १३२ ॥ रावण, कुंभकर्ण आधीं झाले । तेव्हांच मागून राम आले । जैनबौद्धांमागून भले। आचार्य आले त्याच-परी ॥ १३३ ॥ आधीं मान केराचा । मागून संमार्जनाचा । हा न्याय असल्या साचा । आतां तैसेंच होईल ॥ १३४ ॥ अभक्त दुष्ट दुर्जन । ज्या अर्थी झाले निर्माण । त्या अर्थी मागाहून । संत आलेच पाहिजेत ॥ १३५ ॥ म्हणून तुम्हीं अवघ्यांनीं । वेगें अवतार घेऊनी । दंभाचारा पिटाळूनी । लावा भारतापलीकडे ॥ १३६ ॥ सन्नीति सुबत्ता संपत्ति । नांदो सदैव या भारतीं । चतुर्वर्णांत वाढो प्रीति । रक्षण होवो वेदाचें ॥ १३७ ॥ ब्राह्मण करा सदाचारी । क्षत्रिय ते शूर भारी । वैश्यांचिया घरीं । लक्ष्मीचा करावा वास ॥ १३८ ॥ शूद्र करावे नीतिमान् । तैसेंच अलोट बलवान् । मंदिरांचें पावित्र्यपण । तुम्ही रक्षा येऊनिया ॥१३९॥ तुम्ही अवतीर्ण झाल्यावर । अवघें दैन्य जाईल दूर । भारताचा जयजय-कार । करा येऊन चहूंकडे ॥ १४० ॥ क्षेत्रें करावीं नीतिमान् । मठपति वैराग्यसंपन्न । स्वानुभवाचें असो ज्ञान । शास्त्रीपुराणिकांठायीं ॥१४१॥ हेंच तुम्हीं आम्हां द्यावें । आणि तें देण्या लौकर यावें । दासगणूचें हे न

व्हावे। बोल आतां निरर्थक ॥ १४२ ॥ इति श्रीदासगणुविरचित। श्रीशंकराचार्यचरितामृत। होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्यपेठेस जावया ॥ १४३ ॥ श्रीहरिहरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

## अध्याय एकूणचाळिसावा

॥ श्रीगणेशाय नमः ॥ हे सर्वशक्ति सर्वाधारा ! । हे सर्वमान्य सर्वेश्वरा ! । सर्वातीता अघमलहरा ! । पुरुषोत्तमा ! विश्वपते ! ॥१॥ देवा ! तुझ्या कृपेंकरून । आचार्यचरित्र झालें पूर्ण । या कळसाध्याया-लागून । साहाय्य आपुलें असावें ॥ २ ॥ तुझ्या कृपेचा पोसणा । मी आहें नारायणा ! । नका करूं हो ! वंचना । देवा ! दासगणूची ॥ ३ ॥ या आचार्यचरित्रेंकरून । सुसंस्कृत होवो मन । अवघ्यांचे दयाघन ! । जे जे आदरें वाचतील या ॥ ४ ॥ मतामतांचा गलबला । या चरित्रें मिटो भला । भारताचा बोलबाला । होवो शीघ्र तुझ्या कृपें ॥ ५ ॥ हें आचार्य-चरित्र न कहाणी । ही भव्य कल्याणाची पेठ जाणी । पाहा अनुभव घेवोनी । म्हणजे तुम्हां कळेल ॥ ६ ॥ पूर्वी जगद्गुरूंचा । अवतार जो झाला साचा । तो तुमच्या संकटांचा । परिहार करायाकारणें ॥ ७ ॥ कैलासातें सोडिलें । सुंदर उमेसी त्यागिलें । मृत्युलोकीं जन्मा आले । तुमचें कल्याण करावया ॥ ८ ॥ आचार्य देवाहून थोर । त्यांचे न फिटती उपकार । झालेले हिंदू धर्मावर । हें ध्यानांत असूं द्या ॥ ९ ॥ या पुण्य-श्लोक पुरुषाचें । वर्णन जर्मनींत झालें साचें । जें जर्मनीराष्ट्र गीर्वाणाचें । माहेर बनलें सांप्रत ॥ १० ॥ म्हणून शंकराचार्याविषयीं । आदर ठेवा अहर्निशीं । त्यांच्या अद्वैत पंथासी । कंठीं धरून असावें ॥ ११ ॥ तरीच होईल कल्याण । सर्व प्रकारचें जाईल दैन्य । प्रत्येक हिंदूंनीं अभिमान । धरिला पाहिजे आचार्यांचा ॥१२॥ धर्ममतांचे प्रवर्तक । जरी झाले बहुत लोक । तरी न येई निःशंक । आचार्यांची सरी कोणा ॥ १३ ॥ आचा-र्यांच्या मतांत । द्वेष न कोणाचा यत्किंचित् । ऐसें सर्वांगसुंदर मत । आहे श्रीशंकराचार्यांचें ॥ १४ ॥ म्हणून अवघ्या हिंदूंनीं । शरण जावें आचार्य-चरणीं । चरित्र यांचें वाचोनी । वर्तन आपुलें सुधारा ॥ १५ ॥ आतां

अवघ्या ग्रंथाची । अनुक्रमणिका देतों साची । कथा प्रत्येक अध्यायाची । थोडक्यामधें सांगून ॥ १६ ॥ प्रथम अध्यायालागून । केलें आहे वंदन । देवगुरूंकारण । तैसेंच ग्रंथाच्या वर्ण्यविषया ॥ १७ ॥ द्वितीयाध्यायीं तत्त्वतां । बुद्ध देवाच्या असती कथा । बुद्ध देव झाला येता । जन्मा लुंबिनी राईमध्यें ॥ १८ ॥ हा कपिलवस्तु नगरांत । निघाला सहल करण्याप्रत । तों त्याच्या एक प्रेत । दृष्टीस पडतें जाहलें ॥ १९ ॥ तैसाच एक म्हातारा । पंथांत त्यानें पाहिला खरा । जो मृत्यूचिया द्वारा । जाऊन बैसला होता कीं ॥ २० ॥ त्या स्थितींतें पाहून । सिद्धार्थाचें वेधलें मन । त्यांनीं त्याचें कारण । सारथी छंदास विचारिलें ॥ २१ ॥ छंद म्हणे राजपुत्रा ! । या दोन्हीहि अवस्था । कोणालाहि चुकवितां । न येती मृत्युलोकांत ॥ २२ ॥ हेंच झालें कारण । याच्या वैराग्यालागून । सिद्धार्थ गेला निघून । तत्त्वशोध करावया ॥ २३ ॥ उरुवेला वनांत तप केलें । बोधिद्रुमाखालीं भलें । अखेर दीक्षेसी घेतलें । सर्वस्व तें त्यागूनिया ॥२४॥ निरंजना-तीरास । निज मताचा उपदेश । बुद्ध आपुल्या शिष्यांस । करूं लागले विबुध हो ! ॥ २५ ॥ कनिष्क-अशोकांसमान । राजे झाले महान् महान् । बुद्धधर्माचें मोठेपण । निजसत्तेनें वाढविलें ॥ २६ ॥ कथा महावीर स्वामींची । म्हणजे जैनपंथाच्या जनकाची । आहे तृतीय अध्याया साची । ग्रथित केलेली विबुध हो ! ॥ २७ ॥ विदेह देशा-माझारीं । कुंडग्रामाभीतरीं । त्रिशला देवीच्या उदरीं । महावीर जन्मले ॥ २८ ॥ चैत्र शुद्ध पक्षाला । सोमवारीं त्रयोदशीला । हा चोविसावा जन्मा आला । जैनांचा तीर्थंकर ॥ २९ ॥ आपुल्या तीर्थंकरांचें । महत्त्व दावावया साचें । प्रामाण्य कांहीं श्रुतीचें । नामसादृश्यें दाविलें ॥ ३० ॥ जैन मतें थोडक्यांत । कथिलीं याच अध्यायांत । फरक जैनांनीं इतिहासांत । कैसा केला तो दाखविला ॥ ३१ ॥ चतुर्थाध्यायाकारणें । नारदांनीं गाऱ्हाणें । नेलें अति आदरानें । धर्मग्लानीचें ब्रह्मलोकीं ॥ ३२ ॥ मग तो ब्रह्मा चतुरानन । देवांस अवघ्यां घेऊन । कैलासलोका जाऊन । पार्वतीशा भेटला ॥ ३३ ॥ देवगाऱ्हाणें शंकरांनीं । अवघें घेतलें ऐकोनी । गुहाकडे पाहूनी । आज्ञा करिता जाहला ॥ ३४ ॥ हे कीर्तिकेया कुमारा ! । तूं कराया वेदोद्धारा । अवतार घेऊनि जाई खरा । भारतवर्षास भूमिवरी ॥ ३५ ॥ इंद्रहि

तुझ्या मदतीला । येईल जाण महीतला । ऐसें भगवान बोलता झाला । निज कुमाराकारणें ॥ ३६ ॥ पंचमामाजीं आहे कथन । जैनबुद्धांचें खंडण । भट्टापादें केलें जाण । राजसभेंत येऊनिया ॥ ३७ ॥ सभा सुधन्वा राजाची । ती बुधहो ! होती साची । मान्यमान्यता जैनांची । विशेष ज्या सभेमध्यें ॥ ३८ ॥ भट्टपाद तेथें आले । वेदप्रामाण्या दावण्या भले । अघटित कृत्य करिते झाले । जैनबुद्धांच्या आग्रहानें ॥ ३९ ॥ तेथें पर्वतावरूनी । उडी भट्टापादांनीं । दाविली पाहा मारूनी । वेद खरा ठरवावया ॥ ४० ॥ त्या उडीनें समाधान । जैनांचें न झालें जाण । ते बोलले गर्जून । सुधन्व्यास येणें रीतीं ॥ ४१ ॥ अशी उडी बाजारीं । कोल्हाटीहि मारितो खरी । याहून कांहीं अपूर्व तरी । भट्टपादें दाखवावें ॥ ४२ ॥ कथा षष्ठाध्यायांत । सुधन्व्याच्या सभेत । घागरीची वस्तु गुप्त । जैनभिक्षूंनीं सांगितली ॥ ४३ ॥ जैन म्हणाले घागरीस । एक विषारी आहे शेष । भट्टपाद म्हणे श्रीनिवास । आहे जो शेषशाही ॥ ४४ ॥ सोडून पाहतां घागरीला । शेषशायी भगवान् दिसला । नागाचा न राहिला । अंशेंहि पत्ता तेथ ॥ ४५ ॥ परिवारासह सुधन्वा । वैदिक धर्मी झाला बरवा । बहुतांनीं केली सेवा । पुढें वैदिक धर्माची ॥ ४६ ॥ श्रीशिवाच्या आज्ञेंकरून । ब्रह्मदेव पावले जनन । महेश्वर नगरालागून । श्रीनर्मदातटातें ॥ ४७ ॥ मंडणमिश्र नांव धरिलें । भट्टपादाचे शिष्य झाले । अवघे ग्रंथ अभ्यासिले । यांनीं कर्ममार्गाचे ॥ ४८ ॥ श्रोते ! सातव्यामाझारीं । शोण नदीचिया तीरीं । विष्णुमित्राच्या आली उदरीं । शारदा अंबा सरस्वती ॥ ४९ ॥ त्या श्रीसरस्वतीचें । लग्न मंडणासवें झालें साचें । सुख गृहस्थाश्रमाचें । पतीसवें भोगावया ॥ ५० ॥ मंडण-मिश्र-सरस्वती । दुजी वसिष्ठ-अरुंधती । वा अत्रि, अनसूया सती । तैसेंच हें जोडपें ॥ ५१ ॥ कर्मकांडांचें मोठेंपण । दाविलें अनुभवासी आणून । अवघ्या जगालागून । पंडित मंडणमिश्रानें ॥ ५२ ॥ श्रोते ! अष्टम अध्यायांत । विद्याधिराजाची हकीकत । शिवगुरु त्यांचा सुत । जो आचार्यांचा पिता असे ॥ ५३ ॥ या शिवगुरु पंडितांनीं । पुत्रप्राप्ती-लागुनी । आराधिला शूलपाणी । चंद्रमौलीश्वर शंकर ॥ ५४ ॥ ज्या तपानें महेश । स्वप्नीं बोलले तयास । सद्‌गुणी पाहिजे असल्यास । पुत्र मिळेल तो अल्पायु ॥ ५५ ॥ मूर्ख पाहिजे असल्यासी । तो मिळेल

शतायुषी । या दोहोंतूनी सांग तुसी । कोणता पुत्र पाहिजे ।। ५६ ।। पंडितांनीं विचार केला । सद्गुणी पुत्र मागितला । आले तयाच्या उदराला । साक्षात् पिनाकी नीलकंठ ।। ५७ ।। वैशाखांत पौर्णिमेसी । रविवारीं द्वितीय प्रहरासी । कालडीनामें ग्रामासी । श्रीशंकराचार्य जन्मले ।। ५८ ।। ग्रह अवघे उच्चीचे । होते कीं बालकाचे । भाग्य त्या कालडी ग्रामाचें । झाले मथुरा-अयोध्यांपरी ।। ५९ ।। नवमा-माजीं सुरस कथा । आचार्य वेदाध्ययनाकरितां । विद्यागुरूंच्या गृहीं असतां । एक गोष्ट ऐशी केली ।। ६० ।। एका दरिद्री द्विजांचें सदन । सुवर्णाच्या आंवळ्यांकरून । भरविते झाले दयाधन । लक्ष्मीला आणवूनी ।। ६१ ।। भिक्षान्नाचें पावित्र्य । किती हें जगताप्रत । दाविते झाले सद्गुरुनाथ । स्वीकार त्याचा करोनी ।। ६२ ।। निज जननीच्या स्नाना-साठीं । पूर्णा आणविली दारवंटी । निज सदनाच्या अतिनेटी । आपुल्या अंगींच्या सामर्थ्ये ।। ६३ ।। दहाव्यांत कथा सुंदर । केरलपति राजशेखर । येता झाला सपरिवार । आचार्यांच्या दर्शना ।। ६४ ।। षोडशोपचारें पूजा केली । दक्षिणा विपुल ठेविली । ती आचार्यांनीं नाकारिली । मंदिर बांधण्या सांगितलें ।। ६५ ।। तीन नाटकें गीर्वाणीं । रचलीं राजशेखरांनीं । तीं मोठ्या नम्रतेनीं । त्यांनीं दाविली आचार्यां ।। ६६ ।। पाहून त्या नाटकांना । आचार्यांना संतोष झाला । आशीर्वाद भूपतीला । ठेऊन वाटेस लाविलें ।। ६७ ।। कथा अकराव्या अध्यायांत । स्वर्गांतुनी ऋषि समस्त । येते झाले कालडींत । जगद्गुरूंसी भेटावया ।। ६८ ।। ऋषि म्हणाले कर जोडून । आपण अवतार धरून । या भूतलासी अवतीर्ण । कां झालां तें आठवा ।। ६९ ।। आचार्य ! आपल्या शिरीं । आहे मोठी जबाबदारी । चार्वाकांची झाली स्वारी । या वैदिक धर्मावर ।। ७० ।। तिचा प्रतिकार करावया । तुम्ही आलांत महीठायां । तें कालडींत बसूनिया । होणार नाहीं केव्हांहि ।। ७१ ।। जगदुद्धार करावा । कालडीचा मोह सोडावा । अद्वैत मार्ग स्थापावा । जो सर्वांस सुखदायी ।। ७२ ।। ऐसें ऋषींनीं सांगितलें । तें आचार्यांनीं मान्य केलें । मातेनेंहि विचारिलें । पुढील भाकित पुत्राचें ।। ७३ ।। ऋषींनीं तें सांगितलें । स्वस्थानाला निघून गेले । आर्यांबेनें बसविले । अनुष्ठानास ब्राह्मण ।। ७४ ।। आचार्यांच्या जायास्थानीं । आला अस्तंगत शनि । म्हणून अनुष्ठान

मातेनीं । मांडिलें त्याच्या प्रतिकारा ।। ७५ ।। कथा बाराव्या अध्यायांत । ऐशापरि आहे ग्रथित । आचार्य गेले स्नानाप्रत । पूर्णानदीकारणें ।।७६।। तों मगरानें पाय धरिला । आचार्यांचा येऊन भला । पाहून त्या मगराला । लोक बहुत भ्याले कीं ।। ७७ ।। आर्यांबा तेथें आली । आक्रोशें रडूं लागली । कित्येकांची बोबडी वळली । त्या प्रचंड नक्रा पाहून ।।७८।। आचार्य म्हणती जननीला । आई हा मगर म्हणतो मला । तूं संन्यास दीक्षेला । घेतल्या मी सोडीन ।। ७९ ।। तें नसल्या पसंत । आतांच भक्षीन तुला येथ । म्हणून आज्ञा मजप्रत । देई संन्यास घेण्याची ।। ८० ।। तो दुर्धर प्रसंग पाहूनी । आज्ञा देती झाली जननी । श्रीशंकराचार्यालागूनी । संन्यास तो घेण्यास्तव ।। ८१ ।। कथा तेराव्याभीतरीं । आचार्य आले नर्मदातीरीं । पवित्र क्षेत्र ओंकारेश्वरीं । गोविंदगुरूंच्या दर्शना ।। ८२ ।। घेतलें गुरूंचें दर्शन । संन्यास तो केला ग्रहण । सविधि गुरूंपासून । वेदोद्धार करावया ।। ८३ ।। येथेंच ऐसा प्रकार झाला । श्रीनर्मदेस पूर आला । तोच आचार्यांनीं सांठविला । एका कमंडलूमाझारीं ।। ८४ ।। गुरूंची आज्ञा घेऊन । करिते झाले प्रयाण । काशी क्षेत्रालागून । श्रीशंकराचार्य जगद्गुरु ।। ८५ ।। श्रोते ! चौदाव्या अध्यायांत । आचार्य राहिले काशींत । सनंदन झाला छात्र । येथेंच पहिला तयांचा ।। ८६ ।। चित्सुख आणि आनंदगिरि । हेहि सनंदनापरी । शिष्य झाले जान्हवीतीरीं । श्रीशंकराचार्य स्वामींचे ।। ८७ ।। एके दिवशीं पंथांत । चांडालवेषें उमानाथ । येऊन भेटता झाला सत्य । श्रीजगद्गुरूंकारणें ।। ८८ ।। दोघांचीं बहुत बोलणीं । झालीं बुध हो ! त्या ठिकाणीं । अखेर भगवान् पिनाकपाणि । साक्षात् वेषें प्रगटला ।। ८९ ।। व्यासांच्या ब्रह्मसूत्रावरी । तुम्हीं टीका करावी खरी । ऐसें झाला त्रिपुरारि । काशींत सांगता आचार्या ।। ९० ।। पंधराव्यांत सुरस कथा । सनंदनाची योग्यता । दावण्यासी इतर छात्रां । गंगेनें दिव्य केलें कीं ।।९१।। पुरांतून जातां भली । सनंदनाच्या पायातळीं । गंगा उत्पन्न करिती झाली । एकेक सुवर्ण कमलातें ।।९२।। ऐसें झालें म्हणून । सनंदनाकारण । पद्मपाद नामाभिधान । देते झाले जगद्गुरु ।। ९३ ।। पाशुपतमति पंडित । जे आले वादाप्रत । श्रुतिवाक्यांनीं कुंठित । जगद्गुरूंनीं केलें त्यां ।। ९४ ।। श्रीव्यास बादरायण । वेष द्विजाचा घेऊन । आले भेटण्याकारण । श्रीशंकराचार्यांना

॥ ९५ ॥ ब्रह्मसूत्राचा अध्याय तिसरा । त्यांनीं विचारिला खरा । आणि म्हणाले सांग पोरा ! । यावरील टीका तुझी ॥ ९६ ॥ तें आचार्यांनीं मानिलें । भाष्य द्विजासी दाखवलें । तें पाहून प्रकट झाले । तत्काळ श्रीबादरायण ॥ ९७ ॥ व्यासांप्रति पाहून । आचार्यांनीं केलें नमन । आणि करिते झाले भाषण । मधुर निज वाणीनें ॥ ९८ ॥ काम मृत्यु-लोकींचे । झालें आतां माझें साचें । तें ऐकून व्यासवाचें । ऐसें बोलते जाहले ॥९९॥ भाष्य लिहिण्याचें काम झालें । आतां प्रचाराचें राहिलें । तें पाहिजे तुम्हींच केलें । जागजागीं स्थापून मठ ॥ १०० ॥ आणि तें करावयास । वाढविले तुमचें आयुष्य । आणिक पाहा सोळा वर्षे । तेंच सांगण्या आलों मी ॥ १०१ ॥ तें मानिलें आचार्यांनीं । व्यास गेले निघूनी । भाष्यास आशीर्वाद देवोनी । आपुल्या पवित्र वाणीनें ॥१०२॥ कथा आहे सोळाव्यांत । कुमारिलभट्टांप्रत । तो बैसता तुषाग्नींत । आले आचार्य भेटावया ॥ १०३ ॥ आपण भाष्य केलेलें । भट्टपादांस दाविलें । तुषाग्नीला शांतविलें । श्रीमत् शंकराचार्यांनीं ॥ १०४ ॥ पुढी त्याची स्वीकारून । तारक मंत्र सांगून । शंका त्याच्या घालवून । टाकिल्या जगद्गुरूंनीं ॥ १०५ ॥ आचार्यवचन ऐकिलें । भट्टपादें तैसेंच केलें । समिध म्हणून अर्पिलें । कलेवर त्यांनीं अग्नीसी ॥ १०६ ॥ सतराविyaमाझारीं । आचार्य आले नर्मदातीरीं । मंडणमिश्रांचिये घरीं । श्राद्धसमयीं प्रकटले ॥ १०७ ॥ दोघांचा संवाद झाला । शब्दपांडित्याचा भला । मंडणमिश्र चिडून गेला । कुंठित केलें म्हणून ॥ १०८ ॥ व्यास, जैमिनी तेथें होते । ते बोलले मंडणातें । अरे ! गृहस्थांनीं यतीतें । दुरु-त्तरें ताडूं नये ॥१०९॥ त्यांचें करावें पूजन । भिक्षेचें द्यावें आमंत्रण । जाऊं नको बा ! विसरून । या गृहस्थधर्माला ॥११०॥ तें मंडणानें मानिलें । आचार्यांसी पूजिलें । तेथें जगद्गुरूंनीं मागितलें । वादभिक्षेकारणें ॥१११॥ ती वादाची भिक्षा भली । मंडणानें तत्काळ दिली । येथेंच पूर्तता जाहली । सतराव्याची विबुध हो ! ॥ ११२ ॥ अठराव्यांत आहे कथन । वादविवादाचें जाण । अध्यक्षपदाचा मान । दिला दोघांनीं सरस्वतीला ॥ ११३ ॥ तिनें करून युक्तीला । दोघां घातल्या पुष्पमाला । जो जाईल जिंकिला । त्याची माळा सुकेल कीं ॥ ११४ ॥ पंधरा दिवस सभा झाली । मंडणाची माळा सुकली । मग सरस्वती बोलली । आचार्यांस येणें रीतीं

॥ ११५ ॥ तुम्हीं जिंकिला माझा पति । मी त्यांचें अर्धांग निश्चितीं । म्हणून आपणां आहे विनंती । मशीं वाद करावा ॥ ११६ ॥ मला जिंकिल्यावांचून । मंडणाला संन्यासग्रहण । तुम्हां देतां येईल न । म्हणून मशीं वाद करा ॥ ११७ ॥ सरस्वतीनें आचार्यांस । पुसलें कामशास्त्रास । त्याच्या द्याया उत्तरास । आचार्य मनीं घोंटाळले ॥ ११८ ॥ एक मासाची मुदत । मागून घेतली तिजप्रत । कामशास्त्राचीं देण्या सत्य । उत्तरें तीं विबुध हो ! ॥ ११९ ॥ एकुणविसाव्या अध्यायीं । कथा येणें रीतीं पाही । अमरूक राजदेहीं । आचार्यांनीं प्रवेश केला ॥ १२० ॥ आचार्यांचा देह भला । शिष्यवर्गांनिं सांभाळिला । एका पर्वताच्या गुहेला । एकमासपर्यंत ॥ १२१ ॥ वाट पाहिली महिनाभर । पद्मपाद अखेर । गवय्या होऊन साचार । आला स्वामींस भेटावया ॥ १२२ ॥ नृपदेहातें टाकून । आचार्य गेले निघून । पर्वतासी येऊन । निजदेहीं प्रवेश केला ॥ १२३ ॥ आचार्यांचें शरीर । त्या वेळीं चितेवर । जाळण्यासाठीं साचार । ठेविलें राजदूतांनीं ॥ १२४ ॥ तोंच देहीं प्रवेश केला । आचार्यांनीं बुध हो ! भला । नरसिंहाचा मंत्र जपला । चिताशमनार्थ स्वामींनीं ॥ १२५ ॥ चिता अवघी झाली शांत । उलट मेले राजदूत । कोणाचें न कांहीं चालत । अवतारी पुरुषाचियापुढें ॥ १२६ ॥ सरस्वतीच्या प्रश्नाचें । उत्तर द्याया आले साचे । तीर लक्षून नर्मदेचें । श्रीआचार्य महेश्वरीं ॥ १२७ ॥ सरस्वती आचार्यां बोलली । उत्तराची न उरता उरली । तुम्ही साक्षात् चंद्रमौळि । काय ठावें तुम्हां नसे ? ॥ १२८ ॥ माझें कार्य झालें म्हणून । मी करितें आतां गमन । ब्रह्मलोकाकारण । आपुल्या वंदून पायांतें ॥ १२९ ॥ ऐसें बोलून सरस्वती । गेली ब्रह्मलोकाप्रति । अवघी नगरी माहिष्मती । शरण आली आचार्यां ॥ १३० ॥ अध्याय तो विसावा । संन्यासदीक्षेचा आहे बरवा । आचार्यांनीं ठेविलें नांवा । सुरेश्वराचार्य मंडणास ॥ १३१ ॥ एकविसाव्या अध्यायांत । सोडून महेश्वराप्रत । आचार्य निघाले शिष्यांसहित । दक्षिण दिशा लक्षूनिया ॥ १३२ ॥ फिरत फिरत श्रीशैल्यासी । येते झाले पुण्यराशि । तेथें एक भेटला त्यांसी । भैरवाख्य कापालिक ॥ १३३ ॥ त्यानें आचार्यांचें शिर । मागितलें साचार । त्याचा न करितां इनकार । आचार्यांनीं कबूल केलें ॥ १३४ ॥ एका गुप्त गुहेसी । चाल घेऊन आम्हांसी । कां कीं शिष्य बहुवसी ।

आहेत माझ्या समागमें ॥ १३५ ॥ ते तुजलागीं मला ठार । करूं न देती साचार । मी आहें तय्यार । माझें शिर तुला देण्या ॥ १३६ ॥ घेऊन जगद्‌गुरूंना । कापालिक गुप्त गुहेंत गेला । हें वृत्त पद्मपादाला । कळतें झालें योगबळें ॥ १३७ ॥ तो नरसिंह होऊन । गेला गुहेंत धांवून । कापालिकाचें विदारण । पोट तेथें केलें त्यांनीं ॥ १३८ ॥ कापालिक करून गेला । स्वामिशिष्यांस आनंद झाला । या शूद्र मताविषयीं केला । श्रींनीं उपदेश शिष्यांसीं ॥ १३९ ॥ बाविसाव्या अध्यायांत । आचार्य आले शिष्यांसहित । निधितटाकीं गोकर्णात । महाबळेश्वर वंदावया ॥ १४० ॥ तेथून हरिहरेश्वरीं । आचार्य आले निर्धारीं । हरिहरांची स्तुति खरी । केली एक्या स्तोत्रामधें ॥ १४१ ॥ मूकांबिका क्षेत्रांत । आचार्य आले फिरत फिरत । तों एका द्विजाचे गृहांत । पुत्र त्याचा मृत झाला ॥ १४२ ॥ तो आचार्यांनीं उठविला । एका निमिषामाजीं भला । ब्रह्मवेत्त्या पुरुषाला । कांहीं न राहिलें जगीं जड ॥ १४३ ॥ क्षेत्रस्थांचें समाधान । निघते झाले करून । आपुले शिष्य घेऊन । श्रीबलिग्रामास जावया ॥ १४४ ॥ तेविसाव्या अध्यायांत । कथा मनोहर अत्यंत । प्रभाकराचा मुका सुत । आचार्यकृपेनें बोलला ॥ १४५ ॥ त्या प्रभाकरपुत्रा भलें । नांव हस्तामलक दिलें । आपुल्या जवळ ठेविलें । रत्नापाशीं रत्न जाय ॥ १४६ ॥ तुंगभद्रेचिया तीरीं । शृंगपर्वताच्या वरी । संन्यासदीक्षा दिली खरी । हस्तामलकाकारणें ॥ १४७ ॥ चोविसाव्या ठायीं जाणा । शृंगेरी मठाची स्थापना । आणिक शिष्यवरांना । ग्रंथ रचण्याची आज्ञा दिली ॥ १४८ ॥ कृपा आनंदगिरीवर । करिते झाले गुरुवर । बुद्धिमालिन्य केलें दूर । निज शिष्य गिरीचें ॥ १४९ ॥ तोटकाचार्य पदवी दिली । आनंदगिरीकारणें भली । धन्य धन्य ती गुरुमाउली । श्रीशंकराचार्य महाराज ॥ १५० ॥ पंचविसाव्याभीतरीं । जगद्‌गुरूंची मातोश्री । आर्यांबा पूर्णातीरीं । आसन्नमरण झाली असे ॥ १५१ ॥ तिनें पुत्राचें स्मरण केलें । आचार्य कालडींत प्राप्त झाले । इच्छेनुरूप पोहोंचविलें । वैकुंठलोकीं जननीस ॥ १५२ ॥ निज मातेचें कलेवर । जें कां राहिलें भूमीवर । त्याला अग्निसंस्कार । आचार्य करिते जाहले ॥ १५३ ॥ दक्षिण बाहूचें मंथन । त्या प्रेताचें करून । प्रेत कराया दहन । अग्नि उत्पन्न केला कीं ॥ १५४ ॥ कालडीच्या द्विजांना । आकाशवाणीनें शाप दिला । नंबुद्री आप्तांच्या

प्रेतांना । अजून जाळिती परसांतून ॥ १५५ ॥ कथा सव्विसाव्या अध्यायांत । पद्मपाद शिष्यांसहित । जातां रामेश्वराप्रत । निज मातुलाच्या घरीं आला ॥ १५६ ॥ मातुल पद्मपादाचा । द्वैतमती होता साचा । त्यांनीं निज भाच्याचा । ग्रंथसमूह जाळला कीं ॥१५७॥ पद्मपादाच्या बुद्धीस । आणावया मंदत्वास । घातलें एक्या औषधीस । बासुंदींत मातुलानें ॥ १५८ ॥ ती पद्मपादा खाण्या दिली । बुद्धि त्याची मद झाली । तो तयासी लागली । खबर पाहा येणें रीतीं ॥१५९॥ क्रियाकर्मांतर मातेचें । करावयाप्रति साचें । येणें श्रीशंकराचार्यांचें । झालें आहे कालडींत ॥१६०॥ ऐशी खबर ऐकून । पद्मपाद तोषले जाण । निजशिष्यांसी घेऊन । येते झाले कालडींत ॥ १६१ ॥ आचार्यांसी वंदन केलें । अवघे वृत्त निवेदिलें । म्हणे गुरुराया ! जळाले । ग्रंथ माझे मातुलगृहीं ॥ १६२ ॥ टीका मीं जी केली । ती अग्निमाजीं जळाली । बुद्धीसी ताकद नाहीं उरली । तीच पुन्हां लिहिण्याची ॥ १६३ ॥ मग आचार्य बोलले । हें कृत्य मुद्दाम केलें । तुझ्या मामानें तें वहिलें । तुझी टीका जाळून ॥ १६४ ॥ मंदत्व आणाया बुद्धीसी । औषध घातिलें बासुंदीसी । पद्मपादा खाण्या तुसी । तें तुला कळलें नसे ॥ १६५ ॥ टीका जळाल्याची खंती । करूं नकोस तिळरति । मीं ती तुझी ऐकिली होती । टीका साकल्यें मागेंच ॥ १६६ ॥ ती मी तुला सांगतों पाही । भराभर उतरून घेई । आतां पुढें सावध राही । संगत दुष्टाची धरूं नको ॥ १६७ ॥ पद्मपादाच्या टीकेपरी । तीन नाटकें कथिलीं खरीं । जशींच्या तशीं साजिरीं । चंद्रशेखर नृपास ॥ १६८ ॥ अध्याय सत्ताविसावा । ईशवाणीचा आहे बरवा । मध्यार्जुन सदाशिवा । प्रकटून वदणें भाग आलें ॥ १६९ ॥ एक अद्वैत आहे सत्य । बाकीचीं तीं मतें मिथ्य । अद्वैत हेंच श्रुतिसम्मत । जगमान्य मत असे ॥ १७० ॥ ऐशी ईशवाणी ऐकिली । तेव्हां जगाची खात्री झाली । पिंडींतून प्रकटली । मूर्ति हराची प्रत्यक्ष ॥ १७१ ॥ शिवकांची, विष्णुकांची । दोन क्षेत्रें स्थापिलीं साचीं । हीच अठ्ठाविसाव्याची । कथा आहे विबुध हो ! ॥ १७२ ॥ कांहीं मतांचें खंडण । येथेंच टाकिलें करून । आंध्रदेशाकारण । मत अद्वैत पटविलें ॥ १७३ ॥ एकुणतिसांत कथा थोर । गणवरकांची रामेश्वर । येथें नाना पंडितांबरोबर । वाद करून जिंकिलें तयां ॥१७४॥ तेथून व्यंकटाचलासी । आले जगद्गुरु पुण्यराशि । वंदून व्यंकटेशासी ।

स्तोत्र नूतन रचूनिया ॥ १७५ ॥ पुढें कर्नाटक देशांत । आचार्य आले शिष्यांसहित । उज्जनी नामें ग्रामांत । कांहीं दिवस राहिले कीं ॥१७६॥ ही उज्जनी न माळव्याची । आहे कर्नाटक देशाची । येथें कापालिक लोकांची । वस्ती होती विशेष ॥ १७७ ॥ क्रकच त्यांचा पुढारी । होता महान् दुराचारी । तो आचार्यांच्या अंगावरी । येता झाला सरसावून ॥ १७८ ॥ आचार्यांचा करण्या नाश । क्रकचें प्राथिलें भैरवास । तों प्रकटुनी भैरव त्यास । बोलता झाला येणें रीतीं ॥ १७९ ॥ हे क्रकचा मूढमते ! । तूं न जाणिलें आचार्यांतें । यांचा अंत माझ्या हातें । होणार नाहीं केव्हांहि ॥ १८० ॥ हे साक्षात् मदनदहन । मालक आमुचे पार्वतीरमण । वेदोद्धरालागुन । भूवरी अवतरले ॥ १८१ ॥ त्यांचा अपमान तूंच केला । त्याचें प्रायश्चित्त तुला । आलें देणें भाग मला । भोग फळें कर्माचीं ॥ १८२ ॥ भैरवानें क्रकचाचा । शिरच्छेद केला साचा । येथेंच कांहीं नास्तिकांचा । गर्वपरिहार केला कीं ॥ १८३ ॥ येथें कापालिक बहुत मेले । कांहीं पुनरपि वैदिक बनले । पद्मपादांनीं घेतलें । शुद्ध त्यांसी करून ॥ १८४ ॥ कथा तिसाव्या अध्यायांत । आचार्य अनुमल्लपुरींत । येऊन मल्लारीचे भक्त । वाद करून जिंकिले ॥ १८५ ॥ मग मरुंथ पुरीतें । जिंकिलें मन्मथभक्तांतें । पुढें मागध पुरीतें । इंद्रमतासी जिंकिलें ॥ १८६ ॥ प्रयाग वाराणशीसी । खंडून बहुत मतांसीं । स्थापन केलें अद्वैतासी । लोक अवघे वळवून ॥ १८७ ॥ पुढें गोकर्ण क्षेत्रांत । जिंकिले नीलकंठ पंडित । तसें उज्जनी नगरांत । भट्ट भास्करा जिंकिलें ॥१८८॥ एकतिसाव्या अध्यायीं । भगंदराची कथा पाही । अभिनवगुप्तें आचार्य-देहीं । रोगप्रवेश करविला ॥ १८९ ॥ तों साबरीच्या बळावर । आचार्य पडले शय्येवर । अखेर येऊन अश्विनीकुमार । रोगनिदान ऐसें केलें ॥ १९० ॥ अभिचार कर्म करोनी । हा एका दुष्टानीं । आचार्य देहालागुनी । आहे कीं हो जडविला ॥ १९१ ॥ याचे औषधीकरून । होणार नाहीं निरसन । हा घालवायाकारण । समर्थ एक मंत्रशास्त्र ॥ १९२ ॥ हा साबरी मंत्रें असे झाला । म्हणून याच्या नाशनाला । ॐकार मंत्र योजिला । पाहिजे योग्य अधिकारें ॥ १९३ ॥ योग्य अधिकारावांचून । मंत्र न होई फलद जाण । ऐसें अवघ्यां सांगून । अश्विनीकुमार गेले पैं

॥ १९४ ॥ मग त्या व्याधीच्या निरसना । पद्मपाद करी जाणा । ॐका-राच्या अनुष्ठाना । व्याहृतिपल्लव लावून ॥ १९५ ॥ अनुष्ठान पूर्ण झालें । स्वामींचें भगंदर निमालें । तें अभिनवगुप्तास उदेलें । अंत त्याचा करावया ॥ १९६ ॥ अभिनवगुप्ताची अखेरी । याच रोगांत झाली खरी । गौडदेशामाझारीं । पुढें आचार्य आले कीं ॥ १९७ ॥ तेथें मुरारमिश्रातें । वादांत त्यांनीं जिंकिलें । अद्वैतमार्गी वळविलें । हें सामर्थ्य स्वामींचें ॥ १९८ ॥ बत्तिसाव्यामाजीं कथन । सर्वज्ञपीठासी आरोहण । काश्मीर देशीं जाऊन । करिते झाले जगद्‌गुरु ॥ १९९ ॥ आरोहण करितेवेळीं । जमली होती बहुत मंडळी । नाना मतांची तेथें भली । त्यांनीं प्रश्न केले आचार्यांना ॥२००॥ त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें । आचार्यांनीं दिलीं त्वरें । इतर गर्जिन्नले खरे । जयशब्द करोनी ॥ २०१ ॥ आकाशवाणीचें समा-धान । सप्रमाण केलें जाण । आचार्ययोग्यता धन्य धन्य । ऐसा पुरुष होणें नसे ॥ २०२ ॥ तेहतिसाव्यामाझारीं । आचार्य आले तुंगातीरीं । मठ जो कां शृंगेरी । तेथें आपुल्या शिष्यांसह ॥२०३॥ तेथें अवघ्या शिष्यांना । कनवळ्याचा उपदेश केला । मतामतांचा गलबला । शब्दसाहित्यें करूं नका ॥ २०४ ॥ तो अवघ्यांचा करील घात । हें असूं द्या ध्यानांत । वेदाचिया रहस्याप्रत । कंठीं धरून चालावें ॥ २०५ ॥ चौतिसाव्या अध्यायांत । केले चारी दिशांप्रत । अद्वैत मताचे स्थापित । मठ शंकरा-चार्यांनीं ॥ २०६ ॥ रहस्य अद्वैत मताचें । थोडक्यांत कथिलें साचें । या चौतिसाव्या अध्यायाचें । महत्त्व विशेष या ग्रंथीं ॥ २०७ ॥ अध्याय तो पस्तिसावा । स्वर्गारोहणाचा बरवा । समागमें घेऊन देवा । आचार्य निघाले कैलासीं ॥ २०८ ॥ ब्रह्मा, विष्णु, पुरंदर । यक्ष, गंधर्व, किन्नर । शिवगण ते थोरथोर । वीरभद्रादि अवघे ॥२०९॥ यांनीं विनंती करितां खरी । आचार्य बसले नंदीवरी । सदेह गेले सत्वरीं । कैलासलोकाकारणें ॥ २१० ॥ अध्याय तो छत्तिसावा । शृंगेरी-परंपरेचा बरवा । अवघ्या स्वामींचिया नांवां । क्रमवार सांगितलें ॥ २११ ॥ हल्लीं भारती चंद्र-शेखर । हे चौतिसावे पुरुष थोर । असती कीं गादीवर । शृंगेरी मठाच्या ॥ २१२ ॥ मठ जो कां गोवर्धन । जगन्नाथ क्षेत्रीं जाण । त्याचे स्वामी गेले होऊन । एकशेंचाळीस आजवर ॥ २१३ ॥ हल्लींचिया स्वामींप्रत । नांव मधुसूदनतीर्थ । द्वारकामठीं आजपर्यंत । स्वामी पंचाहत्तर बसले

कीं ॥ २१४ ॥ शांतानंद नांवाचे । हल्लीं स्वामी आहेत साचे । उत्तरबद्री मठाचे । कोणी न मठाधिप म्हणून ॥ २१५ ॥ शके चौदाशें चाळिसीं । गोविंदगुरूंच्या गुहेसी । गेले शंकरभारती पाह्यासी । स्वामी शृंगेरी मठाचे ॥ २१६ ॥ हिमालयांत जातांना । त्यांनीं कथिलें कारभाऱ्यांना । मी न आलों जरी जाणा । तुम्हीं दिलेल्या मुदतींत ॥ २१७ ॥ तरी तुम्हीं परत जावें । गादीस शिष्य बसवावे । योग्य पाहून, वागावें । तुम्ही त्याच्या आज्ञेंत ॥ २१८ ॥ तें कारभाऱ्यांस मानलें । मुदतींत न येणें झालें । शृंगेरी मठालागीं भले । श्रीशंकरभारती स्वामींचें ॥ २१९ ॥ म्हणून शिष्य गादीला । योग्य पाहून बसविला । इकडे पाहून गुहेला । शंकर-भारती परत आले ॥ २२० ॥ त्यांना कारभारी मठाचे । बोलते झाले शृंगेरीचे । नाहीं उरलें कारण तुमचें । स्वामी येण्याचें शृंगेरीला ॥२२१॥ ऐसें झालें म्हणून । कुडलगींत एक स्थापून । मठ, आले करून । शंकरभारती संकेश्वरा ॥२२२॥ हरिद्रादेवीच्या आज्ञेनीं । संकेश्वरासी येऊनी । हिरण्य-केशी तटालागूनी । केली मठाची स्थापना ॥ २२३ ॥ तेथें शुक्लतीर्थावरी । प्रवचनाची गर्दी भारी । वक्ता महान् अधिकारी । शंकरभारती स्वामिराज ॥ २२४ ॥ स्वामींचें ऐकण्या प्रवचन । एक सरदार मुसलमान । रण-दुल्लाखान म्हणून । विजापुरचा आला असे ॥ २२५ ॥ त्यांनीं प्रवचन ऐकिलें । कांहीं गांव इनाम दिलें । याच मठाला प्राप्त झालें । पुढें नांव करवीर ॥२२६॥ वासुदेवशास्त्री भिलवडीचे । स्वामी संकेश्वर मठाचे । शंकरभारती नांवाचे । झाले असतां विबुध हो ! ॥ २२७ ॥ वेदोक्ताचें प्रकरण भलें । कोल्हापुरांत माजलें । ब्राह्मण-मराठ्यांत आलें । वितुष्ट तेणें अत्यंत ॥२२८॥ छत्रपतीच्या साह्यें भला । क्षात्र गुरु उत्पन्न केला । म्हणून संकेश्वर मठाला । स्वामींस जाणें भाग आलें ॥ २२९ ॥ करवीर-मठ नांवाला । कोल्हापुरांत राहिला । या संकेश्वर मठाला । एकवीस स्वामी झाले कीं ॥ २३० ॥ शिवगंगा, हंपी, कुंभकोण । येथील मठांचें कथन । याच अध्यायीं आहे जाण । आणिक कथा बाकीच्या ॥ २३१ ॥ सदतिसाव्या अध्यायांत । चार आचार्यांच्या कथांप्रत । सांगितलें पाहा आहे खचित । अनुक्रमानें कालाच्या ॥२३२॥ रामानुजाचार्य, निम्बार्का-चार्य । मध्वाचार्य, वल्लभाचार्य । यांचेहि कथिलें कार्य । थोडक्यांत ये अध्यायीं ॥ २३३ ॥ अडतिसाव्या अध्यायांत । स्थिति देशाची सांप्रत ।

कथन करून येण्याप्रत । केली आचार्यां विनवणी ॥ २३४ ॥ कां कीं संत अवतरल्याविना । राष्ट्राचें दैन्य जाईना । सुखलाभ तो न होई कोणा । खरा खरा श्रोते हो ! ॥ २३५ ॥ हा एकुणचाळिसावा । कळसाध्याय होय बरवा । हा सारची लेखावा । अवघ्या आचार्यचरिताचा ॥ २३६ ॥ हें चरित्र जगद्गुरूंचें श्रीशंकराचार्यस्वामींचें । अमृत मृत्युलोकींचें । आहे कीं हो ! निःसंशय ॥ २३७ ॥ युगायुगाला गुरु झाले । परि न कोणी पावले । जगद्गुरूंच्या माना भले । एक आचार्यांवांचुनी ॥ २३८ ॥ यांची प्रशंसा किती करूं । हे भवनदीचें साच तारूं । किंवा प्रत्यक्ष कल्पतरु । आचार्य भक्तांकारणें ॥ २३९ ॥ तिन्ही देवांच्या अंशेंकरून । जन्म पावले अत्रिनंदन । या आचार्य अवतारीं घडून । आलें त्याहून निराळें ॥२४०॥ या आचार्य अवतारीं । प्रत्यक्ष भगवान् मन्मथारि । अवतरले भूमीवरी । केरलदेशाकारणें ॥ २४१ ॥ भगवंताच्या दशावतारीं । पूर्ण अवतार पूत-नारि । झाला असे यमुनातीरीं । वंशामाजीं यादवांच्या ॥२४२॥ तेवींच हा आचार्यांचा । पूर्ण अवतार शिवाचा । नंबुद्रीच्या कुळीं साचा । झाला असे कालडींत ॥ २४३ ॥ श्रीभगवान् कृष्णापरी । आचार्ययोग्यता आहे खरी । हेच दोघे भूमीवरी । पूर्ण अवतार असती कीं ॥ २४४ ॥ कौर-वांचें हनन । करता झाला गोपालकृष्ण । तेंवि थोतांड मताचें निर्मूलन । केलें शंकराचार्यस्वामींनीं ॥ २४५ ॥ या ग्रंथाचा पाठ जेथ नित्य । भावें होय जेथ जेथ । तेथेंच नांदू पाहत । अवघीं सुखें येऊनिया ॥ २४६ ॥ भूत, पिशाच्च, समंधबाधा । ग्रंथपठणें न राहे कदा । ग्रंथपठकाच्या सर्वदा । इच्छा देव पुरवील ॥ २४७ ॥ वांझहि, होईल पुत्रवती । या ग्रंथश्रवणें निश्चितीं । मात्र पाहिजे दृढ भक्ति । जवळीं आचार्यचरणांच्या ॥२४८॥ या आचार्यचरिताचें मनन । जो करील मनापून । त्याच्या घरा ब्रह्मज्ञान । हुडकीत येईल निःसंशय ॥ २४९ ॥ अल्पायु होतील शतायुषी । हें चरित्र वाचल्यासी । वाचकांच्या देहासी । रोग जातील सोडून ॥२५०॥ ऐहिक सुखें भोगून सगळीं । कीर्ति उरवून भूमंडळीं । प्रत्यक्ष पाहाया चंद्रमौळि । कैलासासी जाईल तो ॥ २५१ ॥ या आचार्य-चरित्रगंगेंत । जो अवगाहन करील सत्य । महादोषचे पर्वत । जळतील त्याच्या निश्चयें ॥ २५२ ॥ पुरतील मनींच्या मनीषा । तो न भोगी कदा क्लेशा । त्याचा योगक्षेम महेशा । वाहणें भाग येईल कीं ॥ २५३ ॥ नुसतें चरित्र न वाचावें । तें

आचरून पाहावें । तरीच तो फला पावे । येरव्हीं नाहीं ।। २५४ ।। याची जे करतील निंदा । ते भोगतील आपदा । मताभिमान्यांप्रति कदा । बरें न देव पाहील ।। २५५ ।। ऐशी आचार्यचरिताची महती । ती अनुभवून पाहा त्वरितगति । आचार्यांच्या भक्तांप्रती । अशुभ न कदापि शिवेल ।। २५६ ।। हें श्रीजगद्गुरुचरितामृत । लिहिण्या आरंभ नांदेडांत । झाला श्रावण मासांत । गोदातटीं सोमवारीं ।।२५७।। शके अठराशें त्रेसष्टांत । वृषनाम संवत्सरांत । मार्गशीर्ष वद्य पक्षांत । सोमवारीं द्वादशीला ।।२५८।। नक्षत्र असतां स्वाती । ग्रंथ गेला कळसाप्रती । भीमातटीं पंढरीक्षेत्रीं । दामोदरनामें आश्रमांत ।। २५९ ।। म्हणजे नांदेडीं आरंभ झाला । शके अठराशें त्रेसष्टाला । तोच ग्रंथ कळसा गेला । पंढरीक्षेत्रामाझारीं ।।२६०।। स्वाती नक्षत्र असतां पूर्ण । हा ग्रंथ झाला म्हणून । आचार्यचरित हा स्वातीघन । उदेला दुजा वाटतसे ।।२६१।। विचाराच्या सागरांत । भाविकांचीं मनें सत्य । हेच शिंपले साक्षात् । योग्य हें धरण्या स्वातिबिंदु ।। २६२ ।। तरी सर्व सुखाचें बनेल मोतीं । सुख देईल तुम्हांप्रती । धार्मिक चातकांची तृप्ति । आचार्यचरित्र करील ।। २६३ ।। श्रीहरिहरांच्या कृपें भलें । आचार्यचरित्र कळसा पावलें । तें सुवाच्य अक्षरांनीं लिहिलें । छगन बारटक्क्यांनीं ।। २६४ ।। दासगणू ही लेखणी । करीं धरली आचार्यांनीं । लिहितां आलें म्हणूनी । या गणूनामें लेखणीला ।।२६५।। आतां माझा नमस्कार । आचार्यपदां वारंवार । करा करुणेची पांखर । या अजाण दासगणूवरी ।। २६६ ।। लेंकुराचें दुबळेपण । जाचक मातेलागून । हरा राष्ट्राचें दुबळेपण । सत्कृपेनें आपुल्या ।। २६७ ।। इति श्रीदासगणुविरचित । श्रीशंकराचार्यचरितामृत । होवो सोपान भाविकांप्रत । कैवल्यपेठेस जावया ।। २६८ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।

# श्रीमदाद्यशंकराचार्यांची आरती

जय जय शंकर भगवत्पूज्यपदाचार्य ।
आर्यवरार्तिक्यमिदं तेऽस्तु जितानार्य ॥ ध्रु० ॥

त्यक्ते वैदिकधर्मेऽधर्मै रितमतिभिः ।
मतिभिद्भिः कृतिभिन्नैर्जैनैर्दुर्मतिभिः ॥
व्याप्ते भारतवर्षे वर्षे सुमनोभिः ।
कृत ईशो योऽवातरदंशैः सुमनोभिः ॥ १ ॥

मंडनजयेन मंडनमकरोन्निजकीर्तेः ।
परकायावेशाद्यैरनवद्यैर्जूर्तेः ॥
हर्ता जगतश्चरितैर्दुरितघ्नैरार्तेः ।
भेत्ता ध्यानाद्गतिदो यो निजसन्मूर्तेः ॥ २ ॥

अरुणेनेव ध्वांते विजिते स्वलवेन ।
प्राग्दुष्टजनेऽर्क इव प्रादुरभूद्येन ॥
प्रस्थानद्योतेन प्रभुणा सुनयेन ।
विजितं द्वैतमतस्तं वंदे विनयेन ॥ ३ ॥

श्रीपद्मपादवार्तिककृत्तोटकहस्ता- ।
मलकप्रमुखच्छात्रेणानंता विजिता ॥
शिथिलीभूता वृषसृतिरपि दृढतां नीता ।
वाचां श्रीपीठस्थितिरपि येनोपात्ता ॥ ४ ॥

व्यक्तीकृत्य सतीं श्रुतिसूक्तिं यः स्वमुदे ।
सत्यवतीसुतसूक्तिं यश्चाद्वैतविदे ॥
चतुरो व्यधान्मठान्यो दिक्ष्वाम्नायभिदे ।
तं वासुदेवदंडयहमत्रिजमिव वंदे ॥ ५ ॥

॥ श्रीशंकर ॥

## संतकवि श्रीदासगणुविरचित

# श्रीसंतज्ञानेश्वरचरितामृत

॥ श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी करुणाकरा। हरिहररूपा सर्वेश्वरा। जयजय भीमातटविहारा। आद्यलिंगा रुक्मिणीपते ॥ १ ॥ तुज वंदिल्या श्रीपति। अवघे देव संतुष्ट होती। तूं अवघ्याचें मूळ निश्चितीं। इतर देव फांद्या तुझ्या ॥ २ ॥ आतां रामदास-तुकोबांसी। तैसें श्रीसांई समर्थांसी। पुण्यश्लोक वामनासी। नमन माझें असो हें ॥ ३ ॥ असो श्रोते सावधान। कथा ऐका ही पावन। जगदुद्धारा भगवान्। श्रीगोदातीरीं अवतरले ॥ ४ ॥ चरित्र रसाळ जयांचें। बहुतांनीं गाइलें साचें। सार काढून तयाचें। मीहि थोडें वर्णितों ॥ ५ ॥ ब्रह्मा, विष्णु, महेश्वर। हे अनुक्रमें भूमीवर। धरून आले अवतार। महाराष्ट्र देशामधें ॥ ६ ॥ मूळ माया बहीण झाली। तिघांसवें जन्मा आली। या चौघांनीं ख्याति केली। दुर्धरशा या कलीमधें ॥ ७ ॥ आधींच हा महाराष्ट्र। अवघ्या देशांमध्यें श्रेष्ठ। त्यांतून गोदेचे उभय कांठ। साक्षात् हृदय जयाचें ॥ ८ ॥ गोदावरीच्या माहात्म्यास। वर्णन करितां थकेल शेष। तेथें अल्पमति मी गणूदास। काय बोलूं शकेन हो ॥९॥ जी गोदातीर्थ माउली। श्रीव्यासांनीं गाइली। ब्रह्म पुराणामाजीं भली। शंभर अध्याय रचूनिया ॥१०॥ चार ओघ गंगेचे। प्रथमतः झाले साचे। थोरला हा महाराष्ट्राचे। वांट्यास आला त्यांपैकीं ॥ ११ ॥ याच ओघाकारण। गौतमीगोदा अभिधान। वृद्धा हें विशेषण। याच गंगेकारणें ॥ १२ ॥ सम्राट शककर्ता भूपति। शालिवाहन प्रतापज्योति। यानें महाराष्ट्राप्रति। महत्त्व आणिलें विशेष ॥१३॥ नररत्नें थोर थोर। येथें झालीं साचार। ज्यांच्या विजयपताका भूमीवर। बहुत काळ फडकल्या ॥ १४ ॥ भिल्लम, सिंघण, जैत्रपाळ।

राजे झाले प्रबळ। ज्यांनीं महाराष्ट्राचें अतुल बळ। भरतखंडा दाखविलें ॥ १५ ॥ राजे अवघे देवगिरीचे। वर्णनीय होते साचे। ज्यांच्या आश्रयें विद्वानांचें। सामर्थ्य आलें उदयाला ॥ १६ ॥ राजप्रशस्ति ग्रंथांत। या देशाचा आहे ग्रथित। इतिहास तो म्हणून येथ। तेंच मी न सांगें पुन्हां ॥ १७ ॥ भास्कराचार्य ज्योतिषी। झाले याच महाराष्ट्र देशीं। बोपदेव हेमाद्रीसी। जन्म येथेंच जाहला ॥ १८॥ राष्ट्राला ललामभूत। ऐसे ग्रंथहि निपजले येथ। हे अवघे सांगतां तुम्हांप्रत। ग्रंथविस्तार होईल बहु ॥ १९ ॥ परि या अवघ्यांवर। ज्यांनीं तान केली साचार। ते सोपान, निवृत्ति, ज्ञानेश्वर। अवतार विधिहरिहरांचे ॥ २० ॥ पैठणाच्या पूर्वेस। ग्राम एक चार कोस। गोदेच्या उत्तर तटास। आपेगांव नांव ज्याचें ॥ २१ ॥ या आपेगांव नगरीं। वत्सगोत्री पंचप्रवरी। शाखा माध्यंदिन खरी। होती जयाची श्रोते हो ॥२२॥ ऐसा कुलकर्णी त्र्यंबकपंत। ज्याचे गुरु गोरक्षनाथ। दोन पुत्र जयाप्रत। गोविंद, हरि जाहले ॥ २३ ॥ गोविंदपंतांनीं आपला। गहिनीनाथ गुरु केला। विठ्ठलपंत एक त्याला। पुत्र झाला योगभ्रष्ट ॥ २४ ॥ तीर्थयात्रानिमित्तानें। विठ्ठलाचें झालें येणें। क्षेत्र आळंदीकारणें। इंद्रायणीतटासी ॥ २५ ॥ तेथें वासिष्ठगोत्री त्रिप्रवरी। सिद्धोपंत सदाचारी। चोवीस गांवांचा भूवरी। कुलकर्णी एक होता ॥ २६ ॥ उमाबाई त्याची कांता। परम भाविक पतिव्रता। पोटीं एक होती दुहिता। रुक्मिणी नांव जियेचें ॥ २७ ॥ ही कन्या आपुली। सिधोपंतें अर्पिली। त्या विठ्ठलाकारणें भली। ईश्वराच्या आज्ञेनें ॥ २८ ॥ सालंकृत कन्यादान। केलें आनंदेंकरून। विठ्ठलपंत तेथून। आपेगांवीं आले पैं ॥ २९ ॥ पुढें गोविंदपंत निराबाई। कालवश झालीं पाही। तशांत विठ्ठलाचे ठायीं। पूर्ण वैराग्य बाणलें ॥ ३० ॥ मग कशाचा संसार। रखुमाई चिंतातुर। होऊन अवघा समाचार। निज पित्यास कळविला ॥ ३१ ॥ तें ऐकून सिधोपंत। आले आपेगांवाप्रत। तों जामात पाहून विरक्त। थोडे खिन्न झाले मनीं ॥ ३२ ॥ तें न बोलून दाविलें। जामातकन्या घेऊन आले। विठ्ठलाचें सांकडें पडलें। सिधोपंता विशेष ॥ ३३ ॥ वैराग्यवृत्ति विठ्ठलाची। उत्तरोत्तर वाढली साची। कास न सोडी एकांताची। कोणीं कांहीं केलें जरी ॥ ३४ ॥ जाऊन वाराणसीस। विठ्ठलें घेतला संन्यास। रामानंद पुण्यपुरुष। होते,

त्यांच्याकडूनी ॥३५॥ चैतन्याश्रम घेतलें । आश्रमनांव विठ्ठलें । वाराणशींत राहिले । गंगास्नान करूनी ॥ ३६ ॥ इकडे क्षेत्र आळंदींत । रखुमाबाई दुःखित । होऊन अश्वत्थवृक्षाप्रत । घालूं लागली प्रदक्षिणा ॥ ३७ ॥ नित्य म्हणावें देवासी । कीं तूं न्यायी म्हणवितोसी । आणि करितोसी अन्यायराशि । पदोपदीं श्रीपांडुरंगा ॥ ३८ ॥ आम्हां बायकांचें जिणें । व्यर्थ संततीच्याविणें । पति संन्यासदीक्षेनें । निर्वाणपदा पावतील ॥३९॥ माझ्या नशिबीं अधोगति । वंध्यादोषें निश्चितीं । देणार तूं श्रीपति । हें आतां समजलें ॥ ४० ॥ संपत्तीविण संसार । संततीवांचून घर । वैराग्य-भक्तिवांचून नर । स्थानें दुरिताचीं म्हणसी तूं ॥ ४१ ॥ आत्मोद्धारा-साठीं भला । पतीनें संन्यास घेतला । तो वांयां जाईल विठ्ठला ! । ऐशी भीति वाटते ॥ ४२ ॥ कां कीं देवा ! बोहोल्यावरी । त्यानें प्रतिज्ञा केली खरी । कीं मी संतति तुझ्या उदरीं । अमोघ निर्माण करीन ॥४३॥ उभयता ऐशा प्रकारें । वांयां जाऊं विठ्ठला रे । तुजवांचून कोण दुसरें । मम गाऱ्हाणें ऐकेल ॥ ४४ ॥ ऐशी हमेश प्रार्थना । करी बैसून वृंदावना । त्यायोगें नारायणा । चिंता पडली विशेष ॥ ४५ ॥ सद्भक्तासी वायदा । पर-मात्मा न करी कदा । भक्तप्रेमा गोविंदा । अवघ्यांहून विशेष ॥ ४६ ॥ स्वामी रामानंदांसी । प्रेरणा करून हृषीकेशी । आणविता झाला आळं-दीसी । तीर्थयात्रामिषानें ॥ ४७ ॥ स्वामींप्रती पाहून । रुक्मिणीनें केलें नमन । तों दिधलें आशीर्वचन । 'पुत्रवती हो' म्हणूनी ॥ ४८ ॥ हा आशीर्वाद ऐकतांक्षणीं । दुःखाश्रु आले नयनीं । तें रामानंदें पाहुनी । प्रश्न केला सिधोपंता ॥ ४९ ॥ सिधोपंतें वर्तमान । स्वामींस केलें साकल्यें कथन । तें ऐकतां झालें मन । साशंक रामानंदांचें ॥ ५० ॥ पुढें न जातां परत फिरले । स्वामी काशीप्रती आले । चैतन्याश्रमा आणविलें । आपुल्यापुढें तत्काळ ॥ ५१ ॥ हे वत्सा ! चैतन्याश्रमा ! । तूं साच फस-विलें आम्हां । पुरे न करितां गृहस्थाश्रमा । संन्यासदीक्षा घेतली तूं ॥ ५२ ॥ तूं सिधोपंताचा जामात । साध्वी रुक्मिणीचा कांत । तुझें नांव विठ्ठलपंत । तूं गोदातटींचा रहिवासी ॥ ५३ ॥ त्वां विश्वास देऊन बुड-विलें । सद्गुणी कांतेलागीं भलें । तीर्थ जननीसी सोडिलें । धिक्कार तुझ्या संन्यासा ॥ ५४ ॥ आतां कृतार्थ होण्याची । इच्छा असेल जरी साची । तरी मान्य करावी आमुची । आज्ञा तूं वेदासम ॥ ५५ ॥ त्वां

घरीं परत जावें। गृहस्थाश्रमा स्वीकारावें। श्रीगोदेच्या तटीं राहावें। विचार करीत तत्त्वाचा ॥ ५६ ॥ तत्त्वबोध होण्यास। घ्यावा न लागे संन्यास। हा एक आश्रमविशेष। महत्त्व त्याचें मानूं नको ॥५७॥ त्यायोगें चैतन्याचा। निरुपाय झाला साचा। धरिला रस्ता आळंदीचा। वंदून स्वामी-चरणांतें ॥ ५८ ॥ कांतेप्रति घेऊन। आपेगांवा केलें गमन। आश्रमत्यागें अखिल जन। उपहास करूं लागले ॥५९॥ परि शांतचित्त चैतन्य। जन-निंदा करी सहन। जनरीतीस अनुसरून। गृहस्थाश्रम चालवीतसे ॥६०॥ प्रत्यहीं ब्रह्मतीर्थावरी। स्नान गोदेमाजीं करी। तत्त्वविचार अंतरीं। करीत बैसे अहोरात्र ॥ ६१ ॥ सती रुक्मिणी स्नानास जातां। श्रीगोदेस जोडी हाता। आणि म्हणे निपुत्रिकता। माझी निवारी वृद्धे तूं ॥ ६२ ॥ गोहत्या गौतमाची। गंगे, तूं वारिली साची। ऐशा ठायीं आमुची। बाजू कां गे झाली जड ॥ ६३ ॥ ब्रह्महत्या, गोहत्या। पितृहत्या, मातृहत्या। ऐशा महापातका नुसत्या। तव स्नानें नाश होतो ॥ ६४ ॥ येथें पतीचा आश्रमत्याग। हें कां पातक राहावें मग। आई ! आपुल्या ब्रीदा जाग। पुनीत आम्हां करावें ॥ ६५ ॥ या योगें ती तीर्थ माउली। देवत्रया बोलती झाली। माझी विनंती ऐकिली। पाहिजे तुम्ही देव हो ॥ ६६ ॥ देवा, विठ्ठलचैतन्यास। दीक्षात्याग घडला दोष। तोहि गुरूच्या आज्ञेस। पाळल्याच्या कारणानें ॥ ६७ ॥ आतां गुरूनें जो करविला। त्याचा आश्रमत्याग भला। तोहि सारासार विचाराला। धरूनिया आहेच कीं ॥ ६८ ॥ वैराग्याच्या वावटळीला। विठ्ठल हा बळी पडला। दीक्षा घ्यावया हापापला। उतावीळपणानें ॥ ६९ ॥ त्याची कांता रुक्मिणी। अति पवित्र शुभाननी। निष्ठा पतीच्या ठिकाणीं। आहे देवा ! लोकोत्तर ॥ ७० ॥ संततीची तिला आस। ती मीं सामान्य दिल्यास। दोघांनाहि विशेष दोष। लागून पडतील रौरवीं ॥ ७१ ॥ मग तिच्या पातिव्रत्याचें। चीज कांहीं न झालें साचें। चोरीप्रती बाळकाचे। शिक्षा फांशी ही न बरी ॥ ७२ ॥ म्हणून तुम्हीं तिघांनीं। अंशें तदुदरीं येऊनी। माझ्या तटालागुनी। भूषित करावें देव हो ! ॥ ७३ ॥ विठ्ठल चैतन्य थोडाबहुत। जरी दोषी आहे खचित। परि कृतकर्माचा त्याप्रत। पश्चात्ताप झाला असे ॥ ७४ ॥ तोहि दोष नाहीं उरला। तत्त्वविचारें शुद्ध झाला। देहीं काळा डाग उरला। मात्र त्याकडे पाहूं नका ॥ ७५ ॥

तूं आलास मत्स्यकच्छांच्या उदरीं । तुम्ही आलांत भूमीवरी । अति हीन जी सूकरी । तीहि तुम्हां पटली असे ॥ ७६ ॥ त्या योनीहि सरत्या केल्या । व्यासाकडून गावविल्या । थोरापुढें न राहिल्या । अवश्य गोष्टी कोणत्याहि ॥ ७७ ॥ थोराचिया चरित्रांत । दोष तोहि भूषण होत । कलंक चंद्रमंडळांत । श्रेष्ठतेसी पावला ॥ ७८ ॥ अहि, भस्म, कौपिन, भलीं । हीन असून भूषणें झालीं । कां कीं तीं अंगिकारिलीं । सदाशिवें म्हणून ॥ ७९ ॥ म्हणून विनंती हीच पायां । जगदुद्धार करावया । चैतन्याच्या उदरीं येण्या । अनमान करूं नका हो ! ॥ ८० ॥ मूळ मायेला बरोबर । आणा, न पडों द्या विसर । चैतन्याचा उद्धार । करून तारा जगासी ॥ ८१ ॥ या गोदेच्या विनंतीसी । देऊन मान आदरेंसी । आले प्रथमतः व्योमकेशी । अंशें उदरीं रुक्मिणीच्या ॥ ८२ ॥ नांव ठेविलें निवृत्ति । जे अध्यात्मविद्येचे गुरु निश्चितीं । द्वितीय पुत्र रमापति । आला होऊन ज्ञानेश्वर ॥ ८३ ॥ शके अकराशें सत्त्याण्णवांत । श्रावण वद्य पक्षांत । तिथि अष्टमी मध्यरात्र । आले ज्ञानेश्वर जन्माला ॥८४॥ वाटे हा अकरावा । अवतार झालासे बरवा । तिसऱ्या खेपेस ब्रह्मदेवा । सवड मिळाली जन्मण्याची ॥ ८५ ॥ नांव धरिलें सोपान । चौथी मूळ माया जाण । मुक्ताबाई सुलक्षण । नांव ठेविलें जियेचें ॥ ८६ ॥ ऐसे गोदावरीकांठीं । जन्मते झाले ज्ञानजेठी । तेणें सती रुक्मिणीपोटीं । महा-नंद झाला ॥८७॥ मुलें मुंजीच्या योग्य जाहलीं । चैतन्या चिंता लागली । समाजानें वाळ घातिली । मग काय विचारितां ॥ ८८ ॥ अतिथिपूजन होईना । गृहा ब्राह्मण येईना । कोणी बरें पाहीना । छीः थूः झाली चहूंकडे ॥ ८९ ॥ त्यायोगें कंटाळले । चैतन्याश्रम स्वामी भले । सहकुटुंब पातले । त्र्यंबकेश्वर क्षेत्रासी ॥९०॥ हें त्र्यंबकक्षेत्र मनोहर । गोदावरीचें माहेर । ब्रह्मगिरि पर्वत थोर । शोभा अनुपम न वर्णवे ॥ ९१ ॥ त्या ब्रह्मगिरी-प्रति जाणा । चैतन्य घाली प्रदक्षिणा । घेऊन मुलांमाणसांना । प्रतिदिनीं श्रोते हो ! ॥ ९२ ॥ प्रदक्षिणा करितां एके दिनीं । भयंकर गर्जना पडली कानीं । पंचाननाची तेणें मनीं । चैतन्य झाले घाबरे ॥९३॥ चैतन्याच्या कडेवर । सोपानदेव साचार । ज्ञानदेवाचा धरिला कर । मुक्ता रुक्मिणी-कटीसी ॥९४॥ मागोमाग निवृत्ति । चालत होता सहज गति । तो रस्ता चुकन दऱ्याप्रति । एकया भयंकर पातला ॥ ९५ ॥ झाडी दाट चोहींकडे ।

ठायीं ठायीं पर्वतकडे । तुटले होते, माकडें । बसलीं असती ज्यांवर ॥ ९६ ॥ हिंस्रक पशूंच्या गर्जना । ऐकूं येती क्षणक्षणां । महीभागीं विखार जाणा । फिरूं लागले मोकाट ॥ ९७ ॥ वेळा उषःकालाची । आरक्त झाली प्राची । झुळूक गुलाबी थंडीची । आल्हाद देऊं लागली ॥ ९८ ॥ तों एक दिसलें द्वार । गुहेचें तें साचार । निवृत्तिनाथ किशोर । आश्रया तेथें पातले ॥ ९९ ॥ ती गुहा गहिनीची । होती योगेश्वराची । विचित्र-गती दैवाची । पाहा आहे कशी ही ॥१००॥ आश्रयासाठीं गुहेंत आले । तों गहिनीनाथ भेटले । छायेसाठीं झाड लाविलें । तों निघालें तें कल्पतरु ॥ १०१ ॥ बघून आसनीं गहिनीनाथ । निवृत्ति घाली दंडवत । सांगूं लागला भीतभीत । वृत्त अवघें घडलेलें ॥ १०२ ॥ अभयदान गहिनीनें । दिलें निवृत्तिकारणें । आपल्या जवळ प्रेमानें । घेतलें त्यास ठेवूनी ॥१०३॥ आणि म्हणाले तयाप्रति । तूं साक्षात् पशुपति । ऐकून गोदेची विनंती । आपेगांवीं जन्मलास ॥ १०४ ॥ तुला अध्यात्मदीक्षा द्याया । मी बसलों ये ठायां । शोक, चिंता त्यजूनिया । राही येथें निर्धास्तपणें ॥ १०५ ॥ अवघ्या विद्या निवृत्तीप्रत । शिकविते झाले गहिनीनाथ । जेथें कल्पतरु साक्षात् । तेथें उणें कशाचें ॥ १०६ ॥ रहस्य कर्ममार्गाचें । अवघे भाग योगाचे । तेवीं स्वरूप आत्म्याचें । कळलें स्वानुभवें निवृत्तीसी ॥१०७॥ गुरुप्रसाद घेऊन । मातापित्यांसी भेटले जाण । त्यायोगें अवघ्यांकारण । आनंद झाला विबुध हो ॥ १०८ ॥ काळजी मौंजीबंधनाची । निवृत्तीच्या लागली साची । तेणें वृत्ति चैतन्याची । क्षणोक्षणीं उदास ॥ १०९ ॥ परी कोणीहि धरामर । मौंजीस न देती रुकार । तेणें त्रासून अखेर । चैतन्यें केलें यापरी ॥ ११० ॥ निवृत्तीस बाहून समोरी । बोलते झाले मधुरोत्तरीं । मीं खटपट भूवरी । केली तुझ्या मुंजीस्तव ॥ १११ ॥ परी न कांहीं उपयोग झाला । यत्न अवघा वांया गेला । मुलांनो तुमच्या दैवाला । मीं काय करावें ॥ ११२ ॥ आतां सोडून तुम्हांसी । मी जातों वाराणशीसी । सांभाळ आपुल्या भावंडांसी । जननीला दुखवूं नको ॥११३॥ तें ऐकतां रखुमाबाई । बोलती झाली लवलाही । मीहि न आतां येथें राहीं । जिकडे आपण तिकडे मी ॥११४॥ सागराकडे नद्या जाती । प्रभा न सोडी सूर्याप्रति । श्रोते ! उबग येणें रीतीं । उभयतांसी जाहला ॥ ११५ ॥ उभयता गेले काशीस । निवृत्ति राहून आपेगांवास । आपल्या

लहान भावंडांस । सांभाळिते जाहले ।। ११६ ।। शेतीवाडी असा[illegible] । लागलें उपोषण । कां कीं मतलबी अवघे जन । अर्भकातें न जुमानिती ।। ११७ ।। भिक्षाहि न मिळे पुरी । ग्रामीं न कोणी विचारी । त्यांतून वक्रदृष्टि खरी । द्विजवर्गाची यांच्यावर ।। ११८ ।। एके दिवशीं निवृत्ति-नाथ । गोदावरीस जोडून हात । सांगते झाले हृद्गत । स्नानास जातां करुणावचें ।। ११९ ।। गंगे ! आजपर्यंत । तुझ्या तटीं होतों स्थित । आतां मात्र आळंदींत । जाणें भाग आलें ।। १२० ।। कां कीं शेताचे वांटेकरी । वांटणी न देती खरी । ब्राह्मण समाजाभीतरीं । शूद्र आम्हां गणतात ।। १२१ ।। आतां बुद्धि हेंच गोदातीर । सलिल तत्त्वाचा विचार । निश्चयाच्या घांटावर । स्वानुभवस्नान आम्ही करूं ।। १२२ ।। आणि निजानंदाच्या ठायीं । तव कृपे राहूं गंगाबाई । तोच आतां आम्हां पाही । आपेगांव आमुचा ।। १२३ ।। ऐसें स्तवून निघाले । लहान भावंडांसहित आले । इंद्रायणीतटा भले । आळंदीसी निवृत्तिनाथ ।। १२४ ।। कांहीं दिवस आळंदींत । राहिले भावंडांसमवेत । परी आपेगांवासमान तेथ । निंदाच होऊं लागली ।। १२५ ।। आळंदीचे वृद्धजन । बोलले निवृत्तीलागून । सिधोपंतांस आलें मरण । तुमच्याच काळजीनें ।। १२६ ।। आतां उपाय एकचि त्यास । तुम्ही जाऊन पैठणास । घेऊन शुद्धिपत्रास । यावें म्हणजे मुंजी करूं ।। १२७ ।। शुद्धिपत्राविण पाही । आम्हां न कांहीं करतां येई । क्षण एक येथें मुळीं न राही । जा असाच पैठणातें ।। १२८ ।। निरुपाय होऊन । तेंहि वचन केलें मान्य । पैठणक्षेत्रालागून । येते झाले निवृत्ति ।। १२९ ।। एका द्विजाच्या गृहीं भले । बंधूंसहित राहिले । क्षेत्रस्थांना कळविलें । कशासाठीं आलों तें ।। १३० ।। परि कोणीच हो म्हणेना । शुद्धिपत्र मिळेना । समाज किमपि पाहीना । दयार्द्र दृष्टीनें थोडाहि ।। १३१ ।। हे ज्याच्या घरीं होते । ऐशा त्या सद्गृहस्थातें । लागले लोक छळायातें । या चौघांच्या निमित्तानें ।।१३२।। एके दिनीं त्याच्या घरीं । पितृतिथि आली खरी । परि न कोणी स्वीकारी । आमंत्रण तें क्षणाचें ।। १३३ ।। पैठणीं असतां गोदातीरा । निवृत्तीनें ज्ञानेश्वरा । अध्यात्माचा पसारा । उपदेशून कथन केला ।। १३४ ।। ज्ञानेश साक्षात् भगवान् । मग विद्या कराया ग्रहण । लागेल उशीर कोठून । होती तयारी पूर्वीचीच ।। १३५ ।। प्रभाव त्याच्या सामर्थ्याचा । विचार केला पाहण्याचा । तों

या द्विजाच्या संकटाचा । योग आला घडून ॥ १३६ ॥ तैं म्हणूं लागले निवृत्ति । आणीव प्रत्यक्ष पितरांप्रति । सांग याची श्राद्धतिथि । करीव तूं ज्ञानेश्वरा ॥१३७॥ आपुल्यामुळें बिचाऱ्याला । जातीकडून त्रास जाहला । त्रासभूत दुसऱ्याला । होणें हें न कांहीं बरें ॥१३८॥ तें ऐकून ज्ञानेश्वर । करिते झाले चमत्कार । पाटावरी प्रत्यक्ष पितर । आणून बसविले गृहस्थाचे ॥ १३९ ॥ या गोष्टीचा पुकारा । पैठणामाजीं झाला खरा । पाहण्या त्याच्या प्रत्यंतरा । सभा एक जमविली ॥ १४० ॥ मोठमोठे पंडित । ज्या सहा शास्त्रें पारंगत । वैदिक अग्निहोत्री दीक्षित । पुराणिक कथेकरी ॥ १४१ ॥ सुखवस्तु गृहस्थ इतर । ओस पडला बाजार । दुकानें लावून दुकानदार । आले सभा पाहावया ॥१४२॥ ज्या गृहस्थाच्या घरीं । हे होते साक्षात्कारी । त्यांसी सभेमाझारीं । बाहून ऐसा प्रश्न केला ॥ १४३ ॥ तूं भ्रष्ट स्वामीच्या संततीस । ठेवून घेतलें गेहास । हा अपराध छपविण्यास । खोटचा कंडचा कां पिकविसी ॥ १४४ ॥ जिवंत पितर आणण्याचें । सामर्थ्य एक ईश्वराचें । या अजाण अर्भकांचें । स्तोम ऐसें माजवूं नको ॥ १४५ ॥ तै तो म्हणे गृहस्थ । मी खोटें न बोलें किंचित् । ब्रह्मा, विष्णु, उमाकांत । प्रत्यक्ष हीं पोरें पाहा ॥ १४६ ॥ गृहा यांचे पद लागले । तेणें माझें दारिद्र्य गेलें । प्रत्यक्ष पितर भेटविले । यांना अर्भकें म्हणूं नका ॥ १४७ ॥ केवळ जनरूढी रक्षावया । हे आलेत ये ठायां । त्यांसी शुद्धिपत्र देऊनियां । वाटे लावणें हेंच बरें ॥ १४८ ॥ हें ऐकतां पंडितांस । राग आला विशेष । पाहून त्यांच्या नांवांस । कां हें तूं बोलतोसी ॥ १४९ ॥ काय म्हणे हा निवृत्ति । हा ज्ञानेश सन्मति । हा सोपान, ही मुक्ति । अवघा बाजार गप्पांचा ॥ १५० ॥ ऐशा रीतीं गृहस्थाचा । सभेनें उपहास केला साचा । म्हणून निवृत्तीनें बोलण्याचा । आरंभ केला येणें रीतीं ॥ १५१ ॥ तुम्ही अवघे धरामर । विश्वास वेदवाक्यांवर । ठेवून बोलावें साचार । वृथा वलगना करूं नका ॥ १५२ ॥ यच्च किंचित् जगत् सर्वम् । याचें काय आहे वर्म । हें जाणा सारून भ्रम । आयुष्य उगें घालवूं नका ॥ १५३ ॥ तैं पंडित म्हणती, हे पोरा ! । एवढें पाठ करून घरा । आलास कां रे ! उत्तरा । द्यावयासी आम्हांपुढें ॥ १५४ ॥ सोंग घेऊन जंबुकानें । सिंहसभेसी कदा न येणें । त्यानें स्वजातिया दावणें । बडिजाव उसन्या कातडयाचा ॥१५५॥ ऐसा

उपहास होतां क्षणीं। ज्ञानेश्वर निवृत्तीस वंदोनी। उभे जागींच राहुनी। बोलूं लागले विनयानें ॥ १५६ ॥ 'ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या'। ऐसें तुम्हीच सांगतां। आणि मागून उपहासितां। तें ज्यानें जाणलें त्यासी ॥ १५७ ॥ सद्गुरुराय निवृत्ति। साक्षात् ब्रह्म निश्चितीं। तुम्हीहि अवघे याच रीतीं। भ्रम सारिल्या व्हाल हो ! ॥ १५८ ॥ 'अणोरणियां' मंत्रांत। वेद अवघ्यां सांगत। कीं स्थावरजंगमांत। एक परमात्मा भरला असे ॥१५९॥ आणि तें जाणण्यासाठीं। ह्या श्रुतिस्मृतींच्या खटपटी। द्वैताची कल्पना खोटी। अद्वैत सिद्धान्त एक खरा ॥१६०॥ या खोटया द्वैताचें। ग्रहण शास्त्रीं केलें साचें। तें केवळ खऱ्याचें। प्रत्यंतर तें दावावया ॥ १६१ ॥ दृङ्मात्र वस्तु ब्रह्म चैतन्य। साक्षात् निवृत्ति दयाघन। तुम्ही आम्ही आहों स्फुरण। याच सद्गुरुरायाचें ॥ १६२ ॥ जिवंत पितर आणविणें। अशक्य न कांहीं याकारणें। कां कीं स्थान याच्याविणें। पितरांसी नसे आन ॥ १६३ ॥ हें मी स्वानुभवें सांगतों। उग्या न गप्पा मारितों। हें न मी गर्वे बोलतों। वृथा बडिजाव दावावया ॥ १६४ ॥ तुम्ही शास्त्रवेत्ते पंडित। आम्ही तिघे तुमचे छात्र। वडिलांनीं अर्भकांप्रत। दुरुत्तरें ताडूं नये ॥१६५॥ सत्यासत्य पाहावें। असत्य असल्या शिकवावें। ऐसें शास्त्र सांगतें बरवें। नीतिदर्शक सभ्य हो ॥ १६६ ॥ घटमठांच्या ठायीं। आकाश निराळें नाहीं। उपाधीनें चित्ताठायीं। अज्ञानी भेद वाटतो ॥ १६७ ॥ हें अज्ञान सारावें। भेदबुद्धीस टाकावें। सच्चिदानंदा ओळखावें। तरीच साफल्य जन्माचें ॥ १६८ ॥ ऐसें होतां एक पंडित। बोलला उठून सभेंत। हें पोर बोलकें बहुत। शब्दानुभवी, समजलें ॥ १६९ ॥ हे वेडया ! अजाण पोरा ! । मंदबुद्धि ज्ञानेश्वरा ! । स्वानुभवसुखाचा बोजवारा। उगा व्याख्यानें करूं नको ॥ १७० ॥ मागें गोकुळीं कृष्णनाथ। ऐसें म्हणाला गोपांप्रत। मीच अग्नि साक्षात्। माझें यजन करा हो ॥ १७१ ॥ तें ऐकतां गोप हंसले। आणि कृष्णाप्रति म्हणाले। हें आमुच्या पाहिजे आणलें। नंदसुता ! अनुभवा ॥ १७२ ॥ तैं अवघ्यांचें समाधान। करायाकारण। बारा गांवें अग्नि दारुण। गिळोनिया दाविला ॥१७३॥ तैसें तूं कांहीं करावें। आणि मग व्याख्यान सांगावें। शक्तीविण बोलूं नये। कांहींच तें केव्हांहि ॥ १७४ ॥ दुसरा म्हणाला त्यावर। हा रेडा येतो समोर। यास आपण देऊं मार। प्रत्यंतर

तें पाहावया ॥ १७५ ॥ जीवात्मा एक अवघ्यांचा । ऐशी याची बोलली वाचा । वळ रेड्याच्या माराचा । यानें निज देहीं दाखवावा ॥ १७६ ॥ ऐसें बोलून ताडिलें । त्या हलगटालागीं भलें । त्या माराचे वळ उठले । ज्ञानेश्वरांच्या पाठीसी ॥ १७७ ॥ तें पाहून मुक्ता भ्याली । सभेस बोलूं लागली । ही पाहा प्रचीति आली । रेड्यास आतां मारूं नका ॥१७८॥ ज्ञानेश्वराच्या पाठीचे । वळ लोकांनी पाहिले साचे । परी कांहीं तार्किकांचें । येणें न झालें समाधान ॥ १७९ ॥ ते म्हणाले ऐशा परी । हे गारुडी करितो बाजारीं । जरि हा रेड्यास बोलका करी । तरी तें मानूं साच आम्ही ॥ १८० ॥ रेडा सभेंत आणविला । ज्ञानेश्वरांपुढें उभा केला । आणि म्हणाले बोलीव याला । म्हणजे अवघेंच संपलें ॥ १८१ ॥ ऐसें बोलतां धरामर । ज्ञानेश झाले चिंतातुर । निवृत्तीच्या पायांवर । डोई आपुली ठेविली ॥ १८२ ॥ आणि म्हणाले भीत भीत । रेडा हा बोलल्या येथ । स्तोम माजेल जगांत । माझें याला काय करूं ॥ १८३ ॥ ऐशी शक्ति आणणें अंगीं । हाच परमार्थ म्हणतील जगीं । सिद्धाईला येईल उगी । प्रतिष्ठा ती वस्तुहून ॥ १८४ ॥ ज्ञानेश्वराचें मनोगत । जाणते झाले निवृत्तिनाथ । डोक्यावर ठेवूनि हात । बोलूं लागले बंधूसी ॥ १८५ ॥ हे वत्सा, ज्ञानेश्वरा ! । तुझी सत्य आहे गिरा । परी हा भ्रमपसारा । याविण न विलया जाय ॥ १८६ ॥ हे अवघेच शब्दज्ञानी । स्वानुभवाचा नाहींच कोणी । जन्मांधास वासरमणि । प्रकाश करी हें न वाटे खरें ॥ १८७ ॥ बोलीव रेडा सभेंत । हे गुरु अवघे पंडित । तुझी परीक्षा पाहण्याप्रत । समज उदाहरण घालिती हें ॥ १८८ ॥ मीं तुजला शिकविलें । हे परीक्षा घ्यावयास आले । यांत यांनीं काय केलें । वांकडें तें सांग पां ॥ १८९ ॥ शिवाय एक्याच चित्तांत । तर्कवितर्क उठतात । तेथें कां मानिशी द्वैत । तैसेंच वत्सा, आहे हें ॥ १९० ॥ चित्तचि कुतर्क घेतें । आणि चित्तचि परिहार करितें । तें निज अलिप्तपणातें । केव्हांहि न टाकित ॥ १९१ ॥ म्हणून विलंब न करावा । संशय यांचा फेडावा । रेड्यामुखें बोलवावा । शास्त्रविषय कांहीं तरी ॥ १९२ ॥ ऐशी आज्ञा होतां क्षणीं । पाहिलें कृपादृष्टींनीं । त्या हलगटालागुनी । सभेमाजीं ज्ञानेश्वरें ॥ १९३ ॥ त्या सत्कृपेनें भला । पशु असून ज्ञानी झाला । हलगटानें शीघ्र केला । या चौकडीस नमस्कार ॥ १९४ ॥ मग ज्ञानेशें

तया स्थाना । सभेस केली विचारणा । कीं या हेल्यानें व्याकरणा । वा तर्क-अध्यात्मा सांगावें ॥ १९५ ॥ भवति न भवति होऊन । अखेर अवघ्यांनीं ठरविलें जाण । कीं या हेल्याच्या मुखांतून । वेदाक्षरें वदवावीं ॥ १९६ ॥ फार बरें ऐका आतां । तुम्ही ऋग्वेदसंहिता । शुद्धाशुद्ध पाहण्याकरितां । पोथ्या हातांत घ्याव्या हो ॥ १९७ ॥ ऐसें बोलतां-क्षणीं । उपहास केला कित्येकांनीं । भाविकजन घेऊनी । पोथ्या हातीं बैसले ॥ १९८ ॥ हलगटाच्या शिरीं हात । ठेवून म्हणाले ज्ञाननाथ । बोल बापा अस्खलित । ऋग्वेद तो स्वरांसह ॥ १९९ ॥ मग उशीर कोठला । रेडा ऋग्वेद बोलला । देव बैसून विमानाला । आले अंतरिक्षांत ॥ २०० ॥ पशुमुखें ऐकिली । श्रुति, सभा थक्क झाली । निंदकांची उडाली । फजीती ती सोळा आणे ॥ २०१ ॥ अवघे निरभिमान झाले । ज्ञानेश्वरासी शरण आले । भाविक लोळूं लागले । संतांचिया पायांवरी ॥ २०२ ॥ अवघ्यांनीं केला जयजयकार । तुळशी, गुलाल, अबीर । उधळिला निवृत्तिनाथांवर । सद्गुरु जाणून अध्यात्माचे ॥ २०३ ॥ शुद्धिपत्राची जरुरी आतां । तुम्हां न राहिली सर्वथा । मर्जी असल्या आम्हीच आतां । मुंजी तुमच्या लावितों ॥२०४॥ तुम्ही हरीहरांचे अव-तार । धन्य आमुचें गोदातीर । तुमचें आपेगांव नगर । गोकुळ अयोध्या कलियुगीं ॥२०५॥ धरामरांनीं लिहून दिलें । हीं असामान्य आहेत बाळें । यांनीं खचित भूषविलें । या आमुच्या महाराष्ट्रा ॥ २०६ ॥ हे ब्रह्मचि साक्षात् । यांच्या दर्शनीं कृतार्थ । गायत्रीच्या मूर्तिमंत । प्रतिमाच या अवतरल्या ॥ २०७ ॥ कोणताहि संस्कार । यांसी नको साचार । ऐसें बोलून कागदावर । धरामरांनीं केल्या सह्या ॥ २०८ ॥ मग निवृत्ति-नाथानें । ज्ञानेश्वराकारणें । ऐसें केलें बोलणें । तें ऐका विबुध हो ॥२०९॥ मिळालें आपणां शुद्धिपत्र । आतां मुंजीच्या आग्रहांत । पडूं नये, वाटे व्यर्थ । कर्मपरंपरा बुडवावया ॥ २१० ॥ आपुल्या मुंजी झाल्यास । उदा-हरण होईल पुढल्यांस । आणि संन्यास दीक्षेस । येईल समज कमीपणा ॥ २११ ॥ वत्सा, आपुल्या वडिलांनीं । केवळ सद्गुर्वाज्ञेंकरुनी । संन्यास दीक्षा टाकुनी । गृहस्थाश्रम केला हा ॥ २१२ ॥ कायद्याची सवलत । दिधल्याहि यत्किंचित । गुन्हे होणार असंख्यात । येविषयीं शंका नसे ॥ २१३ ॥ अपरिहार्य अडचणींनीं । वा विशेष कारणांनीं । वान

कळत करांनीं। अपराध घडल्या सवलत योग्य ॥ २१४ ॥ मतलबी जाणून बुजून करिती। अपराध ज्ञानेश्वरा, जगतीं। आणि शिक्षा न व्हावी म्हणून इच्छिती। सवलतीच्या सवडीतें ॥ २१५ ॥ तें ज्ञानेश्वरासी मानलें। चौघे नेवाशास आले। तट प्रवरेचे पाहिले। श्रीमोहिनीराज वंदावया ॥ २१६ ॥ नेवाशास येतांक्षणीं। सच्चिदानंद कुलकर्णी। मेला त्यास परतोनी। ज्ञानेश्वरें सजीव केलें ॥ २१७ ॥ श्रोते, याच क्षेत्रांत। ज्ञानेश्वरें रचला ग्रंथ। शके बाराशें बारांत। भावार्थदीपिका नांव ज्याचें ॥ २१८ ॥ हा सच्चिदानंदबाबांनीं। लिहिला सुवाच्य अक्षरांनीं। जो ज्ञानेश्वरी म्हणूनी। ख्यात आहे सांप्रत ॥ २१९ ॥ तेथून आले आळंदीस। मध्यें आळ्याबेल्ह्यास। पोचविला निजधामास। टोणगा जो बोलला श्रुति ॥ २२० ॥ शुद्धिपत्र पाहूनी। आळंदीच्या द्विजांनीं। केला बहुत प्रकारांनीं। गौरव या चौकडीचा ॥ २२१ ॥ परी विसोबा खेचराला। तो गौरव नाहीं पटला। जैसें सूर्यप्रकाशाला। घुबडवाघुळें निंदिती ॥ २२२ ॥ श्रोते! एक्या दिपवाळींत। मुक्ता मांडे भाजण्याप्रत। गेली कुलालवाड्यांत। खापर आणायाकारणें ॥ २२३ ॥ मध्यें विसोबा भेटला। त्यानें ताडून मुक्ताईला। खापराचा तुकडा केला। हातांतील काठीनें ॥ २२४ ॥ तुम्ही भ्रष्ट भूमंडळीं। तुम्हां कशाची दिपवाळी। सूकरानें कां कधीं केली। नंदनवनाची आस मुक्ते ॥ २२५ ॥ मुक्ताईचा निरुपाय झाला। रडत आली गृहाला। साकल्येंसी कळविला। बंधूस पर्थीचा समाचार ॥ २२६ ॥ विसोबा चाटी आडून। पाहत होता डोकावून। तें ज्ञानेश्वरें जाणून। कौतुक केलें येणें रीतीं ॥ २२७ ॥ " मीं हा पाठीचा तवा केला। मुक्ते, तुज मांडे भाजण्याला। " जठराग्नि प्रदीप्त झाला। ज्वाळा चालल्या मुखावाटे ॥ २२८ ॥ तें खेचरें पाहून। ज्ञानेश्वरास गेला शरण। पुढें हें अवघें वर्तमान। चांगदेवासीं समजलें ॥ २२९ ॥ त्यानें त्यांना भेटण्याची। केली तयारी शीघ्र साची। परी बुद्धि ऐकून शिष्यांची। निज बेत फिरवीला ॥ २३० ॥ शिष्य चौदा हजार। बोलते झाले जोडून कर। आपण केवढे आहां थोर। चौदाशें वर्षें वांचलां ॥ २३१ ॥ अष्टसिद्धि अंगणीं। तुमच्या हात जोडुनी। कल्पद्रुम, चिंतामणि। तुमच्यापुढें तुच्छ असे ॥ २३२ ॥ निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान। हीं कालचीं पोरें अजाण।

लोकवार्तेस ऐकून । श्रेष्ठ त्यांना मानूं नका ।। २३३ ।। पैठणींचा अवघा प्रकार । आहे गप्पांचा बाजार । ती बुवाबाजी साचार । विश्वास न ठेवा त्यावरी ।। २३४ ।। तें चांगदेवा मानलें । वाघाचें खोगीर उतरलें। चित्त मात्र आतुर झालें । ज्ञानेश्वरांसी भेटावया ।। २३५ ।। ऐशी चांगदेवा भली । आड-विहीर श्रोते जाहली । शेवटीं एक योजिली । पत्र लिहिण्याची युक्ति तया ।। २३६ ।। कागद घेऊन हातांत । चांगदेव बैसला निवांत । म्हणे चिरंजीव यांप्रत । लिहिणें कांहीं योग्य नव्हे ।। २३७ ।। त्यानें रेडा बोलविला । हा कां अधिकार लहान झाला । चौदाशें वर्षे जगून मला । तो न झाला प्राप्त कीं ।। २३८ ।। तीर्थरूप लिहिलें जरी । तो वयानें लहान परी । ऐसें म्हणून अखेरी । कोराच कागद धाडिला ।। २३९ ।। उत्तराची वाट पाहत । चांगा तापीतटीं स्थित । इकटे कागद आळंदींत । शिष्य घेऊन पातला ।। २४० ।। लखोटा फोडण्याच्या आधीं । बोलते झाले ज्ञाननिधि । कोरेंच पत्र कोणीं कधीं । नाहीं लिहिलें आजवर ।। २४१ ।। तैं म्हणाले निवृत्तिनाथ । यांत न झालें विपरीत । खराच कोरा करकरीत । आहे चांगदेव वत्सा रे ! ।। २४२ ।। या कोऱ्या कागदावरी । अध्यात्माची पुस्ती खरी । काढून दाव लौकरी । कृतार्थ करण्या चांगदेवा ।। २४३ ।। आज्ञा प्रमाण मानून । ज्ञानेश्वरें केलें लेखन । तेंच हें पासष्टी प्रकरण । जीव-ब्रह्माचें ऐक्य ज्यांत ।। २४४ ।। पत्र वाचून पाहिलें । चांगदेवा कांहीं न कळलें। म्हणून शीघ्र येणें केलें । आळंदीस बैसून वाघावरी ।। २४५ ।। तो तदभिमान घालवावया । कौतुक केलें ते ठायां । चौघे भिंतीवर बैसोनिया । आले सामोरें चांगयासी ।। २४६ ।। निर्जीव भिंत चालली । ही गोष्ट जेव्हां पाहिली । तै चांगदेवाची झाली । वृत्ति अवघी निरभिमान ।। २४७ ।। पासष्टीचें वर्म कळलें । चांगदेव ज्ञानी झाले । ज्ञानेश्वराच्या कृपें भले । अनुपम ग्रंथ पासष्टी ।। २४८ ।। असो, हा ज्ञानेश ज्ञानसविता । झाला लोकदृष्टीनें मावळता । इंद्रायणीकांठीं तत्त्वतां । आळंदी नामें क्षेत्रांत ।।२४९।। सोपानदेव सासवड नगरीं । मुक्ताबाई तापीतीरीं । निवृत्तिनाथ त्र्यंबकेश्वरीं । समाधि घेऊन राहिले ।।२५०।। त्या चौघांच्या चरणांसी । नमन माझें अष्टांगेसी । कृपादृष्टीनें दासगणूसी । करा महाराज अवलोकन ।। २५१ ।। श्रीहरिहरार्पणमस्तु ।। शुभं भवतु ।।